# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।

पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



**संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.**


पुस्तक ३ रें.] सप्तेंबर १९१०. [अंक २ रा.


## विषयानुक्रम.


| विषय. | पृष्ठांक. |
| --- | --- |
| १ ऐतिहासिक चरित्रें. ... ... ... ... ... ... | ५७–६८ |
| २ ऐतिहासिक संस्मरणीय वस्तू. ... ... ... ... | १–४ |
| ३ तंजावरचें राजघराणें. ... ... ... ... ... | ५५–६० |
| ४ होळकरदरबारांतली हिंगण्यांची वकिली. (मुखपृष्ठ) | |
| ५ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें भाग २ रा. ... ... ... | १७–३२ |
| ६ ऐतिहासिक टिपणें भाग ३ रा. ... ... ... ... | १–८ |

चित्रें—१ तंजावरचा राजा तुकोजी. २ नालकी. ३ बादशाही पंजे.





मुंबई येथें

**तुकाराम जावजी ह्यांनीं**

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

## 'काव्यसंग्रहग्रंथमालें'तून छापून प्रसिद्ध झालेले ग्रंथ.

| | किं. | ट. ख. |
|---|---|---|
| **मोरोपंतकृत महाभारत**—१ आदिपर्व. ... ... ... | १। | ɕ-॥ |
| **मोरोपंतकृत महाभारत**—२ सभापर्व. ( आवृत्ति दुसरी. ) | ·।= | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—३ वनपर्व. ... ... ... | १॥ | ɕ≡ |
| **मोरोपंतकृत महाभारत**—४ विराटपर्व. ... ... ... | ·॥।= | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—५ उद्योगपर्व. ... ... ... | १॥। | ɕ= |
| **मोरोपंतकृत महाभारत**—६ भीष्मपर्व. ... ... ... | ·॥।· | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—७ द्रोणपर्व. ... ... ... | १। | ɕ-॥ |
| **मोरोपंतकृत महाभारत**—८ कर्णपर्व. ... ... ... | २ | ɕ=॥ |
| **मोरोपंतकृत महाभारत**—९ शल्यपर्व. ... ... ... | ·।= | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—१० गदापर्व. ( यांतच सौप्तिक आणि ऐषिक या पर्वांचा अन्तर्भाव झाला आहे. ) ... ... | १। | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—११ स्त्रीपर्व ... ... ... | ·।= | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—१२ शांतिपर्व. (आवृत्ति दुसरी.) | ·॥· | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—१३ अनुशासनपर्व. ... ... | ·॥।· | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—१४ अश्वमेधपर्व. ... ... | १ | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—१५ आश्रमवासिकपर्व. ... | ·॥· | ɕ- |
| **मोरोपंतकृत महाभारत**—१६ मौसलपर्व, १७ महाप्रस्थानिकपर्व, १८ स्वर्गारोहणपर्व. ... ... ... ... | ·॥· | ɕ- |
| **मोरोपंतकृत रामायणें**—भाग पहिला. या भागांत 'मात्रा,' 'नामांक,' 'मंत्रमय,' 'बालमंत्र,' व 'मंत्र,' हीं पांच रामायणें अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसुद्धां आलीं आहेत. | १ | - |
| **मोरोपंतकृत रामायणें**—भाग दुसरा. या भागांत प्रथमस्तोत्र, द्वितीयस्तोत्र, तृतीयस्तोत्र, चतुर्थस्तोत्र, पंचमस्तोत्र, षष्ठस्तोत्र सप्तमस्तोत्र, अष्टमस्तोत्र, नवमस्तोत्र, दशमस्तोत्र ( या दहा स्तोत्रांमध्यें विष्णुसहस्रनामावलि आली आहे. ), शिवरामायण (प्रथम व द्वितीय), उमा, काशी, प्रयाग, गंगा, तीर्थ, ऋषि, राज, सन्नाभगर्भ, परंतु, लघु, निरोष्ठ, दाम, हनुमद्रामायण, दीर्घरामायण, ( दिव्यरामायण, ) हीं २६ रामायणें अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसुद्धां आलीं आहेत. | २ | ɕ≡ |



तंजावरचा राजा तुकोजी.

(इ. स. १७२८–इ. स. १७३५.)

# ७. पिलाजी जाधवराव.

अठराव्या शतकाच्या प्रथमार्धामध्यें, मराठी साम्राज्याची टोलेजंग इमारत उभारण्याचे कामीं, ज्या थोर महाराष्ट्रपुरुषांचे अद्वितीय पराक्रम कारणीभूत झाले, त्यांतील प्रमुखांपैकीं कांहींचीं चरित्रें मराठी भाषेमध्यें प्रसिद्ध झालीं आहेत. परंतु त्यांपैकीं पुष्कळ शूर पुरुषांचीं चरित्रें व त्यांच्या पराक्रमकथा महाराष्ट्रास अद्यापि अविश्रुत आहेत. अशा वीररत्नांपैकीं पिलाजी जाधवराव हे एक होत. ह्यांचें अलौकिक रणशौर्य, अचाट साहस, अपूर्व स्वाभिमान, आणि निस्सीम स्वामिभक्ति इत्यादि अनेक गुण, त्या वेळच्या महाराष्ट्राच्या मनोरम आणि वीररसपूरित इतिहासांत विशेष चमकत असून, त्यांनीं त्या कालांतील ऐतिहासिक कथारसास एक प्रकारचें अपूर्व हृदयंगमत्व आणिलें आहे. भाग्यशाली शाहूमहाराज, राजकार्यधुरंधर बाळाजी विश्वनाथ, रणपटु थोरले बाजीराव आणि कारस्थानी बाळाजी बाजीराव ह्यांच्या कारकीर्दींचें सूक्ष्म रीतीनें पर्यालोचन केलें, तर त्यांतील बराच भाग, पिलाजी जाधवराव, मल्हारराव होळकर आणि राणोजी शिंदेप्रभृति तरुण व नव्या दमाच्या मराठे सरदारांच्या शौर्यकृतींनीं भरला आहे, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु दुर्दैवानें, ह्या शौर्यशाली पुरुषांचीं साधार व सविस्तर चरित्रें प्रसिद्ध नसल्यामुळें, त्यांच्या पराक्रमाचें तेज अस्तंगत झालें आहे. त्यांच्या संबंधाचे सर्व अस्सल कागदपत्र उपलब्ध होऊन त्यांचीं विस्तृत चरित्रें कधीं प्रसिद्ध होतील तो सुदिन होय. परंतु त्या अभावीं, त्यांच्या संबंधाची उपलब्ध माहिती एकत्र करून, आह्मीं त्यांची रूपरेखा येथें सादर करण्याचें योजिलें आहे. तिच्यावरून ह्या इतिहासप्रसिद्ध महाराष्ट्रवीरांची थोरवी व्यक्त होऊन, त्यांच्या विस्तृत चरित्रांचीं साधनें शोधून काढण्याकडे व त्यांची प्रसिद्धी करण्याकडे जिज्ञासु वाचकांचें लक्ष लागेल, अशी आह्मांस आशा आहे.

पिलाजी जाधवराव हे सुप्रसिद्ध जाधवकुलांत जन्मले असून, यांचें घराणें महाराष्ट्रांत फार प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे.* देवगिरीचे यादवराजे व

* पिलाजी जाधवराव ह्यांचें घराणें "वाघोलीकर जाधव" ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ह्यांचा धनाजी जाधवाच्या घराण्याशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं. धनाजी जाधवराव ह्यांचें घराणें माळेगांवकर जाधव ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. पिलाजी जाधवराव व धनाजी जाधवराव ह्या दोन्ही पुरुषांनीं महाराष्ट्राच्या इतिहासांत आपली कीर्ति अजरामर करून ठेविल्यामुळें हीं

पिलाजी जाधवरावांचे पूर्वज यांचा संबंध कसा होता, तें समजण्याचें साधन राहिलें नाहीं. तथापि, त्या सर्वमान्य यादवकुलाचीच ही एक शाखा असावी असा तर्क आहे. पिलाजी जाधव यांच्या पूर्वजांची विशेष माहिती मिळत नाहीं. त्यांचे वडील चांगोजी जाधव हे अठराव्या शतकाच्या प्रारंभीं पुणें जिल्ह्यांतील वाघोली गांवचें पाटिलकीचें वतन उपभोगीत होते. त्यांस पिलाजी व संभाजी असे दोन पुत्र होते. त्यांपैकीं पिलाजी जाधव हे भाग्यवान् निपजून मराठ्यांच्या इतिहासांत लवकरच प्रसिद्धीस आले. इ. स. १७०७ सालीं औरंगजेब बादशाहा मृत्यु पावल्यानंतर छत्रपति शाहूमहाराज हे बंधमुक्त होऊन स्वराज्य घेण्यासाठीं दक्षिणेंत आले. त्या वेळीं त्यांस धनाजी जाधव, हैबतराव निंबाळकर, खंडेराव दाभाडे, मानसिंग मोरे, परसोजी भोंसले, चिमणाजी दामोदर, खंडो बल्लाळ वगैरे मंडळी साहाय्य करण्यास उद्युक्त झाली, त्यांमध्येंच पिलाजी जाधव हे एक होते असें दिसतें. इ. स. १७०८ पासून इ. स. १७१४ पर्यंत महाराष्ट्रामध्यें बरीच अस्वस्थता होती. या कालामध्यें पिलाजी जाधव हा एक तरुण महाराष्ट्र वीर केवळ स्वपराक्रमानें उदय पावून शाहूमहाराजांचे नजरेपुढें आला. इ. स. १७१३ मध्यें चंद्रसेन जाधव व बाळाजी विश्वनाथ यांच्यामध्यें चुरस उत्पन्न होऊन, ज्या वेळीं चंद्रसेन जाधवानें आपले घोडेस्वार बाळाजीचे मागें लाविले व पांडवगडच्या किल्ल्याजवळ त्यास अडवून धरिलें, त्या वेळीं बाळाजी विश्वनाथाचे दोन लहान शिलेदार इरेस पडून, त्याची मुक्तता करण्यास पुढें सरसावले. ते पिलाजी जाधव व यमाजी धुमाळ हे होत. पांडवगडच्या बिकट प्रसंगीं या दोन शिलेदारांनीं असा पण केला होता कीं, बाळाजी विश्वनाथाची व त्याच्या मुलांची शत्रूपासून सुटका करून किल्ल्याच्या माचीमध्यें त्यांना सुरक्षित रीतीनें नेऊन ठेऊं, किंवा आपले प्राण धारातीर्थीं अर्पण करूं. त्याप्रमाणें ह्या दोन बाणेदार शिलेदारांनीं आपला पण सिद्धीस नेला. त्यांनीं थोडेसे निवडक घोडेस्वार जमवून शत्रूशीं हातघाईची लढाई केली, आणि त्याचा मोड करून बाळाजी विश्वनाथ व त्याचे पुत्र यांचे प्राण रक्षण केले. याप्रमाणें पिलाजी जाधव यांच्या कर्तबगारीस प्रारंभ झाला. यानंतर पिलाजीची दुसरी महत्त्वाची कामगिरी म्हणजे हिंगणगांवच्या दमाजी थोरातांचें पारिपत्य व बाळाजी विश्वनाथ व आबाजी पुरंदरे यांची गढींतून सुटका ही होय. इ. स. १७१६ मध्यें दमाजी थोरातानें पुंडावा करून

दोन्हीं घराणीं महाराष्ट्रांत सारखींच प्रसिद्ध आहेत. नामसादृश्यावरून तीं एक असावींत असा इतिहासवाचकांचा गैरसमज होण्याचा संभव आहे. परंतु तीं अगदीं वेगवेगळीं आहेत हें मुद्दाम कळविणें इष्ट आहे.

बाळाजी विश्वनाथास विश्वासघातानें हिंगणगांवच्या गढीमध्यें कैद केलें. त्या वेळीं पिलाजी जाधव ह्यांनीं मोठे शौर्यानें हिंगणगांवच्या गढीवर चाल करून, दमाजी थोराताचा पूर्ण पराभव केला, आणि त्यास कैद करून सातारच्या छत्रपतींपुढें नेऊन उभें केलें. अशा रीतीनें पिलाजी जाधव ह्यांची कर्तृत्वशक्ति बाळाजी विश्वनाथ व छत्रपति शाहूमहाराज यांच्या पूर्ण नजरेस आली, व त्यांनीं त्यांजवर संतुष्ट होऊन, त्यांस पुणें प्रांतीं, मौजे दिवें हें गांव व मौजे नांदेड येथील स्वराज्यअंमल इनाम दिला. अशा रीतीनें पिलाजी जाधवराव हे एक लहानसे सरंजामी सरदार बनून महाराष्ट्रवीरमंडळांत चमकूं लागले.

पिलाजी जाधवराव यांनीं, बाळाजी विश्वनाथ पेशवे यांचे कारकीर्दींत जीं पराक्रमाचीं व शौर्याचीं कामें केलीं, त्यांची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. तथापि, थोरले बाजीराव पेशवे व त्यांचे चिरंजीव बाळाजी बाजीराव पेशवे यांचे कारकीर्दींत त्यांनीं जीं शौर्यपराक्रमाचीं कामें केलीं व जो लौकिक संपादन केला, त्याबद्दल त्रोटक माहिती उपलब्ध होते. पिलाजी जाधवराव हे बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्या बरोबर दिल्लीच्या स्वारीस गेले होते. तेथून आल्यानंतर त्यांस शाहूमहाराजांनीं जमखिंडी, चिकोडी, वाशी व कुंभोज या प्रांतांचा सुमारें पंचेचाळीस हजारांचा मोकासा अंमल दिला. इ. स. १७२३ पासून पिलाजी जाधवराव हे मराठ्यांच्या प्रत्येक महत्त्वाच्या मोहिमीमध्यें असल्याचें दिसून येतें. बाजीराव व चिमाजी आपा या दोघांचाही पिलाजीवर विशेष भरंवसा असून, ते पिलाजीची हरएक युद्धप्रसंगांत व बिकट राजकारणांत सल्लामसलत घेत असत. इ. स. १७२४ मध्यें कंठाजी कदम व त्याचा भाऊ रघोजी कदम यांस अनुकूल करून घेऊन, त्यांस हत्ती बक्षीस द्यावा ह्मणून पिलाजीरावानें बाजीरावांस सूचना केली होती. ती त्यांनीं मान्य केली व त्यांस लिहिलें कीं, "लिहिल्याप्रमाणें मान्य केलें. राजश्री कंठाजी कदम येथें आल्यावरी देऊं. सरंजामाची बोली जे तुह्मीं केली असेल, तेणेंप्रमाणें चालवूं. परंतु या समयांत पांच सातशें जे फौज येईल तेवढ्यानिशींच, परंतु कंठाजी नांवास आलियानें पुरें. हत्ती ते आलियावर देऊं. तुह्मी येविषयीं दरमियान रहाणें. त्याची निशा करणें." दुसऱ्या पत्रांत बाजीराव लिहितात —"हत्ती आतांच द्यावा ह्मणून लिहिलें. त्यास, द्यावयाचें कांहीं संकट नव्हतें. तो हत्ती त्यांनींच दिल्हा, तेव्हांच चिरंजिवाचे नांवें आह्मीं दिला. त्यांत राजश्री कंठाजी कदम येतील आणि त्यांस हत्ती नवाबापासूनच देऊं. ह्मणजे हत्तीही दिल्हासा होतो, आणि लौकिकही होतो. आणि हें तुमचे व राजश्री अंबाजीपंत यांचे चित्तांत येत नसेल, व रघोजीस तोच पाहिजेसा असला, तरी मग उपाय काय? जें तुह्मी उभयतां बोललेस,

तें खरें न करावें तरी काय करावें? येथें नवाबापासून हत्ती, ते आलियावर द्यावासा बोली करून ठेविली आहे. यांत विचारें जे उत्तम दिसेल तें करणें. उद्यां अगर परवां आह्मीही लष्करास येतों. तुह्मी लोकांस निरोप देतां ह्मणून ऐकिलें. त्यास, तुमचे लोक गेलियावर लष्कर कैसें राहेल? यांत लष्करास निरोप द्यावा ऐसें तुमचे उभयतांचे चित्तास आलें असेल, तरी आह्मी आलियावर भलते गोष्टीची वाट काढून निरोप द्यावयाचा. त्यास, ते उठण्यांत विचारास येईल. लष्करचा गाहा न उठे, तें करणें. आह्मी आपले वाईट बुद्धीनें यांस भेटलों; करूं नये तें केलें; आतां तुह्मी तरी सारे विचार चित्तांत आणून एवढें............करावें. मग पुढें कांहीं तरी होऊं! उपास अत्रास करूं नये. वेळेस बाहेर शरम राहे तें करावें. एक चुकले तरी दुसरीयानें सांवरावें. यांत जें तुह्मांस योग्य तें कराल. सर्व लष्करचा ओढा तुह्मांसच ओढणें लागेल." ह्यावरून पिलाजी जाधवराव यांची योग्यता पेशवे किती मानीत होते, तें चांगलें नजरेस येतें.

इ. स. १७२४ मध्यें औरंगाबाद प्रांतीं मराठ्यांनीं, आपला अंमल बसविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु खुद्द निजाम, औरंगाबाद येथें रहात असलेमुळें मराठ्यांना त्या प्रांतांत वसूल करण्यास फार अडचण येत असे. तेव्हां, बाजीराव पेशवे यांनीं आपल्या सरदारांजवळ असे उद्गार काढले कीं, औरंगाबाद प्रांतींचा वसूल सुरळीतपणें जमा करण्यास कोणी समर्थ नाहीं काय? तेव्हां पिलाजी जाधवराव यांनीं श्रीमंतांस विनंति केली कीं, औरंगाबाद प्रांतींचे महाल येथील बाबती सरदेशमुखीचा अंमल व मोकाशाच्या सनदा मला करून दिल्यास मी अंमल बसवितों. हें ऐकून श्रीमंतांनीं तिकडील महालांचा मोकासे अंमल पिलाजी जाधवराव यांचे फौजेच्या खर्चास लावून देण्याचें मान्य केलें. पुढें पिलाजी जाधवराव यांनीं औरंगाबाद प्रांतीं जाऊन व कट्टी मेहेनत करून, तिकडे मराठ्यांचा अंमल बसविला. त्यांनीं शके १६४६ ता. २५ सव्वाल रोजीं, मोंगलाई दिवाण विसाजीपंत पेशकार यांचे विद्यमानें, बाबती सरदेशमुखीचा अंमल घेतला, व त्याच वर्षीं परगणे भोकर्दन येथील देशमुखी मिळविली. या कामीं पिलाजी जाधवराव यांनीं घोड्यास उलटे नाल मारून दोन दोन महिने घोड्याचें खोगीर उतरलें नाहीं. अशा प्रकारें कष्टमेहेनत केली, ह्मणून पेशवे संतुष्ट होऊन, त्यांनीं त्यांस, औरंगाबाद प्रांतीं कन्नड, फुलमरी वगैरे नऊ महालांचा सुमारें दीड लक्ष रुपयांचा मोकासे अंमल इनाम करून दिला. याच समयीं पिलाजी जाधवराव यांचें राजकारणचातुर्य पाहून, निजाम उल्मुल्क यांनीं चाकण परगण्यांतील गोळेगांव व मर्कळ हे दोन गांव इनाम करून दिले. या इनामाच्या सनदेंत, "पादशाही

कामकाजाविषयीं बहुत पसंती, जाहिरींत आली," असे उद्गार काढले आहेत. यावरून पिलाजी जाधवराव यांनीं निजामाकडील राजकारणांत आपलें मुत्सद्दीपण चांगलेंच व्यक्त केलें असावें, हें सिद्ध होत आहे.

इ. स. १७२८ मध्यें पिलाजी जाधवराव हे चिमाजी आपा पेशवे ह्यांच्या बरोबर माळव्याच्या स्वारीस गेले होते. तेथें त्यांनीं माळव्याचा सुभेदार दयाबहादूर याजबरोबर उज्जनीजवळ युद्ध करून मोठें यश संपादन केलें. ह्या स्वारीनंतर पिलाजी जाधवराव हे बुंदेलखंडांत छत्रसाल राजाचे मदतीकरितां बाजीराव पेशवे स्वसैन्यानिशीं चालून गेले, त्यांस जाऊन सामील झाले. त्यांनीं पेशव्यांच्या सैन्याबरोबर महमदखान बंगष ह्याच्याशीं निकराच्या लढाया करून ता. ३० मार्च इ. स. १७२९ रोजीं जेतपूरचा किल्ला जिंकून घेतला व महमदखानास जीव घेऊन पळावयास लाविलें. ह्या वेळीं ज्या मराठे सरदारांनीं आपलें अलौकिक शौर्य व्यक्त केलें, त्यांत पिलाजी जाधवराव हे प्रमुख होते. बुंदेलखंडाच्या छत्रसाल राजानें बाजीराव पेशव्यांच्या ह्या उत्कृष्ट साह्याबद्दल त्यांस झांशी वगैरे प्रांत बक्षीस दिला. त्या वेळीं त्यांनीं सागर प्रांतीं पिलाजी जाधवराव ह्यांस पांच गांव इनाम दिले.

ह्यानंतर बाजीराव पेशवे ह्यांची कांहीं क्षुल्लक कारणाबद्दल पिलाजी जाधवराव ह्यांच्यावर गैरमर्जी झाली, व त्यांनीं त्यांचा सरंजाम जप्त करून, तो मध्यंतरीं कांहीं दिवसपर्यंत राणोजी शिंदे ह्यांस दिला; व पालखी देखील काढून घेतली. परंतु पिलाजी जाधवराव हे कर्तृत्ववान् व रणशूर मराठे सरदार असून, त्यांनीं अनेक वेळीं सरकारकामें स्वामिनिष्ठेनें बजाविलीं असल्यामुळें, दुसरे मराठे सरदार व श्रीमंत छत्रपति शाहूमहाराज ह्यांनीं बाजीराव पेशव्यांची समजूत केली, व त्यांनीं पिलाजी जाधवराव ह्यांचा सरंजाम परत देवविला. पिलाजी जाधवराव ह्यांस सेनापति दावलजीराव सोमवंशी ह्यांचें ह्या वेळीं फार साहाय्य झालें. पिलाजी जाधवराव ह्यांचा सरंजाम ता. २४ सप्टेंबर इ. स. १७२९ रोजीं त्यांस परत मिळाला. ह्या वेळीं पिलाजी जाधवराव ह्यांच्याकडे १ परगणे फुलमरी, १ पा॥ कन्नड, १ पिंपरी, १ सुतींडा, १ हवेली औरंगाबाद, १ पा॥ टाकळी, १ पा॥ उंडणगांव, १ पा॥ सिवणें १ पा॥ कड सांगली हे मोकासे गांव होते, व इनामगांव १ मौजे नांदेड ता. कर्यात मावळ, १ मौजे वाघोली ता. हवेली प्रांत पुणें, १ मौजे दिवें ता. सासवड हे असून, १ मौजे उरळी तर्फ सांडस, मौजे पौडसर, ता. कडेपठार, व पाटस तालुक्यापैकीं १ मौजे गार व १ मौजे दौंड असे मोकासे

होते. ह्या सर्व गांवांस ताकीदपत्रें होऊन पेशव्यांचा पिलाजी जाधवराव ह्यांच्यावरील रोष नाहींसा झाला.

इ. स. १७३० मध्यें पिलाजी जाधव ह्यांची फिरंगाणावर रवानगी झाली. त्यांनीं तेथें कांबे ह्याचें ठाणें घेतलें. त्या युद्धामध्यें त्यास हशमखर्च ६५०० रुपये झाला. तो त्यांस पेशव्यांनीं देवविला. त्याचप्रमाणें त्यांच्या पडल्या घोड्यांचे ऐवज देवविले. लढाईमध्यें सरदारांचीं व शिलेदारांचीं घोडीं पडलीं ह्मणजे त्यांचा खर्च सरकारांतून देण्याची त्या वेळीं वहिवाट होती, त्यामुळें सर्व लोक संतुष्ट असत. असो.

इ. स. १७३२ व इ. स. १७३३ मध्यें पिलाजी जाधव हे पेशव्यांबरोबर माळवा, बुंदेलखंड व हिंदुस्थान ह्या प्रांतीं मोठमोठीं राजकारणें व मुलुखगिऱ्या करण्यांत गुंतले होते. ता. ७ जुलै इ. स. १७३२ रोजीं ह्यांची व निजामाची भेट होऊन निजामानें ह्यांस तिवट बक्षीस दिलें, असा उल्लेख आढळतो. ह्याच वर्षीं पिलाजी जाधवराव ह्यांस १४५० रुपयांचा घोडा बक्षीस मिळाला. इ. स. १७३३ च्या जानेवारी महिन्यामध्यें पिलाजी जाधवराव बुंदेलखंडामध्यें गेले होते. हरदेनगर प्रांत बुंदेलखंड येथें ता. २ जानेवारी इ. स. १७३३ रोजीं पेशव्यांस बहुमानाचीं वस्त्रें मिळालीं, त्या वेळीं पिलाजी जाधवराव ह्यांसही बहुमान मिळाला. ह्यानंतर चिमाजी आपा व बाजीराव पेशवे ह्यांच्या बरोबर पिलाजी जाधवराव ह्यांनीं अनेक महत्त्वाच्या कामगिऱ्या केल्या; व त्यांच्याबरोबर प्रत्येक मोहिमीमध्यें ते जातीनिसीं हजर होते. ह्या मोहिमींची संगतवार माहिती अद्यापि चांगलीशी उपलब्ध नाहीं, त्यामुळें पिलाजी जाधवराव ह्यांच्या हालचालींचा कच्चा वृत्तांत समजण्यास मार्ग नाहीं.

ह्यानंतर पिलाजी जाधवराव हे उत्तर हिंदुस्थानांतील मोहीम आटोपून पुण्यास आले व तेथून ते राजदर्शनासाठीं सातारा येथें गेले. त्यांची व शाहूमहाराजांची ता. ३१ जुलई इ. स. १७३४ रोजीं भेट होऊन महाराजांनीं त्यांचा फार गौरव केला. या समयीं बाणकोटास जंजिऱ्याच्या हबशानें अपाय केला. ही बातमी छत्रपतीचे दरबारांत आली. त्या वेळीं छत्रपतींनीं पिलाजी जाधवराव यांस कोंकणांत जाऊन शामलाचें पारिपत्य करावें, ह्मणून आज्ञा केली. तदनंतर ते तसेच पुण्यास जाऊन आपली फौज घेऊन हबशांवर चालून गेले. तेथें त्यांनीं चांगली कामगिरी बजावून बाणकोट हस्तगत केला, व शत्रूस तेथून हांकून दिलें. तेथून ते परत राजदर्शनासाठीं पुनः सातारा येथें गेले. तेथून त्यांनीं या सर्व हकीकतीचें पेशव्यांस लिहिलेलें पत्र उपलब्ध झालें आहे, तें फार महत्त्वाचें आहे. तें येणेंप्रमाणें:—

छ ६ मोहरम **श्री.** ता. १७ एप्रील इ. स. १७३५.

''राजश्री पंतप्रधान गोसावी यांसीः–

श्रीमंत सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित पिलाजी जाधवराऊ कृतानेक दंडवत विनंति येथील क्षेम तागाईत छ ४ माहे जिल्हेज मुक्काम किल्ले सातारा पावेतों यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लेखनार्थ आज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेषः– सांप्रत कांहीं दिवस स्वामींकडून पत्र येऊन वर्तमान कळत नव्हतें. तेणेंकरून चित्तास असमाधान होतें. त्यास, प्रस्तुत आपलीं पत्रें छ २ जिलकादीचीं मनोहरपूरचे मुक्कामींहून आलीं, तीं छ २९ मिनहूस प्रविष्ट जालीं. सकलार्थ राजश्री आपांचे पत्रावरून अवगत होऊन परम समाधान जालें. राजश्री सवाईजीची व आपली भेटी होऊन, परस्परें सन्मान आदरपुरस्कर जाला, स्नेहाभिवृद्धि जाली, उत्तम गोष्टी जाली. आपल्या महत्त्वानुरूप सर्व उत्तमच होईल. तेथें संदेह काय आहे ? पुढील गमनानंतर खानदौरा यांचे बंधू भेटीस येणार. आलियानंतर जो विचार होईल, तो लिहून पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. यानंतर आमचें वर्तमान तरी, आह्मीं आपली आज्ञा घेऊन माघारे स्वार होऊन आलियानंतर, आज्ञेप्रमाणें सातारियास येऊन राजदर्शन घेतलें. तदोत्तर एक मास राजश्री स्वामीसन्निध राहिलों असतां, बाणकोटास शामलानें अपाय केला, हें वर्तमान राजश्री स्वामीसन्निध आलियानंतर, आह्मांस राजश्रींनीं आज्ञा केली, 'तुह्मीं पुणियास अविलंबें जाऊन, जमावसुद्धां कोंकणांत उतरून, शामलास शासन करून, बाणकोट पुनरोत्तर हस्तगत करणें.' ऐसी आज्ञा करून पुणियास रवाना केलें. त्यावरून आज्ञेप्रमाणें पुणियास आलों. राजश्री आपांची भेटी जाली. तेथून आज्ञा घेऊन, तळघाटें उतरावयाचे उद्देशें मजल दरमजल महाडास दाखल जालों. तों अगोदर महाडचे उपराळियास राजश्री आपांनीं पायेचा जमाव व स्वार ऐसे रवाना केलेच होते. ते समागमें घेऊन, बाणकोटच्या पारिपत्योद्देशें कूच करून, महाडची खाडी उतरोन, पलीकडे जाऊन मुक्काम केला. तों शामलाकडील कृष्णाजी घाटगा व कोंडनाईक परवारी ऐसे दोन तावडे व बारा चौदा गलबतें ( ............फाटलें आहे. ) दगा करून घालवावयास आले. हे बातमी आह्मांस आली. त्याउपरी आह्मी गनिमास खबर न पोहोंचतां रात्रीचा दिवस करून बाणकोटास जाऊन पोंचलों. तों बाणकोट तो अगोदरच हबशी यानें पाडून साफ करून, पाणकोट बंदरावरी आहे, त्यांत दोनचारशें माणूस ठेवून बळाविला होता, त्याजवर मार देऊन, त्यांत शामलाचे लोक होते ते धुडावून, आपले लोक आंत गेले. तों इतकियांत शामलाकडील आरमार माघारें

उलटोन कोटाजवळ आलें. त्याजवरही चार किभला (?) होतीं. त्यांनींही मार दिल्हा. व आमच्याही लोकांनीं कोटांतून व बाहेरून बरकंदाजीचा मार दिल्हा. आरमार एक दिवस व तीन प्रहर रात्रीपर्यंत खाडींत कोंडून ठेविलें. मग रात्रीं वारा पाठीस घेऊन, ओहोटीचे समयीं काळोखियांत गनीम निघोन समुद्रांत गेला. त्यानंतर आह्मीं फौजेसहवर्तमान दोन चार दिवस तेथें मुक्काम करून, कोट पाडून साफ करून टाकिला; आणि फिरोन मागें महाडच्या उपराळियास रायगड महाल पाठीशीं घालून गोरेगांव तपीयांत जाऊन मुक्काम केला. तेथें दोन मासपर्यंत फौजेसहवर्तमान राहिलों. ऐसें असतां राजश्री स्वामींनीं हुजूर दर्शनास यावें ह्मणून आज्ञा केली. त्यावरून आज्ञेप्रमाणें येथें येऊन राजदर्शन जालें. तों राजश्री संभाजी राजे यांजकडे राजश्री आपास पाठवून राजश्रीस भेटीस घेऊन यावें या विचारास, राजश्री स्वामींनीं राजश्री आपास हुजूर बोलाविलें. त्यावरून आपाही आले. राजश्री स्वामींचें दर्शन जालें. दर्शनाअंतीं आह्मांस गोवळकोटास कासीबंदरच्या मोर्चास पाठवावें, हुजुरात व राजश्री फत्तेसिंगबावा व राजश्री प्रतिनिधीकडील व राजश्री सचीव यांजकडील लोक यांणीं काळुस्तीयाच्या मोर्चास असावें, आमचा जमाव व राजश्री त्रिंबकराव सोमवंशी सरलष्कर ऐसे कासीबंदरावर राहावे, ऐसी आज्ञा केली. सर्व दरबारच्या लोकांचा विचार एक. सर्वांच्या मतें स्वामींच्या फौजेचा लौकिक आहे. वरकड सर्व गोवळकोटास जाऊन शाम (?) करून आले, त्यांस आह्मांस भरीस घालावें, ऐसा सर्वांचा विचार. दुसरें, स्वामीही उत्तर प्रांतीं गेले, त्याजमुळें राजश्री स्वामींचे मर्जीकरितां राजश्री आपांनीं आह्मांस पाठवावें, ऐसें मान्य केलें. आह्मी वैशाख शु॥ ७ स स्वार होऊन, राजश्री आपांची आज्ञा घेऊन जाऊं. विदित जालें पाहिजे. विशेष काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

यानंतर पिलाजी जाधवराव स्वार होऊन, शामलाशीं टक्कर देण्याकरितां गोवळकोटास गेले. चिमाजीआपाही सातारा येथें शाहूमहाराजांचें दर्शन घेऊन परभारें कोंकणांत उतरले. नंतर त्यांचें व हबशाचें युद्ध होऊन सिद्दी साद हबशी मारला गेला व शामलास पुरती जरब बसली. याप्रमाणें मराठ्यांस उत्कृष्ट यश प्राप्त जालें. या समयीं चिमाजीआपा यांनीं, गोवळकोट किल्ला हल्ला करून घेण्याचे कामीं, पिलाजी जाधवराव यांस मसलत विचारली व स्वतःचे जमावानिशीं येण्याबद्दल सूचना केली. या प्रसंगीं पिलाजी जाधवराव यांनीं जें पत्र लिहिलें आहे, तें फारच महत्त्वाचें आहे. त्यांत त्यांनीं गोवळकोट कि-

ल्याच्या व मान्याच्या सर्व जागा तपासून, त्या किल्ल्यावर हल्ला करून तुटून पडणें हें हितावह नाहीं, असें आपलें मत दिलें आहे. या पत्रावरून पिलाजी जाधवराव हे युद्धकलेंत पूर्ण निष्णात असून खुष्कीप्रमाणेंच दर्यांतील आरमारी युद्धाचे पाचपेंचही चांगले जाणत असत, असें दिसून येतें.

श्री. २६ एप्रील इ. स. १७३६.

"राजश्री चिमाजीपंत आपा गोसावी यांसीः–

श्री सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी-अलंकृत राजमान्य स्नेहांकित पिलाजी जाधवराऊ दंडवत विनंति येथील कुशल तागाईत छ २५ जिल्हेज मुक्काम मौजे धामणी जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– आपण छ २१ मिनहूचीं पत्रें रवाना केलीं तीं, आजीं छ मजकुरीं प्रविष्ट होऊन अभिप्राय कळों आला. कालचे युद्धीं सिद्दी साद व वरकड नामी सरदार अवघे व हजार बाराशें माणूस ऐसें खस्त जालें. एतन्मुळें शामळाचा उपमर्द विशेष जाला. याउपर हबशीयाचे लोकांत अवसान राहील ऐसें नाहीं. या प्रसंगीं आपणांपाशीं सात आठशें स्वार, अडीच सहस्र पायेचा जमाव आहे. या सामानानसीं खांसा आलियास, स्थल हस्तगत हल्ला करून होईल न होय, एतद्विषयींचा विचार सुचेल, तो वाच्य न करितां लिहून पाठवावा, ह्मणून लिहिलें. ऐसीयास, आवंदा शामळास जरब पुर्तीच बैसली. हें यश श्रीनें सर्वोत्कृष्ट दिलें. सांप्रत या स्थळाचा विचार लिहिला. ऐसीयास, आपले पदरीं लोक व साहित्य मातबर आहे. आणि जें कार्य आपण मनावरी धरितील, तेथें श्री यश देईल. तेथें संदेह नाहीं. परंतु या स्थलाचा मजबुतीचा विचार आह्मीं येथें आलीयाउपर नजरेनें पाहिला. त्यास, गोवळकोटाचे टेकडीभोंवतां चर आहे. त्यामध्यें भरतीचे समयीं पाणी भरून जंजिरा होता. खंदक मालाभर खाणोन खाडीचें उदक मेळविलें आहे. त्यांत पांचां सातां खंडियांचें गलबत फिरतें. आणि पांणियापासून सात आठ हात वर त्या....गरी आहे त्यामध्यें मेंढा आहे, त्याची पेटी भरली आहे. जागां जागां नाजुक स्थळीं चिरेबंदी बुरूज आहेत. त्यापलीकडे सुजाचा कोट आहे. त्यासही खंदक आहे व थोरले किल्लियासही सभोंवतां खंदक आहे. यदन्वयें येथील मजबुती आहे. सारांश, हें स्थळ हल्लेनें येणें हें अगाधच आहे. तथापि मातबर सामानानसीं हल्ला करून, खंदकाजवळ थडकलीयास पुढें खंदकाची अटक! वरील मेंढीयाचा व दोहीं कोटांतील मार. इतका मार सोसून माणूस तेथें जाईल तेव्हां थोडें राहील. ऐसें असून हें स्थल

हल्लेनें होणें अगाध आहे. आह्मीं नजरेनें पाहिल्याप्रमाणें लिहिलें आहे. आपणांपाशीं हें स्थळ........ज्यांणीं पाहिलें असेल, ते विदित करितील. सारांश, या प्रकारचे मजबुतीस हल्ला करणें साहस आहे. सांप्रत येथील कार्यभाग होणें, व चित्तानुरूप मोर्चेबंदीनेंच थोडके दिवसांत होऊन येईल, हा विचार आपल्याही चित्तांत येतच असेल. कदाचित् कच खाऊन लिहिलें ऐसें आपण ह्मणतील, तरी पूर्वीपासून कोणे मनसबीयास अथवा भलते गोष्टीस कच खावी, ऐसा विचार नाहीं. परंतु येथील मजबुतीनुरूप लिहिलें आहे. यानंतर तेथें हाशमांत अथवा आणिक कोणी शहाणा माणूस पाठविणें तो पाठवून द्यावा. त्यासही येथील विचार नजरेनें दाखवून, जो विचार सांगणें तो सांगोन पाठवूं. त्यानंतर जो विचार कर्तव्य, तो केला पाहिजे. वरकड मोर्चेबंदीनें अथवा राजकारणानें येथील कार्यभाग आपले पुण्येंकरून थोडे दिवशींच सिद्धीस पावेल. आपण खांसा आलियास, आपले लौकिकानुरूप कार्य होऊन आलें, तरी उत्तमच आहे. पूर्वीं रायगडास शामलाचा वेढा आला, ते समयीं हुजुरात व पवार व राजश्री बाजी भिवराव रवाना जाले. ते समयीं शामलास पराभवातें पाववून, यश संपादून, पुढें महाडास येऊन, तें कार्य सिद्धि पाववून बाणकोटास रवाना केलें. तेंही यश श्रीनें दिल्हें. तन्मुळें हांवभरी होऊन, गोवळकोटास........केलें. त्यास आजीं तीन वर्षेपर्यंत अवघे राज्यास मसलत पडली. परंतु अद्यापि सार्थक होऊन न आलें. ऐसा विचार आहे. श्रीनें सांप्रत यश दिलें, हेंच विशेष आहे. वरकड येथील कार्यभाग होणें, तो आपले प्रतापेंकरून होऊन येईल. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

यानंतर मराठ्यांचें व हबशांचें कांहीं दिवस युद्ध चालून अखेर तह झाला. व तिकडे शांतता झाली.

इ. स. १७३६ मध्यें दिल्ली येथें मोठमोठीं महत्त्वाचीं राजकारस्थानें उपस्थित झालीं. बाजीराव पेशवे यांस सवाई जयसिंग याचे मार्फत माळवे प्रांतांतील चौथ व सरदेशमुखीचा हक्क मिळाला होता. तो वसूल करण्यासाठीं मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे हे त्या प्रांतीं आपला अंमल बसवीत होते. तें दिल्लीचा वजीर खानदौरान यास असह्य वाटून, त्यानें आपला भाऊ मुजफरखान यास, मराठ्यांस नर्मदापार करण्याकरितां पाठविलें. त्यामुळें मोंगल व मराठे यांचा हर्षामर्ष सुरू होऊन, ते दिल्लीच्या फौजांवर चढाई करून जाऊं लागले. बाजीराव पेशवे यांना चौथ सरदेशमुखीच्या सनदा देण्याचें दिल्लीच्या बादशाहानें व सवाई

जयसिंगानें मान्य केलें होतें, परंतु बादशाही वजीर त्याचे विरुद्ध झाले. त्यांत खानदौरान व निजाम उल्मुलुक ह्यांचें वैमनस्य विकोपास जाऊन उभयतां वेगवेगळीं राजकारणें खेळवूं लागले. बाजीराव पेशवे हे दिल्लीच्या बादशाहाची चंचल वृत्ति आणि दुर्बलता पाहून आपल्या मागण्या अधिक जोरानें करूं लागले. हें पाहून बादशाहास संताप आला, व त्यानें खानदौरा व कमरुद्दीनखान यांना मराठ्यांना चंबळापार करण्यासाठीं रवाना केलें. हे दोघे बलाढ्य वजीर मोठमोठीं सैन्यें घेऊन मथुरेकडे येण्यास निघाले. खानदौरा रजपुतान्याचे रोखें निघाला व कमरुद्दीन-खान आग्रा प्रांतीं आला. या वेळीं बाजीराव पेशवे हे, पिलाजी जाधवराव यांच्यासह, बुंदेलखंडामध्यें वोडसें, दतीया, नरवर वगैरे संस्थानांकडून खंडण्या घेऊन भदावर प्रांतीं आले होते, व तेथील राजांकडून खंडणी घेण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांस दिल्लीच्या फौजा मथुरेकडे आल्याचें कळतांच, त्यांनीं छत्र-साल राजाचे पुत्र जगतराज यांच्या जवळ आपलें लष्करी अवजड सामान ठेवून, ते निवडक सैन्यानिशीं त्यांच्या मुकाबलयास निघाले. मल्हारराव होळकर हे खानदौराच्या मोहोऱ्यावर चालून गेले व पिलाजी जाधवराव ह्यांनीं कमरुद्दीन-खानाच्या सैन्याचा रोंख धरिला. या वेळीं खुद्द बाजीराव पेशवे व त्यांचे रणशूर सरदार मल्हारराव होळकर व पिलाजी जाधवराव यांनीं बादशाही फौजेचे रणोत्सुक योद्धे खानदौरान, कमरुद्दीनखान, सादतखान यांना, मराठ्यांची गनीमी युद्ध-पद्धति व मराठ्यांचें बाहुबल इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें दाखविलें कीं, त्या रणझुंजार वीरांना देखील दे माय धरणी ठाय करून सोडिलें. सादतखान एवढा नामांकित योद्धा, तोही मराठ्यांचें प्रज्वलित शौर्यतेज पाहून दिपून गेला, व त्यानें, बादशाहास संतुष्ट करण्याकरितां, मल्हारराव होळकर, पिलाजी जाधवराव व विठूजी बुळे इत्यादी मराठे सरदारांस धारातीर्थीं पाठवून, मराठ्यांची फौज चमेलपार हांकून दिली, अशा खोट्या बढाईचीं बातमीपत्रें दिल्लीस पाठविलीं. हें वर्तमान बाजीराव पेशवे यांस कळतांच, त्यांस त्वेष उत्पन्न झाला, व त्यांनीं "आह्मीं हिंदुस्थानांत जिवंत असून दिल्लीच्या राजधानीसमोर मराठी सैन्याचें रणतेज व्यक्त करण्यासाठीं लवकरच येऊन हजर होतों," अशीं बादशाहास पत्रें पाठविलीं. या प्रसंगीं मराठे सरदारांनीं जे पराक्रम गाजविले, ते अवर्णनीय होते. त्यांची सविस्तर हकीकत देणारीं अस्सल पत्रें उपलब्ध झाल्यावांचून हा वीररसात्मक वृत्तांत यथातथ्य रीतीनें वाचकांच्या नजरेसमोर येणार नाहीं. या प्रसंगाचीं दोन तीन पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं आहेत. तीं फार वाचनीय असल्यावरून आह्मी येथें सादर करितों.

श्री. फब्रुवारी १७३७.

"विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें, विशेषः- उत्तरेकडील कालीं कासिद आले. राजश्री पिलाजी जाधवराव ओडसे, दतीया-पाशीं होते. कमरुद्दीखानही होते. तेथें उभयतांमध्यें युद्ध होऊन, दुतर्फाही लोक कामास आले. त्यानंतर राजश्री पिलाजी जाधवराव तेथून कूच करून, फणीचे घांटीं चढोन, नरवराचे अलीकडे दहा कोसांवर उतरले. जैसिंगाचे मुलुखाकडे जावयाचा रोंख आहे. समागमें आपली फौज सडीच, वीस पंचवीस हजार बिला कुसूर आहे. राजश्री पिलाजी जाधवराऊ यांसमागमें छत्रसाल राजाचा पुत्र हिरदेसाल होता, तो फिरोन आपले मुलुखास गेला. कमरुद्दीखान युद्धप्रसंग जालियावरी कूच करून नरवरास गेला. समागमें राजा भदोडिया होता. त्याचेही कित्येक लोक कामास आले. कमरुद्दीखानासमागमें वीस पंचवीस हजार फौज आहे. यानंतर इकडील, राजश्री मल्हारजी होळकर गुजराथेकडून आले. खानदौरा लिंगपेडावरी होते. उभयतांची गांठी पडली. होळकरानें कही मारून नेली. त्याचे लागावरी जाटाची फौज धांवली. कही सोडविली. तेथेंही लोक दुतर्फा कामास आले. होळकरानें तेथून कूच करून, मुकुंदराचे घाटें, जैसिंगाचे मुलुखाकडे गेले. जैसिंग होळकराचे मागें मुकुंदराचा घाट उतरोन गेले. खानदौरा घाटाखालें होता, तोही त्याचे मागें जाणार. त्याबराबर पन्नास हजार फौज देखील जैसिंग आहेत. ऐसें वर्तमान, काली नवाबाचे जासूद आले, त्यांबराबर आलें आहे. चार पांच जोड्या आलीया. रामपुरावरी बुणगें थोडें बहुत टाकून गेले आहेत. होळकर सडा जरीवा केवळ आहे. बुंदीवर गेला, त्याचे मागें गेले आहेत. नवाबाचे विचाराउपर माघारें येणार नाहींत. राजश्री पिलाजी जाधवराऊ यांचे कमरुद्दीखानाची फार खटपट केली. महागाई फार केली होती. छत्रसालाचा लेंक समागमें होता. आपले मुलुखावरी अरिष्ट आलें, याकरितां इकडे बुंदीकडे निघाले. नवाबाची बातमी फार आहे. बऱ्हाणपुरास जोड पाठवावेंसें नाहीं. कित्येक खबर कच्ची कोण आणणार? नागाफूर देवगडचे, ये जे जमीन बेगखान नवाबाचे कडील सरदार फौजसमागमें सयाजी गुजर व राजश्री रघोजी भोंसले आहेत. राजश्री रत्नाकरपंतही त्यांबराबर आहेत. देवगडचा तह होत आहे, जाला असेल. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंति."

श्री. १ मार्च इ. स. १७३७.

"राजश्री चिमणाजीपंत आपा गोसावी यांसीः-

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित पिलाजी

# ऐतिहासिक संस्मरणीय वस्तू.



## १ वकीलमुतालकीचीं चिन्हें.

पाश्चात्य राष्ट्रांमध्यें दिग्विजयी योद्धे, सुप्रसिद्ध राजे, राजकारणकुशल मुत्सद्दी, धर्मोद्धारक समाजसुधारक, नवीन शोध लावणारे थोर कल्पक पुरुष, इत्यादिकांच्या लोकोत्तर कृतींचें पुढच्या पिढींस स्मरण रहावें व त्यांच्या चरित्रापासून त्यांस यथायोग्य बोध मिळावा व त्यांना त्यांच्या सद्गुणांचें अनुकरण करण्याची स्फूर्ति व्हावी ह्मणून त्यांचे पुतळे, त्यांचीं चित्रें, किंवा त्यांच्या अर्धमूर्ति करून ठेवण्याची चाल आहे. त्याप्रमाणेंच त्यांचें स्मरण राहण्यासाठीं व त्यांच्या विषयीं आदरबुद्धि व अभिमान जागृत ठेवण्यासाठीं त्यांच्या संस्मरणीय वस्तू, ह्मणजे त्यांचे जुने पोषाख, त्यांच्या आवडत्या वस्तू, आणि त्यांच्याशीं संसर्ग घडलेल्या अनेक लहान मोठ्या जिनसा, यांचा संग्रह करण्याचा तिकडे विशेष प्रघात आहे. अशा वस्तूंस तिकडे कमीजास्त प्रमाणानें फारच महत्त्व देण्यांत येतें व त्यांची योग्यता राष्ट्रवैभवद्योतक विजयचिन्हांसारखी मानिली जाते. अशा प्रकारच्या संस्मरणीय वस्तूंस तिकडील ऐतिहासिक संग्रहालयामध्यें अग्रस्थानाचा मान दिला जाऊन त्यांचें मूल्य लाखों रुपयांनीं केलें जातें. अशा ऐतिहासिक वस्तूंचीं सचित्र वर्णनें देखील तिकडे मोठ्या कौतुकानें प्रसिद्ध केलीं जातात.

आमच्या इकडे थोर विभूतींच्या छत्र्या, मंदिरें किंवा वृंदावनें बांधून त्या रूपानें त्यांची कीर्ति चिरकालिक करण्याचा प्रघात नाहीं असें नाहीं. परंतु त्यांत प्रमाणशुद्ध पुतळे किंवा तत्सदृश चित्रें यांची फार उणीव दिसून येते. त्याचप्रमाणें आमच्या इकडे राष्ट्रीय पदार्थसंग्रहालयांत थोर पुरुषांचीं शेषचिन्हें किंवा संस्मरणीय वस्तू यांचा मोठ्या भक्तीनें समावेश केलेला दिसून येत नाहीं. त्याचें कारण अशा वस्तूंचा अभाव हेंच केवळ नसून, त्यांचें इतिहासदृष्ट्या विशिष्ट महत्त्व मानण्याची प्रवृत्ति नसणें हें होय. तिकडे आलफ्रेड धि ग्रेट किंवा नेपोलियन बोनापार्ट यांच्या शेषचिन्हांची जी योग्यता समजली जाते, तशी आमच्या इकडे पुण्यश्लोक दिल्लीपति अकबरबादशाहा किंवा महाराष्ट्रराज्यसंस्थापक छत्रपति श्रीशिवाजी महाराज ह्यांच्या शेषचिन्हांची योग्यता कोणी मानीत नाहीं! परंतु पाश्चात्य लोकांच्या संसर्गानें व शिक्षणानें आतां आह्मांस अशा प्रकारच्या जुन्या वस्तूंचें ऐतिहासिक मूल्य जाणण्याची अभिरुचि थोडी थोडी उत्पन्न होऊं लागली

आहे; आणि राष्ट्रीय प्रदर्शनें व पदार्थसंग्रहालयें यांच्या योगानें त्यांची योग्य महती समजण्याचें ज्ञान प्राप्त होऊं लागलें आहे, ही समाधानाची गोष्ट होय. इतके दिवस इतिहासाच्या अज्ञानामुळें व अनास्थेमुळें अशा प्रकारच्या संस्मरणीय ऐतिहासिक वस्तू विनाश पावल्या आहेत. तथापि, आजमितीस देखील बऱ्याच जुन्या संस्मरणीय वस्तू, इतिहासप्रसिद्ध राजेरजवाडे व संस्थानिक यांच्या जवळ व अन्य ठिकाणीं, वास करीत असल्याचें आढळून येईल. त्यांची ऐतिहासिक माहिती प्रसिद्ध झाली असतां, इतिहासवाचकांस त्याविषयीं यथार्थ ज्ञान प्राप्त होण्याचा संभव आहे, ह्मणून आह्मी जुन्या ऐतिहासिक वस्तूंची सचित्र माहिती 'इतिहाससंग्रह'द्वारें प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे.

उत्तर हिंदुस्थानांत भारतीय योद्ध्याप्रमाणें अद्वितीय पराक्रम करून, दिल्लीच्या बादशाहावर ज्यांनीं आपली छाप बसविली, आणि ज्यांनीं सर्व शत्रूंना पादाक्रांत करून अद्वितीय यश संपादन केलें, असे मराठ्यांचे प्रमुख योद्धे महादजी शिंदे ऊर्फ पाटिलबावा हे होत. यांनीं दिल्लीच्या बादशाहाकडून मिळविलेलीं सन्मान-चिन्हें ग्वाल्हेर संस्थानांत अद्यापि सुरक्षित आहेत. त्यांचें मूल्य इतिहासदृष्ट्या अतिशय असून, तीं महाराष्ट्राच्या पूर्ववैभवाची अद्यापि साक्ष देत आहेत. ह्या संस्मरणीय जुन्या वस्तूंची ओळख इतिहासवाचकांस फारशी असण्याचा संभव नाहीं. ह्मणून त्यांची अल्प माहिती येथें सादर करितों.

दिल्लीचा बादशाहा शाहाअलम यास गुलाम कादरानें इ. स. १७८७ सालीं कैदेंत टाकून त्याचे फार हाल केले व त्याचे डोळे देखील काढिले. हा गुलाम कादर अतिशय प्रबल होऊन दिल्लीच्या सर्व बादशाही वजिरांस शिरजोर झाला होता. त्याचें यथास्थित पारिपत्य महादजी शिंदे यांनीं केलें. त्यांनीं त्यांस कैद करून पिंजऱ्यांत घालून बादशाहापुढें आणून हजर केलें, आणि त्यास अखेर देहान्त शिक्षा दिली. महादजी शिंदे यांचें हें शौर्य व पराक्रम पाहून बादशाहा फार संतुष्ट झाला, व त्यानें त्यांचा गौरव करून त्यांस नाना प्रकारचे सन्मान व मोठ-मोठ्या पदव्या अर्पण केल्या. या प्रसंगीं महादजी शिंदे यांनीं 'वकील मुताल-कीची' पदवी व तिचा मरातब बादशाहाकडून आपले यजमान श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांजकरितां मागून घेतला. 'वकील मुतालक' ही पदवी व त्याच्याच बरोबरीनें त्याची 'नायबी' ह्मणजे दुय्यम पदवी बादशाहानें त्यांस अर्पण केली. हा बहुमान घेऊन महादजी शिंदे पुण्यास आले व त्यांनीं तो समारंभेंकरून इ. स. १७९२ रोजीं पेशव्यांस अर्पण केला. ह्या वकील मुतालक पदवीचा पूर्ण मायना येणेंप्रमाणें होताः—

"अमारत व अयालत मर्तबात हपमत व षौकत मंजिलत जुबदय वफिकेपान दौलतखाह उमदे खैर अंदषानें बिला इस्तिबाह कसीरूल इक्तिदार अकीदत दिसार सईफे मसलुले मैदान सुजात रुमदे मसकुले मिजमार जलादत मदार अस्राफे अलताफ मवरदे इनायत जिल्हे मष्मूल अवातिफे जमिल वकीले मुल्क अमीरउल-उमरा मुख्तार-उल मुमालिक मदारुल-मोहम सलतनत् उमदये अराकिने खिलाफतयार वफादार सिपाहसिलार सआदतमंद मजाअंद पयवंद फर्जंदे खास उल खास मिलाजदेह महाराजाधिराज पंडित प्रधान सवाई माधवराव नारायण बहादूर फिदवी शहाआलम बादषाहे गाजी"

या पदवीचें सरळ मराठी भाषांतर येणेंप्रमाणें—"मानकरीपणा व संपत्तीचे अधिकारी, सेना व संपत्तीचें स्थान, मित्रतेचे चिन्हानें चिन्हितांतील केवळ सार, राज्याचे अभिष्टचिंतक, निःसंशयपणें कल्याणइच्छकांतील अति उत्तम, विश्वास-वृद्धिकारक, भरंवशाचें चिन्ह आहे ज्यांस, रणभूमींतील केवळ नग्न तलवार, रणकंदनांतील महा शूरत्वाचा केवळ तीक्ष्ण धारेचा भालाच, महाश्रेष्ठ, परम विश्वासू, स्नेहभावाचे सुलक्षणाचा आसमंतात् भाग, नाना प्रकारचे कृपापात्र, सर्व कृपा उतरण्याचें स्थान, कृपेनें जे वेष्टित, अतिसर्वोत्तम, देशसंबंधीं स्वतंत्र काम चालविणार, सर्व अमिरांचे अमीर, ह्मणजे सर्व अधिकाऱ्यांचे प्रमुख अधिकारी, सर्व देशाचा स्वसत्तात्मकपणें कारभार चालविणारे, दौलतीचे सर्व कामाचा भरंवसा आहे ज्यांवर, राज्यधारांचे केवळ स्तंभच, अशा सर्व कारभारी मंडळींतील अतिसर्वोत्तम, स्नेहभाव सिद्धीस नेणारा सुमित्र, सेनापति, सुदैववान् जिवलग, सरकारचे केवळ सुनिश्चित पुत्रच, उपायसूचक, असे जे महाराजाधिराज सवाई माधवराव पंडित प्रधान महापराक्रमी हे, शाहाआलम पातशाहा महायोद्धा यांचे सेवक."

अशा अलकाबाचें पत्र व पुढील पोषाख बादशाहानें महादजी शिंदे यांस दिले.

## पोषाख.

| | |
|---|---|
| १ दस्तार शिरबस्ता | १ जामा |
| १ निम अस्तनी | १ चार कुबा |
| १ चिरा | १ बांकबंद |
| १ कंबरबंद | १ दुमठा |
| १ दुशाला | |

## नग वगैरे.

| | |
|---|---|
| १ समशेर | १ ढाल (शीदर) |
| १ कलम दान | १ शिक्के कलमदान |

| | |
|---|---|
| २ मोर्चेलें | १ हत्ती |
| १ घोडा | १ नालकी |
| १ पालखी झालदार | |

## कित्ता मरातब.

| | |
|---|---|
| १ अलम मयहाती | २ शाग मयहाती |
| २ दुमल मयहाती | १ माही मयहाती |
| १ मरातब मयहाती | |

### जवाहीर दागिने.

१ मोत्यांची माळ पदक
१ शिरपेंच
१ झगा
१ कलगी परगिरी

येणेंप्रमाणें मानमरातब बादशाहानें महादजी शिंदे यांजवळ दिले. ते प्रथम पेशव्यांस देऊन नंतर पेशव्यांच्या संमतीनें त्यांनीं स्वतः स्वीकारिले. या बादशाही सन्मानाची योग्यता महाराष्ट्रांत त्या वेळीं फार मोठी समजली जात असे, व ते मान अगदीं दुर्मिळ असून ते महादजी शिंदे यांनीं आपल्या पराक्रमाच्या जोरावर मिळविले ह्मणून त्यांची फार वाहवा झाली. या सन्मानांची योग्यता आजमितीपर्यंत तशीच कायम आहे. या सन्मानांपैकीं जुनीं वस्त्रें आढळून येत नाहींत; परंतु बाकीच्या जिनसा अद्यापि ग्वाल्हेर रियासतीमध्यें पहावयास सांपडतात. झालरदार पालखी व नालकी आणि इतर मरातबाचीं चिन्हें तेथें आहेत. पालखी ही नेहमीं दृष्टीस पडते त्याप्रमाणेंच आहे; परंतु नालकी मात्र दुसरीकडे पाहण्यास मिळत नाहीं. या नालकीचें चित्र यासोबत जोडिलें आहे, त्यावरून तिची कल्पना करितां येईल. नालकी ही साधारणपणें हत्तीवरील अंबारीसारखी असून, तिची रचनाही तशीच असते. नालकींत बसण्याचा मान महादजी शिंद्यांवांचून दुसऱ्या कोणत्याही सरदारास मिळाला नव्हता. ह्मणून तिची पूजा अद्यापि होत असते.

नालकीशिवाय माहीमरातब, बादशाही पंजे, चंद्र व सूर्य, मच्छली ह्मणजे मासा, बाघका सर ह्मणजे वाघाचें डोकें, आणि शहामृगाचें अंडें, अशीं चिन्हें बादशाहांनीं दिलेलीं अद्यापि अस्तित्वांत आहेत. यांपैकीं अलम ह्मणजे बादशाही पंजे यांचें चित्र महत्त्वाचें वाटल्यावरून सोबत दिलें आहे. हे बादशाही सन्मान मराठ्यांच्या शौर्यप्रभावाचें द्योतक असून ते अद्यापि सर्ववंद्य असे मानिले जातात. या ऐतिहासिक वस्तूंचें दर्शन कोणासही आनंददायक वाटेल यांत शंका नाहीं.

---



बादशाही पंजे.



महादजी शिंदे ह्यांस दिल्लीच्या बादशहाकडून मिळालेली नालकी.

# भाग ६ वा.

## सरफोजी, तुकोजी, बाबासाहेब, सुजानबाई ह्यांच्या कारकीर्दी.

[ इ. स. १७११—इ. स. १७३९. ]

व्यंकोजी राजे यांचे वडील पुत्र शहाजी राजे हे इ. स. १७११ मध्यें मृत्यु पावल्यानंतर, त्यांच्या मागून त्यांचे धाकटे बंधु सरफोजी राजे हे तंजावरच्या गादीचे अधिपति झाले, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. सरफोजी राजे यांची कारकीर्द, इ. स. १७११ पासून इ. स. १७२८ पर्यंत सुमारें सोळा वर्षें झाली. ह्या कारकीर्दीची माहिती बिलकुल उपलब्ध नसल्यामुळें, सरफोजींच्या राज्यकारभाराबद्दल किंवा त्यांच्या गुणावगुणाबद्दल कांहींच वर्णन करितां येत नाहीं. तथापि स्थूल मानानें असें दिसून येतें कीं, सरफोजी हा शांतताप्रिय व निरुपद्रवी राजा होता. तंजावरच्या दक्षिणेकडील मरव देशामध्यें तिकडील पाळेगार लोकांनीं जे दंगेधोपे केले, त्यांचा बंदोबस्त करण्यापलीकडे, आणि तंजावरासभोंवताल्चे संस्थानिक, त्रिचनापल्लीचा विजयराघव नायक व अर्काटचा नबाब यांच्या सारख्या महत्त्वाकांक्षी, स्वार्थपटु व प्रबल सत्ताधाऱ्यांकडून होणाऱ्या त्रासांचें निवारण करण्यापलीकडे, सरफोजी राजे यांनीं रणसंग्रामाचीं दुसरीं कामें हातीं घेतलीं, असें दिसून येत नाहीं. यांची कारकीर्द एकंदरींत अतिशय शांततेची झाली, याचें श्रेय सरफोजीचा मुख्य दिवाण आनंदराव पेशवे व सेनापति खंडोजी विचित्रे यांसच दिलें पाहिजे.

सरफोजी राजे यांच्या कारकीर्दींत राजकीय उलाढाल्या किंवा स्थित्यंतरें ह्मणण्यासारखीं मुळींच झालीं नाहींत, तथापि, प्रापंचिक गोष्टींमध्यें मनास अस्वस्थता उत्पन्न करणाऱ्या कित्येक क्षुल्लक गोष्टी घडून आल्या. यांना तुकोजी या नांवाचा एक कनिष्ठ बंधु होता, तो स्वतंत्र रीतीनें महादेवपट्टण येथें वेगळा रहात असे. त्यांस संतति वगैरे चांगली होती. सरफोजी राजे यांस लग्नाच्या तीन स्त्रिया होत्या, परंतु त्यांस संतति बिलकूल झाली नाहीं. त्यामुळें यांच्या दुसऱ्या स्त्रीस नेहमीं तुकोजी राजे यांचा मत्सर वाटत असे. ह्या कारणानें उभयबंधूंच्या मनांतील बंधुप्रेम कमी होण्यासारखे अनेक प्रसंग येऊन त्यांचें रहस्य राहिलें नाहीं सरफोजी राजे यांची पहिली बायको ही घाडगे यांच्या कुलांतील असून, तिचें

नांव सुलक्षणाबाईसाहेब असें होतें. ती स्वभावानें फार गरीब व विनयशील होती. दुसरी स्त्री, अपरूपबाईसाहेब ही घाडग्यांच्याच कुलांतील असून, महत्त्वाकांक्षी व सत्ताप्रिय होती. तिसरी स्त्री, राजसबाईसाहेब ही शिरक्यांच्या कुलांतील असून, स्वभावानें शांत व सद्गुणी अशी होती. यांपैकीं दुसऱ्या स्त्रीचा व सरफोजींचे बंधु तुकोजीराजे यांच्या बायकांचा बेबनाव झाल्यामुळें, तुकोजी राजे हे आपल्या खर्चासाठीं स्वतंत्र मुलूख घेऊन महादेवपट्टणांत जाऊन राहिले, आणि सरफोजी राजे हे तंजावरच्या किल्ल्यामध्यें राहून राज्यकारभार करूं लागले. अशा रीतीनें बंधुविग्रह होऊन, तंजावरच्या राजघराण्यांत गुप्त रीतीनें कलहाचें व विनाशाचें बीजारोपण ह्यांचेच कारकीर्दीमध्यें झालें, असें ह्मटलें असतां हरकत नाहीं.

सरफोजी राजे यांची वर निर्दिष्ट केलेली दुसरी पत्नी अपरूपबाई, ही तुकोजी राजांस महादेवपट्टणांत घालवून देखील स्वस्थ राहिली नाहीं. ती दुष्ट स्त्रियांच्या नादीं लागून, गादीस आपला वारस करण्यासाठीं, खोटा पुत्र उत्पन्न करण्याचा प्रयत्न करूं लागली. तिनें गरोदर झाल्याचें ढोंग करून, नऊ महिन्यांनंतर एक कृत्रिम बालक निर्माण केलें, आणि जिकडे तिकडे आनंदाची द्वाही फिरवून मोठा पुत्रोत्सव केला. बारशाचे दिवशीं या मुलाचें, ‘सवाई शहाजी राजे’ असें मोठ्या समारंभानें नांव ठेविलें. अशा रीतीनें तिनें तंजावरच्या गादीस खोटा वारस तयार केला. ही गोष्ट पुढें कांहीं दिवसांनीं उघडकीस आली. तेव्हां सरफोजी राजे यांच्या मनास अत्यंत दुःख व संताप उत्पन्न होऊन, त्यांनीं त्या कृत्रिम पुत्राचा निकाल लाविला. तथापि, राज्यतृष्णा आणि बंधुविग्रह यांच्या संयोगापासून निष्पन्न झालेलें हें बीज, तंजावरच्या राजसत्तेचा नाश करण्यास पुढेंही कारणीभूत झालें, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. असो.

सरफोजी राजे हे इ. स. १७२८ ह्मणजे शके १६५० कीलक नाम संवत्सरे या वर्षी दैवगतीस पावले. त्यांच्याबरोबर सुलक्षणाबाई व राजसबाई ह्या दोन स्त्रिया सती गेल्या. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे बंधु तुकोजी राजे हे तंजावरास येऊन राजसिंहासनावर अधिष्ठित झाले. तुकोजी राजे यांची कारकीर्द इ. स. १७२८ पासून इ. स. १७३५ पर्यंत सुमारें आठ वर्षें झाली. यांचीही माहिती तंजावरच्या ऐतिहासिक कागदपत्रांत उपलब्ध होत नाहीं, ही मोठी दिलगिरीची गोष्ट आहे. तुकोजी राजे हे, सरफोजीराजांपेक्षांही अधिक राजकारणपटु व कुशाग्रबुद्धि असून, मोठे विद्याभिलाषी असे होते. यांना संस्कृत, तामिळ, मराठी व फारसी इत्यादि भाषा अवगत होत्या. त्यामुळें दूरदूरचे विद्वान् पंडित व फकीर लोक

यांच्या भेटीसाठीं येत असत. अद्यापि तंजावर येथें अशी एक दंतकथा प्रसिद्ध आहे कीं, कोणी अवलीया फकीर आरबस्थानांतून एके वेळीं तुकोजी राजांचे भेटीस तंजावर येथें आला. तो त्यांचे अनेक सद्गुण पाहून अत्यंत संतुष्ट झाला, आणि त्यानें आपला प्रसाद ह्मणून, तुकोजी राजांस 'नागिणी' आणि 'पद्मिणी' अशा दोन तरवारी नजर केल्या. या तरवारींच्या अंगीं कांहीं अलौकिक शक्ति होती, असें ह्मणतात. या तरवारी मद्रास येथील सरकारी पदार्थसंग्रहालयामध्यें पुष्कळ वर्षें वास करीत होत्या.*

तुकोजी राजे यांच्या कारकीर्दींत जीं राजकारणें किंवा ज्या लढाया वगैरे झाल्या, त्यांची माहिती अद्यापि उपलब्ध नाहीं. तथापि, कर्नाटकांत या सुमारास अनेक चळवळी चालू असून, निरनिराळीं राष्ट्रें स्वसत्ता स्थापित करण्याचे प्रयत्न करीत होतीं; आणि निरनिराळे धाडसी पुरुष, आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर व तरवारीच्या बळावर, आपला अभ्युदय करण्यासाठीं एकमेकांशीं अत्यंत स्पर्धा करीत होते. इ. स. १७१० मध्यें कर्नाटकचा नवाब दाऊदखान हा गुजराथचा सुभा झाल्यामुळें, दिवाण सादतउल्लाखान ह्यांस ती जागा मिळाली. तेव्हांपासून तो आपल्या सत्तेचा प्रसार करण्यासाठीं, तंजावर व त्रिचनापल्ली या दोन संस्थानिकांवर एकसारखी बकदृष्टि ठेवून बसला होता, व मद्रासचे चिनापट्टणकर इंग्रज व फुलचरीकर फरासीस हे, कर्नाटकांत आपला प्रवेश करण्यासाठीं योग्य संधि पहात होते. दक्षिणचा सुभेदार चिनकुलिचखान ऊर्फ निजामउल्मुल्क हा अत्यंत बलाढ्य होऊन कर्नाटकावर केव्हां आपली दृष्टि फिरवील, याची सर्वांसच भीति वाटत होती. अशा परिस्थितीमध्यें आपलें राजछत्र सुरक्षित ठेवणें हें अत्यंत बिकट काम होतें. परंतु तुकोजीनें ह्या वेळीं आपली सत्ता डळमळूं दिली नाहीं. इ. स. १७३२ मध्यें कर्नाटकचा नबाब मृत्यु पावला, आणि त्याच्या भावाचा मुलगा दोस्तअली हा त्याच्या गादीवर बसला. त्या वेळीं कर्नाटकांत थोडीशी चळवळ उत्पन्न होऊन तिचा त्रास तंजावरास पोंचतों कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली. परंतु तुकोजीनें राज्यकारभार मोठ्या दक्षपणानें व बंदोबस्तानें करून, आपलें संस्थान चांगलें सुरक्षित ठेविलें. परंतु दुर्दैवानें, इ. स. १७३५ मध्यें, त्याच्यावर कालचक्राचा फेर येऊन तो मृत्यु पावला. त्यास अरणाबाई, रामकुंवरबाई, मोहिनाबाई, सैनाबाई व लक्ष्मीबाई अशा लग्नाच्या पांच स्त्रिया, व अन्नपूर्णाबाई या नांवाची कट्यारीबरोबर लग्न लाविलेली सहावी स्त्री, मिळून एकंदर सहा स्त्रिया होत्या. यांपैकीं लग्नाच्या स्त्रियांस

* Tanjore Mahratta Principality by Hickey, Page 86.

बाबासाहेब, सयाजी, अण्णासाहेब, नानासाहेब असे चार पुत्र होते, आणि सहाव्या स्त्रीस प्रतापसिंग या नांवाचा पांचवा दासीपुत्र होता. यांपैकीं पहिला पुत्र बाबासाहेब हा, व्यंकोजी ऊर्फ एकोजी राजे हें नांव धारण करून, तंजावरच्या गादीचा अधिपति झाला. परंतु तो अल्पायु निपजून, त्याची कारकीर्द अवघी एक वर्षांतच समाप्त झाली. हा राजा जात्या संशयवृत्तीचा होता. तशांत त्यास गादीवरून पदच्युत करण्याबद्दल त्याच्या भावांनीं कांहीं कारस्थानें केल्यामुळें, त्याची संशयवृत्ति अधिक वाढून, तो जवळ जवळ वेडा झाला होता. कोणाच्या हातांत कट्यार असली किंवा कोणाच्या हातांत कांहीं शस्त्र असलें, तर त्यास लागलींच संशय व भीति उत्पन्न होत असे. 'श्रीमत् भोंसलवंशचरित्र' नामक शिलालेखामध्यें असें लिहिलें आहेः— "कोणी ब्रिदीस जाणार येणार देखील, यांहीं देवाचा नामोच्चार केला, किंवा त्यांचा ओंठ हालूं लागला, अथवा एकीकडे कांहीं दोघे मिळून बोलूं लागले, किंवा कोणाच्या हातीं जपमाळ पाहिली, तरी ती यांच्या ठायीं, आपल्यास वश करण्यास किंवा मारण्यास मंत्र यंत्र करीत आहेत ह्मणून निश्चयेंकरून समजून," त्यांच्या पारिपत्यास तो उद्युक्त होत असे.* राजा असा संशयवृत्ति बनल्यामुळें राज्याचा कारभार विस्कळित झाला, व स्वार्थपटु आणि मतलबी लोकांचें त्याच्या दरबारांत प्राबल्य झालें, आणि त्याच्या शत्रूंस तंजावरावर स्वारी करण्यास चांगली संधि मिळाली. अर्काटचा नबाब दोस्त अलीखान याचा सेनापति व जांवई चंदासाहेब हा तंजावरावर चालून आला. परंतु तंजावर येथील जुन्या पराक्रमी सरदारांच्या शौर्यापुढें त्याचें कांहीं एक चाललें नाहीं. तो तंजावरचा किल्ला हातीं येत नाहीं असें पाहून, कांहीं खंडणी घेण्याचें मान्य करून, त्रिचनापल्लीस निघून गेला. तदनंतर थोड्याच दिवसांनीं बाबासाहेब भ्रमिष्ट होऊन शके १६५९ पिंगल नाम संवत्सरे या वर्षी मृत्यु पावले. त्यांस अपत्य वगैरे कांहीं नसून फक्त सुजानबाई या नांवाची एक स्त्री होती. ती शहाणी व चतुर अशी होती. तेव्हां तंजावरच्या अमात्य व कारभारी मंडळींनीं, हीच राजस्त्री राज्यकारभार चालविण्यास योग्य आहे असें पाहून, तिला गादीवर बसविलें; आणि तिच्या नांवाची द्वाही फिरविली. या स्त्रीची कारकीर्द तंजावरच्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाची मानिली जाते. हिंदुस्थानामध्यें मराठ्यांच्या स्त्रिया प्रसिद्धपणें राजपद स्वीकारून राजकारणांत चमकत असल्याचीं अवघीं तीन चार उदाहरणें प्रसिद्ध आहेत. राजारामाची बायको ताराबाई; दुसरी तंजावरची राणी सुजानबाई; व तिसरी इंदूरची राणी अहिल्याबाई ह्याच मुख्य राजकर्त्या स्त्रिया होत. राणी सुजानबाई हिची

* श्रीमद्भोंसलवंशचरित्र पृ० ७१.

कारकीर्द अवघी तीन वर्षें झाली. ती फार औदार्यशाली व सद्गुणी स्त्री असून तिचें दरबारी मंडळीवर चांगलें वजन बसलें. तिला शांतपणानें राज्यकारभार करण्याची संधि पुष्कळ दिवस मिळाली असती, तर तिचें नांव तंजावरच्या इतिहासांत अधिक प्रसिद्ध झालें असतें. परंतु तिच्या कारकीर्दींत गादीसाठीं प्रयत्न करणारे अनेक शत्रू निर्माण झाल्यामुळें, तिला राजपदाचा अधिकार फार दिवस उपभोगितां आला नाहीं. तिची कारकीर्द पुरी तीन वर्षें झाली नाहीं, तोंच 'सवाई शहाजी' या नांवाचा कोणी इसम, कोयाजी घाडगे या नांवाच्या एका सरदाराच्या साह्यानें, तंजावरच्या गादीचा हक्क सांगण्याकरितां तोतया निर्माण झाला; आणि त्यानें तंजावर येथील किल्लेदार सय्यदखान यास फितवून, तंजावराची गादी बळकाविली. तंजावरच्या इतिहासांत, 'काट राजा' या नांवानें हा तोतया प्रसिद्ध आहे. त्यानें इंग्रज व फ्रेंच लोकांस द्रव्य देऊन, त्यांचें सैन्य आपल्या मदतीस बोलाविलें व तंजावरच्या गादीचे आपण अस्सल वारस आहों, असा सर्वांच्या मनांत भ्रम उत्पन्न केला. परंतु हा काटराजा, 'रूपी' नामक बटकीचा एक मुलगा असून, याचा तंजावरच्या गादीशीं कांहींही संबंध नाहीं, अशी तंजावरचा किल्लेदार व मुख्य मुख्य सरदार यांची लवकरच खात्री झाली. यामुळें त्यांनीं या ढोंगी काटराजास तत्काल काट दिला. नंतर त्यांनीं, सयाजीनामक तुकोजीच्या द्वितीय पुत्रास कांहीं दिवस गादीवर बसविलें. त्यास केवळ नाममात्र राजा करून सर्व राज्यकारभार, मुसलमान किल्लेदार सय्यदखान व त्याचा भाऊ सय्यद कासीम यांनीं आपल्या हातीं घेतला. याप्रमाणें कांहीं दिवस तंजावरची राजसत्ता लष्करी लोकांच्या हातांत जाऊन तेथें बेबंदशाही सुरू झाली; आणि गृहकलह, परस्पर मत्सर, द्वेषबुद्धि, सत्ताभिलाष इत्यादि राष्ट्रविनाशक दुर्गुणांचा प्रादुर्भाव होऊन, तंजावरचें राज्य लवकरच रसातळास जाणार कीं काय, अशी भीति वाटूं लागली. परंतु अशा संकटप्रचुर प्रसंगींही तंजावरच्या मल्हारजी गाडेराव, मानाजी जगताप व अनप्पा शेडगेप्रभृति मुख्य सरदारांनीं जनतेचा कल पाहून, तंजावरच्या गादीवर योग्य पुरुषाची योजना करण्याचा संकल्प केला. आणि तुकोजीच्या विद्यमान चिरंजिवांपैकीं प्रतापसिंग या नांवाचा जो दासीपुत्र होता, तोच राजपदास सर्व गुणांनीं युक्त आहे असें पाहून, त्यास इ स. १७३९ या वर्षीं सिंहासनारूढ केलें. सर्व प्रजेच्या अनुमतानें, रूप, गुण, क्रिया, बुद्धि, या सर्व गुणांनीं युक्त असा दासीपुत्र, गादीस योग्य अधिपति ठरविल्याचें हें उदाहरण तंजावरच्या इतिहासांत लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. "प्रतापसिंहाची माय, राजाची समजातीची झाली, करितां हा पुत्रच राज्यास योग्य ह्मणून सर्वत्रांनीं निष्कर्ष करून,

शके १६६१ सिद्धार्थी संवत्सरे प्रतापसिंह राजास तक्तनशीन केलें." हें तंजावरच्या शिलालेखांतील वाक्य फार महत्त्वाचें आहे. असो. प्रतापसिंह राजे ह्यांची कारकीर्द इ. स. १७४० पासून इ. स. १७६३ पर्यंत तेवीस वर्षें झाली. ती अत्यंत महत्त्वाची व मनोरंजक असून तिनेंच तंजावरच्या इतिहासाचा मुख्य भाग आक्रमून टाकिला आहे, असें ह्मटलें तरी चालेल.



'इतिहाससंग्रहां'त प्रसिद्ध झालेली

# होळकरदरबारांतली हिंगण्यांची वकिली.




हें प्रकरण


दत्तात्रय बळवंत पारसनीस

संपादक, 'इतिहाससंग्रह'

सातारा,


यांनीं संशोधून तयार केलें

तें,


मुंबई येथें,

'निर्णयसागर' छापखान्यांत तुकाराम जावजी

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

नं. २३ कोलभाट लेन.

इ. स. १९११.


किंमत ४ आणे.

येथून पाठविलीं. जें करणें तें तेथून होतें. अनाजी लक्ष्मण याचे बंधु, गोविंद लक्ष्मण, येथें येऊन रावजींसीं बोलून, बाईचीं पत्रें घेऊन येथून कारकून पुण्यास आला. त्यास पंधरा दिवस जाले, आला असेल. तेथून मध्यस्थाचे लखोटे डांकेवरून दोन रावजींस आले. त्याचा आशय समजला नाहीं. कलम १.

रावजींसमागमें जरीपटका व मुतालकी शिक्के दादासाहेबांनीं दिले, ते बराबरच घेऊन आले आहेत. कलम १.

रावजींचा मजकूर बाईसीं बोलावयाचा आहे, ह्मणजे बाईचा खुलासा काय तो कळेल. परंतु बाईसीं बोलावें न बोलावें याची आज्ञा आल्यावर, बोलून उत्तर होईल तें लिहीन. कलम १.

बाईची चित्तवृत्ती, आज सहा महिने जाले, ऐक्यास आणण्यास करितों, परंतु घडत नाहीं. समागमें कोणी कारभारी शहाणा नाहीं. स्त्रीचा स्वभाव. यासी साधन हलके तऱ्हेनें करावें, तर तें ठीक नाहीं. पुढें घडेल तें खरें. कलम १.

रावजींचे मनांत, दादासाहेब झांशीस जातात या अर्थे, आपण बाईचे कैदेंत किल्ल्यांत आहेत, तर हें ठीक नाहीं. हें स्थळ पुरत नाहीं हें मिस करून, किल्ल्यांतून निघोन बाहेर शहरपन्ह्यांत राहावें ऐसें आहे. जे समयीं बाईशीं बोलतील ते समयीं बाईस सूचना करीन, कीं यांस किल्ल्याबाहेर राहावयास सांगू नये. येथेंच राहाणें ऐसी सूचना करीन. मग बाईनीं ऐकिलें तर उत्तम. एक दोन वेळ सांगून किल्ल्यांतून बाहेर न जात ऐसें करीन. बाईजवळ एकांत समय फावणें कठीण. गोष्ट फुटली तर वाईट. यास्तव उगाच आहें. हे जाऊंच लागतील तेव्हां एकांतीं गांठ पाडून सांगणें प्राप्त. तोंवर आपली आज्ञा येईल तसें करूं. कलम १.

बाईस आह्मी कांहीं बोलावयासी गेलों ह्मणजे मर्जीच ठीक पडत नाहीं. कदाचित् रावजींचें वर्तमान सांगितल्यावर जातीनें शुद्ध असली तरी ऐकून बंदोबस्त करितील. नसली शुद्ध तर ऐकून उगीच राहतील. यावरून त्यांचें मानस काय तें समजेल. कलम १.

सदरहू सहा कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२.

श्री. २० एप्रिल इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे छ २५ मोहोरमचें आज्ञापत्र आलें, त्या दिवसापासोन बाईसीं बोलत असतां आज उत्तर देतें,

उद्यां देतें. मधें मधें हेंही बोलणें कीं, राजश्री महादजी शिंदे यांजकडून उत्तर आल्यावर उत्तर लिहून देईन. बहुत दिवस जाले, जासूद बसले आहेत; समय मसलतीचा; आपला उपयोग लिहिल्याप्रमाणें पडावा ह्मणत गेलों. तेव्हां त्रासरूप मर्जी होऊन उत्तर बोलत गेली कीं, ऐवज नाहीं ह्मणाल तर उत्तर देईन. अथवा पाटील-बावांचे जाब येऊं द्या, मग उत्तर देईन. ऐसें करितां पाटीलबावांचीं पत्रें बाईस आलीं व वाफगांवासही गेलीं. त्यांतील अर्थ समजण्यांत आले नाहींत. ऐसें लांब-णीवर घालून हलीं निखालसपणें पत्राचें उत्तर लिहून दिल्हें, तें बजिन्नस पाठविलें आहे. साडेतीन महिने जाबसालाखालें घालून शेवटीं हें पत्र लिहून दिल्हें. तेव्हां बाईस विचारिलें कीं, आपलें ह्मणणें हें होतें कीं, पाटीलबावांचें उत्तर आ-ल्यावर काय सांगणें तें सांगूं; त्याचें फल हेंच कीं काय? त्यास उत्तर दिलें कीं, वाफगांवास पत्रें गेलीं, त्यांचीं उत्तरें पाटीलबावांकडे गेलीं. आमचा जाब हें पत्र लिहून दिल्हें. सावकार व घेणार तेथेंच आहेत. ऐसीं उत्तरें होतात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३.

**श्री.** ता. २४ एप्रिल इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजेः— चंद्र ९ जमादिलावलचें पुरवणीपत्र छ २१ माहे मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, आनंदराव पवार व महिपतराव यांचे बंधु हे महेश्वरीं आले, यांची भेट बाईसीं जाली व बोलणें काय जालें, व बाजीरायास भेटून यांसीं काय बोलणें जालें, याचा बारीक रीतीनें शोध करून लिहिणें ह्मणून आज्ञा. त्यावरून कांहीं कळलें, तें सविस्तर वेगळीं पत्रें लिहिलीं आहेत, त्यावरून कळेल. राजश्री बाजीराव यांनीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस पत्र पाठविलें कीं, पाटीलबावांजवळून सर्व प्रकारें खातरजमा करून घेतली. हरी बावाजी मारला, तो चित्तांत किंतु पाटीलबावांचे होता. त्याचें निवारण केलें. पाटीलबावांचीं पत्रें तुमचे व आमचे नावें खातरजमेचीं आलीं, तर तुह्मी बेवसवास झांशीस येणें. तुह्मी, आह्मी व पाटीलबावा एकत्र जालियावर जी मसलत करणें ती करूं. याप्रमाणें रावजींनीं पत्रें सांप्रत श्रीमंतांकडे सुरतेस पाठविलीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४. ता. २७ एप्रिल इ. स. १७८३.

श्री.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:– विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे, तागाईत छ २४ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. छ ९ जमादिलावलीचें पत्र पाठविलें, तें येथें छ २१ माहे मिनहूस दो घटका रात्रीस डाकेसमागमें पावलें. पत्राचे अन्वयें बाईसीं बहुत बोललों. हा ऐवज लौकर रवाना करावा, यांत सर्वोपरी चांगलें. परंतु बाईचें एकच ध्यान कीं, वाफगांवचें उत्तर आलें नाहीं. आह्मीं उत्तर दिल्हें कीं, वाफगांवचा जाब आपणास आला. आमची बातमी आहे. त्यावरून बाई ह्मणाली कीं, पत्र आलें ह्मणजे तुह्मांस सांगून मग काय करणें तसें ऐवजाची सोय करूं. तूर्त पत्र येऊं द्या. याप्रमाणें जाबसाल जाला. सेवेसीं श्रुत होय. हे पत्रलगता लाखोटा घ्यावा हे विज्ञापना."

---

## लेखांक २५.

श्री. ता. २७ एप्रिल इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:– मागाहून वरात दोन लक्षांची पाठविली, ती वरात व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचें पत्र बाईस दिल्हें. त्यांणीं पत्राच्या नकला करून व आपलें पत्र, ऐसें वाफगांवास पाठविलें. तेथून उत्तर आलियावर काय सांगणें तें सांगूं ह्मणून बोलली. हें वर्तमान डाकेबरोबर लिहून पाठविलें. अलीकडे फार दिवस जाले; जासूदजोडी बसली; निकड करितात; ऐवज द्यावा; ह्मणोन बोलणें जालें. त्याचें उत्तर हेंच कीं, वाफगांवचे जाब आलीयाखेरीज होत नाहीं. तर वाफगांवास सांडणी स्वार अथवा जलद जासूदजोडी पाठवावी. उत्तर काय तें लौकर आणवावें ह्मणोन बोलत असतां, मर्जी दिक होऊन उत्तर दिल्हें कीं, घेणार व देणार उभयतां तेथेंच आहेत. मजकडे गुंता काय? ऐसें ह्मणतात. राजश्री पाटीलबावांचा कबिला देशींहून त्यांजकडे जावयास, मर्दानाचे घाटें नर्मदा उतरून काल करईस आले. येथून बाईनीं त्यांस भेटीस बोलाविलें आहे. आलियावर वर्तमान होईल तें लिहूं. त्याजबराबर राजश्री देवजी गवळी कांहीं जाबसालनिमित्य मामलतीचे, बाईकडे कालच आले. बाईची त्यांची भेट जाली. पुढें कबिल्याबराबर जातील किंवा माघारे अशेरीस जातील, हें कळलीयावर सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६.

श्री. ता० १ मे इ. स. १७८३.

" सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २८ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. येथील पूर्वी जाबसाल जाल्याचें उत्तर बाईनीं दिलें. ते जोडी सरकारची येथून रवाना केली. छ १८ सोमवार माहे मिनहूस तदनंतर आज्ञापत्र छ ९ मिनहूचें तें छ २१ मिनहूस पावलें. त्याचीं प्रत्योत्तरें, येथून सरकारची कासदजोडी सागर प्रांतीं गेली होती, ते येथें आली; त्या जोडीबराबर छ २४ जमादिलावलीं रविवारीं पाठवलीं, ते पावतील. अलीकडील वर्तमान, बाईकडील जोडी आली. मोहनच्या राजाकडे बातमीसाठीं गेली होती, कीं श्रीमंत राजश्री दादासाहेब झांशीं प्रांतीं येतात, त्यास सुरतेंत येविषयींची तयारी व पक्कें वर्तमान लिहावें. त्यावरून अलीमोहनचें राजाचें पत्र आलें. त्या पत्रींचा मजकूर कीं, स्वारीची तयारी नाहीं व आवाई ऐकितों. विशेष कांहीं तसें असल्यास आपले बातमीची जोडी कशास? मीच वर्तमान लिहीन. याप्रमाणें पत्र होतें. तें कारकुनांनीं बाई-जवळ वाचलें, तें ऐकिलें. सेवेसीं लिहिलें असे. राजश्री मुकुंदराव दिवाण यांचे जबानीचें वर्तमान कीं, राजश्री केसोपंत पाटीलबावांकडून श्रीमंतांकडे सुरतेस गेले. त्यांचें बोलणें होऊन पत्रें माघारी पाटीलबावांकडे जातील. त्याचीं उत्तरें फिरून श्रीमंतांस जातील. तेव्हां तह काय ठरणें तो ठरेल. हें ऐकिलें. त्यांनींच रुबरू याप्रमाणें सांगितलें, तें लिहिलें असे. राजश्री बाजीराव बर्वे घर किल्ल्याबा-हेर मागणार हें वर्तमान छ २४ जा। वलचे पत्रीं लिहिलें होतें. तों परस्परें वर्तमान ऐकिलें कीं, राउजी बाईजवळ बाहेर जागा मागतात. हें छ २६ कळलें. मग छ २७स प्रातःकाळीं कोणी कारकून मंडळी नसती, त्या समईं जाऊन सूचना केली. राजश्री बाजीराव बाहेर जागा मागतील तर न द्यावी. ऐकून उत्तर दिलें कीं कां? मीं उत्तर दिलें कीं, तुह्मी दौलत करितात. तुह्मांस विदित असेल. हें ऐकून बाई बोलली कीं, खरेंच, जागा मागावयास आले होते. परंतु मीं कबूल केलें नाहीं. तुह्मीं सूचना केली याचें कारण कळों द्यावें. त्याचें उत्तर दिलें कीं, "समयसार तुह्मांसीं बोलणें. तूर्त समय नाहीं. तुमचें आमचें कधीं खलबत होत नाहीं. लोकांस संशय पडेल." इतकें सांगून घरास आलों. राऊजीचे शोधांत पक्केपणें एक दोन लावून ठेविले आहेत. तूर्त बाहेर स्थळ रहावयास बाईनीं न द्यावें, याप्रमाणें जालें. किल्ल्यांत त्यांनीं असावें. याउपरी वर्तमान होईल तें सेवेसीं लिहीत जाईन. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना."

## लेखांक २७.

श्री. ता. ५ मे इ. स. १७८३.

"सेवेसीं आज्ञांकिताचा कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–राजश्री बाजीराव बर्वे वैशाख शुद्ध २ शनिवारीं दीपसमयीं माझे बिऱ्हाडास आले. मी घरींच होतों. बराबर पांच सात माणसें व आपण आले. मी दरवाजापावेतों सामोरा जाऊन घरांत आणलें. येऊन बसले. त्यांचीं माणसें, आमचीं माणसें, दूर त्यांणीं करून, मी व ते ऐसे उभयतां बसलों. तदनंतर प्रथम मी बोललों कीं, आज कोणीकडे दया केली, कीं येऊन आमचा परामर्ष केला. ऐकून त्यांनीं उत्तर दिलें कीं, तुह्मी आह्मी कोणी परकी नाहीं. रेवेस संध्येस गेलों, तिकडून तुह्मांकडे आलों. हें उत्तर त्यांणीं केलें. मग तेच बोलूं लागले. तेंच लिहिलें असे.

श्रीमंत राजश्री दादासाहेब आनंदवल्लीस जातात. राजश्री बाजीराव यांणीं श्रीमंत राजश्री रावसाहेबांजवळ जावें, याप्रमाणें वर्तमान अलीकडे ऐकतों. कलम. १

आमचा मानस पुणियास जावें, परंतु आह्मां सांगातें सरंजाम नाहीं. आह्मीं विनंति लिहिली आहे. कांहीं पागेचीं घोडीं आह्मांस द्यावीं. आमचे स्वरूपानें नेलियास उत्तम. कलम. १

आह्मी दादासाहेबांपासून निघालों, ते समयीं दादासाहेबांनीं अहिल्याबाईस एक पत्र व राजश्री महादजी शिंदे यांस पत्र दिलें. तीं पत्रें आह्मीं बाईस व पाटीलबावांस दिधलीं नाहींत. आमचें मानस दादासाहेबांचे सोबतीस राहावयाचें नाहीं. त्यांचे मनोधारणास पत्रें घेतलीं. येथें येऊन स्वस्थ बसलों. फार करून मानस राजश्री नानांजवळ असावें. कृपा करितील. दीर्घ द्वेष त्यांचे ठिकाणीं नाहीं. कलम. १

येथें आलों तेव्हां घोडी पिढी दौलत चांगली होती, ते जळाली. वस्त्र देखील राहिलें नाहीं. कर्जदार जालों. कलम. १

आजपावेतों श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे चरणाजवळ असतों, तर फार करून ऊर्जित होतें. सांप्रत दुसरे ठिकाणीं जावें, हे इच्छा सर्वथा नाहीं. कलम. १

सदहू ११ कलमें ह्यांचें बोलणें. कलम. १

मीं उत्तर दिल्हें कीं, आपण मजकूर केला, यास मीही माहीत थोडा बहुत आहें. इतक्या कलमांत मजला एक गोष्ट विदित नाहीं. परंतु मिथ्या बोललों कीं, माहीत थोडा बहुत आहे. कलम. १

रावजींची खातर इतक्या उत्तराचें एक उत्तर दिलें कीं, श्रीमंत राजश्री दादासाहेब पुणियास गेलियावर सहजच तुमचे दोष दूर होऊन श्रीमंत कृपा करितील. चिंता न करावी. कलम. १

झांशीस जात नाहींत हें फार चांगलें. कलह तुटला. कलम. १

आह्मी येथें येऊन दीड वर्ष जालें, एकनिष्ठपणें आहोंत. सरकारचें ह्मणणें हें होतें कीं, एक संवत्सर उगेंच असावें. तदनंतर स्वरूपानशीं येऊं. कलम. १

श्रीमंत राजश्री दादासाहेब अखंड राजश्री नानांचे व हरिपंततात्यांचे गुण घेतात कीं, कारभारी आमचे दौलतींत असे होते कीं, त्यांनीं राज्य रक्षिलें. सदैव उभयतांचे नांवें मजकूर जाला तर श्रीमंतीं बेंरेच ह्मटलें. सखारामपंत व आबाजी महादेव व चिंतो विठ्ठल वगैरे यांस दोष ठेवीत आहेत. ते अप्रामाणिक. उभयतांचे सद्गुण घेतात. कलम. १

शिंदे होळकर यांणीं वांचविले, हें दादासाहेब ह्मणत असतात. कलम. १

बाईनीं दिढा वर्षांत तीन साडेतीन हजारपावेतों खर्चास दिले. दोन तीन कर्ज घेऊन खाल्ले. ही दशा जाली ! कलम. १

हैदरखानाकडे होतों, तेथें फंदफितूर न करितां राहून, एक वेळ दादासाहेबांची भेट घेऊन मग पुणियास जावें. वचन दादासाहेबांजवळ गुंतलें होतें, ह्मणून सुरापूरकर आग्रह करीत असतां तेथें न राहून सुरतेस गेलों. वचन मोकळें करून पुणियास जावयाकरितां येथें आलों. कलम. १

तुह्मांस डाकेबराबर लाखोटा आला, तो श्रीमंतीं लिहिला होता कीं मध्यस्ताचें पत्र होतें ? त्याचें उत्तर रावजींनीं दिलें कीं, राजश्री गोविंदतात्यांचें पत्र होतें. त्यांणीं लिहिलें होतें कीं, तुमचें येणें होत नाहीं. पुढें पर्जन्यकाळ आला. त्याचें उत्तर आह्मीं पाठविलें आहे. उत्तर आलें ह्मणजे जाऊं. याप्रमाणें सांगितलें. कलम. १

टिपूची तारीफ फार केली कीं, दौलती मोठे खानामागें दौलत राखील. कलम. १

याप्रमाणेंच बोलणें जालें, तें सेवेसीं लिहिलें. पानदान आणोन मशारनिल्हेची मुदारत केली. वस्त्रें संग्रहीं नाहींत कीं द्यावीं. बाजारांतून आणावयाची सोय नाहीं. मग पानदान आणून रुसकत केलें. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना.”

---

## लेखांक २८.

पौ. छ. १५ जमादिलाखर सलास **श्रीगजानन.** ५ मे इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ. ३ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहून, काशीद व जासूदजोडीबरोबर पत्रें रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान, राजश्री पाटीलबावांच्या लष्करांतून चैत्र शुद्ध १४ चीं कोणी गृहस्थाचीं पत्रें रवाना जालीं. ते वद्य चतुर्दशीस येथें पावलीं. त्यांत वर्तमान कीं, पाटीलबावांनीं बावनबुरजी गढी घेऊन तेथून कुच करून ग्वाल्हेरीस आले. किल्याभोंवताले मोर्चेबंदी करून शहरपन्ह्यांतून पूर्वेकडून दरवाजाशीं मोर्चे लाविलें. तोफ लावून पन्नास हात किल्याची मुंढे लढाऊन दिली. एक बावडीचें पाणी किल्यांत होतें, तें पाणी बंद केलें. खासा मोर्च्यांत जात असतात. त्रयोदशीस हल्ला करून किल्याचे तीन दरवाजे घेतले. दोन दरवाजे वरते राहिले आहेत. किल्यावरील शिबंदीचे लोक गडबडले आहेत. किल्लाही लवकरीच हस्तगत होईल. म्हणून त्या गृहस्थानें लिहिलें होतें. भोपाळवाले पठाण पेशजीं येथें आले होते. बाईशीं येथें करारमदार करून गेले. तो तपशील पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलाच आहे. त्यास त्या पठाणांनीं आपले कबिले इंदुरांत आणून ठेविले. तदोत्तर कांहीं खर्चा-वेचाची बेगमी करावी ह्मणून जमियतेनिशीं भोपाळच्या तालुक्याचा मातबर गांव मारावयास गेले. तें वर्तमान भोपाळवाल्यास कळलें. त्यांनींही तेथून हजार पठाण पाठविले. त्यांनीं येऊन त्या गांवाजवळ दबा धरला होता. हेही इकडून पांच सहाशें पठाण गांवावर गेले. मध्यें त्यांनीं दबा धरला होता. त्यांसी यांसी गांठ पडून झटपट जाली. पहिल्यानें यांनीं त्यांचा मोड केला. ते निघून चालले. यांनीं कोसभर पाठलाग केला. त्यांनीं माघारी उलटून यांचा मोड केला. दोन चारशें माणूस उभयपक्षीं कामास आलें. हे पांच भाऊ होते, त्यांपैकीं चौघे लढाईत कामास आले. एकास जखमा लागल्या. उचलून नेला. याप्रमाणें येथें वर्तमान आलें. पेशजीं आज्ञापत्रीं आज्ञा आली जें, लग्नपट्टीच्या दोन लक्ष रुपयांविषयीं बाईनीं तुकोजीबावांच्या पत्राचा आक्षेप केला आहे. त्यास येथून तुकोजी होळकर यांनीं बाईस पत्र पाठविलें आहे. तुह्मीं बाईशीं बोलून वरातीप्रमाणें ऐवजाची तरतूद करवून ऐवज लवकर पाठवणें. त्यास

येथें बाईस विचारिलें. त्यांनीं उत्तर केलें जें, अद्याप त्यांचें पत्र आलें नाहीं. राजश्री कृष्णाजी बहिरव थत्ते यांस लिहिलें, तें पत्र फोडून जरूर पहावें. बहुत काय लिहिणें, लोभ करावा हे विज्ञप्ति."

## लेखांक २९.

**श्री.** मे इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विनंति. राजश्री पाटीलबावा ग्वालेरजवळ होते. तेथून बावनबुर्जी गढी गोहदवाले यांची होती. त्या गढीस जाऊन मोर्चे लाविले. ते गढी घेतली. तेथून शह गोहदेवर आहे. ग्वालेरी किल्ला हा कालवर खालीं जाला नाहीं. परंतु होईल. यांणीं आड घातली कीं, गोहद् घेऊन मग ग्वालेर घेऊं. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. पाटीलबावांजवळ गोसावी व बैरागी चाकरीस होते, ते दूर केलें. त्यांचा जमाव सात आठ हजार आहेत. बराबर सामान लढाईचें आहे. त्यांणीं महालोमहालची खंडणी घेत उज्जनी-पलीकडे आले. उज्जनीस येणार ह्मणोन वर्तमान ऐकिलें. इंग्रजाचा तह जाला. श्रीमंत राजश्री दादासाहेब आणावयास राजश्री केसो अनंत राजश्री पाटीलबावां-कडून गेले. ते बावापिराचे घाटावर जाणार. ... तिकडून दादासाहेब बडोदें येथ-पावेतों आले, ह्मणोन ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ३०.

**श्रीगजानन.** ता. १७ मे इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ जमादिलाखरपर्यंत स्वामींच्या कृपावलोकनेंकरून मुक्काम महेश्वर येथें वर्तमान यथास्थित असो. विशेषः—सरकारचें आज्ञापत्र छ २२ जमादिलावलचें आलें, तें छ ७ जमादिलाखरीं येथें पावलें. पत्र पाहून तेच समयीं दरबारास जाऊन बाईस वाचून दाखविलें. ते समयीं येथील कारभारीही जवळ होते. पत्र ऐकून बाईनीं उत्तर केलें जें, "आह्मीं पत्र राजश्री तुकोजी होळकर यांस लिहिलें आहे. त्यांचें उत्तर अद्याप आलें नाहीं." आह्मीं उत्तर केलें जें, "सरकारचे दोहीं आज्ञापत्रीं लिहिलें आलें कीं, तुकोजी होळकर यांनीं बाईच्या पत्राचें उत्तर पाठविलें. आतां या लग्नाच्या ऐवजास बाईनीं दिक्कत करूं नये." त्यास, मुत्सद्दी व बाई बोलली जें, "पत्र येऊन आह्मीं तुह्मांस न दाखवावें असें संकट काय आहे?" शपथपूर्वक मुत्सद्दी यांनीं सांगितलें

जें, "पत्र आलें नाहीं." तेव्हां यांचें खरें, किंवा तुकोजी होळकरांनीं पत्र पाठविलें ह्मणून सरकारांत विनंति केली आहे तें खरें ह्मणावें? काल बाईचीं व सेवकाचीं ऐवजाकरितां निक्षूनच बोलणीं पुष्कळ जालीं. आह्मीं उत्तरें केलीं जें, "आपण ह्मणतात जें, तुकोजीबावांस बाकीविषयीं पत्र लिहिलें आहे, ते कोणती बाकी लिहितात तें पाहून तुह्मांसीं बोलणें तें बोलूं, असें आपलें बोलणें. तुकोजीबावांस पत्र आपण लिहिल्यास दोन अडीच महिने जाले, अद्याप उत्तर आलें नाहीं म्हणतां? आह्मांस तों सरकारचीं आज्ञापत्रें अशीं येतात. त्यांत प्रमाण अप्रमाण कोणतें ह्मणावें?" त्यास बाई बोलली जें, "एवढ्या ऐवजासाठीं आह्मीं तुह्मांसीं अप्रमाण बोलावें, असें आह्मांस संकट काय आहे? श्रीमंतांच्या लग्नाचा ऐवज आह्मीं संतोषानें द्यावा. परंतु आह्मीं तुह्मांस पत्र लिहिलें, त्याचेंही उत्तर नाहीं, व श्रीमंतांचेंही आह्मांस दुसरें पत्र नाहीं. तुह्मांस वरचेवर सरकारचीं पत्रें अशीं येतात. त्या तुमच्या पत्रावरच आह्मीं ऐवज द्यावा कीं काय?" आह्मीं उत्तर केलें जें, "आपल्यास सरकारची वरातच आली असतां, दुसऱ्या पत्राचा आपण आक्षेप करणें युक्त कीं काय?" बाई बोलली जें, "कां न करावा? हें ऐवजाचें काम होय." तेव्हां आह्मीं उत्तर केलें जें, "अशीच आपली मर्जी असल्यास आह्मी लिहितों." त्यास उलटून बोलली जें, "आह्मांस तसें पत्र पाहिजे कीं, पेस्तर सालचे ऐवजीं महालपैकीं ऐवज देणें." "अस्तु. असेंही आह्मीं श्रीमंतांस लिहितों. तेथें तुकोजीबावा काय विनंति करणें ते करतील." बाई बोलली जें, "फार चांगलें. लिहा." फिरून आह्मीं विनंति केली जें, "श्रीमंतांच्या लग्न-उत्साहाच्या ऐवजाविषयींच इतकी भवति न भवति व्हावी हें योग्य नाहीं. येविषयींचे असे जाबसाल ऐकून श्रीमंतांच्या चित्तांत कसें वाटेल, हें आपण समजतच आहांत?" बाई बोलली जें, "केवळ त्या ऐवजास आह्मीं दिक्कत इतकी करावी, असा अर्थ नाहीं. परंतु त्यांचीच अड चालावी, आमची कां न चालावी? यांत तुह्मी काय लिहिणें तें लिहा." याप्रमाणें उत्तरें प्रत्युत्तरें जालीं. यांतील सारांश दिसून आले कीं, महालपैकीं पेस्तर सालचे ऐवजीं ऐवज देणें असें सरकारचें पत्र यावें, अगर तुकोजीबावांचें पत्र यावें, असा येथील मनोदय. सुरळीत पत्र सरकारचें अगर होळकरांचें यावें ह्मणजे ऐवज देतील. वरात घेऊन जासूद आला त्यास फार दिवस जाले, ह्मणून नित्य बोलतच होतों. त्यास बाईनीं जासुदास वरात पत्राचें उत्तर दिलें, तें सेवेसीं पत्रें देऊन जासूद पाठविला आहे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना."

---

## लेखांक ३१.

श्री. मे इ. स. १७८३.

"सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजेः– बाईनीं पत्र लिहून दिल्हें, तें खुलें दिल्हें. ते समई मीं उत्तर केलें कीं, "आपण आजपावेतों बोलत होतां, त्याचा फलादेश हा जाला! पुढें माझी अब्रू श्रीमंत ठेवणार नाहींत. यावर श्रीमंत बहुमानाचीं वस्त्रें आह्मांस देतील!" हें उत्तर केल्यावर बाईनीं हांसल्यावर नेलें. परंतु जवळ राजश्री मुकुंदराऊ दिवाण व राजश्री विनायक बाजी होते. विनायक बाजींनीं उत्तर दिल्हें कीं, "श्रीमंतांकडून येथें आला. येथून गेलीयास आचवला नाहीं." इतकें बोलले. मीं उत्तर दिल्हें कीं, "ते यश घेऊन गेले. ते कशास आंचवतील? परंतु मी मात्र बाईजवळ येऊन बाईनीं अपेश दिल्हेसें होतें." ऐसेंही उत्तरें जालीं असतां, त्यांच्या मनांत सरकारलक्षाची गोष्ट अथवा लिहिण्याचा प्रकार येऊन लिहिल्या अर्थाप्रमाणें घडावेंसें नाहीं. यावर जसी आज्ञा येईल, तसी वर्तणूक करूं. बराबर सरंजाम तीनशें रुपये दरमहाचा खर्च. कार्य तर घडत नाहीं. तेव्हां शिलेदार राऊत आहेत त्यांची आज्ञा, ठेवावे कीं हुजूर रवाना करावे. खर्चास दोनशें रुपये दीडमाही देतात, ते पुरत नाहीं. दीड-माही साडे तीनशें रुपये पाहिजेत. तें प्रमाण खर्च. वावगा खर्च नाहीं. ऐसीयास आज्ञा येईल तसी वर्तणूक करूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ३२.

पैवस्ती छ ३ रजब सलास समानीन. श्री. १९ मे इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति तागाईत छ १७ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—

श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाईसाहेब यांजपाशीं मकरीकर लाखीकर होता. तो राजश्री बाजीराव बर्वे यांजसमागमें दिला होता. तो सांप्रत बाजीराव यांनीं सुरतेस पाठविला कीं, आह्मीं येथें रहावें किंवा काय करावें! श्रीमंत पुण्यास जातात किंवा झांशीस येतात, हें कसें काय तें लिहिणें. याप्रमाणें मकरीस पत्र देऊन पाठविलें आहे. कलम १.

राजश्री जिऊबा शेणवाई यांजकडे राजश्री बाजीराव यांनीं पत्र पाठविलें कीं, श्रीमंतांचा निश्चय कसा पाटीलबावांनीं ठरविला, तो लिहून पाठविणें. ह्मणून जासूद पत्रें घेऊन गेला. कलम १.

राजश्री गणेशपंत कात्रे प्रतिनिधीकडील, त्यांचे चुलतबंधू राजश्री बाजीभट कात्रे, हे श्रीमंत राजश्री दादासाहेबांजवळ, चार मास जाले, येथूनच गेले. बाजीभटाचे मामा यज्ञेश्वर दीक्षित सफ्रे येथें आहेत. त्यांस पत्र बाजीभट यांचें आलें. पत्रीं काय मजकूर तो कळला नाहीं. ज़बानींच वर्तमान कीं, तूर्त श्रीमंत राजश्री दादासाहेब येथेंच आहेत. विलायतेस पत्रें गेलीं आहेत. उत्तरें आल्यावर काय मसलत ठरणें तें होईल. याप्रमाणें ऐकिलें. कलम १.

आह्मी सेवक. आमचे प्राणांत प्राण नाहीं. गरीब, वगवसिला कोणी नाहीं. एक स्वामीचरण जाणतों. चरणाखेरीज आश्रय त्रैलोक्यांत नाहीं. चाकरी शुद्धपणें करून आहे. कोणाची आशा धरून सरकारकामाचा शब्द येईल ती गोष्ट सहसा करीत नाहीं. याउपरी महाराज ठेवतील तसें राहूं. सेवकापासून आज्ञेप्रमाणें काम घडून आलें नाहीं ह्मणून भयभीत आहें. कलम १.

बाजीराव बर्वे यांची बातमी ज्या गृहस्थाकडून कळत होती, तो गृहस्थ रावजींनीं पुण्यास पाठविला. त्याजपाशीं पत्र स्वामींचें नांवें लिहून दिलें आहे. तेथील माहितगिरी त्यास आहे. विनंति करील. पुढें रावजींकडील बातमी लागावयानिमित्य आणिक कारकून त्यांचे घरचा, तोच आपला ह्मणून करून ठेविला आहे. वर्तमान कळेल तसें सेवेसीं लिहीत जाईन. कलम १.

राजश्री दादो उद्धव नासिककर, यांचे चिरंजीव नारो दादाजी, पूर्वीपासून श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे समागमें, ते सांप्रत येथें आले. बरोबर घोडीं २ तट्टें २ व उंट १ आहे. बाईची भेट रोजगारास आलों ह्मणून घेतली. परंतु दादासाहेब झांशीस जाणार, त्यांजबराबर जावें ह्मणून आले आहेत. कलम १.

बाईनीं दोन लक्ष रुपये द्यावे. लग्नाचा ऐवज याविषयीं मीं व राजश्री विठ्ठलपंत उभयतां बहुत ह्मणून पाहिलें. त्यांच्या चित्तवृत्तीस पालट होत नाहीं. वाद प्रतिवाद! ऐवजच कोठें? मजकडे तुकोजीबावांची बाकी काय आहे? आह्मीं उत्तर दिलें कीं, बाकीच असावी तेव्हांच ऐवज द्यावा, नाहीं तर देऊं नये कीं काय? तर साल आइंदेचे ऐवजीं तुकोजीबावांचें पत्र आणा ह्मणजे देईन असें दिक्कती सांगतात. आमचा यत्न तितका भय प्रीत दाखवून, युक्तीचे वाटें बोलणें तें बोलून पाहिलें. त्यास समजतच नाहीं. चार कारभारी आहेत, त्यांनीं सांगावें तर ते बाईपेक्षां गोष्टी सांगतात. त्यांसही अगापिछा नाहीं. याप्रमाणें वर्तमान आहे. कलम १.

सदरहू सात कलमें श्रुत होय हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक ३३.

श्री. मे १७८३.

"पुरवणीपत्र श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:-सा० नमस्कार विज्ञापना ऐसीजे:-बाईचें बोलणें रूक्ष. मग काय खातरजमा ठेवून बोलतात, हें कळत नाहीं. खावंद ईश्वराप्रमाणें. अंमळशी नजर वांकडी करून खावंद पाहूं लागल्यास, क्षणांत मजबुती अथवा खातरजमा असेल ते नाहींशी होऊन डोळे उघडतील, तेव्हां विपरीत! ही दूरआंदेशी मनांत येतच नाहीं. प्रसंगीं कारभारी, त्यांस या गोष्टींचा संतोष! येथील वर्तमान या प्रकारें. आमचे खर्चाविशीं तजवीज कारभारी करून देऊं म्हणतात. आजपावेतों चारशें रुपये खर्चास दिले. मजबराबर शिलेदार सुद्धा अडीचशें रुपये दरमाहाचा खर्च आहे. येथील कर्ज घेऊन खातों. सरकारकाम होत नाहीं. यास्तव सेवेसीं विनंति लिहिली असे. माझे वडिलांनीं स्वामींचें आर्जव करून आह्मांस जागा केली नाहीं, कीं त्यावर स्वस्थ असावें. स्वामींखेरीज आह्मांस त्राता कोणी नाहीं. दैवेंकरून चरणांसीं लागलों. येथून शेवट करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपालोभ करावा हे विज्ञापि."

---

## लेखांक ३४.

पैवस्ती छ ७ रजब अर्बा समानीन. श्री. २१ मे इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:-छ १० जमादिलाखरीचें आज्ञापत्र छ १९ मिनहू्स सायंकाळीं पावलें. दोन पत्रें वेगळीं पावलीं. एक्या पत्रीं राजश्री बाजीराव बर्वे यांचा मजकूर लिहिला होता. त्याचीं उत्तरें वेगळीं पुरवणीपत्रीं लिहिलीं आहेत, व बाईस पत्र द्यावयाचें तें दिलें. त्याचें उत्तर घेऊन मागाहून पाठवितों. त्यांतील अर्थ तूर्त बोलण्यांत आला, त्याची आलाहिदा पत्रीं विनंति लिहिली आहे. श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे लग्नाचा ऐवज सर्वांनीं दिल्हा. बाईची दिकत. जासुदास फार दिवस लागले. ऐवज नाहीं. जासूद ठेऊन फळ काय? त्यावरून त्यांणीं उत्तर लिहून दिलें, तीं पत्रें पुरवणी सरकारच्या जोडीसमागमें पाठविलीं आहेत. त्याउपरी छ १० जमादिलाखरीचीं पत्रें आलीं. त्यांवरून बाईशीं एकदोन वेळ एकांत गांठ पाडून पत्रांचा अर्थ समजाविला, व ऐवजाविषयीं बोललों कीं, "आपण लग्नास ममतापुरस्सर श्रीमंतीं बोलाविलें असतां न गेलांत, तेही चूकच. दुसरें ऐवजास दिकत लावून जासुदास जाब दिला हेही चूक. तर असें न करावें. सर्वांनीं ऐवज दिला.

आपण मातबर. तुमचे प्रतिमेचें दुसरें कोणी नाहीं. हा ऐवज द्यावा हें उत्तम." ऐकून उत्तर दिलें कीं, "मी काय करूं? वाफगांवचें उत्तर साफ येत नाहीं, यास्तव दिकत. तर आतां ऐवज द्यावा हें तुह्मी ह्मणतां, तर माळवे प्रांतीं महाल आहेत, त्यांजवर पट्टी घालीन. त्याचा बोभाट ऐकूं नये. ह्मणजे ऐवज देईन." त्याचें उत्तर मीं दिलें कीं, "बोभाट होतो तो तरी आपण कोठें ऐकतात? किंवा ऐवज न द्यावा ह्मणून ह्या दिकती? सारांश, नर्मदेपलीकडील महालास पट्टी घालीत नाहीं. माळवेप्रांतीं महाल आहेत त्यांजवर ऐवज साधून देईन." आह्मीं उत्तर दिलें कीं, "आपले मर्जीस येईल तसें करावें. ऐवज द्यावा, उत्तम, चांगलें." तेव्हां बाईनीं उत्तर दिलें कीं, "कालच वाफगांवचें उत्तर आलें, तुह्मांस दाखवितें. परंतु एक लक्ष ज्येष्ठ अखेरपावेतों देईन. बाकी एक लक्ष राहिले, ते आषाढ अखेरीस याप्रमाणें देतें." हा निश्चय छ २१ जमादिलाखरीं प्रातःकालीं देवाजवळ बसली होती, त्या स्थलीं निश्चय जाला. याप्रमाणें आह्मी श्रीमंतांस लिहितों. त्यावरून बाईनीं उत्तर दिलें कीं, याप्रमाणें ल्याहावें. त्याउपरी छ २३ रोजीं गेलों कीं, वाफगांवचें उत्तर कसें आलें तें दाखवावें. त्यावरून मुकुंदराऊ यांस बोलावून ह्मणाली कीं, पत्र दाखवावें. त्यांनीं कारकुनास बोलाऊं पाठविलें. तो नव्हता. पत्र पाहिलें नाहीं. एका दो दिवसां पाहून त्यांतील अर्थ असेल तो सेवेसीं लिहून पाठवीन. पूर्वीं बाई ह्मणत होती कीं, सालमजकूरचे ऐवजीं महालासंबंधें पत्र वाफगांवचें यावें कीं, याप्रमाणें श्रीमंतीं पत्र ल्याहावें तेव्हां ऐवज देईन. ह्मणोन ह्मणत होती. त्यावरून आपणांस लिहिलें होतें. त्यास सांप्रत त्याप्रमाणें पत्रें यावीं, हें कांहीं नाहीं. ऐवजच देतात. दोन वेळ खचित पुसोन सेवेसीं लिहिलें असे. श्रीमंत राजश्री दादासाहेब भडोचेस आले. पुढें आलीमोहनच्या वाटेनें उज्जनीस जाणार. तेथेंही वाडे झाडवितात, ह्मणून साहुकारी वर्तमान ऐकिलें. राजश्री पाटीलबावा ग्वाल्हेरच्या शहास आहेत. बहुतकरून ग्वाल्हेरचा किल्ला फत्ते जाला असेल अगर होईल. देखलें ऐकलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापि."

---

## लेखांक ३५.

**श्री.** २१ मे इ. स. १७८३.

"विज्ञापना ऐसीजेः–छ १० जमादिलाखरीचीं पत्रें छ १९ जमादिलाखर माहे मजकुरीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीः—

राजश्री बाजीराव बर्वे तेथें आहेत. ते मनस्वी वर्तणूक करितात. मशारनिल्हेचा बंदोबस्त पक्केपणें करावा. किल्ल्यांतून जाऊं येऊं नये. त्यांजकडे कोणीं जाऊं नये.

जवळ माणसें ठेवणें तीं मोतादीचीं ठेवावीं. त्यांची सावधता करावी. या गोष्टीची उपेक्षा केलियास सरकारचा शब्द बाईकडे लागेल. यास्तव लिहिल्याअन्वयें बाईशीं खचित बोलून आधीं याचा बंदोबस्त करणें. उपेक्षा करावयाची नाहीं. नाना प्रकारें राजकारणें करितात ह्मणोन कळलें, त्यास बाईशीं बोलून पक्का बंदोबस्त करवावा. ह्मणून आज्ञापत्रीं लिहिलें. त्याच्या अन्वयें बाईस पत्र होतें तें त्यांस दिल्हें. १ कलम.

स्वामींची आज्ञा पुरवणीपत्रीं होती कीं, दादासाहेबांकडून पत्रें व कारकून आले गेले, हें बाईस सांगून, बाईकडून बाजीराव यांस विचारून, त्यांतील उत्तरें प्रतिउत्तरें होतील तीं लिहून पाठविणें ह्मणून आज्ञा. त्यावरून आनंदराव पवार याचा मजकूर केला. त्याचा परिणाम हें आह्मांस थोडकेंसें कळलें होतें, ऐसें शेवटीं उत्तर केलें. यास्तव पुरता विस्तार सांगितला नाहीं. सांगूं. परंतु गोष्ट मोघम ठेवून शोध करावा. तें करीत नाहींत. बाजार करितात. यामुळें सोईनें एका दो दिवसां सांगूं. माझें पत्र बाईस दाखवावें ह्मणून आज्ञा. तें पत्र वाचून दाखविलें. रावजींशीं बाईचें बोलणें स्वामींचें पत्र दिल्यावर जालें नाहीं. साबाजीपंताशीं बोलणें जालें. त्याचा मजकूर कळला तितका वेगळी पुरवणी लिहिली असे.                कलम १.

छ १९ जमादिलाखरीं पत्र पावलें. छ. २० रोजीं बाईकडे उभयतां गेलों. बाजीराव यांचा मजकूर केला. आज्ञापत्राप्रमाणें बोललों. त्याचें उत्तर एक वेळ दिल्हें कीं, "माझी खातरजमा आहे. तुह्मीं मागें सूचना केली होती कीं, बाजीराव किल्ल्यांतून बाहेर राहावयास जागा मागतील, तर न देणें. ह्यावरून मीं त्यांस विचारिलें. त्यांनीं माझे पायावर हात ठेविला. तुह्मीं लटकीं लिहून पत्र आणिलें, ऐसें बाईनीं उत्तर दिलें. त्यावरून मजला अपूर्व वाटलें, व त्रास आला कीं, ह्मातारी दौलत करिते, परंतु चौकशीची जात नाहीं. तेव्हां बाईस मीं उत्तर दिलें कीं, पायावर रावजींनीं हात ठेविला त्याजवर जाऊं नका. त्यांची वर्तणूक सुधी नाहीं. तुह्मांस ठाऊक नाहीं. मग त्यांचे वर्तणुकींतील एक गोष्ट बोललों कीं, राजश्री आनंदराव पवार, श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडून येथें येऊन, रावजींस भेटून, रावजींनीं वस्त्रें देऊन पाटीलबावांकडे पाठविलें. तेथून येऊन यांस भेटून सुरतेस गेले; हें आपणास ठाऊक नाहीं. हात पायांवर ठेविला. यावर निचिंत! तर असें न करणें. तुमचा जिमा आहे. सावध होऊन यांचा बंदोबस्त करावा. ऐकून उत्तर दिलें कीं, याप्रमाणें बाजीराव यांस बोलावून पुसतें. मग त्यांतील अर्थ ते काय सांगतात, तो तुह्मांस सांगेन. याप्रमाणें छ २१ स आणखी बोलली कीं, माझा जिमा आहे. बाजीराव गेला तर मी देईन. आह्मीं उत्तर दिलें कीं, ही गोष्ट खरीच, तत्रापि सावधता करावी. त्यांजकडे कोणीं जाऊं येऊं नये.

माणसें मोतादीचीं ठेवावीं. पत्रीं आपणास लिहिलें आहेच. याप्रमाणें कलम १. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."

## लेखांक ३६.

श्री. २६ मे इ. स. १७८३.

"विज्ञापना ऐसीजे:– तागाईत छ २४ जमादिलाखरपावेतों वर्तमान यथास्थित असे. श्रीमंत राजश्री दादासाहेब बावापिराचे घांटावर आले ह्मणून मुकुंदराव ह्मणत होते, व बाईनीं सांगितलें कीं, शिंद्यांनीं दादासाहेबांस खर्चास दोन लक्ष रुपये पाठविले ह्मणून सांगितलें, तें सेवेसीं लिहिलें असे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति."

## लेखांक ३७.

श्री. २६ मे इ. स. १७८३.

"विज्ञापना ऐसीजे:–छ २४ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. बाईस पत्र बाजीराव यांचें मजकुराचें देतांना आह्मी उभयतां व बाई चवथे देवघरांत होती. तेथें देवापाशीं पत्र आह्मीं वाचून दाखविलें. सांगितलें कीं, हें पत्र एकच कारकुनास दाखवून पत्राप्रमाणें बंदोबस्त करावा, बोभाट्यांत पत्र आणूं नये ऐसें सांगून दिलें. बाईनीं तें पत्र जितके मुत्सद्दी त्यांस दाखविलें. येथें रीत आहे, कोणी काम बहुत मंडळीखेरीज होत नाहीं. असो. बाजीराव यांस बोलावून आनंदराव पवार यांचा मजकूर पुसावा. त्यांस तर बोलाविलें. राजश्री साबाजीपंत यास बोलावून, बाई व मुकुंदराव व विनायक बाजी व गोविंदपंत गानू असे एकांतीं बसून, साबाजीपंतास पत्राचा अर्थ सांगितला कीं, याप्रमाणें आह्मांस पत्र श्रीमंतांचें आलें. तुमची काय वर्तणूक तें सांगा. त्यांनीं उत्तर दिलें कीं आमची वर्तणूक वावगी नाहीं. कोणती वावगी आपले नजरेस आली असेल ती सांगावी. ऐसें साबाजीपंत बोलल्यावर बाईनीं व त्रिवर्गांनीं आनंदराव पवार यांचा मजकूर, म्यां सांगितला त्याप्रमाणें, साबाजीपंतास त्यांनीं सांगितलें. त्यांचीं उत्तरें काय जालीं तीं समजलीं नाहींत. मग बाईस छ २२ दिवसीं पुसावयास गेलों. भोजन करून बसली होती. मीं जाऊन स्मरण दिलें कीं, आपण बाजीरावजींस बोलावून आनंदराव पवार यांचा मजकूर सांगितला. त्याचें उत्तर बाईनीं दिलें कीं, बाजीराव आले नाहींत. त्यांचा कारकून साबाजीपंत आला. त्यास आह्मीं मजकूर सांगितला. तो ह्मणतो कीं, रुजू मुकाबला करून द्या.

आह्मांस तर आनंदराव भेटला नाहीं. हें लटकें तुफान. तर तुह्मी मुकाबला करून घाल? आह्मीं उत्तर दिलें कीं, श्रीमंतांच्या पदरीं आहोंत, वावगी गोष्ट तुह्मांस सांगत नाहीं. मुकाबलाच करावा असें मानस आपलें असेल तर त्याची चिंता नाहीं. परंतु तुह्मीं आपले दाबानें व सरदारीचे रीतीनें, त्यास चांगले तऱ्हेनें पुसावें. केवळ मुकाबलाच घेऊन बसूं नये. इतकें मीं बोलल्यावर बाई ह्मणाली कीं कदाचित् त्यांचा आग्रह पडला, तर होईल कीं नाहीं? मीं उत्तर दिलें कीं, मजशीं गांठ पडल्यावर मुकाबले करावयास पडणार नाहीं. तत्रापि मुकाबला करा ह्मणतील तर चिंता नाहीं. हें छ २२ बोलणें जालें. मग छ २३ मागतीं गेलों. उभयतांही तृतीय प्रहरीं गेलों. तेव्हां रावजींचा मजकूर केला. बाई व मुकुंदराव व विनायक बाजी व आह्मी उभयतां. बाईनीं उत्तर दिलें कीं, आनंदराव पवार यांचा मजकूर आह्मांस थोडकासा तेव्हांच कळला होता. कारभारी ह्मणाले कीं, यावेगळी रावजींची वर्तणूक दुसरी कोणती? ही तर आह्मांस कळली होती. आणिक असेल तर सांगा. त्यास पुसून तुह्मांस सांगूं. याचें उत्तर मीं दिलें कीं, दुसरें काय सांगणें? याउपर सावध, सावध, सावध, ऐसें तीन वेळ सांगितलें. तुह्मांस एक गोष्ट सांगितली त्याचें फळ काय केलें? असो. सारांश, श्रीमंतीं लिहिलें आहे, सावधता रावजींची करून माणसें वगैरे नेमस्त ठेवून बंदोबस्त करावा, असें सांगितलें. वरकड विस्तार बोलावा, तर येथील बहुनायकी. बाईची अखत्यारी कोणावर नाहीं. बाईस तर कृत्रिम कळत नाहीं. पुढें वरचेवर सूचना रावजीं-विषयीं बाईस करीत जाऊं. जोंवर श्रीमंत राजश्री दादासाहेब झांशीस अथवा कोठें पोहोंचले नाहींत, तोंवर रावजी गडबड करतील. याजकरितां बारीक बातमी राखतों. जसे तऱ्हेनें कळेल तसे तऱ्हेनें राखून, वावगी गोष्ट कळलीयांवर बाईस जाऊन सांगूं. मग बंदोबस्त करणें त्यांजकडे आहे. रावजी नर्मदेस स्नानास अथवा सांयकाळचे संध्येस येत नवते. तीथ परवणीस येत होते. सांप्रत किल्याबाहेर जावयाचें नाहीं असें समजलें. त्या दिवसापासून सांयकाळचे नित्य रेवेस येतात. तो मार्ग किल्याबाहेर आहे. तिकडे जावयाची रूढ घातली आहे. तेथें संध्या करून, दोन घटका बसून, मग हवेलीस जातात. तेथें बातमी राखीत असतों. शोध यांचा चांगला सांपडत होता, तो गृहस्थ रावजींनीं पुण्यास पाठविला. त्याजबरोबर पत्र सेवेसीं लिहिलें असे. रावजींजवळ मोतादी माणसें असावीं, वरचेवर सावधता करावी, येविषयीं बाईस वारंवार सांगत जाऊं. बाईचे खाजगत कारभारी, मसलतगार गोविंदपंत गानू. ह्यांनीं बंदोबस्त करावा सरकारचे लिहिण्याप्रमाणें, तर तें रावजींचे मामेसासरे! मुकुंदराव सांगकामे! बाईस तर चौकी

# ऐतिहासिक टिपणें.



## भाग ३ रा.



### १. निजामअल्लीखानाचें स्त्रीसैन्य.

हैदराबादचा निजामअल्लीखान ह्यानें आपल्या राजधानीमध्यें बायकांचें सैन्य तयार केलें होतें. ह्या सैन्यावर मिसेस जेम्स हॉल नामक एक युरोपियन बाई मुख्य सेनापति होती. ह्या बाईचें नांव इतिहासामध्यें 'जमालखान' अथवा 'जमाल सरदार' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ही बाई हैदराबादेहून पुढें पुण्यास आली, व तेथें तिनें बऱ्याच खटपटी करून आपलें नांव प्रसिद्धीस आणिलें. हिची माहिती 'इतिहाससंग्रह' पुस्तक १ अंक ६ मध्यें 'जुन्या ऐतिहासिक गोष्टीं'मध्यें दिली आहे. (गोष्ट १५ पहा). ही बाई प्रथम हैदराबादेस होती, व तेथें तिनें बायकांचें सैन्य उभारिलें होतें, ह्याबद्दल एक अस्सल जुनें पत्रही उपलब्ध झालें आहे. हें पत्र पेशव्यांचे निजामाकडील वकील गोविंदराव काळे ह्यांनीं नानांस लिहिलें आहे. त्यामध्यें 'फिरंगीण' ह्मणून जिचा उल्लेख केला आहे, तीच ही बाई होय. हें पत्र येणेंप्रमाणें:—

[मिणवलीदप्तर.] श्री.

" विनंति ऐसीजेः—'पांचशें बायका कवायती केल्या, त्या बायकांची जात कोणती व दरमाहा काय केला ? व जनान्यापावेतों फिरंगिणीचा इतबार, याची खातरजमा कशी जाली ? हें लिहून पाठवावें' ह्मणोन आज्ञा. त्यास, बायका कांहीं फिरंगिणी नाहींत. देशच्या बायका महार चांभार वगैरे जातींच्या, त्यांस बंदुखा देऊन, कवायत शिकवून तयार कराव्या इतकेंच. जनान्यापावेतों या जमावाचा दखल. देवडीवर वरकड चौक्या. त्यांत एकीकडे बायका. खासे नबाब जनानखान्यांत बसल्यावर एकले फिरंगिणीनें जाऊन बसावें; आज्ञा दिल्यावर बाहेर यावें. या गोष्टीस इतबार कशास ? आदबचेंच काम आहे. बायकांस दरमहा काय, याचा शोध करून लिहितों. फिरंगिणीनें कवायत मात्र शिकवावी. परंतु दारोगे पैका देणार, लिहिणार, सर्व सरकारचे. तिचे स्वाधीन काय ? नांवाची मात्र धणी, इतकाच अर्थ! रवाना छ ५ सफर हे विनंति.*



* ह्या बाईबद्दल व तिच्या सैन्याबद्दल आणखी कांहीं माहिती उपलब्ध झाली, तर ती फार मनोरंजक होईल. क्याप्टन मूर ह्यानें आपल्या 'Hindu Pantheon' ह्या पुस्तकामध्यें

## २. जनरल मेडोज ह्याची आत्महत्या.

जनरल मेडोज हा, इ. स. १७९१ । ९२ सालीं इंग्रज, पेशवे आणि निजाम ह्यांच्या संयुक्त सैन्यानें ज्या वेळीं टिपू सुलतानावर स्वारी करून श्रीरंगपट्टणावर हल्ला केला, त्या वेळीं इंग्रज सैन्यांतील प्रमुख सेनापतींपैकीं एक होता. हा मोठा नामांकित योद्धा होता. हा मुंबईस इ. स. १७८८ पासून इ. स. १७९० पर्यंत गव्हरनरच्या अधिकारावरही होता. श्रीरंगपट्टण येथें ता. ६ फेब्रुवारी १७९२ रोजीं इंग्रज सैन्यानें जो रात्रीचा हल्ला केला, त्यांत ह्याची तुकडी वाट चुकून भलतीकडे गेली, त्यामुळें ह्यावर थोडा दोष आला. परंतु लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांनीं मोठ्या सावधपणानें बाजू राखली. ह्या चुकीमुळें तो उदासीन व दिलगीर झाला. आणि त्यानें, श्रीरंगपट्टणावर पुनः निकराचा हल्ला करून विजयी होईन, नाहींतर समरांगणीं मरून जाईन, असा मनांत पण केला. परंतु ता. २८ फेब्रुवारी १७९२ रोजीं टिपूशीं तह करण्याचा निश्चय होऊन त्याचे दोन मुलगे लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांच्याकडे ओलीस येण्याचें निश्चित झालें. हें ऐकतांच, जनरल मेडोज ह्याचें मस्तक अधिक खवळून जाऊन, त्यानें शत्रूच्या मुलांच्या आगमनसमयीं पिस्तूल मारून आत्महत्या केली. ही बातमी हरिपंत फडके ह्यांच्या पत्रांत दाखल आहे. (इतिहाससंग्रह पु. २ अंक १२—लेखांक १३. ऐ० कि० प्रकरणें, पृ. ९६ पहा.) हीच हकीकत गोविंदराव काळे ह्यांनीं पेशव्यांस विस्तृत रीतीनें पुढें कळविली आहे, ती येणेंप्रमाणें:—

---

ह्या बाईचा व निजामअलीखानाच्या स्त्रीसैन्याचा उल्लेख केला आहे. त्यांतही ह्या स्त्रीसैन्याबद्दल प्रत्यंतर माहिती सांपडते:—

"The military name or title, assumed by this heroine, was Jamal Khan, or Jamal Sardar : not an uncommon name among Moghuls,.........It will be seen that Jamal is a very good name for the wife of Jam–Hall.

Her dress at Poona was of a warlike stamp, although still not entirely masculine. A long flowing *Jama* is the style of the ordinary dress of the Moghuls, with the loose *izar* or trowsers ; an enormous sabre, and a plumed helmet, graced the well-formed person of this daring Amazonian: and it may be supposed, that, had she taken the field with her corps while serving in the Nizam's army, her example would have been animating to his troops.

I have heard it related, that she was offered the command of the battalion of women that Nizam Ali Khan raised for the interior duties of the *Mahal* or ladies apartments or which we call the *Seraglio*. It consisted of five or six hundred women regularly dressed and disciplined, commanded by officers of their own sex, and armed with light fuzees : they mounted gaurd regularly over the ladies' apartments or vicinity, and are described as, on the whole, a very well set up corps."— *Moor's Hindu Pantheon. Page* 375.

[मेणवलीदप्तर.] श्री. ता. १ एप्रिल १७९२.

"विनंति ऐसीजे:—अर्काटाकडे हैदरअली इंग्रजांवर गेले होते ते सालीं, बेली व मंडोर धरून कैद केले. फार तसदी केली होती. मंडोर नामें तोच मेडूस. याचे मनांत कीं त्या समईचा बदला टिपूस करावा. हा मोठा आग्रह. परंतु लाडांनीं मसलत पाहून सलुखाचें बोलणें ऐकूं लागले. त्या दिवसापासून मेडूस उदास. जे दिवसीं टिपूचे पुत्र पटणाबाहेर येऊन लाडाचे भेटीस आले, ते समई आपण गेला नाहीं. तिकडे त्यांची भेट; इकडे याणें दोन पस्तोल गोळ्या भरून पोटांत मारून घेतले. मोठा आफसोस केला. सर्वांनीं धरून गोळ्या काहाडल्या. जखमा बऱ्या जाल्या. वांचला. लाडांनीं वाईट मानून त्याचें काम चेनापट्टणचें तगीर केलें. त्याणेंही इस्ताफा लेहून दिल्हा. तहनामे टिपूचे होत तोंपावेतों आपले डेऱ्यास होता. तहनामे परस्परें दिले घेतले. तोफा जाल्या. त्याचे दुसरे दिवशीं कूच करून मेडूस चेनापट्टणास गेला. तेथें कांहीं कार्यामुळें पंधरा दिवस राहून विलायतेस जाणार. याप्रमाणें जालें. लाड मुखत्यार; त्याची पर्वा धरली नाहीं. मंडुसाचें वय पांसष्ट अधिकच होईल. दांत बिलकूल नव्हते. लाडसाहेब बहुत दुरंदेश, प्रामाणिक, बोलण्याची कायमी, संकोच, सहनशील, सर्व गोष्टी संपन्न. असा इंग्रजांत थोडा. संबंध अशासींच असावा. परंतु बंगाल्यांत चौ महिन्यांत जाऊन, तेथें चार महिने राहून, सर्व कामाचा बंदोबस्त करून आपण विलायतेस जाणार. पुन्हां येणें समजतेंच आहे. वय साठ पांसष्ट वर्षांचें. संपूर्ण केश पांढरे. पुनरपि भेटीची आशा नाहीं. याप्रमाणें वर्तमान कळावें सबब विनंति. रा। छ ८ साबान हे विनंति."

ह्या पत्रामध्यें 'मेडूस' ह्मणजे जनरल मेडोज, व 'लाड' ह्मणजे लॉर्ड कार्नवालिस असें समजावयाचें. जनरल मेडोज ह्यास श्रीरंगपट्टणावर हल्ला करून टिपूचा सूड घेण्याची फार महत्वाकांक्षा होती. ती तहामुळें विफल झाली, ह्मणून त्यानें आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला. ह्या संबंधाची बातमी मराठ्यांच्या पत्रांत जी आढळून येते, ती अगदीं बरोबर आहे. तत्कालीन इंग्रजी लेखांतही तशाच आशयाची माहिती आढळून येते.* ह्यावरून प्रत्यंतर पुराव्यानें देखील मराठ्यांचीं अस्सल पत्रें इतिहासदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचीं आहेत हें सिद्ध होतें.

वर दिलेल्या गोविंदराव काळ्यांच्या पत्रांत 'लाड' ह्मणजे लॉर्ड कॉर्नवालीस ह्यांच्या बद्दल काढलेले स्तुतिपर उद्गारही लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. त्यावरून लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांच्या संबंधानें मराठी मुत्सद्यांचें किती उत्कृष्ट मत होतें, तें दिसून येतें.



* लॉर्ड कॉर्नवालिस ह्यांच्या हाताखालच्या एक लष्करी अंमलदारानें, जनरल मेडोज ह्यांच्या आत्महत्येसंबंधानें पुढील हकीकत दिली आहे. ती त्याच दिवशीं लिहिलेली असून ती गोविंदराव काळे ह्यांच्या पत्रांशीं पडताळून पाहण्यासारखी आहे. ती येणेंप्रमाणें:—

## ३. कोंकणांतील घडामोडींची एक महत्त्वाची यादी.

ही जुनी यादी माहीम तालुक्यांतील अलेवाडी गांवीं राहणारे रा. रा. बापू हरी जोशी ह्यांच्या दप्तरांत सांपडली. ती आमचे मित्र रा. रा. गंगाधर रामकृष्ण मोगरे ह्यांनीं प्रसिद्धीसाठीं आमच्याकडे पाठविली आहे. ह्या यादीमध्यें दिलेले सन इतिहाससंशोधकास फार उपयुक्त आहेत. यादीची भाषा फार अशुद्ध असून कित्येक शब्दांचा बरोबर अर्थबोध होत नाहीं. परंतु मूळामध्यें फेरफार न करितां हा कागद आह्मीं येथें प्रसिद्ध केला आहे. ह्या संबंधानें कोणी जिज्ञासूंनीं अधिक माहिती मिळविल्यास ती उपयुक्त होईल.

[किरकोळ.] श्री.

१–"**याद गेरेची** ॥ शंवत् १५८५ मध्यें फीरंगी आले ॥
२–शंवत् १५९१ बाधुर बुडवीला दिवामध्यें ॥
३–शंवत् १५९२ मध्यें कोटाचा पाया घातला वशईच्या ॥
४–शंवत् १६०४ मध्यें फुरार बांधले सिया बुतेलान ॥
५–शंवत् १६१२ मध्यें दवण घेतली फीरंगेई ॥
६–शंवत् १६१५ मध्यें माहिम घेतलें ॥

---

"Tippoo has, this afternoon, commenced the execution of the preliminaries of peace, by sending to camp his second and third sons as hostages, conformably with one of the articles ; and this act was made particularly interesting and satisfactory to Lord Cornwallis by Tippoo, without mentioning any of the other confiderates, insisting that his children should be carried directly to his Lordship's tent, and there delivered into his arms, with a request that he would, during their absence from their father, consider them and treat them as his own children. It would at any time have been impossible to witness such a scene, which marked so great a change in their father's fortunes, without certain reflections on the instability of human grandeur. But all sensations of that nature were almost totally absorbed in the melancholy damp into which we had been thrown a few hours before, by a fatal act that General Medows had committed upon himself. The column that the General commanded on the night of the 6th did not execute precisely what was allotted to it. But he has, by his uniform conduct through life, established his character with all mankind as the essence of honour and courage, and the mistake on that night was never considered, by any man in the army, in any other light than as one of those errors to which night attacks have been, and ever will be, liable. The General, however, notwithstanding every consolation which his Lordship could give him, continued dissatisfied with himself, and allowed this unlucky affair to prey continually upon his spirits, till this morning, when it seems he could bear it no longer, and discharged a pistol loaded with three bullets into his body. He is still alive, but there can scarcely be hopes that he will recover."

७–शंवत् १६२७ मध्यें शुजातखान आला हातेलेया मध्यें मार्गशीर्षमासीं. माश सा ६ राहीला. जेष्ट मासीं गेला ॥

८–शंवत् १६५० मध्यें येकतरखान आला कार्तिक वद ८ मी (की १२१) मास ११ राहिला. आश्विनमासीं गेला ॥

९–शंवत् १६५१ च्या भाद्रपदामध्यें केरलई घेतली फीरंगेई ॥

१०–शंवत् १६६९ फाल्गुन शुद्ध प्रतीपदा १ चे दीवसीं शुरुलखान आला. वार बुधवार मास २३ राहीला ॥

११–शंवत् १६९५ मध्यें दवणेवर मुंगुल आले. कार्त्तिक मासीं मास ८ राहीले होते ॥

१२–शंवत् १६९७ मध्यें वैशाख मासीं वद । गुरौवार मोड जाली. मध्यरात्रीं मोठी ॥

१३–शंवत् १६९९ मध्यें कार्तिक शुद्ध ४ सोमवार मोड जाली धाकटी ॥

१४–शंवत् १७१५ प्रवर्त आषाढ वद १२ सो भोमे तद्दिनीं लोधी सीरगांवीं मध्यानीं आले ॥

१५–दुसरे दीवसीं बुधवारीं त्रयोदशीचे दीवसीं वीरार मोहारेयापर्यंत जा...गेले॥

१६–शंवत् १७१८ शके १५८३ मार्गशीर शुद्ध चतुर्थी शुक्र आरबान जालुन गेले. दिंवस नव होते मोंबै मध्यें ॥

१७–शंवत् १६६९ फाल्गुन शुद्ध प्रतिपदा बुधे शुरलखान आला. मास २३ राहिला ॥

१८–शंवत् १६११ माघ शुद्ध १५ गुरुवारीं गेला. मलिकंबराचें लस्कर ॥

१९–शंवत् १७११ शके १५१६ आखाड वद चतुर्दसी १४ सह आमावस्या ३० सोमवारीं धरणीकंप मध्यरात्रीं व दुसरे दिवशीं माध्यानीं धरणकंप दुसरून झाला ॥

२०–शंवत् १७२१ शके १५८६ फाल्गुन शुद्ध त्रितीया ३ बुधे इंग्रेजी मोंबै येथें आले ॥

२१–शंवत् १७१० शके १५७५ या वरुषामध्यें अवर्षण मास २॥ जेष्ठ, आषाढ श्रावण अर्धपर्यंत. जेष्ठमासी मृगाचें वादळ, प्रजन्य थोडाक, तेण्हें करुनी बीं पेहिरणी. त्याउपरी प्रजन्य जास्ती लोकामध्यें हाहांकार । कण कोंकण जमीलेंईसें होतें. मग अर्ध प्रजन्य पडला ॥

२२–शंवत् १७२८ शके १५९३ भाद्रपद वद ८ शुक्रे तद्दीनीं रात्रीं वादळ हस्त नक्षत्राचें जालें ॥

२३–शंवत् १७२८ शके १५८९ आखाढामध्यें विमलांत आवींज केली ॥

२४–शंवत् १७३० शके १५९५ प्रवर्त्ते, माघ शुद्ध ७ सह ८ सोमे दीनीं, आरबी याचे बरसे नव ९ आले भैईगावांचे बारेयावर. भईगांव गीरीज पापडी

पर्यंत अन्न ( म्र? ) लावुनि दिवस ५ होते सनवारीं. ( शनिवारीं ) द्वादशींचे रात्री गेले. फिरंगी पाहीत राहिले ॥

२५–शंवत् १७३४ शके १६०० आखाडादी शंवत् १७३४ कार्तिक शुद्ध ६ शुक्रे तदीनीं रात्र प्रथम घटी ८ वारमोड जाली, झाडपान राहिलें नाहीं. वसई आगासीमधें ची ॥

२६–शंवत् १७३४ शके १६०० आखाढादी शंवत् १७३४ माघ वद ११ सह १२ सोमे तदीनीं रात्र प्रथम घटी ८ धरणकंप झाला. वारा वीज गडगडाट अमावास्या शुक्रवारपर्यंत ॥

२७–शंवत् १७४० श्रावण शुद्ध ११ । १२ सोमे धरणीकंप जाला, तिसऱ्या प्रहरीं ॥

२८ शंवत् १७५९ शके १६२४ प्रवर्त्त मार्गसीर शुद्ध २।३ भोमे तदीनीं रात्रगत घटी २० वारमोड झाली, झाडपान राहिलें नाहीं. समुद्रान चाल केली होती. अवधी विलाथ बुडवीली. मग दुसरे दिसीं बुधवारीं बोट सकाळ दिषला आपंपर झाली ॥

२९–स्वस्ति श्री शंवत् १७६३ शके १६२८ प्रवर्त्तमाने माघ वदि ३० अमावास्या भृगु दिने दिवा रहीत घटी ४ अवरंगजेब पाश्वाय मृत्यु पावला. महर्घता स्वस्त झाली. मग घांटावर आपंपर झाली ॥

३०–शवत् १७३४ शके १६२९ अस्वीन वदी ८ बुधे को दि आला साईवजान्वित रंकेर जाळली. कावें प्रगण्यापर्यंत कार्तिकमासीं माहीम तारापुर प्रांतीस गेला. गुरें बाद घेऊन गांव जाळून गेला. मग माघ वदि १३ऽ१४ फिरंग्याचे लसकर सहश्र १२ मस्तुद होऊन गार्डीसे २ अईसे करून वाज्यापर्यंत गेला. मग तेथें.........

३१–शके १६४६ मार्गसीर मासीं वद ३० शुक्रे पीलाजी जाधवाची गेर जाली ॥



## ४. पेशवाईतले बाजारभाव.

पेशवाईमध्यें निरनिराळे सरदार मोहिमीवर गेले ह्मणजे ठिकठिकाणचे बाजारभाव श्रीमंतांस कळवीत असत. हे धान्याचे भाव, अर्थशास्त्राचा अभ्यास करणारास फार उपयोगीं पडतील. त्यावरून त्या वेळच्या देशस्थितीची थोडी तरी कल्पना येईल. ह्या बाजारभावाचे कांहीं कागद मासल्याकरितां पुढें दिले आहेतः—

### १ भागानगरचा इ. स. १७९२ तील बाजारभाव.

[ पेशव्यांचे सरदार कोन्हेर बाबूराव ह्यांनीं, टिपूवरील स्वारींतून पानगलाहून भागानगरास इ. स १७९२ मध्यें परत आल्यानंतर, हा बाजारभाव लिहिला आहे. ]

[मेणवलीदप्तर.] श्री. इ. स. १७९२.

" विनंति ऐसीजेः–पानगलाहून भागानगरास येतां वाटेंत जागां जागां पाऊस फार लागला. वारा तों अतिशय, असा कधीं पाहिला नाहीं. विजांचा कडकडाट व दोन वेळां गारांची अतिवृष्टि जाली. त्याचा बयान करवत नाहीं. चाराही माफीक मिळत होता. जुनें छपराचें कंबळ; पाणी विहिरीचें; नदी नाल्यास तों बिलकूल पाणी नाहीं. धान्याची महर्गता चार पांच शेरी धारण होती. सांप्रत भागानगरांत निरख येणेंप्रमाणें आहेः–

८।· जोरी नवी दर रुपयास दाहा शेर.
८८७ दाळ तुरीची दर रुपयास सात शेर.
८८१।।। तूप दर रुपयास पावणेदोन शेर.
८८२।।। तेल येरंडेल दर रुपयास पावणेतीन शेर.
८८२ तेल चांगलें दोन शेर.
८८५ गूळ दर रुपयास पांच शेर.
८।२ मीठ दर रुपयास बारा शेर.
८८८॥ गहूं दर रुपयास साडेआठ शेर.
८८८ हरभरे दर रुपयास आठ शेर.
८।· उडीद दर रुपयास दाहा शेर.
८८९ मूग दर रुपयास नऊ शेर.
८८८ तांदूळ मोठे दर रुपयास आठ शेर.
८८५ तांदूळ बारीक दर रुपयास पांच शेर.
१ वांगीं वगैरे शाकभाजी घोळ चमकुरा वगैरे माफीक सालाबादीप्रमाणें विशेष नाहीं.
२ गवत मूठभर पेंडी, दोन रुपये हजार, देशच्या पेंढ्या पन्नास होतील.
१ खुर्दा अलमगीरी. दर रुपयास टके ३२॥ प्रमाणें.
१ पानें विड्याचीं पिकलीं साहा पैसा शें (शंभर) व हिरवीं दोन पैसे (शंभर).

हालचे प्रसंगीं निरख याप्रमाणें आहे. याउपर करोडा काय करितों पहावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## २. म्हैसूर प्रांतांतील इ. १७९२ चा बाजारभाव.

"निरख बाजार स्वारी राजश्री पंत प्रधान सु॥ इसन्ने तिसैन मया व अलफ. स्वारी कर्नाटक वि॥ हरी बल्लाळ मुकाम मौजे केंपसमुद्र पो मांगडी छ १९ जमादिलावल.

| गल्ला कैली बारुले | | चौसेरी मापें | वजनी वजन | पक्के |
|---|---|---|---|---|
| ८८॥÷ | हरभरे | ८८।≡ | ८८१ तूप | १।≡ |
| ८८।।।≡ | बाजरी | ८८॥= | ८८३ गूळ | ८८२।।। |
| ८८।।।= | जोरी | ८८।।। | ८८१॥ कणीक | |
| ८८॥ | गहूं | ८८।≡ | ८८२।।। पीठ जोरी | |

ϭϭ॥ उडीद ϭϭ।=
ϭϭ१ϭ≡ मूग
ϭϭ॥≡ तुरी ϭϭ॥÷
ϭϭ॥।÷ हुलगे ϭϭ॥≡
ϭϭ१॥= साळी ϭϭ१॥
ϭϭ१॥ पावटे ϭϭ१।
ϭϭ१।= नागली ϭϭ१।
ϭϭ॥।÷ तांदुळ मोठे आसडी ϭϭ॥।
ϭϭ॥। तां मोठे सा ϭϭ॥=
ϭϭ॥≡ तां बारीक सडीक ϭ॥÷
ϭϭ॥। तां बारीक असडीक ϭϭ॥=
ϭϭ।= दाळ तुरी
ϭϭ।≡ दाळ उडीद
ϭϭ।= दाळ हरभरे
ϭϭ॥÷ दाळ पावटे ϭϭ।≡
ϭϭ॥ मीठ.

ϭ१।ϭ-

माळवे जिन्नस दर रुपयास.

ϭϭ५ चिंच.
ϭϭ१ आलें. १।
ϭϭ३ मिर्चा ओल्या.
ϭϭ१॥ मिर्चा वाळल्या.
ϭϭ१। लसूण.
ϭϭ२ कांदे.
ϭϭ१॥ कारलीं व पडवळें.
ϭϭ१॥ दोडकें.
ϭϭ३ काळा भोंपळा.
ϭϭ४ पांढरा भोंपळा.

ϭ॥३॥।

खुर्दा शिवराई टके. ३।

ϭϭ४ पीठ नागली ϭϭ३॥
ϭϭ३॥ तां मोठे आ ϭϭ३।
ϭϭ३।९ तां मोठे आ ϭϭ२॥।९
ϭϭ३। तां बारीक आ ϭϭ२॥।
ϭϭ३ तां बा सा ϭϭ२॥।
ϭϭ१ तेल गोडें ϭϭ॥।
ϭϭ१॥ तेल मिसळ
ϭϭ१॥। तेल येरंडेल
ϭϭ१। साखर रासी
ϭϭ२ साखर मखदुमी
ϭϭ१। सुपारी
ϭϭ१ सुंठ
ϭϭ३ हळद खडी
ϭϭ१ मिरीं १।=
ϭϭ१ जिरीं १ϭ=
ϭϭ१ हिंगराशी ७॥
ϭϭ१ अफू राशी ४
ϭϭ१ मसाला १।
ϭϭ१ भांग १।

ϭ१ϭ४ϭ९

गवळ्याकडील जिन्नस.

ϭϭ४ दूध.
ϭϭ५ दहीं.
ϭϭ१ लोणीं. १।=

ϭ।

सुमारें.

१५७५ पानें विड्याचीं.
१७५ पिकलीं देंठीं.
४०० पिकलीं काळीं.
१००० हिरवीं.

१५७५
३० लिंबें पिकलीं.

१६०५

येणेंप्रमाणें निरख असे."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।

पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ३ रें.] आक्टोबर १९१०. [अंक ३ रा.

विषयानुक्रम.


| विषय. | पृष्ठांक. |
|---|---|
| १ ऐतिहासिक संस्मरणीय वस्तू. ... ... ... ... | ५–८ |
| २ ऐतिहासिक चरित्रें. ... ... ... ... ... ... | ६९–७६ |
| ३ ऐतिहासिक स्फुट लेख. ... ... ... ... ... | ८९–९२ |
| ४ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें भाग २ रा. ... ... ... | ३३–५६ |
| ५ ऐतिहासिक टिपणें भाग ३ रा. ... ... ... ... | ९–१६ |

चित्रें—१ नबाब सादतअल्लीखान. २ अयोध्येच्या नबाबांचीं राजचिन्हें.




मुंबई येथें

तुकाराम जावजी ह्यांनीं

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

## 'काव्यसंग्रहग्रंथमालें'तून छापून प्रसिद्ध झालेले ग्रंथ.

किं. ट. ख.

**मोरोपंतकृत स्फुट काव्यें**—भाग पहिला. यांत या कवीचीं सन्मणिमाला, ज्ञानदेवस्तव, चांगदेवस्तुति, नामदेवस्तव, कबीरस्तव, नरसिंहमेहतास्तव, एकनाथस्तव, श्रीनाथचरित्र, रामचरित्र, रामदासगुणवर्णन, वामनपंडितस्तुति, तुकारामस्तुति, तुलसीदासस्तव, माधवदासस्तव, महिपतिस्तुति, वामनादिकीर्तन, साधुस्तव, सत्संगस्तव, साधुरीति, साधुसत्कार, सद्वर्णन, गंगास्तुति, गंगाप्रार्थना, गंगावकिली, गंगास्तव, गंगाविज्ञप्ति (संस्कृत), काशीप्रार्थना, काशीस्तुति, विश्वेशस्तुति, काळभैरवस्तुति, अन्नपूर्णास्तुति, मणिकर्णिकास्तुति, द्विचत्वारिंशल्लिंगयात्रा, प्रयागस्तुति, यमुनास्तुति, गदाधरस्तुति, बिंदुमाधवस्तुति, विष्णुपदवकिली, राजापुरस्थगंगाप्रतिनिधितीर्थकीर्तन, गोदावरीस्तव, कृष्णस्तव, कृष्णाप्रार्थना, कृष्णामाहात्म्य, पंढरीमाहात्म्य, पांडुरंगदंडक, विठ्ठलप्रणिधि, विठ्ठलस्तोत्र, विठ्ठलस्तुति, विठ्ठलविज्ञापना, ४ पांडुरंगस्तोत्रें (संस्कृत), विठ्ठलपदपद्मस्तुति, इष्टकास्तुति, विठ्ठलभक्तस्तुति, पुंडरीकप्रार्थना, खंडोबास्तव, तुळजास्तव, महालक्ष्मीस्तव, वेंकटेशप्रार्थना, रेणुकास्तव, सिद्धेश्वरस्तव, गजाननस्तव, गणपतिप्रार्थना, शिवार्याशतक (संस्कृत), शंकरस्तव (संस्कृत), दुर्गास्तव, हरिहरस्तव, हरिहरप्रार्थना (संस्कृत), दशावतारप्रार्थना, रामस्तव, रामप्रार्थना, रामस्तुति (संस्कृत), रामनाममहिमा (संस्कृत), मुक्तामाला (संस्कृत), आर्यागीतिमुक्तामाला, आर्याकेकावली, अम्लानपंकजमालाबंधपंचक (संस्कृत), रामरीति, मारुतिस्तुति, कृष्णस्तवराज (संस्कृत), हरिसंबोधनस्तोत्र, मुरलीपंचक, तुलसीस्तव, श्रीमद्भगवद्गीतास्तुति, गुरुस्तुति, मुक्तांजली, रघुराजस्तव, पतिव्रताकीर्तन, अहल्यास्तुति, प्रांतप्रार्थना, मनःप्रार्थनाष्टक, रामप्रार्थना, वाङ्मनःप्रार्थना, महद्विज्ञापना, सन्मनोरथराजि, नामसुधाचषक, प्रश्नोत्तरमाला, नामरसायन, नाममाहात्म्य, संशयरत्नमाला, अश्वधाटीशतक, पांडुरंगप्रसादमहिमा, पंतांची अगदीं पहिली आर्या, केकावली, हीं १०५ रसाळ प्रकरणें असून शिवाय सुमारें २१ पदें व ११ अरत्या अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसह ३ ।·



नवाब सादतअल्लीखान.

## २. अयोध्येच्या नबाबांचीं राजचिन्हें.



अठराव्या शतकामध्यें, दिल्लीच्या बादशाहाच्या अंमलाखालीं जे मुसलमान सुभेदार स्वतंत्र झाले व ज्यांनीं स्वतंत्र राज्यें संस्थापित केलीं, त्यांपैकीं अयोध्येच्या राजघराण्याचा संस्थापक, महमद अमीन सादतखान बऱ्हाणउल्मुल्क, हा एक होय. हा मूळचा खोरासान प्रांतांतील एक लहानसा व्यापारी असून, तो उद्योगधंद्याच्या निमित्तानें प्रथम पाटणा येथें आला, व तेथील सुभेदाराच्या आश्रयानें त्यानें दिल्ली-येथें प्रवेश केला. तेथें त्यानें बादशाही स्वारांमध्यें प्रथम एक लहानशी नौकरी धरिली; आणि आपल्या आंगच्या शौर्यपराक्रमादि गुणांच्या योगानें वाढत वाढत जाऊन, तो इ. स. १७२१ मध्यें आग्र्याचा सुभेदार झाला. नंतर त्यानें, दिल्लीच्या महमदशाहा बादशाहास, सय्यद बंधूंच्या पारतंत्र्यांतून मुक्त करून, त्याजपासून बक्षिसादाखल, इ. स. १७३२ मध्यें, अयोध्येची सुभेदारी प्राप्त करून घेतली. पुढें त्यानें आग्र्याचा सुभेदार आणि बरेली व फरुक्काबाद येथील सुभेदार यांच्या साह्यानें फौज व द्रव्य जमा करून, आपली स्वतंत्र राजसत्ता त्या प्रांतांवर प्रस्थापित केली. या वेळेपासून अयोध्येच्या राज्याची भरभराट झाली, व सुमारें सव्वाशें वर्षेंपर्यंत सादतखान व त्याचे वंशज यांनीं या राज्याचा उपभोग घेतला. इ. स. १८५६ मध्यें अयोध्येचें राज्य लॉर्ड डलहौसी यांनीं खालसा केलें, हें सर्वश्रुतच आहे. अयोध्येच्या नबाबांचा इतिहास इंग्रजी व मराठी भाषेमध्यें प्रसिद्ध आहे. त्यावरून तेथील नबाबांचें थोर राजवैभव, त्यांची अद्वितीय राजसत्ता, व अगणित संपत्ति यांची सहज कल्पना करितां येईल. अशा थोर राजघराण्याचीं राजकीय चिन्हेंही त्याच्या मोठेपणास साजतीलशींच असलीं पाहिजेत हें उघड आहे; परंतु त्यांची माहिती व चित्रें अत्यंत दुर्मिळ आहेत.

नबाब सादतअलीखान यानें आपल्या राज्याचें मुख्यचिन्ह मत्स्य हें केलें होतें. त्याची एक मनोरंजक आख्यायिका इतिहासांत प्रसिद्ध आहे. ती येणेंप्रमाणें:— एके वेळीं सादतअलीखान हा लखनौ प्रांतावर अंमल बसविण्याकरितां स्वसैन्यानिशीं गंगानदी उतरून आला. त्या वेळीं अकस्मात् गंगेच्या पात्रांतून एक मासा त्याच्या कपड्यामध्यें उडी मारून येऊन बसला. त्यास हा एक उत्तम शकुन झाला असें वाटून, त्यानें मोठ्या उत्साहानें लखनौच्या शेख लोकांवर स्वारी केली व तेथील किल्ला आपल्या ताब्यांत जिंकून घेतला. तेव्हांपासून त्या किल्ल्यास

'मत्स्यीभवन' असें नांव पडलें आहे.* या वेळेपासून अयोध्येच्या नबावांचें मुख्य राजचिन्ह मत्स्य हें होऊन, त्याचीं चित्रें सर्वत्र आढळून येतात. अयोध्येचें राज्य अस्तित्वांत होतें, तोंपर्यंत तेथील निशाणावर माशाचें चित्र फडकत होतें; आणि तेथील राजवाड्यावर व प्रत्येक सरकारी इमारतीवर, प्रवेशद्वाराच्या शिरोभागीं मत्स्याकृति ही असावयाचीच हें निश्चित असे. अद्यापि देखील लखनौ येथील जुन्या इमारतींच्या प्रवेशद्वारावर दोन मत्स्य काढलेले दृष्टीस पडतात.

लखनौच्या एका सुप्रसिद्ध चित्रकारानें काढलेलें नबाब सादतअलीखान याचें एक जुनें चित्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. त्याची प्रतिकृति आह्मीं यासोबत दिली आहे. या चित्रामध्यें देखील नबाब सादतअलीखान यास माशाच्या पाठीवर उभें केलें आहे असें दिसून येईल.

---

* मत्स्यीभवन हा अयोध्येच्या नबावांच्या मुख्य राजवाडा होय. येथें पूर्वीं जुना किल्ला होता. नंतर त्या जागीं राजवाडा बांधण्यांत आला. ह्या राजवाड्याचें वर्णन, तो प्रत्यक्ष पाहिलेल्या एका इसमानें, पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे. तें वाचनीय असल्यामुळें येथें दिलें आहे:—

"Mutchibhawan:—The palace which faces the Goomtee, comprises six principal courts or quadrangles surrounded by pavilion-like buildings. In the first of these are two lofty gateways. On the outer, there is a handsome chamber, called the Noubut-khana, or Music-room, forming an orchestra upon a splendid scale. The second court, encompassed by state apartments, is laid out as a garden having a well or bouli, ( in the centre, ) round which are pavilions, opening to the water, and intended to afford a cool retreat during the hot weather ; the air is refreshed by the constant dripping of the fountains; and the piazzas and arcaded chambers beyond, within the influence of its luxurious atmosphere, are well calculated for sleeping chambers in the sultry nights, so constantly occurring throughout the periods of hot winds. Parallel to the second court, and at the eastward of it, stands a splendid edifice, raised upon an arched terrace, entirely of stone. This fabric, called Sungee-Dalan contains a ground hall, surrounded with a double arcade, crowned with a capital at each angle, and one over the principal point, all of copper doubly gilt. At the extremities of the terrace, there are wings, and flower gardens stretched along each front, divided into parterres by walks and fountains. A corridor extends round this court, planted with vines, and out of these entrances, one with a covered passage is appropriated to the ladies. These gateways are decked with gilded domes; and the mosque, zanana, and the other buildings attached to the palace, give to the whole edifice the air of a city raised by some enchanter ......And the palaces of the Hyderbagh, Hosseinbagh, and Seesh Mahal have nearly equal claims to admiration." —*Mrs. Roberts, 1839.*



अयोध्येच्या नवाबांचीं राजचिन्हें.

लखनौचा तिसरा नबाब सुजाउद्दौला याच्या पदरीं कर्नल जेन्टील् या नांवाचा एक फ्रेंच इसम होता. त्यास पुढें नबाबाची नोकरी सोडून जावें लागलें. त्यानें सुजाउद्दौल्याच्या राजचिन्हांचें एक सुंदर चित्र आपल्या संग्रहासाठीं पॅरीस येथें नेलें होतें. त्याची नक्कल आह्मांस कर्नल जेन्टील् याचे फ्रेंच भाषेंतील चरित्रांत उपलब्ध झाली आहे, तीही यासोबत आह्मीं जोडिली आहे. त्यामध्यें सुजाउद्दौल्याच्या स्वारीचीं सर्व राजचिन्हें दर्शित केलेलीं असून तीं प्रेक्षणीय आहेत. अयोध्येच्या नबाबांच्या स्वारीचा समारंभ फारच अपूर्व असून त्यांत हीं सर्व राजचिन्हें मोठ्या थाटानें मिरवीत असत. *

---

* अयोध्येच्या नबाबांच्या स्वारीचा थाट कसा असे त्याची कल्पना, नासिरउद्दीन हैदर ह्याच्या एका स्वारीच्या समारंभावरून करितां येईल. त्याचें वर्णन प्रत्यक्ष हजर असलेल्या एका युरोपियन बाईनें पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे:—

"The van of the cavalcade is formed of 50 elephants, carrying suivels, each accompanied by a driver and two gunners in white uniform and with turbans and kamarbands of red and green, the colours of the cloth composing the housings of the camels. A party of artillery succeeds, the gunners being in blue uniform; next two troops of cavalry in the picturesque vests worn by sawars, of scarlet cloth, with painted caps of black-lamb skin. After this a regiment of foot, only half-clad, in wild barbaric costume, the trousers scarcely extending midway down the thigh, where it is vandyked with black points; they have red jackets and small turbans of black leather; and the warlike but discordant music of the Dankah or kettledrum assimilates well with the strange fantastic display made by the troops. The Najibs are closely followed by the most gorgious portion of the spectacle, the elephant carriage of the king and his court; the great satrap himself sits enthroned in a sort of triumphal car of silver, canopied and curtained with crimson velvet, embroidered and fringed with gole, and drawn by four elephants, exactly matched in colour, height and size. The others have two elephants each, but all glitter with gold and silver; and the gallant company so proudly borne along, shine from head to foot in jems and brocade. Their turbans are adorned with costly aigrettes of jewels; claps, studs, belts, rings, and bracelets, of the most precious treasures of the mine, appear in greatest profession, down to the gem-enamelled slipper; and these are set off by the graceful flow of drapery, composed of the most beautiful-woven tissues, and shawls of the finest fabric. Round these chariots, Chobdars, (mace bearers) Chaprasis, Harkaras, and other state servants, some brandishing sheathed scimitars, and others fanning the air with chowries, shout out the titles of the illustrious and puissant personages, to whom they belong; while a cloud of irregular horse hovers on either side, litting and curvetting apparently with disorderly recklessness, yet in reality conducting their evolutions with the most consummate skill.

"The king's led horses next appear to swell the pomp and parade; they

याशिवाय अयोध्येच्या नबाबांचीं जुनीं राजचिन्हें लंडन येथील ब्रिटिश म्यूझियम्‌मध्यें व इतर संग्रहालयांमध्यें वास करीत आहेत. जुन्या रियासतींच्या राजचिन्हांचे इतिहासही मनोरंजक व बोधपर असून, त्यांचें संशोधन केलें असतां पुष्कळ मौजेची माहिती मिळण्याचा संभव आहे. परंतु अशा प्रकारच्या ऐतिहासिक माहितीचा संग्रह करून ठेवण्याचा प्रघात आमच्या राष्ट्रामध्यें नसल्यामुळें ती माहिती मिळणें आतां जवळ जवळ अशक्य झालें आहे. तथापि, त्या दृष्टीनेंही इतिहाससंशोधनाचा उपक्रम व्हावा ह्मणून, ह्या संबंधाची उपलब्ध होणारी अत्यल्प माहिती देखील 'इतिहाससंग्रहां'त प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे.



are all richly caparisoned and attended by grooms in handsome liveries. The royal Palki and palanquin next appear; these native vehicles are of the most splendid description, constructed entirely of wrought gold, each carried by bearers clad in long scarlet vests, embroidered with gold, their turbans ornamented with the emblems of royalty."

जाधवराव दंडवत विनंति येथील क्षेम तागाईत फाल्गुन शुद्ध दशमी भौमवासर मुक्काम कसबें आटेरी सुभा आग्रें, जाणून स्वकीय लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन, लेखनार्थश्रवणें समाधान जालें. संक्रमणप्रयुक्त तीळ शर्करा पाठविली, ती प्रविष्ट जाली. इकडील सविस्तर वृत्त तरी, वोडसें, दतीया, नरवर वगैरे संस्थानें खंडिलीं; त्याचें सविस्तर, श्रीमंत राजश्री राऊ यांणीं पूर्वपत्रीं आपणांस लिहिलें आहे. त्यावरून श्रुत जालेंच असेल. त्याअलीकडे भदावर प्रांतीं आलों. येथील खंडणीदंडणीचा विचार जो जाला, त्याचें सविस्तर व पुढें जाण्याचा विचार, राजश्री रायांनीं आपणांस लिहिला आहे, त्यावरून निवेदन होईल. सदैव पत्रद्वारें सांभाळ करीत गेलें पाहिजे. चिरंजीव राजश्री संभाजी जाधव घरीं आहेत; मुलीचें लग्नकार्य कर्तव्य आहे. वडीलपणें साहित्य केलें पाहिजे. विशेष काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

श्री. ३ एप्रिल इ. स. १७३७.

"राजश्री चिमाजीपंत आपा गोसावी यांसीः—

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित पिलाजी जाधवराव दंडवत विनंति येथील क्षेम तागाईत छ १३ जिल्हेज मुकाम नजीक जयनगर जाणून स्वकीय लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः—आटेर, प्रांत भदावर येथील कार्यभाग विल्हेस लागलियानंतर, चमेलीपार होऊन, यमुनातीरास गेलों. तेथें पांच सात मुक्काम करून, सादतखान यमुनापार होता त्याजवरी, सड्या फौजा यमुनापार घेऊन गेलों. तेथें युद्धप्रसंग बरा रवेसीनें जाला. मोंगल पराभवातें पाववून आग्र्यासन्निध नेऊन घातला. तेथून माघारें फिरोन आइली तीरास आलों. राजश्री जगतराज व राजश्री सभासिंग बुंधेले पंधरा हजार फौजेनिसीं भेटीस आले होते, त्यांच्या भेटी जाल्या. तदोत्तर त्यांस निरोप देऊन, त्यांसमागमें आपलें बुणगें लावून देऊन, सड्या फौजा आग्रें उजवे हातें टाकून, इंद्रप्रस्थावरी मोहीम केली. कमर्दीखान व खानदवराखान, सादतखानास सामील व्हावयास, मथुरेवरून आग्र्याकडे गेले. आह्मी सड्या फौजांनिसीं नीट इंद्रप्रस्थास गेलों. तेथें दोन मुक्काम केले. दुसरे मुक्कामास, शहरांतून त्याचे मोंगल चार पांच हजार बाहिर निघाले, त्यांचा आमचा युद्धप्रसंग बराच होऊन शेंपन्नास मोंगल जिवें मारले. याखेरीज शेंपन्नास जखमी केले. दोनशें घोडे पाडाव आले, व दोन हत्ती घेतले. आणि तेथून कूच करून, आलावरदीची सराई सहा कोस होती, तेथें मुक्काम करून राहिलों. इतकीयांत

कमर्दीखान वजीर मथुरेकडून फिरोन आह्मांसन्निध आला. त्याची आमची गांठी पडली. युद्धप्रसंग जाला. एक हत्ती व दोन उंट बाणाचे घेतले. तेथून आह्मी कूच करून रेवाडीवरी आलों. ते दिवशीं सादतखान व खानदवरा इंद्रप्रस्थास आले. दुसरे दिवशीं कमर्दीखान व ते एकत्र जाले. मग आह्मी स्वार होऊन जयनगरासन्निध आलों. येथून चमेली, उडगीर देवगिरीजवळीं पार होऊन येतों. आपणांस कळावें ह्मणऊन लिहिलें असे. सविस्तर वर्तमान राजश्री रायांनीं आपणांस लिहिलें आहे, त्यावरून निवेदन होईल. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

या पत्रांवरून मराठ्यांच्या दिल्ली येथील रणसंग्रामाची अल्पशी तरी कल्पना येईल. ह्या मोहिमीमध्यें पिलाजी जाधवराव यांनीं उत्कृष्ट कामगिरी केली व पेशव्यांची मर्जी अगदीं सुप्रसन्न करून सोडली. याबद्दल बाजीराव पेशवे यांनीं त्यांस योग्य पारितोषिक दिलें असेल हें सांगावयास नकोच.*

यानंतर पिलाजी जाधवराव यांच्या शौर्यप्रदर्शनाचा प्रसंग ह्मणजे इ. स. १७३८ मध्यें निजामाबरोबर झालेलें मराठ्यांचें युद्ध हें होय. ह्या युद्धामध्यें

* पिलाजी जाधवराव ह्यांनीं ह्या मोहिमीमध्यें कसा पराक्रम केला, तें त्यांच्या अस्सल पत्रांतून व्यक्त होत आहे. ह्याच मोहिमीसंबंधाची 'तारीख-इ-इब्राहिमखान' ह्या फारसी बखरीमध्यें जी हकीकत दिली आहे, तीही पडताळून पाहण्यासारखी आहे. मराठ्यांच्या यशासंबंधानें ह्या बखरीमध्यें किती असत्य व अनुदारपणाचा उल्लेख आहे, तें त्यावरून दिसून येतें:—

"In the third year from the aforesaid date, through the mediation of Amir-ul-umra Khan-dauran Khan Bahadur, the Government of Malwa was bestowed on Baji Rao, whereby his power and influence was increased two-fold. The Rao in question, having entered Malwa with numerous force, soon reduced the province to a satisfactory state of order. About the same time he attacked the Raja of Bheedawar, and after putting him to flight, devastated his territory. From thence he despatched Pilaji with the view of subduing the Kingdom of Anterbed (Doab), which is situated between the Ganges, and Jumna. At that very time Nawab Barhanul-Mulk had moved out of his own province, and advanced through Antbarbed to the vicinity of Agra. Pilaji therefore crossed the Jumna, and engaged in active hostilities against the above-named Nawab; but having been vanquished in the battle, he was forced to take to flight, and rejoin Baji Rao. An immense number of his army were drowned while crossing the Jumna; but as for those who were captured or taken prisoners, the Nawab presented each one with two rupees and a cloth, and gave him permission to depart. Baji Rao becoming downcast and dispirited after meeting with this ignominious defeat, turned his face from that quarter."

—*History of India, by Sir H. Elliot, Vol. VII. Page 262.*

बाजीराव पेशवे व त्यांचे स्वामिभक्त सरदार ह्यांनीं निजामास नामोहरम करून भोपाळच्या लढाईंत जो अप्रतिम विजय मिळविला, तो मराठ्यांच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा आहे. ह्या युद्धानंतर निजामानें मराठ्यांशीं जो तह केला, त्याचीं सर्व बोलणीं पेशव्यांच्या वतीनें पिलाजी जाधवराव व बाबूराव मल्हार बर्वे ह्या दोन सरदारांनीं केलीं. त्यावरून पिलाजी जाधवराव ह्यांची योग्यता पेशव्यांच्या दरबारांत किती वाढली होती, हें दिसून येईल.

निजामाचें युद्ध संपून बाजीराव परत देशीं येऊन पोहोंचतात न पोहोंचतात, तोंच वसईकडे फिरंग्यांनीं फार उपद्रव दिला, ह्मणून तिकडे मोहीम निघाली. ह्या मोहिमीचे सूत्रचालक व मुख्य सेनापति चिमाजीआपा पेशवे हे असून त्यांच्या बरोबर मल्हारजी होळकर, पिलाजी जाधवराव वगैरे सरदार आपलें रणशौर्य व्यक्त करण्यास तत्पर होते. ह्या युद्धाचा वृत्तांत इंग्रजी व मराठी ग्रंथांमध्यें प्रसिद्ध आहे. त्याची पुनरावृत्ति करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. ह्या प्रसंगीं पिलाजी जाधवराव ह्यांनीं बहुत कष्टमेहेनत करून आपल्या शौर्याची पराकाष्ठा करून दाखविली. ती इतकी कीं, त्यांनीं रणभूमीवर एकसारखे उभे राहून तोफा व गरनाळा ह्यांचा सतत भडिमार चालविल्यामुळें, दारूची घाण व धुराचा लोट त्यांस असह्य होऊन त्यांची प्रकृति देखील बिघडली. परंतु निकरानें लढून वसईचा किल्ला घेण्याचा त्यांनीं कृतसंकल्प केला. चिमाजीआपा पेशवे ह्यांस, वसईचा किल्ला लवकर हस्तगत होत नाहीं असें पाहून, अतिशय काळजी उत्पन्न झाली, व त्यांनीं पिलाजी जाधवराव व मल्हारजी होळकर ह्या सरदारांस "किल्ला हस्तगत झाला नाहीं, तर निदान मला तोफेच्या तोंडीं देऊन माझें शीर तरी किल्ल्यांत पडूं द्या." अशी निर्वाणींची इच्छा व्यक्त केली. तेव्हां सर्व सरदार इरेस पडून, त्यांनीं हर प्रयत्नानें किल्ला साध्य केला. वसई ता. ५ मे इ. स. १७३९ रोजीं फत्ते झाली, व मराठ्यांचें निशाण तेथें ता. ११ मे इ. स. १७३९ रोजीं फडकूं लागलें. वसई फत्ते झाल्यानंतर चिमाजीआपांनीं पिलाजी जाधवराव यांस हवापालट करण्यासाठीं एकदम घाटावर पाठविलें. ही बातमी शाहूमहाराज यांस कळून त्यांनींही पिलाजी जाधवराव यांस पत्र लिहिलें, व योग्य औषधोपचार करण्याबद्दल त्यांस सूचना केली. शाहूमहाराजांच्या पत्रामध्यें "तुह्मी वसईस गेलां होतां, शरीरीं सावकाश नाहीं ह्मणून घरीं आलां, ऐसें परस्परें कळलें. परंतु तुह्मीं कांहींच न लिहिलें. अपूर्व आहे! याउपरीं आपल्या शरीरभावनेचें वृत्त सविस्तर लिहिणें व उपाय करणें. आळस न करणें." असे उद्गार नमूद आहेत.

यावरून खुद्द हिंदुपदपादशाहीचे मालक शाहू छत्रपति यांना देखील पिलाजी जाधवरावांचें किती अगत्य होतें तें दिसून येतें. असो.

पिलाजी जाधवराव हे वसईची लढाई फत्ते होतांच, वसई सोडून देशावर आले, हें वर सांगितलेंच आहे. त्यानंतर फिरंगी लोकांनीं कौल घेऊन, वसईचा किल्ला ता. ११ मे इ स. १७३९ रोजीं चिमाजीआपा यांच्या स्वाधीन केला. हें आनंदवृत्त चिमाजीआपांनीं पिलाजी जाधवराव यांस लिहिलें. त्याचें उत्तर त्यांनीं ता. १६ मे इ. स. १७३९ रोजीं लिहिलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

श्री. ता. १६ मे १७३९.

"राजश्री चिमाजीपंत आपा गोसावी यांसीं:–

श्री सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित पिलाजी जाधवराऊ दंडवत विनंति येथील क्षेम तागाईत छ १८ सफर जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– आपण पत्र पाठविलें, प्रविष्ट होऊन साद्यंत वृत्त कळों आलें. वसईच्या कोटांतून फिरंगी यांनीं वस्तभाव कुली नेऊन छ १३ सफरीं अस्तमानीं गलबतावर चढोन निघोन गेले. किल्ल्यांत लोक पाठवून बंदोबस्त केला. हें संतोषाचें वर्तमान लिहिलें, तेणेंकरून परम संतोष जाला. किल्ल्यांत नेहमीं हजार दीड हजार माणूस ठेवणें तें ठेवून, तुमच्या चित्तास येई ऐसा बंदोबस्त करितों, ह्मणोन लिहिलें. ऐसियास, आपण बंदोबस्त करिजेल, तो उत्तम प्रकारेंच होईल. शरीरीं आरोग्यता जालियाचें वृत्त लिहावें ह्मणून लिहिलें. ऐसियास, आपली आज्ञा घेऊन स्वार जालियानंतर वरघाटें आलियानें देशचा वारा लागोन समाधान वाटेल ह्मटलें; परंतु तोफेच्या व गरनाळ्यांच्या धुरानें नेत्रांस व घशास किंचित् अपाय जाला आहे, त्याचा उपाय करितों. आपले पुण्येंकरून आरोग्यता होईल. येत समयीं आपण आज्ञा केली कीं, दरमहाचे ऐवजीं कांहीं ऐवज तरतूद करून निकडीच्या समयास पावता करणें. त्यावरून आज्ञेप्रमाणें घरीं आलियावर कर्जवाम करून ज्येष्ठ मासचे हप्त्यापैकीं बाकीचा ऐवज रुपये ८११७ आठ हजार एकशें सतरा राजश्री अंताजीपंत यांजकडे पुणियास रवाना केले. ते आपणापांशीं पावता करितील. विशेष काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

या पत्रावरून चिमाजीआपाही पिलाजी जाधवरावांस कसें महत्त्व देत होते, हें व्यक्त होतें. वसईच्या लढाईत पिलाजी जाधवराव यांनीं जी कष्टमेहेनत केली, तिचें सविस्तर वर्णन मराठ्यांच्या इतिहासांत आढळून येत नाहीं. तथापि त्यांच्या कामगिरीबद्दल इ. स. १७४७ मध्यें बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं त्यांस

"वसईचे मसलतोस श्रमसाहस करून स्वामिसेवा केली" ह्मणून मौजे सांडोरें ताा आगर वसई पाा सायवान हा गांव नूतन इनाम करून दिल्याचा उल्लेख सांपडतो. यावरून पिलाजी जाधवराव यांची वसईच्या मोहिमींतील सेवा लक्ष्यांत घेण्यासारखी असली पाहिजे, हें उघड होतें. परंतु ऐतिहासिक कागदपत्रांच्या अप्रसिद्धीमुळें त्यांच्या पराक्रमाचें तेज अंधकारांत लपून गेलें आहे!

वसईची मोहीम संपल्यानंतर, थोरले बाजीराव पेशवे हे, थोडेच दिवसांनीं ह्मणजे तारीख २८ एप्रील इ. स. १७४० इसवी रोजीं, खानदेशांत रावेर येथें मृत्यु पावले; व त्यांचीं पेशवाईचीं वस्त्रें त्यांचे चिरंजीव बाळाजी बाजीराव यांस मिळालीं. बाळाजी बाजीराव हे, आपल्या वडिलांप्रमाणें तरवारबहाद्दरींत पूर्ण निष्णात असून मोठे राजकारस्थानी मुत्सद्दी होते. त्यांनाही, पिलाजी जाधवराव यांची कर्तबगारी व शौर्य पूर्ण माहीत असल्यामुळें, त्यांनीं आपल्या वडिलां-प्रमाणें त्यांच्यावर पूर्ण विश्वास ठेवून, मोठमोठीं राजकारस्थानें त्यांच्या सल्ल्यानें सिद्धीस नेलीं. इ. स. १७४१ चे जानेवारी महिन्यांत बाळाजी बाजीराव हे निजामाची भेट घेण्याकरितां नर्मदेपर्यंत गेले. त्यांच्याबरोबर पिलाजी जाधवराव हे होते. दिल्लीच्या बादशाहाकडून, पूर्वींच्या सनदेप्रमाणें माळव्याच्या राज्य-कारभाराचा सर्व अधिकार आपणास मिळावा ह्मणून, बाळाजी बाजीराव यांनीं या वेळीं निजामाबरोबर बोलणें चालविलें होतें. या मसलतींत पिलाजी जाधवराव हे मुख्य असून, त्यांची व निजामाची ता० ९ जानेवारी इ. स. १७४१ रोजीं भेट झाल्याचा उल्लेख सांपडतो. पिलाजी जाधवराव यांनीं पेशव्यांच्या वतीनें निजामउलमुल्क यांशीं असें बोलणें लाविलें होतें कीं, दिल्लीच्या बादशाहाकडून पेशव्यांस माळव्याच्या सुभेदारीचें काम द्यावें व तो प्रांत जहागीर देववावा, आणि मदतखर्च ह्मणून पन्नास लक्ष रुपये देववावे. त्यावर निजामाकडून असें उत्तर मिळालें कीं, माळव्याची सुभेदारी मजकडे आहे, सबब त्याची नायबी तुह्मांस सांगण्यांत येईल; आणि मदतखर्चाबद्दल मागितलेली रकम तुह्मांस देण्याविषयीं प्रयत्न करण्यांत येईल. यानंतर लवकरच सवाई जयसिंगाची व पेशव्यांची भेट होऊन माळव्याची सुभेदारी मराठ्यांस मिळाली. ह्या बाबतींत जे करारमदार झाले आहेत, त्यांत राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर व पिलाजी जाधवराव ह्यांचीं नांवें असून, ह्या तिघांकडून पेशव्यांच्या सुरळीत वर्तनाबद्दल बादशाहानें हमी लिहून घेतली आहे. ह्यावरून ह्या सरदारांची योग्यता दिल्लीपतीसही फार वाटत होती हें उघड आहे.

यानंतर पेशव्यांची मध्यप्रांत व बंगाल यावर मोहीम झाली. या मोहिमीमध्यें पिलाजी जाधवराव यांनीं श्रमसाहस विशेष करून, पेशव्यांची मर्जी सुप्रसन्न करून सोडली. मध्यप्रांतांतील गढामंडल्याच्या स्वारीमध्यें पिलाजींचे पराक्रम विशेष व्यक्त झाले, ह्मणून पेशव्यांनीं त्यांस तारीख २३ आगस्ट इ. स. १७४१ रोजीं एक हत्ती व तीन हजार रुपये बक्षीस दिले. यानंतर मराठ्यांची इतिहासप्रसिद्ध बंगाल्यावरील मोहीम घडून आली. ही मोहीम ह्मणजे मराठ्यांच्या शौर्यपराक्रमांच्या कसोटीची परमावधि होय. ह्या मोहिमीमध्यें बंगालचा नबाब अलिवर्दीखान याच्याबरोबर मराठ्यांनीं जीं राजकारणें खेळविलीं व आपल्या बाहुबलाचे जे चमत्कार दाखविले, ते इतिहासांत नमूद करण्यासारखे आहेत. परंतु त्या संबंधाचीं अस्सल पत्रें प्रसिद्ध झाल्यावांचून त्या सर्वांचें खरें स्वरूप निदर्शनास येणार नाहीं. ह्या प्रसंगीं पिलाजी जाधवराव यांचें बुद्धिचातुर्य चांगलें व्यक्त झालें आहे, व त्याबद्दल त्यांस अनेक पारितोषिकेंही मिळालीं आहेत. अलिवर्दीखानानें या समयीं बाळाजी बाजीराव पेशव्यांशीं दोस्तीचा घाट घालून व द्रव्याच्या राशी देऊन, मराठ्यांना बंगाल्यांतून परत फिरविण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला. त्यानें पिलाजी जाधवराव यांची ता. ९ एप्रील इ. स. १७४२ रोजीं भेट घेऊन, त्यांस एक मौल्यवान् घोडा बक्षीस दिला; आणि त्यांच्या द्वारें पेशव्यांची भेट घेऊन त्यांनाही खूप नजराणे दिले. परंतु एवढ्यानें मराठ्यांचें समाधान न होऊन, ते आणखी वर्ष दोन वर्षें त्या प्रांतांतून हालले नाहींत. बाळाजी बाजीराव पेशवे व पिलाजी जाधवरावं हे ता. २४ फेब्रुवारी इ. स. १७४३ रोजीं गयेस असल्याचा उल्लेख सांपडतो. असो.

इ. स. १७४५ मध्यें पिलाजी जाधवराव यांनीं, भोपाळचा नबाब फैज महंमदखान याजबरोबर तह करून, त्याचे मुलुखांपैकीं निम्मे वांटणीचे महाल भेलसें वगैरे पेशव्यांस मिळवून दिले. त्यांनीं ता. ४ नोव्हेंबर इ. स. १७४६ रोजीं रतनगड किल्ला जिंकून घेतला. इ. स. १७४८ मध्यें पिलाजी जाधवराव हे निजामाच्या राजकारणांत असल्याचें दिसून येतें. बाळाजी बाजीराव पेशवे यांनीं, या प्रसंगीं पिलाजी जाधवराव यांनीं सैद लष्कर अल्लीखान याचे मार्फत, निजामाशीं तहाचें बोलणें बोलून, परस्पर निखालसता करून घ्यावी व स्नेहभाव पूर्ववत् करावा ह्मणून जीं पत्रें लिहिलीं आहेत, तीं पाहिलीं असतां पिलाजी जाधवराव यांस ते किती महत्त्वाचीं राजकारणें सांगत असत, हें चांगलें दिसून येतें. ते पिलाजी जाधवरावांस लिहितातः—"एकांतीं सविस्तर नबाबास वृत्त आमचें सबाह्य अभ्यंतर मर्जीचें निवेदन खानांनीं करावें. तदोत्तर जे आज्ञा

करितील तें लिहून पाठवावें. आह्मांस नबाबाच्या स्नेहाची फार उमेद आहे. किल्ल्याविसीं, वरकडांविसीं जें नबाबास उत्तम तेंच आह्मीं करावें, ऐसा बेलभंडार आह्मांपासून घ्यावा, व नबाबांनींही निखालसपणें नानकुरान द्यावें. परस्पर निखालसता व्हावी; लौकिकांत विरुद्ध नसावें, हेंच अंतःकरणपूर्वक चहातों. इतकेंही असोन, नबाब निखालसता न करीत, तरी आमचा उपाय काय? सारांश, सविस्तर खानानें नबाबासीं बोलावें. उत्तर होईल तें लिहून पाठवावें. ह्मणजे पुढें मागें खानावर उभयपक्षींचा शब्द येणार नाहीं." अशीं महत्त्वाचीं राजकारणें सिद्धीस नेणाऱ्या मराठे मुत्सद्याची योग्यता पेशव्यांच्या दरबारीं केवढी असली पाहिजे, हें इतिहासवाचकांस निराळें सांगावयाचें कारण नाहीं.

बाळाजी बाजीराव पेशवे हे, पिलाजी जाधवरावांस आपल्या वडिलांप्रमाणें पूज्य मानून त्यांस फार मान देत असत, व त्यांना 'काका' असें ह्मणत असत. त्यांनीं त्यांची आपल्या फौजेच्या प्रमुख सेनापतींमध्यें गणना केली होती व ते मोठमोठ्या युद्धप्रकरणीं त्यांची सल्लामसलत घेत असत. त्यांनीं इ. स. १७४३।४४ मध्यें नरवर, बिजेपूर व किरोली वगैरे बुंदेलखंडांतील एक लाख रुपयांचा प्रांत त्यांस नवीन बक्षीस दिला. शिवाय, ते हरएक नवीन मोहिमीमध्यें त्यांच्या बहादुरीबद्दल योग्य पारितोषिकें देत असत. एके प्रसंगीं पिलाजी जाधवराव हे पावसाची अतिशय झड लागली असतांना, जरुरीच्या स्वामिकार्यासाठीं धांवून आले व त्यांचीं वस्त्रें अगदीं भिजून गेलीं. तेव्हां खुद्द पेशव्यांनीं आपल्या अंगावरील खास पोषाख त्यांच्या अंगावर घातला. अशा प्रकारचा बहुमान पेशवाईमध्यें फारच थोड्या सरदारांस मिळत असे.

पिलाजी जाधवराव यांचे चिरंजीव सटवाजी जाधव हे त्यांच्याप्रमाणेंच शूर व कर्तृत्ववान् होते. त्यांनींही बऱ्याच लढाया जिंकून आपलें नांव पेशव्यांच्या दरबारीं प्रसिद्धीस आणिलें होतें. पिलाजी जाधवराव यांच्या पदरीं जीं माणसें असत, तीं त्यांच्या शिक्षणानें शिपाईगिरीचे कामांत चांगलीं तरबेज झालेलीं असून, तीं प्रसंगविशेषीं लोकोत्तर शौर्य दाखवीत असत. त्यांच्या पदरीं 'हसन महात' ह्मणून एक नौकर होता. तो वाघावर बेजरब हत्ती घालून वाघाची शिकार करीत असे. त्यामुळें त्याची फार प्रसिद्धी होऊन, त्यास खुद्द पेशव्यांनीं त्याच्या बहादुरीबद्दल सुवर्णवलय बक्षीस दिल्याचा दाखला सांपडतो.

पिलाजी जाधवराव यांना पेशव्यांच्या दरबारांत एक विशिष्ट प्रकारचा मान होता. तो दुसऱ्या कोणत्याही मराठे सरदारास असल्याचा दाखला सांपडत नाहीं. हा मान ह्मणजे, पेशव्यांच्या बंदीखान्यामध्यें जे कैदी असतील —मग ते

राजकीय असोत, अगर फौजदारी गुन्ह्याचे असोत,-त्यांची वाटेल त्या वेळीं, मर्जीप्रमाणें पूसतपास करणें व त्यांना बंदमुक्त करणें हा होय. जाधवराव यांची स्वारी ज्या वेळीं राजवाड्यांत जाईल, त्या वेळीं कोणी बंदीवान त्यांच्या समोर दिसला व त्यांनीं त्यास बंदमुक्त करण्याची इच्छा दर्शविली, तर त्यास तत्काळ सोडून देण्याबद्दल पेशव्यांचा हुकूम होता, असें ह्मणतात.

पिलाजी जाधवराव यांची प्रकृति सदृढ व निकोप असून त्यांनीं पांचपन्नास वर्षांमध्यें लढायांचीं कामें बहुत कष्टमेहेनतीनें केलीं. पुढें त्यांस पोटशूलाचा आजार जडला. तेव्हां ते आपलें मूळ गांव जें वाघोली तेथें राहूं लागले. तेथें त्यांस आषाढ वा। ६ बुधवार शके १६७३ ह्मणजे ता। ३ जुलई इ. स १७५१ रोजीं देवाज्ञा झाली. ही बातमी बाळाजी बाजीराव यांस समजतांच, ते वाघोलीस त्यांच्या मुलाच्या समाचारास स्वतः गेले होते. पिलाजी जाधवराव ह्यांच्या पश्चात् त्यांच्या वंशजांकडे पेशव्यांनीं त्यांचा सरंजाम बरेच दिवस चालविला होता.

वर दिलेल्या संक्षिप्त माहितीवरून, पिलाजी जाधवराव यांची योग्यता मराठ्यांच्या इतिहासांत किती आहे व त्यांचें चरित्र इतिहासदृष्टीनें किती महत्त्वाचें आहे, याची कल्पना महाराष्ट्रवाचकांस सहज करितां येईल. अशा थोर व पराक्रमशाली पुरुषाच्या जीवनवृत्तांताचीं अस्सल साधनें शोधून काढून, त्याचें साद्यंत व साधार चरित्र कोणी तयार करण्याचें श्रेय घेईल, तर मराठ्यांच्या इतिहासावर त्याचे अगणित उपकार होतील. ऐतिहासिक चरित्रांच्या अभावामुळें पिलाजी जाधवरावांसारख्या लोकोत्तर नरवीरांच्या पराक्रमकथा प्रायः लुप्त होऊन त्यांची महाराष्ट्रास नाममात्र ओळख राहिली आहे; आणि तीही, अशीच अनास्था चालू राहिली, तर कालेंकरून नष्ट होण्याचा संभव आहे! इकडे महाराष्ट्राच्या इतिहासाचा अभिमान बाळगणारांनीं अवश्य लक्ष पुरवावें, अशी आमची अगत्याची सूचना आहे.*

---

* पिलाजी जाधवराव ह्यांच्या चरित्राची ही रूपरेखा काढण्याचे कामीं रा. राजवाडे ह्यांनीं खंड ६ मध्यें प्रसिद्ध केलेलीं पत्रें, आणि वाघोलीकर व वाडीकर जाधव ह्यांच्या कैफियती ह्यांचा विशेष उपयोग झाला, ह्यांबद्दल त्यांचे आह्मी फार आभार मानितों.

## १६. सोलापूर किल्ल्यांतील लेख.

सोलापूर गॅझेटीयरमध्यें, सोलापूर किल्ल्यांत खालील ठिकाणीं लेख मिळतात अशी माहिती आहे. यांपैकीं जे लेख आह्मांस आतां आढळले, त्यांपुढें नक्षत्र चिन्ह * दिलेलें आहे. गॅझेटीयरमध्यें दिलेल्या लेखांशिवाय दोन तीन लेख आह्मांस नवीन आढळलेले आहेत; त्यांचीही येथें नोंद करून ठेवतों.

नं. (१) खिळे दरवाजावर, पितळेच्या पत्र्यावर, दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं आबाजी बल्लाळ यानें तो दरवाजा दुरुस्त केला, याबद्दल मराठींत लेख आहे. (तो हल्लीं त्या दरवाजावर नाहीं.)

नं. (२–३) वेशींच्या दोन दरवाजांवर, विजापूरच्या आली आदिलशाहानें ते दरवाजे बांधल्याबद्दल **मुसलमानी लिपींत** दोन लेख आहेत. *

नं. (४) पूर्वेकडील आंतल्या भिंतीच्या बाहेरच्या बाजूवर, ६ फूट उंचीवर, एका लहानशा डबक्यासमोर शिलालेख आहे. डबक्याच्या उजवीकडील दगडी बांधकामांत एक नागोबाचा दगड आडवा असून, त्या नागोबाचे समोर मनुष्याच्या डोक्यापेक्षां जरा अधिक उंचीवर हा शिलालेख आहे. हा **कानडी लिपींतील** लेख आहे.*

नं. (५) पश्चिमेकडील बाहेरच्या भिंतीच्या आंतल्या बाजूला नैरृत्य कोनाजवळ सुमारें ६ फूट उंचीवर दोन दगड आहेत व त्यांवर पुसट पुसट अक्षरें आहेत. (हे लेख आह्मांस मिळाले नाहींत.)

नं. (६) दक्षिणेच्या आंतल्या भिंतींतील उंच हनुमान बुरुजाच्या फरशीवर, एक **अर्धा मुसलमानींत व अर्धा मराठींत** असलेला शिलालेख आहे. *

नं. (७) कोटाच्या आंत ईशान्यबाजूच्या एका जुन्या विहिरीच्या तोंडाच्या उजव्या बाजूस एका दगडावर **मराठींत** सुबोध शिलालेख आहे. *

### आह्मांस नवीन मिळालेले लेख.

नं. (८) बाहेरच्या भिंतीच्या आंतल्या बाजूस आग्नेय कोनांत एका उभ्या दगडावर **मराठी लिपींत** स्वच्छ शिलालेख आहे.

नं. (९) पूर्वेकडील आंतल्या तटाच्या आंतल्या बाजूस दारूखान्यासमोर जरासें डावीकडे **मोडी लिपींत** एक शिलालेख आहे.

नं. (१०) पश्चिमेकडील आंतल्या भिंतीच्या आंतल्या बाजूस (पाडलेल्या भागाजवळील) एका बुरुजावर दोन उत्तम नक्षीचे जुने हिंदु देवळाचे खांब आहेत; त्यांपैकीं एकावर **मुसलमानी लिपींत** एक लेख आहे.

### शिलालेख नं. ६.

हा लेख दक्षिणेच्या आंतल्या भिंतींतील उंच हनुमान बुरुजाच्या फरशीवर, अर्धा मुसलमानी लिपींत व अर्धा मराठींत आहे. मराठी भाग येथें जसा लागला

तसा देत आहें. कित्येक अक्षरें कालांतरानें पुसट झालेलीं आहेत. दुर्बोध स्थळीं प्रश्नचिन्हें दिलेलीं आहेत. हा लेख विजापूरच्या आली आदिलशाहाच्या वेळचा आहे. याच्या एकंदर, मराठी भागाच्या, पांच ओळी आहेत. त्या अशाः—

(१) ... ना आळी येदीळशाहा सुळतानाः कोट सो (?) ळा
(२) पुरासी रक्षे सुगुनाः तेथील नेघबा बाजी जाधीत (?)
(३) खानाः केळी अपरुब माहाळाची (?) रचनाः मचे (?)
(४) पळग करून हउदखाना नवी प्रती ह्मणउन लीही
(५) ळे सासानाः (?) ॥

## शिलालेख नं. ७.

हा लेख कोटाच्या आंत ईशान्यबाजूस असलेल्या एका जुन्या विहिरीच्या तोंडाच्या उजव्या बाजूस एका दगडावर, मराठींत सुबोध लिहिलेला आहे. हा लेख शके १५७५ ह्मणजे इ. स. १६५३ मधील असून, त्यांत त्या विहिरीविषयीं हकीकत आहे. याच्या एकंदर बारा ओळी आहेत; त्या अशाः—

(१) शेके १५७५ विजयनाम संवत्सरे आश्विनमासे बहळे पंचमि सोमवा-
(२) र मृगशिरानक्षत्र वुरियाच (?) ये ॥०॥ सुहरसन सळा सखप्र
　　सैतवा (०।?)
(३) ळ फ छ १७ माहे जिळकादरोज आळत्फात दिने राजा शाहा
(४) सुळतान महामद आदळशाहा पादशाहानाः ( राव नि (?) पुर्ण कृ
(५) पा असे सुशनाः कोट संदळापूर अपरुब न (?)
　　तिना बाळा किळामधे वु
(६) नियाद सोधून केळि रचनाः माहमदखान पिर
　　माहामद जाघितखान हा
(७) बाळदान सुजाणाः नजिक शाहाबुरुज व (।) दारु
　　खाना. तेथे नविर्मा-
(८) हामद बाई बांधि० ॥ चि चौकोनाः दोनी
　　तरफ सिद्धि (?) कोटासि ह्या-
(९) त करून घेतले बहसानाः त्यासि सदा प्र
　　सन्न आहे. स्वामि रहमानाः न
(१०) वि बाई ह्मणउनि लिहिले सासाना.
　　त्याचा पाणि घेतजुमेळेजानाः याळा
(११) माचे हावाळे होता दळरतराट गाविदे (?)
　　वाटसर नाण्क बाहि दौलत खो
(१२) हा मदानाः ॥

हा लेख सुलतान महमद आदिलशाहा पादशाहाच्या वेळचा आहे. या विहिरीस बाळंतिणीची विहीर ह्मणतात, त्यांत बरेंच तथ्य दिसतें. कारण, सातव्या ओळी-मध्यें महामदखान पिरमहामद जाघीतखान यानें 'बाळ दान' केल्याचा उल्लेख असावासें दिसतें. याच जाघीतखानाचा उल्लेख नं. ६ च्या शिलालेखांतही आहे असें वाटतें.

## शिलालेख नं. ८

आह्मीं हनुमान बुरुजावर उभे असतां, बाहेरच्या भिंतीच्या आंतल्या बाजूस आग्नेय कोंपऱ्यांत, एका स्वच्छ उभ्या दगडावर, एक मराठींत शिलालेख असलेला दिसला. हा लेख शके १४६६ मधला असून आग्नेय कोनांतील बुरुज त्या वेळीं बांधल्याविषयीं त्यांत उल्लेख आहे. या लेखावरच्या दोन लहान ओळींतील अक्षरें, मंडळींनीं त्यांवर शिलाप्रहार करून तीं नासविलीं असल्यामुळें, ओळखतां येत नाहींत. खालच्या चौकटींतील दहा ओळी कळतात. त्या अशाः—



(१) बुर्ज कारकीर्द खुदाये
(२) वदखा (?) वे (ळे ?) अजम बर्गथी (?)
(३) न गोसावि बुजाये ववब
(४) र्या खानिर्बु मुदति १ महे २१
(५) रोजणी तेरीख १८ माहे सफ
(६) र इहदे खमसईन ता॥ छ १६
(७) माहे रबिलाखर इहदे खम
(८) सैन मोर्तबु जाहाला. सके १४६६
(९) क्रोधी संवत्सरे आसाडमासे तै हा बु
(१०) र्ज मोर्तबु जाहाला.



या ओळींभोवतीं चार रेषांचें चौकट असून, वर दोन लहान अक्षरांच्या ओळी आहेत; पण त्या आतां वाचतां येत नाहींत.

## शिलालेख नं. ९.

हा लेख पूर्वेकडील आंतल्या तटाच्या आंतल्या बाजूला, दारूखान्याच्या समोर जरासा डावीकडे आहे. हा मोडी लिपींत स्वच्छ असा अमून याच्या पांच ओळी आहेत. त्या अशाः—

(१) खेरहात शाह अलमगीर राजा म-
(२) नोहर खासजी गौड किलेदार किले सो-
(३) लापुर ह्याच्या अमलामधें ह्या तरफ-
(४) ची अलंगजकोट कचा होता तो पका के
(५) ला सन २४ विक्रम संवत १७३७ ॥ ६ ॥

हा लेख विक्रम संवत् १७३७ ह्मणजे इ. स. १६८० मध्यें शाहा अलमगीर राजा राज्य करीत असतां, मनोहर खासजी गौड याच्या अंमलांत सोलापूर किल्याचा पूर्व भाग (ज्यास अलंगज कोट ह्मणत असत) जो कच्चा होता, तो पक्का केला.

येणेंप्रमाणें माहिती मिळाली आहे.

त्र्यंबक गुरुनाथ काळे,
सोलापूर.



ठेवून करावयाचें नाहीं. वरचेवर बातमी घेऊन त्यांस राखावें हेंही करीत नव्हती. आतां सरकारचे लिहिण्यावरून सावध जाले ह्मणतात. हा कालवर माणसाची वगैरे चौकशी केली नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति."

## लेखांक ३८.

श्री. मे १७८३.

"पुरवणीपत्र श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:-पूर्वी बाईनीं ह्मटलें होतें कीं, श्रीमंत आपलें पत्र खातरजमेचें पाठवितील, तर साल आहिदेचे ऐवजीं कर्ज घेऊन देईन. तोच जाबसाल आतांही एक वेळ असा केला कीं, माझे नांवें पत्र जिमतीखातर जमेचें पाठवावें कीं, माळव्यांतील माहालास पुढें उपद्रव लागणार नाहीं. जोंपर्यंत पैसा फिटेल तोंपावेतों तोही ऐवज महाल मजकूर वजा होऊन देईन. तिगस्त व सालगुदस्त व सालमजकूर या ऐवजाशीं संबंध नाहीं. ऐशीं भाषणें मनास येईल तसें बोलतात. श्रीमंतांचे दौलतींत यांची दौलत. ते आठवण न धरितां, आपणच खावंदगिरी महालाविषयीं करून आहेत. या समयास घरचीं वांकडीं मनांत आणूं नयेत, सरकारचे लिहिण्याचे अर्थ मनांत येऊन ऐवज महालचा फौजेस पाठवावा, ही विनंति वारंवार मी करीतच आहें. तें ऐकून हंसतमुख होत असावें, उत्तर देऊं नये, ऐसे आदेश बाईचे आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."

## लेखांक ३९.

श्री. १९ जुलई इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १८ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:- छ १२ रजबचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ ८ साबानीं दो प्रहरां पावलें. पत्रीं आज्ञा कीं, श्रीमंत राजश्री रावसाहेब यांच्या लग्नाचीं वस्त्रें व बहुमान गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांस येणेंप्रमाणें:—

४ कापड सनगें

१ पातळ पैठणी जरी १.
१ खण पैठणी एक.
२ शालजोडी फर्द.
———
४

१ माळ मोत्यांची मोतीं ११८ सुमार एकसें अठरा.

५

एकूण वस्त्रें चार व बहुमान माळ एक मोत्यांची पाठविली, ती पावती करून उत्तर पाठवावें ह्मणून आज्ञा. त्यावरून आज्ञेप्रमाणें वस्त्रें ४ व बहुमान माळ मोत्यांची प्रविष्ट करून, बाईचीं उत्तरें घेऊन सेवेसीं पाठविलीं असेत. बहुत काय लिहिणें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ४०.

श्री. २९ जुलई इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधानसाहेब स्वामींजीचे सेवेसीं:-

विनंति सेवक चरणरज केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २८ रोज माहे साबानपावेतों साहेबांचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- चंद्र ११ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर जाहलें. तेथें आज्ञा कीं, सरकारचे लग्नपट्टीचा ऐवज राजश्री तुकोजी होळकर यांजकडे दोन लाख रुपये घ्यावयाचे करार केले, तो ऐवज गंगाजलनिर्मळ अहल्याबाई होळकर यांजकडून देवविला. त्यास अहल्याबाईनीं उत्तर केलें कीं, आह्मीं तुकोजी होळकर यांस लिहून पाठविलें आहे. त्याचें उत्तर आल्यावर ऐवजाचा फडशा करूं. यावरून येथें तुकोजी होळकर यांसी बोललों. यांनीं उत्तर केलें कीं, कराराप्रमाणें ऐवज लवकर द्यावयाविषयीं अहल्याबाई यांसी लिहून पाठविलें आहे. याउपर ऐवजास गुंता पडावयाचा नाहीं. याप्रमाणें बोलले. तेव्हां ऐवजाची रवानगी अहल्याबाई लवकरच करतील. येथेंही सावकाराची खातरजमा करून वराता दिल्या आहेत. त्याप्रमाणें सावकाराचे पदरीं ऐवज लवकर पडला पाहिजे. याकरितां तुह्मीं तेथें अहल्याबाईस सांगून, ऐवजाच्या हुंड्या लवकर पाठवून देणें ह्मणून आज्ञा. त्यावरून वराता तीन आलादा आलादा सावकाराचे नांवें होत्या, त्या बाईस दाखविल्या. बाईनीं वराता कबूल केल्या. एकूण तिही वरातेचे रुपये १९८१०० एक लक्ष अठ्याणव हजार एकश्याच्या, त्या पा। तूर्त हुंड्या सुमारीं ६ एकूण रुपये १३०००० एक लक्ष तीस हजार यांच्या हुंड्या, तिलोकसी पदमसी याच्या दुकानच्या घेऊन राजश्री कृष्णाजी भैरव थत्ते यांजकडे पाठविल्या आहेत. ते मुदतीप्रमाणें आपला ऐवज घेऊन, वरकड उभयतां सावकारांचा ऐवज बाईच्या पत्राप्रमाणें ज्याचा त्यास देतील. सरकारचे वरातेपैकीं सावकाराचें देणें रुपये ६८१०० अडुसष्ट हजार शंभर रुपये राहिले. त्याही हुंड्या आज्ञे-

प्रमाणें सावकाराकडे लवकरच रवाना करतों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. मिति शके १७०५ आषाढ वद्य ३० भौमवार हे विज्ञापना."

---

## लेखांक ४१.

**श्री.** ८ आगष्ट इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक सा॥ नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिवभट जोशी संगमनेरकर नि॥ अहल्याबाई होळकर यांचे आश्रित यांनीं कसबे संगमनेर येथें श्रीरामजीच्या मूर्ति पंचायतनासुद्धां घेऊन ठेविल्या. एक स्थळ तेल्याचें, दोन तीनशेंपावेतों खरेदी केलें. त्या स्थळीं देवालय बांधून श्रीच्या मूर्तीची स्थापना करून, नित्य कीर्तन पूजा चालवावी असा मनोभाव ह्मणून विनंतिपत्रें सेवेसीं भटजींनीं लिहिलीं आहेत व समक्ष बाईनीं विनंतिपत्र लिहावयास सांगितलें कीं, "भटजी आमचे आश्रित. यांचा हेतु वतनाचे स्थळीं देवालय करावें. तर, सरकारचें आज्ञापत्र तेथील कमाविसदारास कीं, भटजींनीं स्थळ जागा घेतली, त्या जागेची महजर, खर्च न पडतां करून देऊन, बिनदिक्कत श्रीच्या देवालयाचें काम निर्विघ्न शेवटपर्यंत होय तो अर्थ करावा." त्यावरून विनंतिपत्र लिहिलें आहे. त्यास स्वामी कृपाळू होऊन भटजीचे कार्याविषयीं कमाविसदार यांस पत्र, महजर करून देण्यासाठीं आज्ञा करणार धनी समर्थ, व भटजीचे पत्राचीं उत्तरें यावीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ४२.



**श्री.** २७ सप्टेंबर इ. स. १७८३.

"पुरवणीपत्र श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजेः–चंद्र २१ सवालचीं आज्ञापत्रें आलीं. तेथें आज्ञा त्याचीं विनंतिपत्रें लिहिलीं असेतः—

लष्करांतून बाईचें नांवें पत्र गेलें, त्याच्या नकला तुह्मीं पाठविल्या त्या पावल्या. पुढें बाईनीं पत्राचें उत्तर काय दिलें व तुह्मां उभयतांशीं काय बोलणें जालें, हें लिहून पाठविणें ह्मणून आज्ञा. त्यास, पत्राचें उत्तर परभारें बाईनीं पाठविलें आहे. आह्मांपाशीं विशेष कांहीं बोलली नाहीं. पूर्वीच सेवेसीं लिहिलें असे. परभारें बाईनीं पत्र पाठविलें, त्याचें उत्तर यथास्थित आल्यावर आह्मांशीं बोलावयाचें बोलतील.

तोंवर त्यांस भ्रम आहे कीं, परभारें खत व ऐवज पटून जाब आल्यास यांचें कारण काय? याप्रमाणें वर्तमान असे. कलम १.

खेतसी तिलोकसी याचें दुकान पुण्यांत आहे. तेथें टिकमदास धर्मदास नांवें गुमास्ता त्याच्या दुकानीं साडेसातशें रुपये घेतले. त्याविषयीं विनंति लिहिली होती, त्याची आज्ञा कांहींच आली नाहीं. कलम १.

रा॥ नारो कृष्ण सुभेदार याजकडील कारकून कोणगोईचे जाबसालाकरितां आहे. कसरावद व कान्हापूर येथील फडशा होणें त्याची आज्ञा आली नाहीं. कलम १.

रेशीम सरकारचें पत्रीं वजन ८८१ तीन टांक लिहिलें होतें. येथें वजन करून घेतलें, तों वजन पुरें पक्कें ८८१ एक टांक उतरलें. दोन टांक उणें आलें. वजन ऐशी रुपये शेर घालून केलें. त्याप्रमाणें एक शेर एक टांक भरलें. कलम १.

धोतरजोडे १३ व शेला १ एकूण चवदा सणगें पावलियाचें उत्तर आलें. कलम १.

पत्रीं आज्ञा कीं, रेशीम पाठविलें हें कारेगरास देऊन धोतरजोडे आणीक सुमारें १५ करवणें. कांठास पट्टा मोठा न घालणें. दोन दीड बोट पट्टा कांठ करवणें. मोठा न करणें ह्मणून आज्ञा. त्यास रेशीम रंगदार उत्तम, चांगलें आहे. कारागीर बोलावून त्यांस रेशीम तूर्त वजन १६ रुपये भार दोन धोतरजोडे करावयास दिलें. दोन धोतरजोडे तयार होऊन किंमत आंखणी करून सेवेसीं पाठवितों. हे पसंत येतील. त्यांचे उत्तर आल्यानंतर दुसरें काम लावूं. कारण कीं, रेशीम सरकारचें. सूत पाजणी व मेहनत कारागिरांची. यांत नुकसानी त्यांची होती. ते ह्मणतात कीं रेशीम आह्मांस खंडून द्या. आमचा माल तयार होईल तो वाजवी किंमत चौघांचे विचारें होईल ती द्या, असें ह्मणतात. यास्तव दोन धोतरजोडे करविले. ते आठ दिवसांत होतील. त्याची बिनाखी करून पाहूं. किती नुकसानी कारागिरांस येतें त्यासारखें सेवेसीं लिहीन. रेशीम दर शेरीं ५० प्रमाणें मागतात. आह्मीं दर शेरीं ५५ रुपये सांगितले आहेत. आज्ञा येईल तसें करूं. खंडून द्यावें हें बरें. त्याची पोटफोड होती. खंडून रेशीम देऊन, त्याच रेशिमाचे धोतरजोडे करून घ्यावे अशी चाल आहे. कलम १.

पूर्वीं सरकारचे पत्रीं आज्ञा आली होती कीं, धोतरजोडे सुमारें वीस करून पाठविणें. त्यांत तपशील, १५ नऊ हात लांब व रुंद एकवीस तसूचे यत्ता सुमार ........५ आठ हात लांब व रुंद आठरा तसूचें यत्ता सुमार ५. २० पैकीं येथून पाठविलेः—१० नऊ हात लांबीचे सुमारें, ३ आठ हात लांबीचे सुमारें, १३.

सांप्रतचे पत्रीं आज्ञा कीं, आठरा तसूंचे रुंदीचे सुमारें १० करून पाठवणें. त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. उत्तरानुरूप करून पाठवूं. कलम १.

सावकाराचा ऐवज बाकी राहिला, तो निकट करून घेऊन पाठविणें ह्मणून आज्ञा. त्यास पूर्वीं १३०००० रुपये त्याच्या पावत्या येणेंप्रमाणें आल्या. तपशीलः—

३५००० रघुनाथ सदाशिव गद्रे यांची पावती.
४०००० कृष्णाजी भैरव थत्ते यांची पावती.
७५०००

बाकी ५५००० रुपये याची पावती राजश्री रामचंद्र नाईक परांजपे यांची आली नाहीं. त्यांस ताकीद होऊन त्यांजकडील पावती आली पाहिजे. ज्या पावत्या आल्या, त्या बाईस दिल्या नाहींत. मजपाशीं आहेत. पुढें पंचेचाळीसांचा जाब कसा येतो, त्यासारखें पाहून पावती देऊं. वराता कोऱ्याच आहेत. वसूल सारा ऐवजाचा फडशा होईल, तेव्हां भरपायी करून देऊं. कलम १.

श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील कारकून पूर्वींच घोंडो खंडोजी राजश्री पाटीलबावांकडे गेला होता. तो माघारे येऊन बाईची भेट घेऊन दादासाहेबांकडे गेला. त्याचें बोलणें जालें, तें पूर्वींच लिहिलें होतें. विशेष नाहीं. बाई हेंच बोलली कीं, "दादासाहेब देशीं गेले, उत्तम जालें. फितूर दूर जाला." हेंच बोलली होती, तें लिहिलें होतें. कलम १.

चिंतो विठ्ठल याचें घर खरगोणांत आहे. तें आपले जिमेस करून घेणें ह्मणून आज्ञा. त्यास बाईची परवानगी घेऊन, भवानी जासूद निा बापाजी नाईक यास खरगोणास पाठविलें. यानें रुबुरू पाहून ताकीद कमाविसदार यांस केली, कीं घर खाली करून देणें. त्यावरून कमाविसदार यांनीं उत्तर दिलें कीं, चिंतो विठ्ठल याचा गुमास्ता कोठें आहे, तो घेऊन येणें. येथून गुमास्त्याचें पत्र पाठविलें होतें. जासुदास सांगितलें होतें, त्याची आड करितील तर हें पत्र त्यांस देणें. त्याप्रमाणें पत्र त्यांस दाखविलें. पत्र पाहून उत्तर लिहून दिलें कीं, घर खाली करून देऊं. तुह्मांकडे रुपये आहेत ते व्याजासुद्धां पाठविणें, ह्मणजे घर खाली करून देऊं. असें उत्तर गुमास्त्याचे नांवें आलें. तें पत्र आह्मांजवळ आहे. कमावीसदार यांनीं लिहिलें कीं, गुमास्ता तुफान घेतो. घर चिंतो विठ्ठल याचें नाहीं. केसो विठ्ठल यांनीं, घर न्हावी याचें गहाण ठेविलें, तें घर गुमास्त्यानें लिहून दिलें असे. आमच्या नांवें उत्तर आलें. मागतीं कमावीसदार यांस आह्मीं पत्र लिहिलें कीं, जें घर गहाण ठेविलें, तेंच आमचे जप्तींत असावें. याप्रमाणें लिहिलें. गुमास्ता येथें तूर्त नाहीं. आल्यावर त्याजबरोबर जासूद देऊन खरगोणास पाठवून, त्याचा फडशा करून सेवेसीं लिहीन. कलम १.

स्वामींनीं कृपा करून धोतरजोड्यांचे ऐवजीं वरात पाठविली, ती वरात बाईस दाखविली नाहीं. वर्तमान बाईस सांगितलें कीं, वरात एकूणीसशें रुपयांची आली आहे. बाईनीं उत्तर दिलें कीं, ऐवज राहिला नाहीं. पंचवीस बाकी राहिले, ते तेथें घ्यावयास लिहिलें आहे. असें ह्मणाली कदाचित् तेथेंच घ्यावे असें जालें, तर एकूणीसशें रुपये वरातीप्रमाणें आह्मी घेऊं. बाकी ऐवज सावकारास पावता करूं. याचा जाबसाल बाईचीं पत्रें सरकारांत आलीं आहेत, त्या उत्तराप्रमाणें होईल. कलम १.

राजश्री बाजीराव बर्वे यांजसमागमें खासे धोतरजोडे ३ तीन पाठविले.

२ दोन बोट काठाचे.

१ एक सर काठाचा.

३

एकून तीन धोतरजोडे हे, लिहिलें आल्यापूर्वींच रवाना केले होते. सेवेसीं श्रुत होय. देखिलें ऐकिलें वर्तमान सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापित."

---

## लेखांक ४३.

श्री. १ आक्टोबर इ. स. १७८३.

" विज्ञापना ऐसीजे:—मालजीराव होळकर यांचे दिवाण भगवंतराव बल्लाळ लिमये येथें कुटुंबसुद्धां असामी बाईकडून खाऊन होते. काम कारभार त्यांजकडे कांहीं नव्हता. सावंत पारख सावकार दिंमत यशवंतराव फणसे यांचें कर्ज राजश्री बापुजी आनंदराव दिंमत व्यंकोजी बाबूराव नेवासकर यांचा नातू त्यांजकडे येणें. त्याचा तगादा सकत, सबब बापुजी आनंदराव यांणीं भगवंतराव बल्लाळ लिमये यांस दर्म्यान देऊन वाईदा मुदत केली. मुदतीस ऐवज बापुजी आनंदराव यांजकडून पावला नाहीं. ह्मणोन, आश्विन शुद्ध प्रतिपदेस सावंत पारख याची चौकी भगवंतराव लिमये यांच्या घरीं बसली. ती मजबूत. घरांतील बाहेर न ये, बाहेरून घरांत न जाये. याप्रमाणें चार दिवस जालें. शेवटीं फडशा न होय. तेव्हां भगवंतराव यांणीं आफू दाखविली. ऐवज देत नाहींत. माझे घरीं चौकी बसली ती उठत नाहीं. मी आफू खातों. ह्मणोन पाणी घेऊन आफू पाणियांत घालून प्याले. ते एक रात्र होते. शेवटीं मृत्यु पावले. याप्रमाणें जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें असे. उखाळ फार दिल्हे. उपाय जाला तो केला. शेवटीं कांहींच उपाय न होय. भगवंतराव बल्लाळ यांणीं आफू खाऊन, बापुजी आनंदराव यांस सांगून त्यांचेच घरीं येऊन निजले. बापुजी आनंदराव नेवासकर यांचे घरीं मृत्यु पावले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापित."

---

## लेखांक ४४.

श्री. १६ आक्टोबर. इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः-

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाइत छ १९ माहे जि॥द पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेषः-छ १८ मिनहूस येथून बाईनीं सेवेसीं पत्र लिहून दोन लक्ष रुपयांच्या हुंड्या करून हुंडीपत्रें राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे रवाना केलीं आहेत. ऐवज मुदतींत येऊन पोंहचेल. आगोधरचें बोलणें होतें कीं, हुंडणावळ चढली त्या अर्थीं रोकडच रवाना करूं, ह्मणोन दोन मास प्रतिक्षेवर घातले. ऐवज रोकडा जमा न होय, मग हुंडीच करून पाठविली. मजला बोलावून सांगितलें कीं, ऐवजाची रवानगी केली. तुह्मीं आपलीं पत्रें पाठवावीं. त्यावरून पत्र लिहून द्या ह्मणोन बोललों. परंतु मजपासीं पत्र लिहून दिल्हें नाहीं. परभारें पत्रें आपलेकडे दादाजीकडून पाठविलीं आहेत. त्यांवरून सविस्तर श्रवण होईल. आणखी ऐवजाविसीं वरचेवर सूचना करीत आहें. तीन लक्ष रुपये पाठवावे असा बेत, परंतु तूर्त दोन लक्ष रुपयांची हुंडी तिलोकसी पदमसी यांची घेऊन पाठविली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ४५.

श्री. २१ आक्टोबर इ. स. १७८३.

"सेवेसीं विज्ञापना ऐसीजेः-नवाबाकडून आनंदीबाई निंबाळकरीण राजकारण घेऊन गेली. उभयतांचा स्नेह शुद्धत्वेंकरून चालावा; परस्परें उपयोगीं पडावें; कालकला कितीक प्रसंग घडतात, येविषयीं अंतःकरणपूर्वक उभयपक्षीं साधन राखीत जावें; ह्मणोन पक्केपणें नवाबाशीं बोलून या प्रांतीं आली. हें वर्तमान ऐकिलें. येथें भेटीस आली. यांजपाशीं उल्लेख निघाला न निघाला याचा शोध लागला नाहीं. खलबत उभयतां स्त्रियांचेंच जालें. तेथें इतर कोणास प्रवेश नवता. सेवेसीं श्रुत होय. नवीन वर्तमान ऐकिलें जें, नवाबाचें व भोंसल्यांचें मानस हें आहे कीं, हैदर नाईकाशीं बिघाड करावा. फौजा उभयपक्षीं कर्नाटकांत पाठऊन टिपूचें पारपत्य करावें. सांप्रत सरकारचा व टिपूचा सल्ला एखलास आहे. एकाएकीं श्रीमंत ऐकणार नाहींत. यास्तव आनंदीबाई निंबाळकरिणीस नवाबांनीं पाठविली आहे कीं, इंग्रजाचा पक्ष बोलाऊन हैदरनाईकाचें पारपत्य करावें. या अर्थीं हे बाई गेली आहे ह्मणून ऐकिलें. तसें सेवेसीं श्रुत होय विज्ञापना."

---

## लेखांक ४६.

श्री. आक्टोबर इ. स. १७८३.

"सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:-राजश्री तुकोजी होळकर यांजकडून हजार दीड हजार गाडदी व दोन अडीच हजार फौज घेऊन राजश्री चिमाजीराव बुळे आले. ते जमीदाराचे पारपत्यानिमित्य आले, ऐसें ऐकिल्यांत आलें. येथून पांचां मजलीवर फौज आहे. येथें तोफ मागावयास त्यांजकडून कारकून आला आहे. जमीदार गढींत आहे. त्याजपाशीं जमीयत हजार स्वार, दोनचार हजार भील. याप्रमाणें गढीस तोफ लावावी ह्मणून येथें कारकून बुळ्याचा आला. पेंढारी सा हजार यांजसमागमें आहेत. सारांश, ही फौज आलीयामुळें [बाई] श्रीओंकारेश्वरास जाणार ती राहिली. धर्मध्वज हजार खादी लावून केला होता. तो ओंकारेश्वरास पाठविला. उपाध्या व कारकून गेला. आपण राहून किल्ल्याची वगैरे निगादास्त करितात. येथें जमीयत कांहीं नाहीं. पागा, शिलेदारसुद्धां दोन चारशें राऊत आहेत. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें लोभ असों द्यावा हे विज्ञाप्ति."

---

## लेखांक ४७.

श्री. २३ नोव्हेंबर इ. स. १७८३.

"सेवेसीं विज्ञापना:-छ २६ मिनहूस राजश्री कृष्णाजी तानदेव अडीचशें स्वार व हजार पायदळ या जमीयतीनसीं या मुकामीं दो प्रहरां दिवसां येऊन दाखल जाले. बाईची भेट जाली. इतःपर मसलत करून रामपुरेवाल्याचे पारिपत्यास कोण कोणास पाठवितील तें पाहावें. सांप्रत मवासांचीच मसलत येऊन पडली आहे. आज छ २७ रोजीं बाई बडव्यास श्रीनागेश्वराच्या दर्शनास जाणार आहेत. तेथें शिंद्यांकडील कामदार राजेश्री महिपतराव भगवंत आहेत, तेही या मसलतीस हमराह आहेत. येथून मसलत करून रामपुऱ्याकडील रवानगी करून, मार्गेश्वर शुद्ध प्रतिपदेस महेश्वराकडे येथून चालतील, ऐसें ऐकण्यांत आलें. यांत अधिक उणें काय होईल तें पहावें. राजश्री पाटीलबावांचें पत्र बडव्याचे कमावीसदार महिपत भगवंत यांणीं बाईचे नांवें आणलें कीं, आमचा परगणा उजाड केला रामपुरेवाल्यानें, तर तुह्मीं आपली जमीयत पाठवून त्याचें पारिपत्य करणें ह्मणोन पत्र आणलें आहे. यास खर्च फौजेचा वगैरे बसोन काम जालें तर उत्तम. परंतु होणें कांहीं दिसत नाहीं. भूपाळवाल्याचें साह्य करून पारिपत्य न जालें. हेंही तसें

आहे. सरकारांतून श्रीओंकारेश्वरीं ब्राह्मण नेहमीं अनुष्ठानास आहे. त्यांचें वार्षिक प्रतिवर्षीं पांचशें रुपये चालतात. यंदांचें वार्षिक महिपत भगवंत यांनीं दिल्हें नाहीं, ह्मणून तो ब्राह्मण ग्वालेरीस गेला. अनुष्ठानास आपला बंधु ठेवून गेला आहे, व कैलासवासी बाजीराव साहेबांची छत्री येथून जवळ आहे. येथून कुच जाल्यावर तेथें जाऊन, येथील वर्तमान लिहून सेवेसीं पाठवितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ छ ११ मोहरम

सन अर्बा समानीन.

## लेखांक ४८.

८ डिसेंबर इ. स. १७८३.

श्री.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १३ मोहरम सोमवार मुकाम मर्दाना येथें स्वामिकृपावलोकनें सुखरूप असों. विशेषः— राजश्री मुकुंदराव हरी व राजश्री कृष्णाजी तानदेव वगैरे रामपुरेकरावर गेले. त्यांची एक लढाई जाली. हें वर्तमान छ ४ तारखेचे विनंतिपत्रीं लिहिलें असे. अलीकडे मंडळी फौजसुद्धां रामपुऱ्यास जाऊन, त्यांचें स्थल होतें तें घेऊन, छ ११ स बाईस पत्र पाठविलें कीं, रामपुरेवाला पळोन झाडींत गेला. आह्मी त्याच्या ठिकाणास पोहचलों. यावर तुह्मीं स्वार होऊन महेश्वरास जावें. याप्रमाणें पत्र त्याजकडून आलें. त्यावरून आज बाई महेश्वरास दाखल होतील. श्रीची यात्रा छ ११ मोहरमीं महेश्वरीं दाखल जाली. मिरजकर गोपाळरावजी यांचा कबिला आहे. त्यांजसमागमें फौज नाहीं. पायदळ शें दोनशें आहे. यात्रा आठ हजारपावेतों आहे. त्यांजकडून कारकून सरकारचीं पत्रें घेऊन आला होता. त्यास बाईनीं मार्गाचें दस्तक व पत्रें देऊन महेश्वरीं उतरावयास सांगितलें. वेदशास्त्रसंपन्न राजश्री यज्ञेश्वर दीक्षित मनोहर यांजविषयीं सरकारचें पत्र व थैली आह्मांपाशीं आली. त्यावरून त्यांस दस्तक व मार्गाचीं पत्रें बाईचीं करून देऊन, नाव घाटाची चिटी देऊन, रेवापार केलें. तेही जमावनिशीं जातात. राजश्री गणेश नारायण विंझे हेही श्रीयात्रेस कुटुंबसुद्धां गेले. राजश्री विठ्ठलपंत उज्जनीस गेले. देशीं येणें ह्मणून उज्जनीस देवदर्शन घेऊन येणार. येथील किल्ला बांधावयास काम बाईनीं लाविलें. जागा उंची, रेवेतीरीं आहे. पडून जागा खराब जाली होती. तिचें काम नवें करितात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ४९.

पैा छ १४ मोहरम सन अर्बा मार्गशीर्ष **श्री.** १० दिसंबर इ. स. १७८३.

"सेवेसीं केसो भिकाजी व विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ माहे मोहरम मुक्काम कसबे मर्दाना येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– बाई याच मुक्कामीं पंधरा रोज राहिली. येथून राजश्री मुकुंदराव हरी दिवाण व आबाजी रणसोड नि॥ पागा व राजश्री कृष्णाजी तानदेव यांस फौजेसमागमें देऊन, रामपुरेकराचे पारिपत्यास रवाना चंद्र ४ तारखेस सायंकालीं मुहूर्तेंकरून केलें. ते गेले. त्यांची व रामपुरेकरांची गांठ मार्गांत पडली. गोळागोळी होऊन उभयपक्षीं दहावीस माणूस पडले. यांजकडील घोडीं पाडाव करून दोन घेऊन गेले. याप्रमाणें चंद्र ८ पावेतों वर्तमान जालें. सुरतेकडून पलटणें घांट चढून गेलीं ह्मणून पूर्वीं विनंतिपत्र लिहिलें होतें. त्यास, हा कालवर घाट चढले नाहींत. आज उद्यां इतके घाटास येतील. बरोबर स्वार राजश्री पाटीलबावांचे आहेत व कोणी कारकून आहे ह्मणून वर्तमान ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५०.

**श्री.** २८ फेब्रुवारी इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार व विठ्ठल शामराज कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ छ ६ रबिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथून बाईचीं पत्रें घेऊन पाठविलीं, तीं पावलीं असतील. तदनंतर वरचेवर स्मरण देत आहोंत, परंतु मर्जी विचारावर नाहीं. त्यांत राजश्री यशवंतराव गंगाधर यांचें पत्र, हे कालवर आलें नाहीं. येथून राजश्री गोविंद रघुनाथ गानू व राजश्री विनायक बाजी यांस बहुत प्रकारें सांगितलें कीं, येथील महालचा ऐवज कोठें गु॥ पट्टीचा ऐवज दिल्हा, तोच पावला नाहीं. दादाजी गंगाधर यांस सांगून, पुढें मागती ऐवजाविषयीं श्रीमंतांचीं पत्रें न येत ती गोष्ट करावी, ह्मणोन उभयतांस बहुत सांगितलें. व मागाहून वरचेवर याच साधनासाठीं लिहिलें आहे. दुसरें वर्तमान, पेंढारी या प्रांतीं होते. त्यांस पत्र राजश्री तुकोजी होळकर यांचें आलें कीं, जमावसुद्धां स्वारीस जातों, तर तुह्मीं लौकर येणें. त्यावरून ते या घाटास येणार होते. परंतु हा मुलूख खराब होईल, ह्मणोन पेंढारी यांचे दोन सरदार बाईनीं येथें बोलावून, त्यांस ताकीद केली कीं, तुह्मीं ओंकारमांधात्यावरून सनावदास जाऊन, पुढें बऱ्हाणपुरचे मार्गानें जाणें. मार्गांत कोणास उपद्रव दिल्यास

पारिपत्य करीन. याप्रमाणें ताकीद केली असतां, यांणीं गांवापुढें दों कोसांवर मार्गांत वाणी लुटले व काल वाटेनें चार गाड्या व पांथिक लुटले. तो बोभाट येथें आला. येथून राऊत आजच बाईनीं पाठविले. खरगोण परगणा पार करून देणार. ऐसियास १०।१२ हजार पेंढारी आहेत. देशीं मुलखांत गांव लूटमार करतील. यास्तव दोन तीन हजार फौज त्यांचे तोंडावर आलियास कोठें उपद्रव करणार नाहींत. खालें घाटानें जेथें होळकराची फौज असेल, त्या सुमारास लावून द्या ह्मणजे उत्तम. प्रांतास उपसर्ग फार देतात, गवत काडी घेतात, चिंता नाहीं. लुटून फस्त करितात. इकडून ताकीद जाली असतांही खरगोण परगणीयांत व मार्गांत उपद्रव दिल्हा आहे. त्यांचा भरंवसा नाहीं. उपद्रव देण्यास मागें पुढें पहात नाहींत. यास्तव सरकारची हजार दोन हजार फौज गंगेअलीकडे लवकर आली ह्मणजे परभारा नागतलचे घाटें पेंढारी लाऊन द्यावे. हे, गांव लुटावयास व वाटा मारावयास चुकत नाहींत. यास्तव स्मरणार्थ विनंति. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञाप्ति."

---

## लेखांक ५१.

**श्री.** २४ मार्च इ. स. १७८४.

"विज्ञापना ऐसीजेः–छ १९ रबिलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ २ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, पंचवीस हजारांची रवानगी लौकर करविणें व पेंढारी यांजपासून काय खंड घेतला हें लिहून पाठवावें. त्यास, आज्ञेप्रमाणें पंचवीस हजारांची रवानगी जाली आहे. पेंढारी यांजपासून भांडीं व नक्त व खुर्दा मिळोन पांच सात हजारांचा ऐवज व वीस पंचवीस घोडीं याप्रमाणें पेशजीं आलीं. खंडाकरितां संताजी होळकर व शरीफभाई दोन वेळां येथें आले होते. लौकिकांत पन्नास हजार करार जाले ह्मणोन वर्तमान आहे. याचा शोध बारकाईनें घेऊन सेवेसीं लिहून पाठवीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५२.

पै॥ चंद्र २५ जमादिलावल आर्बा समानीन. **श्री.** ८ एप्रील इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथून दोन पत्रें राजश्री विठ्ठलपंत गेल्यावर सेवेसीं पाठवलीं, तीं डांकेवरून पावलीं असतील. राजश्री दादाजी गंगाधर यांस पत्रें व महालचा झाडा बाईनीं लिहून पाठविला होता. त्यांस लिहिलें होतें कीं, ऐवज कोठून द्यावा? तुह्मीं महालचे हिशेब

समजावून पुढें ऐवजाविषयीं तगादा न लागे तें करणें. त्याचें उत्तर आलें कीं, खासगत लग्नानिमित्त पाटणास गेलों. पत्रें व महालचे हिशेब श्रीमंतांस समजाविले. ऐवजाविषयीं आहे नाहीं करून, निश्चयपूर्वक उत्तर लिहावें, तर लग्नास जरूर जाणें. तेथून आल्यानंतर जाब सविस्तरें लिहूं. याप्रमाणें दादाजीचें उत्तर बाईस आलें. हें वर्तमान बाईनीं सांगितलें. ऐवजाचा तेथेंच जाबसाल उगवून येईल तों प्रतीक्षा आहे. नाहीं तर कळेल तसें करूं ह्मणून ह्मणतात. श्रीस ब्राह्मणांचीं वर्षासनें यांचा ऐवज द्यावयाकरितां सरकारांतून राजश्री राघोपंत गोखले आले. ते येथें चैत्र शुद्ध १ आले. बाईस पत्र सरकारचें होतें तें देऊन, राऊत व वाटेचीं पत्रें देऊन उज्जनीस पावतें केलें. पुढें जातील. कलम १.

पेंढारी यांचें वर्तमान, पूर्वीं एक मास जाला, लिहिलें होतें. सांप्रत खानदेश प्रांतीं बहुत खराबी केली. मार्ग चालत नाहीं. मनस्वी वर्तणूक करितात. बाईनीं जमियत पाठवावी तर महाल खानदेशांत. बाईकडे आपली ये जा नाहीं. तत्रापि लौकिक जाणून राऊत पाठवावें, तर बैरागी १० हजार इंदूर प्रांतीं आले. तिकडे जमियत गेली. पागेचे राऊत दोन, ताकिदीस पाठवावे कीं कोठें धामधूम न करणें. त्यास, पेंढारी दोन रावतांस मानितात असें नाहीं. सरकारची फौज आल्याखेरीज त्यांचें पारिपत्य होणार नाहीं. बहुत अमर्याद वर्तणूक करितात. हें वर्तमान सेवेसीं जाहीर असेल. त्यांचें पारिपत्य व्हावें. पूर्वीं इकडे होते, तसेंच या प्रांतीं पाहाडांत राहतील. कासारबारीपासून बऱ्हाणपूरपावेतों वाट चालूं देत नाहींत. लुटितात. शिवाय जीवें मारितात. ब्राह्मण स्त्रीची अब्रू ठेवीत नाहींत, असा प्रळय केला. बाई त्यांचें पारिपत्य करीत नाहींत. जमियत नाहीं! कलम १.

राजश्री पाटिलबावांकडील वर्तमान तर गोहज प्रांतीं आहेत. गोहज पाडून बराबर केली. महाल मात्र राहिले. तेथें कबिले नांवाचे आहेत. त्यास स्थळ रहावयास नेमणुका करून, तेथें कबिले गेल्यावर, महाल राहिले ते पाडून बराबर करावें, असें वर्तमान आहे. राजश्री माधवराव गंगाधर यांचें पत्र राजश्री वासुदेव चिमणाजीस आलें कीं, ज्येष्ठ अखेरीस येऊं. घराची दास्त वगैरे सामान करून ठेवणें ह्मणून पत्र आलें. आह्मांस रहावयास स्थळ बाईनीं त्यांचेच हवेलींत दिलें आहे. त्यावरून आह्मांस सूचना वासुदेवपंत करीत होते. मीं उत्तर दिलें कीं बाईस सांगावें, त्यांनीं येथें रहावयास सांगितलें. इतकें उत्तर केलें. त्यावरून पाटील-बावा छावणीस उज्जनीस येतील असें आहे. कलम १.

बैरागी १० हजार माघमासीं उज्जनीस येऊन माघारे गेले. पुन्हां मगतीं इंदूरपावेतों आले. लुटीत नाहींत. गांव बगांव गांव पाहून ऐवज घेतात. बराबर

लढाईसामान, बाणाच्या कैच्या सुमारें ५० उंट आहेत. घोडे शेंपन्नास. अधिक नाहीं. हत्यारबंद माणूस मजबूत आहे. देशीं जाऊं ह्मणतात. येथून जमियत बाईनीं पाठविली. राजश्री मकाजी गीते वगैरे पागा रवाना केल्या आहेत. येथून विसा कोसांवर आहेत. पुढें काय होईल तें सेवेसीं लिहून पाठवीन. कलम १.

येथून धोतरजोडे सरकारचे आज्ञेप्रमाणें पाठविले. एकंदर याद राजश्री विठ्ठलपंत यांजसमागमें पाठविली आहे. सदरहूचा जाब पैकीं अकरा धोतरजोडे यांची पावती यावयाची आहे. कमपेष सातशें रुपये जाले. पुढें आणीक करून पाठवावयाची आज्ञा आल्यास, कारेगरास सांगून धोतरजोडे करून पाठवीन. अथवा आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन. एकोणीसशें रुपयांची वरात असे. तो ऐवज आला नाहीं. वरात माघारें पाठवावी ह्मणून बाईस विचारलें, तर ह्मणतात कीं पंचवीसहजार रुपये दिले नाहींत. त्याचे पेव्यांतील ही वरात आहे. तूर्त अखेर साल जालें, पुढें सालअखेर ऐवज लावून देऊं, असें उत्तर ८ दिवस जालें, केलें. अगोदर तों नाहींच ह्मणत होती. धोतरजोडे सरकारांत गेले व ऐवज तुह्मीं वरात येतांच द्यावा, त्यास ८ मास जाले असें सांगितलें. त्यारून ऐवज............ लावून देऊं ह्मणतात. याउपर न कळे. वरकड वर्तमान यथास्थित असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५३.

पै॥ चंद्र आठ ८ जमादिलाखर **श्री.** १६ एप्रिल इ. स. १७८४.
सन आर्बा समानीन वैशाख.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- येथील वर्तमान चंद्र १७ जमादिलावलपावेतों लिहून डांकेवरून सेवेसीं रवाना केलें आहे. अलीकडील वर्तमान.—

राजश्री मकाजी गीते वगैरे पागा बैरागी यांजवर गेले होते. यांची त्यांची एक लढाई होऊन बैरागी परभारें सुरतेकडे गेले. दक्षिणेस जात होते, ते सुरतेकडे गेले. जमाव जो आहे तोच कायम आहे. कलम १.

बाईचे बंधु महादाजी शिंदे येथें कुटुंबासुद्धां होते. ते देशीं घरास माघ मासीं गेले. त्यांचा काल चैत्र शु॥ ९ जाला. त्यामुळें बाई बहुत श्रमी जाली कीं, मीच काळतोंडी वांचलें कशीं? सारीं मजदेखत गेलीं! तीन चार रोज शोक फारच केला. आतां मागतीं दरबार करीत आहेत. कलम १.

---

राजश्री विसाजी काशी सागरास गेले होते. ते चंद्र २१ येथें आले. येथून देशीं चंद्र २५ जमादिलावलीस निघून आले आहेत. सेवेसीं येऊन पावतील. कलम १.

पेंढारी यांचा दंगा फार जाला होता. येथून जमियत जावी तो प्रकार जाला नाहीं. सरकारची फौज आली नाहीं. राजश्री तुकोजी होळकर यांजकडून पागा, शरीफन-भाई पागे येऊन, पेंढारी खानदेश प्रांतांतून काढून करवंदबारीस नेले आहेत. तूर्त तों दंगा नाहीं. पुढें उपद्रव होईल तो न कळे. कलम १.

राजश्री शिवाजी विठ्ठल यांचें कुटुंब व पुत्र देशीं होते, ते येथें येऊन शिवाजी विठ्ठल यांजकडे गेले. चंद्र २१ जमादिलावलीं. कलम १.

वेदशास्त्रसंपन्न हरिहरभट आठवले यांजसमागमें जासूदजोडी सरकारची पोंहचावयास गेली होती. ती जोडी फिरून त्यांजकडून आली. बराबर पितांबर व उत्तरी व चोळखण वगैरे होते. त्यास दस्तक येथून देऊन रवाना केलें. ते पोंहचतील. —कलम १.

सदरहूप्रमाणें वर्तमान जालें, तें सेवेसीं लिहिलें आहे. फार दिवस आज्ञापत्र येऊन समाधान होत नाहीं, ह्मणून चिंता फार लागली आहे. सेवकास वरचेवर आज्ञापत्र येतें, तेणेंकरून संतोष फार असतो. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.”

---

## लेखांक ५४.

पैवस्ती चंद्र ८ जमादिलाखर **श्री.** १७ एप्रिल इ. स. १७८४.
सन आर्बा समानीन वैशाख मास.

“सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २६ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—सालगुदस्तां दीड साला ऐवज पाठऊन द्यावा ह्मणोन लिहिलें सरकारचें आलें. त्यास मागील दीडसाला ऐवज मजकडे नाहीं. त्याचा हिशेब तपशीलवार श्रीमंतांस दाखवावयानिमित्य राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे पाठविला, तो त्यांनीं समजाविला आहे. साल आखेर ऐवज महालचा मजकडे आहे, तो पुढें मी पाठवीन. ह्मणोन आजच बाई बोलली, व आपण मुंजीनिमित्य जुन्नरास गेलां, हें वर्तमान बाईनीं सांगितलें. श्रमी होऊन बोलली कीं, श्रीमंतांस माझें अंतर समजोन खरेपण येत नाहीं. मागील दीडसाला ऐवज, कांहीं वराता तुकोजींनीं केल्या, कांहीं मजकडे खर्च जाला, कांहीं सरकारांत लग्नपट्टीबद्दल दिला. यावर मजकडे एक पैसा दीडसालापैकीं राहिला नाहीं कीं देऊं? याप्रमाणें आजच बोलली. तें सेवेसीं लिहिलें असे. बहुत दिवस आज्ञापत्र येत नाहीं, तेणेंकरून चित्त स्वस्थ नाहीं. चिंता वाटती. सेवकास आज्ञापत्र आलियानें संतोष फार होतो. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.”

---

## लेखांक ५५.

पै॥ चंद्र २० जमादिलाखर. श्री. २८ एप्रिल इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ७ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—छ २७ जमादिलावलचे तारखेचीं पत्रें लिहून डांकेबरोबर पाठविलीं आहेत. त्या अलिकडील वर्तमानः-

साडे दहा लक्षांची तरतूद करून ऐवज पाठवावा ह्मणून पूर्वी आज्ञापत्र बाईस आलें. त्यांत मागील दीडसाला ऐवज राहिला, तो साडेदहा लक्षांत भरणा करून पाठवणें ह्मणून. त्याजवरून बाईंनीं ताळेबंद वगैरे राजश्री दादाजी गंगाधर यांचे विद्यमानें पाठविले. त्याचें उत्तर निक्षून आलें कीं, ऐवज देणें लागतो, सुटत नाहीं. त्याजवरून बाईंनीं आह्मांपाशीं मजकूर केला कीं, मागील दीडसाला मजकडे राहिला नाहीं. पुढील सालचे ऐवजीं महालचा ऐवज जो होईल तो देऊं. मृग साल लागलें ह्मणजे कमाविसदार यांजपासून ऐवज घेऊन देऊं, ऐसें बोलली. त्याप्रमाणें तरतूद करावयास लागलीं आहेत. टोंक परगणा राजश्री राजाराम रणसोड पारनेरकर यांजकडे होता. तो त्यांजकडून दूर करून, राजश्री गणपतराव विष्णु यांजकडे मामलत सांगितली. एक लक्ष रुपये कर्ज घेऊन कमाविस सांगितली. याप्रमाणें इकडील महालचा ऐवज घेऊन, ज्येष्ठ आषाढ अखेरी इतका ऐवज पाठवितों. याप्रमाणें बोलण्यांत आलें आहे. कलम १.

जांबाचे घांटावर तळें मोठें बांधलें आहे. तेथें बाई उद्यापन करावयास वैशाख शु॥ ११ शनिवारीं जाणार. गेली तर बरोबर जाईन. चार दिवस लागतील. कलम १.

जाबतेखान यांजकडून वकील बाईकडे पत्र घेऊन आला कीं, आमचा हेत दोन दिवस येऊन तुह्मांपाशीं राहावें. पुढें तुमचे हातून आमचा बंदोबस्त व्हावा. याप्रमाणें लिहिलें होतें. त्याचें उत्तर बाईंनीं दिलें कीं, तूर्त येऊं नये. चिरंजीव तुकबा फौजसुद्धां या प्रांतीं आल्यावर जें करणें तें केलें जाईल. याप्रमाणें जाब देऊन वकिलास वस्त्रें देऊन चंद्र ४ जमादिलाखरीं बिदा केलें. कलम १.

टिपू, हैदरखान याचा लेक, विजापुरचें ठाणें घेऊन, पादशाहा आपण ह्मणवून, गज सवा गजाचा व मोहर पंधरा माशांची व रुपया एकवीस माशांचा केला, ह्मणून त्या प्रांतींचे ब्राह्मण येथें आले, त्यांनीं वर्तमान सांगितलें. कलम १.

राजश्री माधवराव दि॥ गणपतराव गद्रे यांजबराबर सरकारचे धोतरजोडे सुमार आठ व रुमाल २ व राजश्री विठ्ठल शामराज यांजबरोबर धोतरजोडे २ एकूण जोड १० व रुमाल २ पावले असतील. त्याचें आज्ञापत्र आलें नाहीं. कलम १.

बिस्टोल फिरंगी जमावसुद्धां कानपुरास आला. त्याचें मानस कीं पातशाहाचा बंदोबस्त करावा. राजश्री पाटिलबावांचे मतें, फिरंग्याचे विद्यमानें जाबसाल करूं नये व भेटीसही जाऊं नये, ह्मणून वर्तमान ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें. एकूण पांच कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५६.

श्री. २ मे इ. स. १७८४.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान रावसाहेब स्वामींचे सेवेसीं:–

विंनंति सेवक केसो भिकाजी दातार चरणावरी मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:–छ ४ माहे जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ ११ रोज माहे मिनहूस प्रविष्ट होऊन, शिरसा वंदून, आज्ञेप्रमाणें कारीगारास बोलावून, गजाची रुंदी व लांबी हात नव याप्रमाणें धोतरजोडे सुमारी २ तूर्त करून पाठवितों. किनारा पेशजीं धोतरजोडे पाठविले त्याप्रमाणें करविले आहेत. हे पसंत पडल्यावर आणखी तीन धोतरजोडे करवितों. गंगाजलनिर्मल अहिल्याबाई होळकर ही जमावसुद्धां जांबेस तलावाचे उद्यापनाकरितां आलीं आहेत. येथून महेश्वरीं जावयासी आठ दाहा रोज लागतील. आह्मी समागमें आहों. येथून पुढें इंदुरास जावयाचा विचार आहे. कदाचित् इंदुराकडे जाणें जालें, तरी आठ चार रोज अधिक लागतील. लौकर महेश्वरीं अहिल्याबाई गेली, तरी मीही समागमें आहें. धोतरजोडे आज्ञेप्रमाणें सत्वर रवाना करितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ५७.

श्री. मे १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति ऐसीजे:– श्रीमंत राजश्री रावसाहेबांस नजर हत्ती नग १ एक पातशाहांनीं दिला, तो हत्ती राजश्री देवराव महादेव वकील यांनीं देशीं रवाना केला. जांबेचे घाटापर्यंत आला, पुढें घाट उतरत नाहीं, ह्मणून येथें कारकून देवरावजीकडील आला. मग बाईचीं पत्रें व व वाटेचें दस्तक देऊन मर्दानाघाट उतरावयास हत्ती पाठविला. त्या घाटें उतरून येईल. कारकुनाजवळ खर्चास नव्हतें. हत्ती मस्तीस. वाटेचा चालत नाहीं. जे खर्ची दिली ती वाटेंत सरली, ह्मणून त्यांनीं सांगितलें. त्यावरून त्यांची ओळख व पत्र लिहून घेऊन रुपये १०० शंभर त्यास हत्तीसाठीं खर्चास दिले. कारकून व्यंकोजीपंत ह्मणून देवरावजीचा पुण्यांत गेल्यावर रुपये देईन

ह्मणून करार करून गेला. हत्तीची तारीफ फार सांगत होता. उत्तम आहे. चलाख मोठा. वाटेंत माहवत एक मारला. मग दुसरा माहवत ठेऊन हत्ती घेऊन आला. राजश्री देवरावजी ज्येष्ठमासीं इकडून येणार आहेत. ते देशीं येतात. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना."



## लेखांक ५८.

श्री. १७ मे इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २६ जमादिलाखरपावेतों मुक्काम जांब येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १४ जमादिलाखरचें आज्ञापत्र पाठविलें, तें चंद्र २५ जमादिलाखरीं पावलें. येथून चंद्र २३ जमादिलाखरीं बाईनीं पत्राचीं उत्तरें दिलीं, तीं घेऊन पाठविलीं; तीं पावलींच असतील. वरकड स्वामीआज्ञेप्रमाणें बाईशीं बोलतच आहें. बाईचेंही मानस ऐवज घ्यावयाचा आहे. कमाविसदारांस वगैरे यांस बोलावणीं पाठविलीं आहेत. आल्यावर ऐवजाची तजवीज होईल. ऐवजास आषाढ श्रावण लागेलसा दिसतो. मी तर वरचेवर सूचना बाईस करीतच आहें. राजश्री शिवराव हरी याचें कुटुंब देशीं येणार, त्यास भेलशापावेतों आलें. तेथें राजश्री पाटिलबावा यांनीं राजश्री खंडेराव हरी यांजला दोन तीनशें स्वारांनिशीं पाठवून भेलशास अटकाविलें. त्याजसमागमें राजश्री देवराव हिंगणे देशीं यावयाकरितां होते, तेही तूर्त अटकून राहिले ह्मणून ऐकिलें. बाईचा मुक्काम येथें ज्येष्ठ शुद्ध पंचमीपावेतों आहेत. पुढें इंदुरास व गवतमपुरास जाऊन, आषाढ शुद्धांत परतून महेश्वरास जाणार. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ५९.

श्री. २६ मे इ. स. १७८४.

सन खमस समानीन. वैशाख मास. पो॥ चंद्र १५ रजब

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ६ रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—परगणे कसरावद व कान्हापूर हे दोन्ही महाल सरकारचे. यांत बखेडा जमीदार करितात. सांप्रत कसरावदेचा देशमुख यानें दहा बारा असाम्या कसब्याच्या व आणखी गांवच्या घेऊन मवासांत पळून जात होता. त्यास सुराणी ताळुके बढवाणी येथें

ठाणें राजश्री संताजी होळकर यांचें, तेथील ठाणेदारांनीं जमीदारास असाम्यां-सुद्धां धरलें. येथें वर्तमान कळतांच, बाईस वर्तमान सांगून, बाईचीं पत्रें संताजी होळकर यांचे नांवें, सुराणीकर कमाविसदाराचें नांवें लिहून घेऊन, बाईचा जासूद बरोबर देऊन पत्रें पाठविलीं. परंतु कमाविसदारानें जितके धरिले होते, तितके परभारें सेंदव्यास संताजी होळकर यांजकडे पाठविले. हें वर्तमान आलें. फिरून बाईचें पत्र संताजी होळकर यांचे नांवें घेऊन पाठविलें कीं, जमीदार व असाम्या राजश्री गबाजी सदाशिव यांचे स्वाधीन करणें. याप्रमाणें वर्तमान व कान्हापुरचे शिवेंत कापडकरी बजाज मारला गेला, त्यामुळें तेथील रयत फेऱ्यांत आली. त्याजकडे दोष तर दिसत नाहीं. परंतु एक दोन महालचे जमीदार आहेत, त्यांजकरितां यांचीही सुटका तूर्त होत नाहीं. कैदेंतच आहेत. अद्याप लावणीचा बंदोबस्त दोंही महालांत नाहीं. कमाविसदार यांचा वाकर किमपि नाहीं. यामुळें दाब राहत नाहीं. पितापुत्राचे कलहामुळें वाकर राहिला नाहीं. पेशजीं ओंकारभट यांनीं सरकारांत विनंतिपत्र लिहिलें होतें, त्या पत्राची आज्ञा, पत्रीं आली. तें वर्तमान त्यांनींच सांगितलें. महाल सरकारचे. लोक गैरराजी जाले आहेत. वर्तमान कळलें तें व दृष्टीनें पाहण्यांत आलें तें सेवेसीं लिहिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६०.

**श्री.** १५ जून इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २६ रजब मुकाम इंदूर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—बाईनीं तीन लक्ष रुपये करार करून कमाविसदारांपासून घेतले. तपसीलः—

| | |
|---|---|
| २००००० | खरगोण व देपालपूर विद्यमान कृष्णाजी तानदेव. |
| १००००० | इंदूर विद्यमान त्र्यंबक बाबूराव कमाविसदार. |
| ३००००० | |

तीन लक्षांची योजना जाली. यांचे वायदे श्रावण अखेरचे जाले ह्मणोन बाईनीं सांगितलें. आमची निकड आहे कीं, ज्येष्ठ अखेर आषाढ मासांत ऐवज पाठवा. याप्रमाणें वरचेवर सूचना करीत आहें. तेही ह्मणतात कीं योजनेंतच आहें. रवानगी लौकरच करीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६१. १५ जून स. १७८४.

श्री.

"विज्ञापना ऐसीजेः—

राजश्री आपाजी राम दाभोळकर छ २५ रज्जबीं इंदुरास आले. आज छ २६ रोजीं बाईची भेट घेऊन उदयीक कूच करतील. कलम १.

राजश्री रघुपतराव नारायण यांजकडून गंगाधर राजाराम, सरकारचीं पत्रें घेऊन राजश्री पाटीलबावांकडे गेले होते कीं, याप्रमाणें माळव्यांतील माहालचा बंदोबस्त करून घ्यावा. परंतु वकिलाची भेट जाली नाहीं. राजश्री माधवराव गंगाधर यांस भेटून पत्रें सरकारचीं दिधलीं. यांणीं पत्रें पाटीलबावांस दाखविलीं. नंतर उत्तर दिलें कीं, रघुपतराव यांचे वकिलांनीं आले मार्गें जावें. न जातील तर किल्ल्यावर घालीन. याप्रमाणें उत्तर सांगून पाठविलें. रामजी पाटलांनीं कारभार केला, तो काय समजोन केला? हीं भाषणें ऐकून वकील उठोन सिरोंजेस आला. ह्मणोन वर्तमान ऐकिलें. तें सेवेसीं लिहिलें असे. कलम १.

राजश्री रघुपतराव नारायण यांजकडील कमाविसदार सुजालपुरास जावया निमित्य आले. ते इंदुरीं राहिले आहेत. हें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. कलम १.

जमीदार इंदुरकर यांचे घरीं छ २५ रज्जब सोमवारीं बाई गेली होती. मंडलोई यांणीं नजर घोडे २ व शालजोड्या वगैरे दिल्हे. कलम १.

विश्वेश्वर मोकासी यांच्या घरीं छ २५ सोमवारीं गेली. त्यांणींही नजर घोडा वगैरे वस्त्रें दिलीं. कलम १.

येथें मुक्काम बाईचा छ २९ रजबपावेतों आहे. पुढें कूच करून महेश्वरास जाणार. कलम १.

आमचें चोरीचें ठिकाण कमाविसदार हा कालवर लावीत नाहींत. मुद्दा मात्र आह्मीं त्यांचे जिमेस करून दिल्हा आहे. याउपर येथून कूच होईल तोंवर मार्ग जाला तर उत्तम, नाहीं तेव्हां सेवेसीं विनंति लिहीन. कलम १.

एकूण कलमें साहा आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६२.

श्री. १६ जून इ॰ स. १७८४.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसींः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना

तागाईत चंद्र २७ माहे रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १३ रजबीं अजुरदार याजसमागमें विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. चंद्र ११ रजबीं बाईचे पत्राचे जाब घेऊन पाठविले आहेत. त्यावर फिरोन बाईशीं बोलणें जालें. परंतु यांचे मनांत सरदारीची उभारणी होऊन, सरकारचाकरी घडून सरदारीचा नक्ष व्हावा, तो प्रकार ध्यानांतच नाहीं. विदेहीपणाच्या गोष्टी! त्यांजवळ कोणी हिमतीचा माणूसही नाहीं. याप्रमाणें रीत आहे. पुढें आज्ञा येत जाईल त्याप्रमाणें बोलत जाऊं. किसनराय मंडलोई, कसरावदकर याचा मजकूर पेशजीं सेवेसीं विनंति लिहिली आहे. त्यास, मंडलोईमजकूर यास बेड्या घालून पाठवून द्यावा, अशीं पत्रें बाईचीं घेऊन राजश्री संताजी होळकर यांस पाठविलीं; व राजश्री गबाजी सदाशिव यांजकडून कारकून व चाळीस पन्नास माणसें सेंदव्यास गेलीं आहेत. परंतु संताजी होळकर यांचें ह्मणणें, बेड्या घालून तुमचे स्वाधीन करीत नाहीं. किल्ल्याबाहेर काढून देऊं. तुह्मीं घेऊन जाणें. त्यास, विना बेड्या घातल्याशिवाय तो यांचे हातीं लागेल असें नाहीं. बाईचे पत्राप्रमाणें त्यास मान्य नाहीं. येविषयींचा बंदोबस्त हुजुरून जालेखेरीज ठीक पडणार नाहीं. चंद्र ३ रजबचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र १४ रजबीं पावलें. पत्रीं आज्ञाः—चोरी जाली त्याचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास बाईशीं बोलून कमाविसदारांपासून चोरी भरून घ्यावी. त्यास आज्ञेप्रमाणें बाईशीं बोलत आहें. परंतु यांच्यानें नेटाचा जाबसाल कमाविसदारांशीं करवत नाहीं. तेव्हां बोलून फलादेश काय? असो. स्वामीच कृपावंत होऊन, तेथें राजश्री खंडो बाबूराव आहेत, त्यांजला ताकीद पोहोंचलीयानें निकाल होऊन येईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६३.

श्री. १६ जून इ. स. १७८४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—छ २४ रजबीं शनवारीं रांगडी माणसें पंचवीस, एक दोन दिवस अगोदर गांवांत हत्यारबंद फिरत होते. त्यांनीं छ मिनहूस दीपसमयीं सराफ्यांत येऊन अनुपचंद निसबत तिलोकशी पदमशी याचे दुकानावर येऊन घाला घातला. मशारनिल्हेचा जांवई विसा वर्षांत होता, त्यास ठार करून, त्याचे गुमास्त्यास ठार करून, एक पुरभैया ठार केला. वाटवा घेऊन गेले. जातेमार्गांत जो कोणी भेटला, त्यास ठार करीत

गेले. एकवीस माणसें जायां केलीं. त्यांत ठार नऊ व बारा जखमी केलीं. निघून गेले. बाईस वर्तमान कळलें. त्यांनीं स्वार प्यादे चहूंकडे पाठविले. अंधारी रात्र, कोठें शोध लागला नाहीं. चार प्रहर राऊत फिरून प्रातःकाळीं माघारे आले. कोणाची माणस कोण हा ठिकाण लागला नाहीं. सावकाराचें दोन हजारांचें वित्त गेलें. या प्रकारें अकस्मात् कर्म करून गेले. सेवेसीं श्रुत हे विज्ञापना."

---

## लेखांक ६४.

श्री. २० जून इ. स. १७८४.

"विज्ञापना ऐसीजे:-छ ३० रजबचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ १६ साबानीं जांबेहून स्वार होतांच पावलें. पत्रीं आज्ञा कीं, बाई तुह्मांस खर्चास देत आहे, त्यास चारशें रुपये धोतरजोड्यांचे ऐवजीं ठेऊन, बाकी पंधराशें रुपयांची हुंडी करून पाठविणें. व तुमचे राहुटीस चोरी जाली, मुद्दा आहेच, बाईकडून कमाविसदारांस ताकीद करविणें. ते थांग लावून देतील ह्मणोन आज्ञा, व ऐवजाची रवानगी बाईस सांगून लौकर करावी. सावकाराशीं करार केला तो पार पडेल ह्मणोन आज्ञा. त्यास, बाईचें ह्मणणें कीं, ऐवजाच्या मुदती आहेत. लौकरच रवानगी करीन. चारशें रुपये ठेवावयाचें प्रयोजन नवतें. धोतरजोड्याचे ऐवजीं ठेवीन हेंही नाहीं. धोतरजोडे वरचेवर आज्ञेप्रमाणें पाठवीतच आहे. त्याप्रमाणें ऐवज सरकारांत वरचेवर देत आहेत. परंतु पूर्वीं दाहा महिने खर्चास बाईनीं दिलें नवतें. सावकाराचे रुपये घेऊन खर्चिले. त्याच सावकारावर कमाविसदारांनीं ऐवज देविला. त्यामुळें त्याचे चारशें रुपये देऊन समजोती पाडिली. पुढें राहिला ऐवज तो वरचेवर रोजमऱ्याचे ऐवजीं थोडाबहुत देत जाईन. याप्रमाणें करार त्यांसीं केला. पंधराशांची हुंडी रवाना करितों. भाव चढला आहे. येथें हुंड्यांवर दरसदे रुपये ३॥ साडेतीन प्रमाणें पुण्याशिक्क्यास भाव आहे. यास्तव अमावास्यापर्यंत भाव उतरले ह्मणजे लौकरच हुंडी सेवेसीं पाठवितों. चोराचा मजकूर, त्यास जांबेहून निघतां बाईनीं निक्षून कमाविसदारांस ताकीद केली. चोरमुद्दा खरा जाला असे. आणीक पांच चोऱ्या बाई तेथें असतां इंदुरीं जाल्या. त्यांत आमचे राहुटीस ज्यानें चोरी केली, तो धरला आहे. मुद्दे ठिकाणबंद आहेत. परंतु अगत्यवाद धरून ठिकाण लावितील असें नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६५.

पे॥ चंद्र २० साबान सन खमस समानीन आषाढ मास.

श्री. २५ जून इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत

चंद्र ६ माहे साबानपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र १६ रजबचें आज्ञापत्र पाठविलें, तें डांकेबरोबर उज्जनीस परभारा लखोटा गेला, तो राजश्री नारो हरी दि॥ सबनीस यांनीं कासदाबराबर देऊन पाठविला. तो चंद्र ४ साबानीं बुधवारीं जांबचे मुक्कामीं पावला. बाईचीं पत्रें माझेच लखोट्यांत होतीं. बाई इंदुरीहून निघाली, त्या दिवसापासून श्रमीच आहेत. कोणाची भेट फार करून होत नाहीं. कारभारी दोघे चवघे यांचे मात्र एक वेळ वरचेवर भेट होते. याप्रमाणें आज चार दिवस वर्तमान. त्यांत स्वामींचीं पत्रें आलीं, घेऊन गेलों. तों निजली होती. बाहेर अवघे कारभारी वगैरे मंडळी बसली होती. आंत प्रवेश कोणाचा नव्हता. मागील दोन घटका दिवस राहतां, कारभारी यांस बोलाविलें. वरकड इंदूरकर कमाविसदार वगैरे बाहेरच. कारभारी आंत गेले होते. त्यास त्यांजकडील जासुदासमागमें निरोप सांगून पाठविला कीं, सरकारचीं पत्रें आलीं आहेत, तीं घेऊन यावयाचीं आहेत, असें पुसून येणें. त्यावरून जासुदानें आंत जाऊन विचारिलें. त्याचें उत्तर आलें कीं, घटकाभर थांबून बोलावूं. त्यावरून अस्तमानपावेतों बसलों. तों आंतून कारभारी बाहेर आले. मीं विचारलें कीं, पत्रें दाखवावयाचीं होतीं, आणि तुह्मीं निरोप पाठविला कीं, घटकाभरानंतर बोलावून घेऊं; असें असतां उठून आलेंत हें काय ? पत्रें पाहावयाचीं तीं पाहिलीं नाहींत. कारभारी यांनीं उत्तर केलें कीं, मर्जी स्वस्थ नाहीं, याजकरितां तुह्मांस बोलाविलें नाहीं. उदयीक पत्रें पाहूं. मीं उत्तर दिलें कीं, ही रीत कोठील ? तुह्मीं बोलत असतां, पत्राविषयीं मर्जी ठीक नाहीं जाली कीं काय ? इतकी गोष्ट नसावी. कारभारी यांनीं उत्तर केलें कीं, फावत नाहीं. त्याजवरून उठून राहुटीस आलों. काल गुरुवारीं पत्र द्यावें, तों ज्वर फारच आला, त्याजमुळें गांठ पडली नाहीं. आतां त्यांचे अवकाशें पत्रें देऊन उत्तर घेऊन पाठवीन. पेशजीं पत्रें बाईस पाठविलीं, त्याचें उत्तर घेऊन चंद्र २३ जमादिलाखरीं डांकेसमागमें येथून रवाना केलें. तें सेवेसीं पावलें असेल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

## लेखांक ६६.

पैवस्ती चंद्र २० साबान सन खमस **श्री.** २५ जून स. १७८४.

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ६ साबान शुक्रवार प्रातःकाल मुक्काम जांब नजीक घाट येथें वर्तमान यथास्थित असेः– विशेष. चंद्र २६ रजबीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलीं आहेत. त्या-अलीकडील वर्तमानः—

बाईनीं इंदुरीहून चंद्र २ साबानीं कूच केलें, ती हरसुरास आली. चंद्र ३ रोजीं जांबेस येऊन मुक्काम केला. चंद्र ४ रोज बुधवार मुक्काम जाला. गुरुवारीं व्यतिपात टळल्यानंतर कूच करून महेश्वरास जावें हा बेत होता. त्यास अस्तमानीं ज्वर आला, यास्तव तूर्त येथेंच राहिली. उतार पडल्यावर महेश्वरास जाणें होईल. कलम १.

इंदूरचे कमाविसदार यांजला सावकार रयत राजी नाहींत. त्यांनीं प्रयत्न केला कीं, खंडो बाबूराव दूर करून नवे मामलेदार द्यावे. परंतु बाईनीं कबूल केलें नाहीं. रयत वगैरे तशीच जांबेपावेतों आली आहे. येथून माघारे जाईल. कलम १.

इंदुरीं मल्हारजी होळकर सुभेदार व खंडेराव होळकर यांच्या सुरती पाषाणाच्या संगमरवरी करून स्थापल्या. गांवचे रांगडे ब्राह्मण व बैरागी व गोसावी व देशस्त ब्राह्मण व जमीदार वगैरे दहा बारा हजार पात्र जेऊं घातलें. कमाविसदार व सावकार व जमीदार वगैरे यांस शेलेपागोटीं शें पन्नास दिलीं व शालेचे फर्द पंधरा सावकारांस दिले. याप्रमाणें स्तुति कीर्त संपादून कूच केलें. लाभ तो कांहींच नाहीं. इंदूरचे कजिये वगैरे इनसाफ करून पैका मिळवावयाचीं कलमें होतीं, परंतु त्यांची चवकशी कांहींच केली नाहीं. याप्रमाणें येथील रीत जाहली आहे. कलम १.

इंदुरीं बाई असतां ऐवजाविषयीं सूचना केली कीं बहुत दिवस जाले, हा कालवर ऐवज रवानगीची तजवीज होत नाहीं. त्यावरून उत्तर केलें कीं, महेश्वरीं गेल्यावर ऐवजाची रवानगी करीन. परंतु खुलासा लौकर ऐवजाची रवानगी व्हावी हा मानस दिसत नाहीं. धरणेकऱ्याप्रमाणें आह्मी त्यांस भासतों. आमचें अवलोकन त्यांजला कर्जदारासारखें होतें. महेश्वरास गेल्यावर ऐवजाच्या हुंड्या देतील, त्या सेवेसीं रवाना करीन. कलम १.

राजश्री आपाजी राम दाभोळकर चंद्र २४ रजबीं इंदुरीं आले. चंद्र २५ रोजीं बाईची भेट जाली. चंद्र २६ रोजीं निरोप घेऊन देशास गेले. जातेसमयीं बाईनीं त्यांस शेलापागोटें दिलें. किंमत रुपये १२.

त्या रात्रीस दिले. प्रातःकालीं रावजींनीं परतून पाठविलीं. पुन्हां मागती बाईनीं कारकुनासमागमें दोन सणगें चवदा रुपयांचे किंमतीचीं पाठविलीं. तींही माघारें पाठवीत होते. तों मीं रावजींकडे गेलों, तों बाईचा कारकून रदबदली करीत होता कीं सणगें ठेवावीं. हे ठेवीत नव्हते. परंतु मीं सांगितलें कीं....दोहीकडून चूक होऊं नये. सणगें आपण ठेवावीं. परंतु न दिल्यास ठीक दिसत नाहीं. त्यावरून त्यांनीं ठेविलीं. रावजी बाईचे भेटीस गेले. तेव्हां शेलारी १ व खण १ एकूण

३० तीस रुपये किंमतीची दिधली. याप्रमाणें सरकारच्या लोकांचा मान सन्मान आहे. सेवेसीं वर्तमान कळावें म्हणून लिहिलें असे. कलम १.

सदरहू पांच कलमें. याशिवाय आमचे राहुटीस चोरी जाली, हें वर्तमान सेवेसीं लिहिलें होतें. कमाविसदार ठिकाण लावून देतील. परंतु अद्याप कांहीं ठिकाण लाविलें नाहीं. बाईचा कारभार पुढें तिखट मागें पोंचट. यामुळें यांचें नेट पडत नाहीं. स्वामी तेथें. राजश्री खंडो बाबूराव यांस ताकीद करवितील, तेव्हां यांस येथें भय उत्पन्न होऊन वस्तवाणी देतील, नाहीं तर यांस भय नाहीं. आमचे राहुटीस चोरी जालीयावर चार पांच चोऱ्या आणखी बाईच्या गोटांत जाल्या, त्याचेंही ठिकाण नाहीं. मी तर कमाविसदारांचे अंगीं चोर व पत्ता व चोरीचा मुद्दा याप्रमाणें लाऊन दिला आहे. यांत लटकी विनंति लिहिणार नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६७.

**श्री.** जून १७४५.

"विज्ञापना ऐसीजेः— वर्तमान ऐकिलें कीं, जनस्थानीं रामकुंड पूर्वी कैलासवासी श्रीमंत राजश्री आपासाहेबांनीं, चित्राव शिवरामबावा याजकडून बांधविलें आहे, तें नवें बांधावें ऐसें मानस अहिल्याबाईचें. त्याजवरून श्रीमंत मातुश्रीसाहेबांस विचारावयास कृष्णाजी तानदेव हे नाशकास गेले होते, यांस सांगितलें होतें. यांणीं मातुश्रीसाहेबांस विचारिलें. त्यांणीं आज्ञा केली कीं, ही गोष्ट करूं नये. जैसें बांधलें तसेंच असों द्यावें. त्यावरून राहिलें. कृष्णाजीपंतीं मातुश्रीसाहेबांस महेश्वरचीं पातळें साधीं- रेशीम नाहीं- कांठ देखील सुती, वजन दर पातळ पक्के २१ एकवीस पैसेभार, याप्रमाणें दोन करून पाठविलीं. लांब हात १६, रुंद दोन हात. ऐकिलें कीं आज्ञा केलीं होती. परंतु यांणीं करून पाठविलीं. हें वर्तमान अहिल्याबाईजवळ सांगितलें तें ऐकिलें. त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

## लेखांक ६८.

पो चंद्र २८ रजब सन खमस समानीन ज्येष्ठ मास.

**श्री.** ता. ३१ जून इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ माहे रजबपावेतों मुक्काम इंदूर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— बडगोंदें येथील मुक्कामींहून पत्र सेवेसीं पाठविलें तें पावलें असेल. अलीकडील

## ५. आणीबाणीच्या प्रसंगीं उपयोगीं पडलेले सरदार.

नाना फडणविसांनीं इ. स. १७८० मध्यें शिंद्यांचे वकील नारो शिवदेव ह्यांस, पाटीलबावांस पेशवे सरकारचे मदतीस पाठविण्याबद्दल पुष्कळ पत्रें लिहिलीं आहेत. त्यांपैकीं एका पत्रामध्यें, ज्या सरदारांनीं मराठ्यांची दौलत रक्षण करण्यासाठीं आणीबाणीच्या प्रसंगीं मदत केली, त्यांचा चांगला नामनिर्देश केला आहे. तो वाचनीय वाटल्यावरून येथें दिला आहे.

श्री.

"विज्ञापना ऐसीजेः– लहान मोठे दौलतींत आहेत, तितक्यांनीं स्वामिसेवेचे पोटीं आपलें कल्याण समजोन श्रम करावे, विखरली मसलत जिकडील तिकडे आटोपावी ह्मणोन लिहिलें, त्यास श्रीमंतांचे पदरीं जितके लहानमोठे आहेत, त्यांनीं श्रमसाहस अर्थें प्राणेंकरून करावयास कसूर केली नाहीं. त्यास स्थूलमानेंकरून पटवर्धन व रास्ते, शिवाजी विठ्ठल व खंडेराव त्रिंबक व प्रतिनिधी, यांशिवाय लहानमोठे यांणीं सात वर्षें तवाईज सोसली. पांडुरंगराव, गोपाळरायाचे भाऊ, यांणीं हैदरखानाकडील फौजेशीं लढाई देऊन जातीनशीं पाडाव गेले. त्यापूर्वीं वामनराव मातबर फौजेनशीं राजश्री हरिपंताबरोबर मेहनत करून सरकारकामावरच वारले. सरंजाम त्यांचा गेला तथापि, व खराबी जाहली असतांही, राजश्री परशरामपंतभाऊंनीं अंगावर कर्जें काढून दोन वर्षें सरकारचीं कामें केलीं, तीं परस्परें कळलींच असतील. रास्त्यांनींही फौजसुद्धां छावण्या केल्या, गुजराथेंत लढाया मारल्या, कर्नाटकांतही होतेच. इतकेंही असून सरकारांत पैकाही त्यांपासोन घेतला; आद्यापही चाकरीस कसूर नाहीं. शिवाजी विठ्ठलाची तों माहितगिरी पाटीलबावांस आहेच. खंडेराव त्रिंबक यांणींही धार घेतल्याची मसलत चांगलीच केली; पुढें नजरही सरकारांत त्यांपासोन घेतली. प्रतिनिधींची फौज चार वर्षें सतत छावणीस, लोकही चांगले बाळगतात. भवानरायाचे वेळेस, भगवंतरावाचे पेंचामुळें कर्जाच्या जरबेंत फार आले, तथापि फौजेचे चाकरीस गुंता पडला नाहीं. याशिवाय लहानमोठ्यांनीं आपले कुवतीपेक्षां तवाई अधिक सोसली. कोणी तरी एक वरीष निदान दोन वर्षें सोसेल. सहा वर्षें एकसतत जाहल्यामुळें थकणीच जाहली. या गोष्टी राजश्री पाटीलबावांचेही ध्यानांत यावयाजोग्या आहेत. उभयतां सरदार दौलतीचे स्तंभ. कदाचित् इमारत थकली तर स्तंभावर उभी रहात असते. पुढेंही भरंवसा यांचाच आहे, व तेच राज्याचें संरक्षण करतील, ही खातरजमा आहे. सारांश तुह्मांस सविस्तर कळावें, ह्मणून लिहिलें आहे. चौघांनीं चोहींकडे कमर बांधून मसलती आटोपाव्या ह्मणोन लिहिलें, याचा अर्थ श्रीमंत, नबाब, हैदरखान, भोंसले हा असला, तर याचीं उत्तरें अलाहिदा लिहिलींच आहेत. श्रीमंतांचे घरांत चौघांनीं चोहींकडे आटोपावें असें असलें, तर चौघांचे

सरंजाम बराबर, असें तर कोठें सरकारांत दिसत नाहीं. श्रीमंत उभयतां सरदार तीन प्रकर्णे. त्यांत श्रीमंतांचे सरकारचा प्रकार लिहिलाच आहे. त्यांतही जितकें शक्ती-पेक्षां अधिक होईल, तें घडतच आहे. राहतां उभयतां सरदार राहिले, त्यांजकडे राज्यरक्षणाचा भार आहे. हे जाबसाल पूर्वी त्यापासोन होतच आहेत. सविस्तर अर्थ दुसरे पुरवणीवरून विदित होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## ६. नाना फडणविसांचें व्यवहारचातुर्य.

श्रीमंत सवाई माधवराव पेशवे ह्यांची स्वारी इ. स. १७९० मध्यें वाई, धोम, महाबळेश्वर ह्या क्षेत्रीं गेली होती. त्या वेळीं, वाई येथें पेशव्यांचे सरदार गंगाधरराव रास्ते हे राहत असत. त्यांनीं, पेशव्यांनीं आपल्या वाड्यामध्यें येऊन राहावें ह्मणून फार आग्रह धरिला. पेशव्यांची मर्जी तेथें राहण्याची दिसली नाहीं. तेव्हां नाना फडणविसांनीं, रास्त्यांची समजूत करण्यासाठीं, आपल्या यजमानास मेणवलीस आपल्या वाड्यामध्यें न नेतां, वाई व मेणवली ह्यांचे दरम्यान तंबू देऊन तेथें राहण्याची व्यवस्था केली. वाई व मेणवली ह्यांचे दरम्यान कृष्णेच्या तीरीं एक मोठी आंबराई आहे, त्यास अद्यापि 'पेशव्यांच्या तळाची जागा' असें नांव आहे. क्षुल्लक गोष्टीकरितां मानापमानाचें महत्त्व अधिक वाढून विनाकारण चुरस वाढते, त्याकरितां व्यवहारचतुर माणसें थोडक्यांत माघार घेऊन युक्तीनें काम करून घेतात, हें वरील उदाहरणावरून दिसून येईल. ही हकीकत नानांनीं आपले जिवलग मित्र हरिपंत फडके ह्यांस लिहिली आहे. त्याचें उत्तर हरिपंततात्यांनीं नानांस लिहिलें, तें उपलब्ध झालें आहे. तें येणंप्रमाणेंः—

श्री.

"सेवेसीं विज्ञापनाः– 'श्रीमंतांची स्वारी वाईनजीक आलीयावर, राजश्री गंगाधरराव रास्ते दोन वेळां आमचे डेऱ्यास येऊन सांगितलें कीं, वाडा रिकामा करून ठेविला आहे, तेथें श्रीमंतांनीं राहावें; नाहींतर स्वरूप गेलें. त्यावरून श्रीमंतांस वाड्यांत राहावयाची विनंति केली. रास्ते यांणीं विनंति केली. परंतु मर्जी डेऱ्यास राहावयाची, यामुळें रास्ते फार खट्ट जाले. श्रीमंत ह्मणाले, 'वाईस जात नाहीं. धोमास जाऊं, अगर मेणोलीचे वाड्यांत राहूं.' ही गोष्ट जाल्यावर, रास्ते खट्ट होऊन ह्मणतील कीं यांणींच इतकें केलें! तेव्हां बहुत प्रकारें विनंति करून वाई मेणो(ली)चे मधीं डेरे द्यावे, दिवसां रात्रीस मर्जीस येईल तेव्हां रास्ते यांचे वाड्यांत जाऊन भोजननिद्रा करावी, पाहिजे तेव्हां डेऱ्यास यावें हें मर्जीस आलें. त्याप्रमाणें करतात. रास्त्यांसही सांगितलें कीं, याउपरी आग्रह करूं नये. त्यांणींही संतोष मानिला.' ह्मणोन आज्ञा केली, ती कळली. त्यास श्रीमंतांची मर्जी वाड्यांत राहावयाची नाहीं, ही गोष्ट मनापासून खरी. परंतु स्वामींनीं

तोड काढिली, ही फार चांगली गोष्ट जाली. त्यांचा संतोष राहिला. श्रीमंतांची मर्जी राहिली. फार चांगली गोष्ट जाली. असें न होतें, तर रास्ते फार वाईट मानिते. रा। छ १६ रबिलावल हे विज्ञापना."



## ७. एक महत्त्वाचें पत्र.

पुण्यास इंग्रजांचे वकील सर चार्लस मालेट हे येण्याचें ठरलें. त्यास नाना फडणविसांनीं संमति दिली. परंतु महादजी शिंद्यांस तें आवडलें नाहीं. त्या वेळीं ह्या महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल बराच वादविवाद झाला. ह्या संबंधांत हरिपंतांनीं नानांस लिहिलेलें पत्र अतिशय महत्त्वाचें असून मनोरंजक आहे. तें येणेंप्रमाणें:—

"सेवेसीं विज्ञापना:– मुंबईकरांचें पत्र पारशी आलें, त्याची नक्कल हिंदवी करून पाठविली आहे. ते वकील पाठविणार, याचें उत्तर कसें लिहावें? शिंद्यांनीं मुंबईकराकडून चेनापट्टणकरास घेऊन टिपूशीं संधान लाविलें ह्मणून संदेह घेऊन, सदाशिव दिनकर यांजकडून पुरवणी लिहविली, तें तुह्मांस लिहिलेंच आहे. वकील आला असतां संदेहास जागाच बांधतील. नारो शिवदेव यांचेही बोलण्यांत कीं, इंग्रजाचें राजकारण दुसरेकडून कांहीं होऊं नये, हें पाटीलबावांचे मनांत आहे. त्यापक्षीं याचें उत्तर कसें लिहावें तें लिहून पाठविणें. येविषयीं शिंद्यांस लिहिलें आहे. उत्तर येईल तेव्हां लिहून पाठवूं. असें लिहावें कीं कसें, हें लिहून पाठविणें ह्मणून आज्ञा. त्यास, या ह्मणण्याचे दोष स्वामींनीं लिहिलेच आहेत. हे पाटीलबावांचे प्रकृतीमुळें लटके नाहींत, खरेच आहेत. संदेहाची रास. त्यास जागा खरी. परंतु थोर दवलतीस हे विचार कांहीं नाहीं. मुंबईकर आमचे शेजारी, त्यास कांहीं बोलणें, त्यानें भला माणूस पाठवितो ह्मटल्यास त्यास नका ह्मणणें, किंवा शिंद्यांस लिहितो, ते लिहितील तसें तुह्मांस लिहूं असें ह्मणणें, दोन्ही गोष्टी ठीक नाहींत. जर इंग्रजाचा बिघाड असता तर चिंता नव्हती. सलुखा आहे. कामकाजामुळें दहा वेळा आह्मांस लिहिणें, कारकून पाठविणें प्राप्त. तसेंच त्यांस लिहिणें, कारकून पाठविणें, त्यास इतकी अडचण पडली, तर सरकारची मातबरी कशी राहील? यांत शिंदे वांकडें काय मानणार आहेत? या गोष्टीचा इतल्ला देखील देऊं नये. मुंबईकरास लिहावें कीं सुखरूप मातबर पाठवावा. आल्यावर बोलणें ऐकावें. त्यांत हत्ती घोडे काय आहेत, तें समजल्यावर पाटीलबावांस लिहावयास योग्य असेल त्याचा इतल्ला द्यावयास येईल. यांत कांहीं वांकडें पडेल असें परिच्छिन्न दिसत नाहीं. आह्मांस कांहीं शिंद्यांचे विरुद्धाचें राजकारण करणें नाहीं. मग चिंता काय? मुंबईकर जनरल स्नेह करूं पाहतो. शहाणा आहे. सुरतेस होता तेव्हांपासून तो घरोबा राखतो. आतां जवळ आला. कच्चें पक्कें कळावें ह्मणून कोणी पाठविणार, त्यास आल्यास माझे मतें चिंता नाहीं. स्वामींनीं लिहिले तोच पक्ष बलाविला तर न पाठविणें ह्मणून लिहावें. सिद्ध कांहीं संतोष मानतील व श्रीमंतांनीं होऊन दक्षिण तीराच्या दिल्या असतांउत्तर

तीराची इच्छा संकोचामुळें करणार नाहींत. याजकरितां बळवंतराव यांचे राहाण्यास गुण बरा दिसतो हें नाहीं. आणि निरोप देण्याचें ठरवावें तर, बळवंतरावाबद्दल सनदा पाठविल्या असतां बळवंतरावाची मातबरी राहते. स्वामींनीं रयात केलीशी होते. संतोषानें जातील. त्यांनीं निरोप मागितला, आपण वस्त्रें पात्रें देऊन निरोप दिला तर जाण्यांत संतोष. नाहीं तर रुक्षता मानितील. राजश्री आपाचे फडनिशीकरितां सनदांस हिसका दिला, याजकरितां तात्यांची गैरत मनास आणून, आपणास संतोष वाटावा याकरितां करावें, तर ती गोष्ट भोळयावरीच नेली, हीं कृत्रिमें खाशांचीं आहेत. बळवंतराव सरळ माणूस आहे, परंतु चाकरीचा होता. तेव्हां खावंदाचे हिताची गोष्ट बोललेंच पाहिजे. बोलतात, बळवंतराव यास निरोप देणें. सनदा याजबरोबर पाठवणें. ही एक उमदगीची जात आहे; परंतु क्षेत्र तसें नाहीं. याजकरितां तूर्त सनदा देऊं नयेत. बळवंतरावास मीं लिहिला हा बाहाणा, अगर तेथें याहून कांहीं अधिक योजला तर लाऊन, राहणें होयसें करावें, ह्मणजे सरकारकामास चांगलें. शेवटीं नबाबाच्या भेटी होणार. सेनाधुरंधर तूर्त येत नाहींत त्यापक्षीं तुह्मीं बराबर असावें. ही घरोब्याची गोष्ट लाऊन न जात असें करावें. हा प्रकार सर्वतोपरी बरा दिसतो. मोहित्यांचा प्रकार बोलण्यांत आला तो ठीक, परंतु रजबदल करितात त्यापक्षीं निरोप दस्तक द्यावें. ज्याशीं अट धरावी तो षक्स गेला. आतां कोणाशीं बोलावें? इतक्यांत गोविंदराव येतील. कदाचित् भोसल्यांनीं यावें असें ठरलें, अगर नबाबाच्या भेटी होतात हा इतल्ला, त्यास भागानगरीहून आला आहे. त्यापक्षीं आह्मीं नका येऊं ह्मटलें असतां ते होऊन आले, तर ते समयीं दक्षिण तीराच्या सनदांवर निकाल पडेल. कावेबाजीचें काम आहे. तेही तसेच आहेत. याजकरितां लिहिल्याप्रमाणें जाल्यास बरें दिसतें. याहून एखादा प्रकार ठरला तर लिहावयास आज्ञा करावी. रवाना चंद्र २३ रविलाखर हे विज्ञापना."



## ८. जनरल गाडर्ड ह्याचा बातमीदार ठाकोरसिंग.

मराठ्यांप्रमाणें इंग्रजी लष्करांतही पूर्वी बातम्या मिळविणारे हेर असत. ते पूर्वीं बातम्या मिळविण्याचा फार प्रयत्न करीत असत. एकदा ठाकोरसिंग नांवाचा हेर पुण्यास आला. परंतु घांशीराम कोतवालानें त्यास पकडलें, व त्याजकडून दादासाहेब पेशव्यांच्या लष्करची सर्व बातमी काढून घेतली. ह्या संबंधाचें एक मनोरंजक पत्र उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणें.—

श्री.

"यादी ठाकूरसिंग कासीद जथे रघू पांडे दिम्मत जरनेल गाडर इंग्रज सुरतकर याजकडून बातमीस, बोहरा कटोर नजीक तापी येथील मुक्कामींहून छ १८ रोजांनीं चार असामींनिशीं निघोन पुण्यास आलों. येथें कोणाकडे हजार दोन हजार रुपये द्यावयास करून, आह्मांस बातमी दरबारची सांगत जावें ह्मणोन गांवांत शोध करीत होतों. तों

घाशीरामाची आपली गांठ पडली त्यांणीं आपल्यास वर्तमान तिकडील सर्व पुशिलें. त्यास दादासाहेब महमदी बागांत आहेत. सिधा प्रथम इंग्रजानें दोन चार हजार रुपये दिले. हल्लीं त्यांस हैदरनायकाकडून हुंड्या पंचवीस लाखांच्या आल्या आहेत. कांहीं सावकाराकडील ऐवज आह्मांसमक्ष नेला. फौज व तोफा वगैरे सामान येणेंप्रमाणें तयार आहे. बि तपशील. दादासाहेबांचे.

१५०० पलटणें गाडदी.
२००० आरब ढवलक्याहून धुंदके काठेवाडांत आहे, तेथून आले आहेत.
४००० स्वार देशाचे वगैरे हल्लीं जातात.
७५००
१०००० इंग्रजांकडील
    ८००० पलटणें
    २००० स्वार
        १००० खंदारी
        १००० तुर्कस्वार
        २०००
    १००००
        तोफा.
    ४२ दादासाहेबांकडील
    ४२५ इंग्रजांकडील मोठ्या लहान. शेंपन्नास याखेरीज.
    ४६७
७००० सुरतवाल्याचीं व मुंबईचीं पलटणें
    २००० मुंबईहून गोरे
    ५००० सुरतकराचीं
    ७०००
    सदरहू कारखान्यावर जनरल बेली गोलंदाज ह्मणून फिरंगी आहे.
२४५००

सदरहूप्रमाणें सामान तयार आहे. लढाईस येणार आहेत. परंतु येथून वकील गेल्यावर तीन क्रोड रुपये द्यावे, आमची कोठी पुण्यास करावी, हें बोलणें बोलले. नंतर न्याहालचंद येथें आले. ते मागती माघारें गेलें आहेत. त्यांचें बोलणें जाल्यावर काय मसलत होईल ते नकळे. सालमजकुरीं बाईनीं फार मनावर घेतलें आहे. त्यांचे कारकून इंग्रजांकडे जातात, इंग्रजांचे बाईकडे येतात. दादासाहेब दो चोहों रोजांनीं जरनेल गाडराकडे येतात जातात. आमदाबादेस पायागड चांपानेराचे घाटानें वकील

पुढें गेला. मागून सुभा जाणार. ढाला दिल्ह्या आहेत. त्याचें नांव ठाऊक नाहीं. परंतु वराशावर उतरला आहे. इंग्रज बारा सरदार दर्याचे कांठीं राहतात. सुरतेहून कच्चे सात कोसांवर ढिमस गांव आहे, तेथें डेरे देऊन राहिले आहेत. जवळ फौज नाहीं. पन्नास स्वार चौकीस असतात. काळे पगडीवाले शेंपन्नास असतात. खेरीज शागीर्दपेशा असतो. दहा दिवस सुरतेंत, चार दिवस फौजेंत, चार दिवस समुद्राचे कांठीं, याप्रमाणें फिरते असतात. दादासाहेबीं तीन गोळे सव्वा सव्वा लाख रुपये देऊन घेतले आहेत. त्याचा गुण, तो फौजेवर सोडिला असतां फौजेस दिसूं नये. ऐसा गुण आहे ह्मणतात. इंग्रजानें दारूची चादर एक केली आहे. ती फौजेवर सोडावी ह्मणजे दोन कोसांवर फौज असल्यास तेथें येऊन, हजार दोन हजार माणूस जाया व्हावें, ऐसा गुण त्यामध्यें आहे ह्मणतात. येणेंप्रमाणें वर्तमान तिकडील आहे. चंद्र ५ सवाल समा समानीन अश्वीन."



## ९. बाळाजीपंत ठोसर.

सवाई माधवराव पेशव्यांजवळ बाळाजीपंत ठोसर ह्या नांवाचा एक नानाफडणाविसाच्या खातरजमेचा इसम होता. तो इ. स. १७९० मध्यें मृत्यु पावला. त्याच्या मृत्यूबद्दलचें पुढील पत्र उपलब्ध झालें आहे, तें येथें नमूद करण्यासारखें आहे.—

"सेवेसीं विज्ञापना:-स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावलें. बाळाजीपंत ठोसर आठ दिवसांचा निरोप घेऊन बहुरास गेले. तेथें ताप आला. तसेच शेतांत गेले. वायु जाला. मग पुण्यास आणिलें. उपाय चालला नाहीं. तीन दिवस होते. माघ शुद्ध सप्तमी गुरुवारीं देवआज्ञा जाली. धाकटी स्त्री समागमें गेली. चांगला माणूस. अकस्मात अशी गोष्ट जाली. ईश्वरी इच्छा! चांगलींच माणसें जातात ह्मणोन आज्ञा केली, ती कळली. त्यास बाळाजीपंतांचें वर्तमान ऐकोन चित्तास वाईट वाटलें. ही गोष्ट मनांत यावयाची नाहीं. अकस्मात ऐकिली. तस्मात् ईश्वरी इच्छा खरी. या गोष्टीस कोणाचा इलाज नाहीं. जें होईल तें पाहून उगेंच असावें. श्रीमंतांजवळ खातरजमेचा माणूस होता. ईश्वरी इच्छा! बाळाजीपंत लेले सर्व कामात माहित, तेही गेले. त्यास काय करावें! बाळाजीपंत ठोसर याचा खटला फार, कसा परिणाम लागेल पाहावें. त्याचा मूल आहे, त्याजवर कृपा करून त्यास सांभाळणें स्वामींकडे आहे. साबान चंद्र १५ जमादिलाखर हे विज्ञापना."



## १०. निजामाच्या चाकरीस आलेले युरोपियन.

१८ व्या शतकाचे अखेरीस पुष्कळ युरोपियन लोक मोठमोठीं शिफारसपत्रें घेऊन निजाम व पेशवे ह्यांच्या लष्करांत चाकरीस रहाण्यासाठीं येत असत. ह्या संबंधाचीं निजामाकडील वकील गोविंदराव काळे ह्यांचीं, पुढील दोन पत्रें पाहण्यासारखीं आहेत. ह्या पत्रांवरून ह्या युरोपियनांचीं नांवें व माहिती कळून येते:—

## लेखांक १.

**श्री.**

"विज्ञापना ऐसीजेः-मिस्तर ज्यारच बेली पहिले आला, त्याजबराबर मिस्तर ज्यानसेन यांचीं पत्रें मीर आबदुल कासम व मुषीरुल मुलुक यास आलीं. त्यांत शिपारस आहे कीं, ज्यारच बेली मातबर सरदार, यानें उमदी कामें केलीं. पलटणें तयार करण्याविषयीं बहुत कुशल. यास नवाब बंदगानअली यांचे सरकारांत नौकर ठेवावें, याप्रमाणें आहे. सांप्रत कलकत्त्याहून मिस्तर मैनसेन आला आहे. त्याची मुलाजमत चंद्र १६ सवालीं मिस्तर बेदील याचे मारफत जाली. हाही नौकरीचे इरायानें आला आहे. यानेंही शिपारसपत्रें आणिलीं आहेत. याचा तपशील एका दो दिवसांनीं समजला ह्मणजे मागाहून विनंति लिहिण्यांत येईल. एकूण दोघे मिस्तर येथें आहेत. अद्याप यांस चाकरीस ठेवण्याचा निश्चय जाला नाहीं हे विज्ञापना."

## लेखांक २.

**श्री.**

"विज्ञापना ऐसीजेः-मिस्तर ज्यारच बेली व मिस्तर मेनसेन हे दोघे इंग्रज आले आहेत, व फरासीसाकडीलही एक गृहस्थ नौकरीच्या इरायानें आला आहे. त्यास यांस चाकरीस ठेवण्याची चर्चा नवाबापाशीं जाली. नवाबाचे बोलण्यांत आलें कीं, इंग्रजांस चाकर ठेवणें तरी फार वाढवून ठेऊं नये. हळु हळु परिश्रम करावा ही त्यांची चाल. हे लोक चांगले, हा सरंजाम चांगला, अमकें पाहिजे ऐसें करीत करीत, कोठी घालावयाची परवानगी घ्यावी. कोठी सिद्ध जाल्यावर फैल करावा ऐशी यांची चाल. यास्तव ठेवणें तरी समजून ठेवावे. गाडद आपले मारफातीची ठेऊन घ्यावी. ऐसी चर्चा जाल्यावर, हेंही त्यांचे बोलण्यांत आलें कीं, इंग्रजच नोकरीस ठेविले तरी फरासीस वाईट मानतील. फरासीसासच ठेविलें तरी इंग्रज वाईट मानतील. याजकरितां दोघांसही नौकर ठेवावे ऐशीं बोलणीं होतात. कोणासही अद्याप चाकरीस ठेविलें नाहीं. ही विज्ञापना."

## ११. हत्यारबंद लोकांस नर्मदेचे दक्षिणेकडे येण्यास बंदी.

पेशवाईचे अखेरीस, महादजी शिंदे मृत्यु पावल्यानंतर जेव्हां उत्तर हिंदुस्थानांत फार चळवळ झाली, त्या वेळीं नाना फडणविसांनीं हत्यारबंद लोक नर्मदेच्या दक्षिणेस येऊं देऊं नयेत ह्मणून, अहल्याबाई होळकर ह्यांस बंदोबस्त ठेवण्याबद्दल लिहिलें होतें. ह्यावरून प्रसंगविशेषीं हत्याराची बंदी पूर्वींचे मुत्सद्दी राजकारणासाठीं करीत असत, असें दिसून येतेंः-

**श्री म्हाळसाकांत.**

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक अहल्याबाई होळकर कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील क्षेम स्वामींचे

कृपावलोकनेंकडून यथास्थित असे विशेष. स्वामींकडून चंद्र २२ जिल्हेजचें पत्र आलें तें चंद्र ७ मोहरमीं प्रविष्ट होऊन बहुत संतोष जाला. हिंदुस्थानांतून वडिलांचे व राजश्री दौलतराव शिंदे यांचे वगैरे तालुक्यांतून हत्यारबंद कोणी दक्षिणेस येतील, त्यांजला सरकारचे दस्तकाखेरीज नर्मदा उतरून येऊं न देणें, येविषयीं तुह्मीं आपले तालुक्यांत कमाविसदारांस ताकीद करून हत्यारबंद माणूस न येई असा बंदोबस्त पक्का करणें ह्मणून आज्ञा. ऐसीयासी चिरंजीव राजश्री दौलतराव शिंदे स्वामींपाशींच आहेत, त्यांजला समक्ष असेल. त्याप्रमाणें ते आपले जिल्ह्यांत पत्रें पाठवून बंदोबस्त करितील. इकडील जिल्ह्यांत आज्ञेप्रमाणें पत्रें पाठऊन नाक्या वाटांनीं बंदोबस्त केला आहे. मिती श्रावण वद्य ५ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



# १२. दौंड येथील १७८९ चा बाजारभाव.

इ. स. १७८९ मध्यें दौंड येथें जो बाजारभाव होता तो पुढील एका टिपणांत सांपडला आहे. तो येणेंप्रमाणेः—

श्री. ता. १४ आगष्ट इ. स. १७८९.

"निरख बाजार मौजे दौंड सु॥ तिसैन मया अलफ छ २२ जिल्काद.

| वजन पक्कें. | कैली माप. |
|---|---|
| б।३ कणीक. | б।· हरभरे. |
| б।६ पीठ जोरी | б।·॥ बाजरी. |
| б।४ पीठ बाजरी | б।१॥ जोरी. |
| б। तांदूळ. | б।· डाळ तुरीची. |
| ббर तूप. | б।·॥ गहूं. |
| бб५॥ गूळ. | бб२। तांदूळ मोठे. |
| бб२। साकर. | бб२ तांदूळ बारीक. |
| бб३ सुपारी. | бб॥ मीठ. |
| бб३। तेल. | б।· दूध. |
| | б।२ दहीं. |
| सुमारें. | खुर्दा. |
| ४००० पानें हिरवीं. | ५б– जुना शिवराई. |
| ३२५ पिकलीं. | ४। नवा शिवराई. |



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।

पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ३ रें.] नोवेंबर १९१०. [अंक ४ था.

## विषयानुक्रम.



| विषय. | पृष्ठांक. |
|---|---|
| १ तंजावरचें राजघराणें. ... ... ... ... ... | ६१–७२ |
| २ ऐतिहासिक संस्मरणीय वस्तू. ... ... ... ... | ९–१२ |
| ३ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें, भाग २ रा.... ... ... | ५७–८० |
| ४ ऐतिहासिक टिपणें, भाग ३ रा. ... ... ... ... | १७–२४ |

चित्रें—१ तंजावरचा राजा प्रतापसिंह. २ टिपू सुलतानाच्या सिंहासनाचें व्याघ्रमुख आणि रत्नजडित पक्षी.




मुंबई येथें

तुकाराम जावजी ह्यांनीं

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# 'काव्यसंग्रहग्रंथमालें'तून छापून प्रसिद्ध झालेले ग्रंथ.

किं. ट. ख.

**वामनपंडितकृत यथार्थदीपिका**—भाग पहिला. (आवृत्ति दुसरी.) यांत भगवद्गीतेवरील या कवीच्या 'यथार्थदीपिका'-नामक विस्तीर्ण टीकेचे प्रथम चार अध्याय अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसुद्धां. ... ... ... ... १॥ ८=

**वामनपंडित यथार्थदीपिका**—भाग २ रा. यांत ५ पासून ९ अध्याय आले आहेत. ... ... ... ... ... २ ८≡

**वामनपंडितकृत यथार्थदीपिका**—भाग ३ रा. यांत १० पासून १४ पर्यंत अध्याय आले आहेत. ... ... २। ८≡

**वामनपंडितकृत यथार्थदीपिका**—भाग ४ था. यांत १५ पासून १८ पर्यंत अध्याय आले आहेत. ... ... २ ८=

**वामनपंडितकृत कवितासंग्रह**—भाग पहिला. (आवृत्ति दुसरी.) यांत या कवीचीं रामजन्म, अहल्योद्धार, सीतास्वयंवर, भरतभाव, लोपामुद्रासंवाद, विराटपर्व, स्थालीपाक, भीष्मयुद्ध (भीष्मप्रतिज्ञा), भीष्मशरपंजर, जयद्रथवध, पार्थभाग्य (अर्जुनभाग्य), शुकरंभासंवाद, दंपत्यचरित्र (अश्वत्थामा), शुकाष्टक, दशावतारचरित्र, ध्यानमाला (विष्णुध्यान), विष्णुध्यान (ध्यानसवाया), भूगोलवर्णन, नामसुधा, नृहरिदर्पण (प्रल्हादचरित्र), गजेंद्रमोक्ष, वामनचरित्र (प्रथम व द्वितीय), भागवतरामायण (संकलितरामायण), कृष्णजन्म, मृत्तिका-भक्षण, बालक्रीडा (प्रथम व द्वितीय), गोरसहरण, उखल-बंधन, वनसुधा, ब्रह्मस्तुति, हरिविलास (कालियामर्दन), वेणुसुधा, कात्यायनीव्रत (गोपीवस्त्रहरण), यज्ञपत्न्याख्यान (ऋषिपत्न्याख्यान), रासक्रीडा, गोपीगीत, कंसवध (प्रथम व द्वितीय), द्वारकाविजय, सर्ग ५ रुक्मिणीपत्रिका, रुक्मिणीविलास, मुकुंदविलास (जरासंधवध) हीं ४५ स्फुट प्रकरणें अर्थनिर्णायक व अवांतर टीपांसुद्धां. ... ... ३॥ ०।०



तंजावरचा राजा प्रतापसिंह.

(कारकीर्द इ. स. १७४०–१७६३.)

# भाग ७ वा.

## राजे प्रतापसिंह यांची कारकीर्द.

इ. स. १७४० मध्यें प्रतापसिंह राजे हे तंजावरच्या गादीचे अधिपति होऊन राज्यकारभार चालविण्यास त्यांनीं सुरवात केली नाहीं, तोंच एक मोठें संकट प्राप्त झालें. तंजावरच्या दरबारामध्यें सय्यदखान व सय्यद कासीम या नांवाचे दोन महाप्रबल व कारस्थानी सरदार फार प्रसिद्धीस आले होते. त्यांच्याकडे राज्याची फौजदारी व तंजावरच्या कोटाची किल्लेदारी व राजाची चिटणिशी, असे मोठमोठे अधिकार होते. या सय्यदबंधूंनीं, तंजावरच्या राज्यकारभारांत आपलें वर्चस्व असावें व सर्व राजसत्ता आपले हातीं यावी, ह्मणून पूर्वीं अनेक प्रयत्न केले होते; आणि त्यांना, प्रतापसिंह राजाचे कारकीर्दींत आपले मनोरथ पूर्णपणें तडीस जातील, अशी आशा उत्पन्न झाली होती. राजा प्रतापसिंह हा नुक्ताच गादीवर बसल्यामुळें त्यास राज्यकारभार चालविण्याचा विशेष अनुभव नव्हता. तथापि तो जात्या बुद्धिवान्, स्वाभिमानी आणि व्यवहारचतुर असल्यामुळें, त्यानें दरबारांतील ह्या दोन यवन मुत्सद्यांचीं कारस्थानें लक्ष्यांत घेऊन, प्रथम त्यांचा बंदोबस्त करण्याचा निश्चय केला. ही गोष्ट त्या प्रमत्त सरदारांस समजतांच, त्यांनीं निरनिराळीं कारस्थानें रचून, प्रतापसिंह राजास तंजावरच्या गादीवरून पदच्युत करण्याचा उद्योग चालविला.

'श्रीमत् भोंसलवंशचरित्र' या शिलालेखामध्यें सय्यदखानाच्या प्रमत्तपणाचें व दुराचाराचें जें वर्णन दिलें आहे, त्यावरून तो दरबारी लोकांस फारच शिरजोर होऊन तंजावरच्या गादीवर काय संकट आणील त्याचा नेम नव्हता. तंजावर येथील राजसत्ता ही हिंदूंची असल्यामुळें, तेथें पूर्वापार व्यंकोजी महाराजापासून दानधर्म बहुत चालत आला होता. प्रतापसिंह राजे हे गादीवर आल्यानंतर, त्यांनीं आपल्या पूर्वजांचा कित्ता गिरवून, पूर्वापार चालत आलेले दानधर्म तसेच चालू ठेविले. सय्यदखान यास ही गोष्ट पसंत न पडून, तो हिंदुधर्मास विरोध करूं लागला, आणि हिंदु देवालयांत त्यानें अनाचार सुरू केले. त्यानें मोहना नांवाची एका देवालयांतील देवदासी भ्रष्ट करून तिला आपले घरीं नेऊन ठेविलें. त्यामुळें त्याजविषयीं हिंदुधर्माभिमानी लोकांस तिरस्कार उत्पन्न झाला. प्रतापसिंह महारा-

जांस हीं त्याचीं दुष्ट कृत्यें करून चुकलीं; परंतु त्यांनीं तंजावर येथील त्याचें प्राबल्य लक्ष्यांत घेऊन, त्याच्या कृत्यांकडे कांहीं दिवस कानाडोळा केला. अर्थात् सय्यदखानास त्यामुळें अधिकच उत्तेजन येऊन, तो तंजावरची सर्व राजसत्ता आपल्या मुठींत आणण्याचा अधिक प्रयत्न करूं लागला. तशांत त्यास ह्या कामीं दुसऱ्या एका सुप्रसिद्ध व्यक्तीचें प्रोत्साहन मिळालें. ह्याचा थोडासा वृत्तांत येथें नमूद करणें अवश्य आहे.

या समयास कर्नाटकाच्या रंगभूमीवर चंदासाहेब या नांवाचा एक धाडसी व महत्त्वाकांक्षी पुरुष अवतीर्ण होऊन, त्यानें दक्षिण हिंदुस्थानांत अनेक घडामोडी व अनेक कारस्थानें चालविलीं होतीं. हा अर्काटचा नबाब दोस्तअलीखान याचा जांवई असून, त्याचें पूर्वीचें नांव हुसेन दोस्तखान असें होतें. हा मोठा कुशाग्रबुद्धि, धूर्त, मधुरभाषी आणि सुस्वरूप असल्यामुळें, अर्काटचा नबाब दोस्तअलीखान ह्याची त्यावर फार मर्जी जडून, त्यानें त्यास आपला घरजांवई केलें, आणि त्यास आपल्या दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. त्यानें थोड्याच दिवसांत अर्काटच्या दरबारांत आपलें चांगलें वजन बसविलें; आणि कर्नाटकांतील राजकारणांत प्रवेश करून, तंजावर व त्रिचनापल्ली येथील हिंदुराज्यें पादाक्रांत करण्याची महत्वाकांक्षा मनांत आणिली. त्रिचनापल्ली येथें नायक राजे राज्य करीत असून तेथील शेवटचा राजा विजयरंग हा इ. स. १७३१ मध्यें मृत्यु पावला, व त्याच्या गादीविषयीं, राणी मीनाक्षी आणि दुसरा वारस, वंगारू तिरमल, ह्यांच्यामध्यें तंटे सुरू झाले. ही उत्कृष्ट संधि साधून अर्काटच्या नबाबानें, आपला मुलगा सफदरअली व जांवई चंदासाहेब ह्यांस, त्रिचनापल्ली येथील तंटा मिटविण्याकरितां पाठविलें. चंदासाहेबानें तेथें जाऊन, मोठ्या युक्तीनें तेथील राणी मीनाक्षीअम्मा हिला अनुकूल व वश करून घेतलें; आणि त्रिचनापल्लीचा किल्ला व फौज आपल्या ताब्यांत घेऊन, त्या राजस्त्रीस विश्वासघातानें बंदिवासांत टाकिलें. ह्याप्रमाणें चंदासाहेब त्रिचनापल्लीचा स्वसत्ताधारी नबाब बनला,* आणि राणी मीनाक्षी ही बंदिवासामध्यें

* ह्या प्रसंगाची हृदयद्रावक हकीकत एका इतिहासकारानें पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहे:—

"In 1732, the Rajah of Trichinopoly had died without issue; his second and third wives burned themselves with the body, but the first wife succeeded to the Government, in conformity, it is said, with the desire of the deceased Rajah. Disputes subsequently ensued between the Ranee and a Prince of the royal blood. Dost Ali, the Nabob of Arcot, was prevailed upon to take advantage of the confusion, to subject the kingdom of Trichinopoly to his own authority. Accordingly he sent an army under his son

दुःखाश्रू गाळीत, आपल्या आयुष्याचे दिवस कंठूं लागली. तेथें ती लवकरच मृत्यु पावली, असें ह्मणतात. अशा प्रकारें इ. स. १७३६ मध्यें तंजावरच्या शेजारचें त्रिचनापल्लीचें प्राचीन हिंदु संस्थान, चंदासाहेबाच्या ताब्यांत गेल्यामुळें, त्याचें नांव दक्षिण हिंदुस्थानामध्यें प्रसिद्धीस आलें, व तिकडील राजकारणामध्यें त्याचें फार महत्त्व वाढलें.

चंदासाहेबाच्या हातीं त्रिचनापल्ली आल्यापासून त्यास, तंजावरावरही स्वारी करून तें काबीज करावें, अशी प्रबळ इच्छा उत्पन्न झाली, व त्यानें तंजावरच्या दरबारांतील दुफळीचा फायदा घेऊन, इ. स. १७३७ मध्यें तंजावरावर स्वारीही केली. परंतु तंजावरच्या रणशूर मराठे सरदारांपुढें त्याचें बिलकूल तेज न पडून त्यास विन्मुख परतावें लागलें, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. तथापि, त्याच्या अधिकारप्रभावामुळें व त्याच्या कारस्थानपटुत्वामुळें त्याचें वजन कर्नाटकामध्यें दिवसेंदिवस अधिक वाढत जाऊन, खुद्द तंजावरच्या गादीस त्याचें फार भय उत्पन्न झालें. राजा प्रतापसिंह ह्यानें गुप्त रीतीनें त्याचा वेळींच प्रतिरोध करण्याचा संकल्प केला.

तंजावर येथील सय्यदखान नांवाचा किल्लेदार शिरजोर होऊन, तो अंतस्थ रीतीनें प्रतापसिंह राजास सत्ताहीन व निर्बल करून टाकण्याचा प्रयत्न करीत होता, ह्याचा उल्लेख वर केला आहे. ह्या सय्यदखानानें गुप्त रीतीनें चंदासाहबाकडे राजकारण करून, त्याच्या मुलास आपली मुलगी द्यावी व त्याच्या साह्यानें तंजावरचें राज्य हस्तगत करून तें आपण चालवावें, अशी मसलत योजिली. ही गोष्ट राजा

---

Subder Ali, and his son-in-law Chunda Sahib, to seize any opportunity which might offer of getting possession of the capital.

The result was tragical. Chunda Sahib, who already owed his advancement to his matrimonial arrangements, was fortunate enough to excite the tender regard of the Ranee. Accordingly he was enabled to prevail on the love striken lady to admit him with a body of troops into the city of Trichinopoly, having first taken an oath on the Koran that he would act in nothing to her detriment. But the loves of middle aged queens are not always fortunate, and Chunda Sahib proved more cruel to the Ranee than Æneas proved to Dido. There is however a slight difference between the classical legend and the modern story. Æneas broke the heart of Dido by running away; whereas Chunda Sahib broke the heart of the Ranee by remaining where he was. The latter seized the city of Trichinopoly, and there imprisoned the lady; upon which the latter died of grief and the kingdom of Trichinopoly yielded to the authority of the faithless Chunda." :—*Madras in the Olden Times, pages* 549-50.

प्रतापसिंह ह्यास समजली. तेव्हा त्यानें मोठ्या शहाणपणानें सय्यदखानाचा समाचार घेऊन, त्याचें खूळ तंजावरांतून नाहींसें करण्याचा विचार आरंभिला. त्यानें प्रथम, सय्यदखानाचा बंधू सय्यद कासीम यास अनुकूल करून घेतलें, व त्याच्या मार्फत, त्याचा व चंदासाहेबाचा झालेला गुप्त कट माहित करून घेतला. तंजावरचा किल्लेदार सय्यदखान ह्यानें, चंदासाहेबाच्या मुलास आपली मुलगी देण्याचें निश्चित करून, प्रतापसिंह महाराजांस लग्नाचें निमंत्रण दिलें, आणि त्यांस सांगितलें कीं, "मीं माझी बेटी चंदासाहेबाच्या मुलास अर्पण करण्याचा निश्चय केला आहे. चंदासाहेब बलवान् व प्रतापी पुरुष असल्यामुळें त्याच्याशीं संबंध केल्यानें तंजावरच्या गादीस फार बळ प्राप्त होईल." प्रतापसिंह महाराजांस सय्यदखानाचें सर्व कृत्रिम माहित होतें. तेव्हां त्यांनीं वरकरणीं ह्या शरीरसंबंधास आपली पसंती दर्शवून चंदासाहेबाची फार स्तुति केली, व लग्नास लागेल तो खर्च देण्याचें मान्य केलें. लग्न मात्र तंजावरच्या किल्ल्यामध्यें न करितां मध्यार्जुनामध्यें करावें अशी सूचना केली. त्याप्रमाणें सय्यदखानानें चंदासाहेबाच्या मुलाबरोबर आपल्या मुलीचें मोठ्या थाटानें मध्यार्जुन येथें लग्न केलें, आणि चंदासाहेबाशीं सर्व राजकारणांचें खलबत करून, तंजावरच्या किल्ल्यावर त्यानें गुप्त रीतीनें अमुक वेळीं हल्ला करावा, असा संकेत ठरविला. ही गोष्ट सय्यदखानाच्या बंधूनें कागदपत्रानिशीं प्रतापसिंह महाराजांस कळविली. त्यांनीं वेळींच सावध होऊन, आपले मुख्य सरदार मल्हारजी गाडेराव, अन्नपा शेटगे, आणि मानाजीराव जगताप ह्यांच्या सल्ल्यानें, सैन्याचा सर्व बंदोबस्त पक्का करून, सय्यदखानास आपल्या राजवाड्यांत कांहीं राजकारणनिमित्य बोलाविलें, आणि तेथें त्यास कैद करून सरदारलोकांच्या ताब्यामध्यें दिलें. त्यांनीं त्यास स्वर्गलोकची वाट दाखविली. ह्याप्रमाणें त्यांनीं त्या प्रमत्त सय्यदखानाचा कायमचा बंदोबस्त केला; आणि मल्हारजी गाडेराव प्रभृति मराठे सरदारांना, राज्याचे मुख्य अधिकार देऊन, तंजावरचें एक खूळ नाहींसें केलें.*

---

* मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफ् साहेब ह्यांनीं आपल्या इतिहासामध्यें ह्या सय्यदखानाच्या शिरजोरपणाचा व त्याच्या वधाचा संक्षिप्त उल्लेख केला आहे. तो येणेंप्रमाणें:—

"The nominal Raja of Tanjore was the grandson of Sivajee's brother Venkajee. Tookajee, the youngest of Venkajee's three sons was the only one who had issue ; and at this period two sons of Tookajee's remained alive; the one, Syajee, was legitimate, the other, Pertaub Sing, was the son of a concubine. The Government was administered under the name of the former, but the power was held by a Mahommedan officer, who, since the time of Tookajee, had been vested with the command of the fort of Tanjore.

अशा प्रकारें सय्यदखानासारखा तंजावरच्या गादीचा एक प्रबळ शत्रु नाहींसा झाला. तथापि, त्याच्या वधाची वार्ता चंदासाहेबांस कळतांच, तो खवळून जाऊन तंजावरावर चालून आला, व त्यानें दोन महिनेपर्यंत तंजावरास वेढा दिला, व तें पादाक्रांत करण्याचा एकसारखा प्रयत्न चालविला. अशा प्रकारें चंदासाहेबाचें महत्संकट जाणून, राजा प्रतापसिंह ह्यानें, आपले भाऊबंद जे सातारचे छत्रपति शाहूमहाराज व त्यांचे पेशवे ह्यांस, स्वसैन्यानिशीं मदतीस येण्याबद्दल विनंतिपत्रें लिहिलीं. छत्रपति शाहूमहाराज ह्यांना, तंजावरच्या मराठी संस्थानाचा पूर्ण अभिमान असून, त्याचें संरक्षण करणें हें आपलें कर्तव्य आहे असें वाटून, त्यांनीं पेशव्यांच्या सल्लामसलतीनें, फत्तेसिंग भोंसले व रघूजी भोंसले ह्या दोन मराठे सरदारांबरोबर निवडक सैन्य देऊन, त्यांना कर्नाटकच्या स्वारीस पाठविलें. त्याप्रमाणें हे प्रसिद्ध सरदार इ. स. १७४० मध्यें आपलें लढाऊ सैन्य घेऊन तंजावरच्या राजाच्या मदतीसाठीं कर्नाटकामध्यें उतरले.

कर्नाटक प्रांतावर मराठ्यांचा अंमल शिवाजीमहाराज व त्यांचे बंधू व्यंकोजी राजे ह्यांच्या कारकीर्दींत चांगला बसला होता. परंतु पुढें तो संभाजी व राजाराम ह्यांच्या कारकीर्दींत कमी होऊन, तिकडे मुसलमानी राज्यसत्ता संस्थापित झाली, आणि दक्षिणचा सुभेदार निजामउल्मुलक व अर्काटचा नबाब सादत-उल्लाखान ह्यांचें प्राबल्य विशेष झालें. अर्काटचा नबाब मराठ्यांस खंडणी देत असे. तीही सादतउल्लाखान वारल्यानंतर –ह्मणजे इ. स. १७३२ पासून– मराठ्यांना मिळेनाशी झाली; व तंजावरच्या गादीस व हिंदु देवालयांस मुसलमान सुभेदारांचा विशेष ताप झाला. इ. स. १७३६ मध्यें चंदासाहेबानें त्रिचनापल्ली घेतल्यापासून तर तंजावरच्या गादीस विशेष भीति उत्पन्न झाली; आणि ती केव्हां नष्ट होईल त्याचा नेम राहिला नाहीं. तेव्हां ह्या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन, मराठ्यांचे छत्रपति शाहूमहाराज ह्यांनीं कर्नाटकावर फौज पाठवून तंजावरच्या राजघराण्यास संकट-विमुक्त करण्याचा निश्चय केला.*

---

Syajee, who some years afterwards placed himself under the protection of the English at Madras, was dispossessed by the officer, who raised Pertaub Sing to the head of the Government in 1741; but the new Raja would not submit to the control of his minister, and freed himself from a state of tutelage by assassination.'"—*Grant-Duff, Page* 250.

* प्रतापसिंह राजे ह्यांनीं मद्रासचे गव्हरनर लॉर्ड पिगॉट ह्यांस ता. ९ मार्च इ.स. १८६२ रोजीं एक पत्र लिहिलें आहे. त्यांत अर्काटच्या नबाबांनीं व त्यांच्या भाईबंदांनीं तंजावरचें राज्य गिळंकृत करण्याचा प्रयत्न केला, तेव्हां शाहूमहाराजांची कुमक घेऊन, स्वतःचा बचाव करावा लागला असा स्पष्ट उल्लेख आहे.

"At the death of Sandetulla Cawn, there appeared twelve Nabobs of the

मराठ्यांचा हा कर्नाटकावरील मोहिमीचा विचार, चंदासाहेबानें त्रिचनापली घेतल्यापासून चालू असावा, असें मानण्यास आधार मिळतो. परंतु ही मोहीम इ. स. १७३९ पर्यंत अमलांत आली नाहीं. इ. स. १७३९ मध्यें मराठ्यांना वसईचें युद्ध आणि दिल्लीकडील नादिरशाहाच्या स्वारीमुळें उपस्थित झालेलें नवीन संकट ह्यांपुढें ही मोहीम स्वीकारितां आली नाहीं. परंतु इ. स. १७३९ मध्यें ही मोहीम हातीं घेण्याचा नक्की विचार ठरून, बाजीराव पेशवे ह्यांच्या हाताखालीं ४०।५० हजार सैन्य देऊन त्यास कर्नाटक प्रांतावर पाठवावें, ही वाटाघाट शाहूमहाराजांचे दरबारांत चालू होती, हें निश्चित आहे.* परंतु अनेक कारणांमुळें इ. स. १७४० पर्यंत हा विचार सिद्धीस गेल्याचें दिसत नाहीं.

इ. स. १७४० मध्यें शाहूमहाराजांनीं मराठ्यांची जंगी फौज कर्नाटकामध्यें पाठविण्याचा निश्चय करून, रघूजी भोंसले, फत्तेसिंग भोंसले, श्रीपतराव प्रतिनिधि

---

Nawayet caste, who having raised an army of twelve thousand horse, entertained bad thoughts of usurping other people's governments and accordingly took possession of Trichinopoly, and with a design to usurp my government, seized all my country, and took away my treasure, elephants, horses, linen, arms, &c. At length they came near the fort to take it ; of which Sahu-Raja being acquainted, detacted a considerable army, under the command of Phattesing and Raghoji who punished Navayets, took Chanda Sahib prisoner, gave the Government of Trichinopoly to Morarey Row, and saved my country."—*Rous's Papers. App. No.* VI, 57.

* तंजावरच्या मराठी राज्यास अर्काटचा नबाब व चंदासाहेब वगैरेंनीं त्रास दिल्यामुळें कर्नाटकावर स्वारी करण्याचा मराठ्यांचा विचार दोन चार वर्षें घाटत होता, असें दुसऱ्याही माहितीवरून दिसून येतें. मद्रासच्या जुन्या कागदपत्रांत ता० ६ आगष्ट इ. स. १७३९ ह्या तारखेखालीं पुढील उल्लेख आढळतोः—

"Sou Rajah, about two years since, had meditated a design to fall upon this country with a powerful army, under the command of Bajee Row ; in order to revenge the insult offered his relations by the ambitious intentions of the Governors of this province to put themselves forcibly in the possession of Tanjore ; a kingdom which belonged to them (the Mahrattas) alone, and therefore would have been a direct invasion of their right. But Nadir Shah, in the interim, having penetrated very far into the empire, made him suspend his project for the present. However I am now certainly informed he will very shortly put it in execution. To this purpose he has made choice of between 40 and 50 thousand of his best troops, the flower of his army ; and given the command of them to Bajee Row, with express orders to lay waste this whole country."

ह्यावरून बाजीरावाच्या हाताखालींच सैन्य देऊन कर्नाटकावर स्वारी करण्याचा शाहूमहाराजांचा विचार होता कीं काय न कळे !

व दुसरे लहान लहान मराठे सरदार ह्यांची ह्या मोहिमीवर योजना केली; आणि इतिहासप्रसिद्ध रणशूर संताजी घोरपड्याचे वंशज गुत्तीकर मुरारराव घोरपडे ह्यांना तुंगभद्रेजवळ तीन तालुके देण्याचें मान्य करून, त्यांनाही आपल्या सैन्यानिशीं सामील होण्याबद्दल आज्ञा केली. येणेंप्रमाणें हें सर्व सैन्य एकत्र होऊन, इ. स. १७४० च्या एप्रिल महिन्यामध्यें अर्काटप्रांतांत येऊन दाखल झालें.

अर्काटचा नबाब दोस्तअल्लीखान हा, मराठ्यांचें प्रचंड सैन्य आपल्या प्रांतावर चालून येत आहे हें पाहून, त्यांच्याशीं टक्कर देण्याकरितां, कडप्पा व अर्काट ह्या दोन जिल्ह्यांच्या मध्यें दमलचेरीचा जो घांट आहे, ती सुरक्षित जागा समजून, तेथें आपले ४००० हजार घोडेस्वार व ६००० पायदळ इतक्या फौजेनिशीं येऊन दाखल झाला. मराठ्यांचें सैन्य घांटाच्या पलीकडे होतें. त्यांनीं प्रथम सामदामाचीं बोलणीं लाविलीं, परंतु नबाबानें त्यांस उडवाउडवीचीं उत्तरें दिल्यामुळें त्यांनीं, ता. ९ मे इ. स. १७४० रोजीं, १०००० घोडेस्वार एका जंगलांतून आडमार्गानें पुढें पाठवून, नबाबाच्या सैन्यास वळसा घातला; आणि बाकीच्या फौजेनें डोंगरावर चढून सर्व मान्याच्या जागा हस्तगत केल्या; आणि नबाबाच्या सैन्यापुढें उभे राहून सन्मुख युद्ध आरंभिलें. नंतर अर्काटचा नबाब व मराठे ह्यांचें तोफा व बंदुका ह्यांचें घनघोर युद्ध झालें. त्यामध्यें मराठ्यांनीं आपला शौर्यप्रभाव विशेष गाजविला आणि अद्वितीय यश संपादन केलें. अर्काटचा नबाब दोस्तअल्लीखान व त्याचा धाकटा मुलगा हुसेनअल्ली आणि कित्येक दुसरे नामांकित सरदार हे रणांगणीं पतन पावले. आणि अर्काटचा मुख्य दिवाण मीरआसद हा मराठ्यांच्या ताब्यांत आला. अर्थात् मुख्य नबाब पतन पावून शत्रूस हस्तगत झाल्यामुळें सर्व सैन्याची दाणादाण उडाली व तें सैरावैरा पळून गेलें. त्यामुळें मराठ्यांना अर्काट प्रांतामध्यें इतस्ततः संचार करून आपला अंमल बसविण्यास चांगली संधि मिळाली.

दोस्तअल्लीखान ह्याचा वडील मुलगा सफदरअल्ली हा स्वसैन्यानिशीं आपल्या बापाच्या मदतीकरितां चालून येत होता. त्यास हें दमलचेरीच्या खिंडींतील युद्धाचें भयंकर वर्तमान समजतांच, तो वेलोर येथें स्वतःच्या संरक्षणासाठीं पळून गेला, व तेथील किल्ल्याचा त्यानें आश्रय केला. चंदासाहेब हा त्रिचनापल्लीहून ५००० हजार घोडेस्वार व १०००० पायदळ ह्यांच्यासहवर्तमान, अर्काटच्या नबाबाच्या साह्याचें मिष करून मराठ्यांवर चालून येत होता, तोही तसाच मागचा पाय काढून त्रिचनापल्लीस निघून गेला. अशा रीतीनें मराठ्यांच्या ह्या विजयवार्तेनें त्यांचा कर्नाटकांत सर्वत्र दरारा बसला, आणि त्यांचे प्रतिस्पर्धी कांहीं काल अगदीं हताश होऊन स्वतःच्या बचावाचे मार्ग शोधूं लागले.

अर्काटचा नबाब दोस्तअलीखान हा दमलचेरीच्या युद्धामध्यें मृत्यु पावल्यामुळें अर्काटची गादी रिकामी झाली. तिचा खरा वारस दोस्तअलीखानाचा मुलगा सफदरअलीखान हा होता. परंतु त्यास, मराठ्यांना पुष्कळ खंडणी देऊन त्यांचें कृपासाह्य घेतल्यावांचून, ती प्राप्त होणें दुर्घट होतें. चंदासाहेब हा सफदरअलीखानाचा बाह्यात्कारें हितचिंतक होता. परंतु त्याची मनीषा परिस्थिति अनुकूल झाल्यास स्वतःच अर्काटचें राजपद घ्यावें ही होती. सफदरअली व अर्काटचा दिवाण मीरआसद ह्या दोघांस चंदासाहेबाचें कृत्रिम कळून चुकलें होतें. त्यांनीं उभयतांनीं, मराठ्यांशीं तह करून त्यांना, मागतील ती खंडणी व सांगतील तो प्रांत देऊन, आपला पक्ष खंबीर करावा, आणि आपला प्रतिस्पर्धी जो चंदासाहेब, त्याचें मराठ्यांकडून समूळ उच्चाटण करवावें ह्मणजे पुनः भीति राहणार नाहीं, असा विचार केला; आणि त्यांनीं मराठ्यांशीं तहाचें बोलणें लाविलें. मराठ्यांना चंदासाहेबाचें प्राबल्य नाहींसें करून, तंजावरच्या राजावरील संकट दूर करावयाचें होतें. तेव्हां त्यांनीं, मीरआसद व सफदरअली ह्यांची विनंति मान्य करून, त्यांच्याकडून ता. १६ नोव्हेंबर इ. स. १७४० रोजीं पुढें लिहिल्याप्रमाणें तह करून घेतला. हा तह फार महत्त्वाचा असून, ह्यांत चंदासाहेबाची त्रिचनापल्ली येथील सत्ता नाहींसी करण्याचा मुख्य प्रयत्न आहे. हा तह येणेंप्रमाणें:—

"तहनामा ब मारफत आजम मीर आसदउल्लाखान सुभेदार तालुके अर्काट व त्रिचनापल्ली वगैरे. छ ७ रमजान सुरू सन इहिदे आर्बैन मया व अलफ.

बंदोबस्त तालुका अर्काट वगैरे तुमचे मुद्देमाफक करूं. कलम १.

कर्नाटकचें कामकाज जें करणें तें तुमच्या इतल्याखेरीज न करूं. कलम १.

त्रिचनापल्लीचा मजकूर, आह्मी फौजेनिशीं आलियावरी, तुह्मीं भारी फौजेनिशीं सामील व्हावें; दोघांचे तरतुदीनें जागा घ्यावी; व आणिकही पाळेगार सामील करून घ्यावे. आणीक फत्ते जालियावर, किल्ल्यांतील मालमवेसी पैका असेल तो आह्मीं घेऊन, खालीं किल्ला तुमचे हवाला करूं. तालुक्याचे किल्ले व बंदर व मुलूख जो असेल, तो तुमचे हवाला करूं. चंदाखान वगैरे जे सरदार सांपडतील, त्यांजपासून खंड पैका घेऊन, त्यापैकीं तिजाई तुमचे फौजेस देऊन, दोन तकसिमा सरकारांत घेऊं आणि त्यांस तुमचे जिमे करूं. कलम १.

चंदाखान वगैरे लाखों रुपये देतील, तरी गोष्टीवर मन न द्यावें. कराराप्रमाणें त्रिचनापल्ली वगैरेचा बंदोबस्त करून तुह्मांस द्यावें. कलम १.

आमच्या तुमच्या दरम्यान, चंदाखान व ताकी (महमदखान) वगैरे बोलीस पुढें

जाबसालास कोणी नसावें. आपले विरुद्ध मोंगल, गनीम, पाळेगार असतील, त्यांस तंबी पोंचवावी. कलम १

करारबाब जाहला असेल त्याबद्दल येथें मुक्रार केली आहे. त्याबद्दल मीर आसद यास रवाना केलें असे. त्याबरोबर एक माणूस मातबर पाठवावा. जो करार जाला असेल, त्यास दरम्यान बेलभंडार, महादेव, श्रीव्यंकटेश, व खंडेराव, विठोबा, भवानी, पीर दस्तगीर दरम्यान असे. त्यास, बोली लाऊं, त्यांत तफावत पडणार नाहीं. दरम्यान देव असे.

मीर आसदउल्ला अगर हरकोणी तुह्मांकडील मातबर, कामकाजाबद्दल येईल, त्यास जबाबसाल करून बिदागी करावी. आवकाश न करावा. शिरपांव बहुमान देऊन रुकसत लावावें. कलम १.

तुह्मी व आह्मी एक होऊन, आणीक स्थळें जीं असतील, तेथें जो पैका साधेल त्याचा हिस्सा तिजाई तुह्मांस देऊं. कलम १.

येकूण कलमें सुमारें आठ ८. येणेंप्रमाणें करारबाब जाहला असे. सदरहूप्रमाणें चालावें. दरम्यान तजावत तफावत करूं नये. छ. मजकूर."

ह्याप्रमाणें मराठ्यांनीं मीर आसद ह्याच्याशीं तह केला व त्याच्याच सल्ल्यानें त्रिचनापल्लीवर योग्य संधि साधून हल्ला करण्याचा निश्चय केला.

मध्यंतरीं रघूजी भोंसले हे शिवगंगा येथें मराठ्यांच्या सैन्याचा तळ ठेवून महाराष्ट्रांत परत आले. ह्याच वर्षीं (इ. स. १७४०) बाजीराव पेशवे मृत्यु पावले होते. त्यांचीं पेशवाईचीं वस्त्रें, बाळाजी बाजीराव ह्यांस न मिळतां, बाबूजी नाईक बारामतीकर ह्यांस मिळावीं, असा रघूजी भोंसले यांचा मानस होता. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां ते पुनः कर्नाटक प्रांतामध्यें परत आले. त्यांच्या बरोबर बाबूजी नाईक हेही आले. ह्यांनीं सर्वांनीं मिळून, त्रिचनापल्लीवर हल्ला करून चंदासाहेबास नेस्तनाबूत करावें असा संकल्प केला; व त्यांनीं कर्नाटकांतील सर्व हिंदु राजे व पाळेगार ह्यांचें साह्य घेऊन चंदासाहेबावरील स्वारीची कडेकोट तयारी केली.

तंजावरचे राजे प्रतापसिंह ह्यांस, चंदासाहेबाचें निर्मूलन होऊन त्रिचनापल्ली मराठ्यांच्या ताब्यांत यावी व आपली सत्ता सुरक्षित राहावी, ही फार इच्छा होती. तेव्हां त्यांनीं मराठ्यांच्या सैन्यास कुमक करून, लागेल तें साह्य देण्याचें मान्य केलें; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं छत्रपति शाहू महाराज व त्यांची राणी व सरदार रघूजी भोंसले व फत्तेसिंग भोंसले ह्यांसही मोठमोठ्या नजरा देण्याचें मान्य केलें. तंजावरचे राजे प्रतापसिंह ह्यांचे मार्फत तिमाजी रंगनाथ व गंगापा ह्यांनीं ह्या वेळीं मराठ्यांशीं जो तह केला, तो येणेंप्रमाणें:—

"तहनामा संस्थान चंदावर मार्फत तिमाजी रंगनाथ व गंगापा सु॥ इहिदे आर्बैन मया व अलफ.

करार रुपये.

३००००० राजश्रीची नजर.
२००००० मातुश्रीची नजर.
२००००० उभयतां सरदार यांची नजर.
८००००० फौजेस खर्चास.
१५०००००

यांसी मुदती.

२००००० सध्यां द्यावे.
३००००० अनाजी लिंगो ब॥ आणावे.
५००००० राजश्रीची निशा करून देऊं.
५००००० आठा रोजांनीं द्यावे.

एकूण पंधरा लक्ष रुपये रास्त कलम १.

तीन लाख रुपये पेशव्यांसीं तुह्मीं करार केला, परंतु बशर्त अंमल सादुल्लाखान जाजती जहाले, तरी ज्यादा द्यावी. कलम १.

त्रिचनापल्ली घ्यावी. चंदाखानास काढावा. कलम १.

अनाजीस उगवणी चार हजार ++ पंधरा हजार पैदास्त दारूगोळा जें सामान मोर्चांचें लागेल, तें पुरवून आपण येऊन मोर्चे लावावे. कलम १.

येणेंप्रमाणें चौ कलमांचा तहनामा केला असें. कळावें. छ ६ जिल्काद."*

* हा तह ता. १३ जानेवारी १७४१ इसवी रोजीं झाला. मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रांटडफ साहेब ह्यांनीं, तंजावरसंस्थानानें ह्या वेळीं मराठ्यांशीं स्नेहभावाचा पत्रव्यवहार चालविला, एवढाच उल्लेख केला आहे. त्यांना ह्या तहाची माहिती मिळाली होती असें दिसत नाहीं. ते लिहितातः—

"It appears however that the Tanjore state, though then agitated by fractions, entered into a friendly correspondence, with their countrymen, but whether to avert attack, or to afford assistance is not mentioned.":—*Grant Duff's History.*

हा तह होण्याच्या पूर्वीं सुमारें ९।१० वर्षांपासून, मराठ्यांचें तंजावरच्या राज्यासंबंधाचें राजकारण चालू होतें असें दिसतें. ता. ३१ आक्टोबर इ. स. १७३२ रोजीं रामचंद्र पंडित ह्यांच्या विद्यमानें झालेला पुढील करार वाचण्यासारखा आहे. परंतु ह्याप्रमाणें तंजावरचें राजकारण इ. स. १७४१ पर्यंत अमलांत आलें नाहीं.

"तहनामा चंदावरकर बोली विद्यमान राजश्री रामचंद्र पंडित सुरसन सल्लास सल्लासीन मया व अलफ. खासगत बोली रामचंद्र नाईकः—

नालबंदी सा लक्षपैकीं तीन लक्ष रुपये, यास हुंडणाजवळ जे पडेल ते वजा करून, बाकीच्या हुंड्या अवरंगाबाद अथवा भागानगर येथें आणून द्याव्या. कलम १.

ह्याप्रमाणें तंजावरचें सैन्य मराठ्यांच्या मदतीस येऊन, सर्व संयुक्त सैन्यानें त्रिचनापल्लीस वेढा दिला. ह्या वेढ्याची विस्तृत माहिती देण्याचें हें स्थल नाहीं. परंतु एकंदरींत त्रिचनापल्ली हें प्राचीन ठिकाण चंदासाहेबाच्या हातांत राहूं नये ह्मणून, सर्व हिंदु सैन्यांनीं ह्या वेळीं मोठ्या वीरश्रीस चढून, मोठें निकराचें युद्ध केलें. चंदासाहेब त्रिचनापल्लीच्या बळकट किल्ल्याचा आश्रय धरून मोठ्या हिय्यानें लढत होता. परंतु किल्ल्यांतील सामुग्री लवकरच संपत आली, त्यामुळें त्यास मराठ्यांशीं टक्कर देणें अशक्य वाटूं लागलें. तेव्हां त्यानें मराठ्यांशीं किल्ला स्वाधीन करण्याबद्दल बोलणें चालू केलें; आणि अगदीं निर्वाणींचा उपाय ह्मणून त्यानें आपला भाऊ बडासाहेब ह्यास मदुरेहून स्वसैन्यानिशीं कुमकेस आणविलें. परंतु मराठ्यांनीं, त्याचें सैन्य त्रिचनापल्लीस पोंचण्यापूर्वींच, त्यावर तुटून पडून त्यास मोक्ष दाखविला. ह्या चकमकीमध्यें उभय पक्षांचे २००० लोक धारातीर्थीं पतन पावले! अर्थात् अशा रीतीनें चोहों बाजूंनीं निराश होऊन चंदासाहेबास त्रिचनापल्लीचा किल्ला ता. २६ मार्च इ. स. १७४१ रोजीं शत्रूच्या स्वाधीन करावा लागला.* चंदासाहेबानें आपलीं बायकामुलें अगोदरच पांडेचरीस फ्रेंच लोकांच्या

---

बाकी तीन लक्ष रुपये उरले, ते आपले वकिलाचे हवालीं करावे. कलम १.

चंदी प्रांत हस्तगत जालियावर तेथील धंदा तुम्हांस सांगूं. कलम १.

चंदावर २ रा बाबद जो ऐवज येणेंचा + + + + तो देऊं. कलम १.

चंदावरकरांस पत्रें वगैरे पाठविणें तें राजश्री काशीबानाईक यांचे विद्यमानें पाठवूं. त्यांणीं आमचे मार्येत वर्तावें, म्हणजे सदर्हूप्रमाणें केलें जाईल. कलम १.

चंदावरकरांचा कारभार सिद्धीस गेल्यानंतर तुमचा परामर्ष करणें तो करूं. अंतर होणार नाहीं. कलम १.

एकूण पांच कलमें करार केलीं असेत. याप्रमाणें तुम्हीं आम्हीं वर्तावें. छ २२ जमादिलावल."

* ग्रांटडफ व ऑर्मे हे ता. २६ मार्च इ. स. १७४१ त्रिचनापल्लीचा किल्ला मराठ्यांनीं जिंकून घेतला असें लिहितात. मद्रासच्या जुन्या कागदपत्रांमध्यें ता. १३ मार्च इ. स. १७४१ ही तारीख दिलेली आहे. परंतु ता. २६ मार्च हीच तारीख बरोबर असावी असें आनंदरंग पिल्ले ह्यांच्या रोजनिशीवरूनही सिद्ध होतें. तींत पुढील उल्लेख आढळतो:—

"On Saturday the 16th instant [ 25th March ], Raghoji Bhonsla directed the Poligars, the Kallar of the Maravan Tondiman, and the Pindaris, to scale the walls of the fort of Trichinopoly, and they did so simultaneusly from all quarters. Chanda Sahib, who was besieged there, seeing that his life would be in danger if he remained any longer, treated for terms, through the medium of a Pathan nobleman. He agreed to pay a sum of twelve lakhs of rupees to the Mahrattas, on condition that he should be allowed to retire in safety. At midnight of the same day, he repaired to the Mahratta camp outside the fort, together with his son, Abid Sahib, his son-in-law, Khan Bahadur, and Sharif Sahib. When Raghoji Bhonsla met these four individuals, he said nothing in his camp. The fort at Trichonopoly was occupied by the Mahrattas, and their standard was hoisted there."

—*Anand Ranga Pillai's Diary. Vol 1., Page 162.*

आश्रयास नेऊन ठेविलीं होतीं. फक्त त्याचा वडील मुलगा मात्र त्याचे जवळ होता. त्रिचनापल्ली मराठ्यांच्या स्वाधीन केल्यानंतर त्यानें ८ लक्ष रुपये खंडणी देऊन स्वतःची व मुलाची सुटका करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु मराठ्यांनीं तें मान्य न करितां, त्यास व त्याच्या पुत्रास आपल्या कैदेंत ठेविलें; आणि मोठ्या बंदोबस्तानें त्यांची रवानगी सातारा येथें केली. चंदासाहेब व त्याचा पुत्र हे साताराच्या किल्ल्यावर इ. स. १७४१ पासून १७४८ पर्यंत कैदेंत होते, हें इतिहासवाचकांस विदित असेलच. असो.

ह्याप्रमाणें रघूजी भोंसले व फत्तेसिंग भोंसले ह्यांनीं त्रिचनापल्ली पादाक्रांत करून हिंदूंचें परम पवित्र व पूज्य देवस्थान जें श्रीरंग, तें यवनांच्या त्रासापासून विमुक्त केलें; आणि तंजावरच्या राज्याची पीडा दूर केली. ह्या योगानें त्यांची प्रतापकीर्ति सर्व कर्नाटकांत व महाराष्ट्रांत पसरून मराठ्यांचा दरारा त्या प्रांतीं विशेष बसला. ह्या सर्व वेळ्यामध्यें गुत्तीकर मुरारराव घोरपडे ह्यांनीं फार अंगमेहनत केली व चांगलें कर्तृत्व व शौर्य दाखविलें; ह्मणून रघूजी भोंसले ह्यांनीं त्यांस त्रिचनापल्लीचे सुभेदार नेमून, तेथील सर्व व्यवस्था त्यांच्या ताब्यांत दिली. मुरारराव घोडपडे हा नव्या दमाचा बाणेदार व कर्तृत्ववान् मराठा वीर ह्याच वेळीं उदय पावला व त्यानें पुढें आपल्या पराक्रमानें मराठ्यांचें नांव कर्नाटकामध्यें पुष्कळ वर्षें चांगलें गाजविलें. सारांश, कर्नाटकांतील सर्व अस्वस्थतेचें मूळबीज व सर्व राज्यकारस्थानांचा सूत्रचालक जो चंदासाहेब, त्यास मराठ्यांनीं रसातळास मिळवून, त्यास अगदीं हद्दपार केल्यामुळें तंजावरच्या प्रतापसिंह राजास मोठा संतोष झाला, व त्यानें मराठे सरदारांचें अभिनंदन करून, त्यांच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां त्यांस पुष्कळ पारितोषिकें दिलीं. 'भोंसलवंशचरित्रा'मध्यें असें लिहिलें आहे कीं, त्रिचनापल्लीचा किल्ला स्वाधीन झाल्यानंतर, तंजावरच्या प्रतापसिंह महाराजांनीं आपला कारभारी अण्णपा शेटगे ह्यास, रघूजी भोंसले व फत्तेसिंग भोंसले ह्यांच्या अभिनंदनार्थ पाठविलें. त्या वेळीं त्यांनीं, त्रिचनापल्लीचा किल्ला तुह्मी आपल्या ताब्यांत घ्या, ह्मणून किल्ल्या देखील त्याच्या स्वाधीन केल्या; परंतु महाराजांनीं त्यांचा स्वीकार केला नाहीं. असो. प्रतापसिंह महाराजांचें त्रिचनापल्लीच्या स्वारीमध्यें मराठ्यांस पुष्कळ साह्य झालें, हें निर्विवाद आहे. ह्या साह्याचा मोबदला जें राष्ट्रीय स्वास्थ्य, तें चंदासाहेब प्रतिबंधांत असेपर्यंत, सुमारें ८ वर्षेंपर्यंत, प्रतापसिंह महाराजांस चांगलें उपभोगितां आलें, एवढें येथें नमूद करणें अवश्य आहे.

---



टिपू सुलतानाच्या सिंहासनाचें व्याघ्रमुख.



टिपू सुलतानाच्या सिंहासनावरील रत्नजडित पक्षी.

# ३. म्हैसूरच्या टिपू सुलतानाचीं राजचिन्हें.

## १. सुवर्णसिंहासनाचें व्याघ्रमुख.

१८ व्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें दक्षिण हिंदुस्थानांत हैदरअली व त्याचा पुत्र टिपू सुलतान हे दोन फार बलाढ्य व वैभवसंपन्न राजकर्ते होऊन गेले. ह्यांनीं अगणित द्रव्य मिळवून श्रीरंगपट्टण येथें आपली राजधानी केली होती. त्यांच्या राजवैभवाचें वर्णन इतिहासांत नमूद आहे. हैदरअली ह्यानें शहाणपणानें म्हैसूरचें राज्य मिळविलें व टिपू सुलतानानें अहंपणानें तें गमाविलें, अशी ख्याति आहे. असो. श्रीरंगपट्टण येथील शेवटच्या युद्धामध्यें ता. ४ मे इ. स. १७९९ रोजीं टिपू मारला गेला, व त्याची सर्व संपत्ति इंग्रज लोकांच्या हातीं लागली. त्या संपत्तीपैकीं विशिष्ट राजचिन्हें— कीं ज्यांची योग्यता इतिहासदृष्ट्या अद्वितीय आहे अशीं —इंग्लडमध्यें नेऊन, त्यांनीं फार काळजीपूर्वक जपून ठेविलीं आहेत. ह्या शेषचिन्हांपैकीं टिपूच्या सुवर्णसिंहासनाचें व्याघ्रमुख, व त्याजवरील रत्न-जडित 'हुम्मा' पक्षी, आणि टिपूची विजयतलवार ह्यांची अल्प माहिती येथें सादर करितों.

टिपूचें सिंहासन फार मौल्यवान् व शोभिवंत असें होतें. तें अष्टकोणाकृति असून त्याच्या प्रत्येक कोंपऱ्यास एकेक अशीं सोन्याचीं आठ व्याघ्रमुखें बसविलेलीं होतीं. ह्यांपैकीं मधल्या दर्शनीय भागाचें व्याघ्रमुख फारच मोठें होतें. त्याचेंच चित्र प्रस्तुत येथें दिलें आहे. ह्या सिंहासनाचे पाय वाघाच्या पायांप्रमाणेंच केलेले असून, सर्व सिंहासन जणूं काय, वाघाच्या पाठीवरच बसविलेलें आहे, असें दिसत असे. टिपू सुलतानास वाघ हें जनावर फार प्रिय असून, तेंच त्यानें आपलें राजचिन्ह केलें होतें. त्याच्या हत्यारांवर व इतर सर्व वस्तूंवरही वाघाचें चिन्ह असे. "विजयी पुरुष हा ईश्वराचा वाघ आहे" अशा अर्थाचीं अक्षरें, त्याच्या सर्व हत्यारांवर, व्याघ्रमुखांच्या आकृतींत कोरलेलीं असत. प्रस्तुतच्या चित्रांत सुद्धां हीं अक्षरें आहेत. खेरीज, ह्यांत टिपूचा बाप हैदरअली ह्याजबद्दलही थोडा उल्लेख आहे. हें व्याघ्रमुख लांकडी असून, त्यावर शुद्ध सोन्याचे पत्रे मढविलेले आहेत. त्यांची जाडी $\frac{१}{१०}$ इंच आहे. ह्या वाघाचे दांत व डोळे स्फटिकाचे असून, ते खऱ्या वाघाच्या डोळ्यांप्रमाणें चमकत आहेत.

हें सिंहासन तयार करण्यास, टिपूनें इ. स. १७८८ चे सुमारास त्रावण-कोरच्या नायर लोकांवर स्वारी केली, त्या वेळीं प्रारंभ केला. आणि दुसऱ्या वर्षीं,

त्रावणकोरच्या राजावर पुनः स्वारी करण्याचे अगोदर, त्यानें आपल्या राज्यांत अशी द्वाही फिरविली कीं, ज्यांचीं लग्नें होणार असतील अशा सर्व लोकांनीं श्रीरंग-पट्टण येथें ह्या सिंहासनारोहणाचे समारंभाकरितां यावें, ह्मणजे त्यांचा प्रवासखर्च संस्थानांतून दिला जाईल. त्याप्रमाणें हजारों लोक टिपूच्या राजधानीकडे निघाले. परंतु टिपू सर्व हिंदु लोकांस मुसलमान करणार, अशी कंडी उठल्यामुळें ते भिऊन ताबडतोब परत गेले. त्यामुळें टिपूचा सिंहासनारूढ होण्याचा विचार रहित झाला. पुढें टिपू त्रावणकोरच्या स्वारींत गेला, परंतु तेथेंही त्याचा पराजय झाला. तेव्हां त्यानें सिंहासनावर बसण्याचा आपला बेत लांबणीवर टाकिला. तो अखेरपर्यंत सिद्धीस गेला नाहीं! कोणी कोणी असेंही ह्मणतात कीं, इ. स. १७९२ मध्यें श्रीरंगपट्टणच्या तहानें जो मुलूख इंग्रजांकडे गेला होता, तो परत मिळविल्याखेरीज सिंहासनावर बसावयाचें नाहीं, असाही त्याचा संकल्प होता!! एकंदरींत, टिपूस ह्या अप्रतिम सिंहासनाचा दर्शनानंदापेक्षां दुसरा उपभोग घेतां आला नाहीं. असो.

लॉर्ड ह्यारिस व जनरल वेलस्ली ह्या इंग्रज सेनापतींनीं इ. स. १७९९ मध्यें टिपूवर स्वारी करून त्याचें राज्य जिंकून घेतल्यानंतर, हें व्याघ्रमुख व दुसऱ्या अनेक वस्तू, लढाईचीं विजयचिन्हें ह्मणून विलायतेस पाठविल्या. त्या कांहीं दिवस ईस्ट इंडिया कंपनीच्या पदार्थसंग्रहालयांत ठेविल्या होत्या. इ. स १८३१ मध्यें मार्किस ऑफ् वेलसली ह्यांच्या सूचनेवरून, त्या चौथे विलयम् बादशाहा यांस नजर करण्यांत आल्या. त्या त्यांनीं आपल्या 'विंडसर क्यासल' येथें प्रदर्शनार्थ ठेविल्या. त्या अद्यापि तेथेंच आहेत. त्या पाहून प्रत्येक प्रेक्षकास इंग्रज लोकांच्या शौर्यपरा-क्रमाबद्दल आदरबुद्धि वाटल्यावांचून राहत नाहीं. ह्या ऐतिहासिक वस्तू ह्मणजे ब्रिटिश राष्ट्रास सदैव भूषणास्पद होणारीं अपूर्व व अमूल्य अशीं विजयचिन्हेंच होत ह्यांत शंका नाहीं.

## २. रत्नजडित 'हुम्मा' पक्षी.

वर वर्णन केलेल्या टिपूच्या सुवर्णमय सिंहासनावर बहुमूल्य मोत्यांची झालर असलेलें एक छत होतें, व त्या छतावर एक सुंदर रत्नजडित पक्षी होता. त्याचें चित्र सोबत दिलें आहे. ह्या पक्ष्याचा आकार लहानशा खबुतराएवढा होता. हा इराण देशांत सुप्रसिद्ध असलेला 'हुम्मा' नामक पक्षी होय. हा 'हुम्मा' पक्षी नेहमीं आकाशांत उडत असून, त्याची सावली ज्याच्या डोक्यावर पडते, तो राजा होतो, अशी समजूत इराणी लोकांत आहे. हा अप्रतिम रत्नजडित पक्षी इ. स. १७९९ मध्यें वेलसली साहेबांनीं, राजे तिसरे जॉर्ज बादशाहा यांस

नजर करण्याकरितां, विलायतेस ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर्सकडे पाठविला. तेव्हांपासून तो तेथील राजकीय संग्रहालयांत वास करीत आहे.

ह्या पक्ष्यासंबंधानें अशी एक आख्यायिका आहे कीं, म्हैसूरवरील स्वारीची तयारी चालली असतांना, वेलसली साहेबांचा मुक्काम मद्रास येथें मि० पेट्री यांच्या येथें होता. दिवस उन्हाळ्याचे होते; सबब दोन प्रहरचें काम वेलसली साहेब बागेंत बसून करीत असत. ते ज्या वटवृक्षाच्या छायेखालीं बसत, त्या वृक्षावर एक 'हुम्मा' पक्ष्याचें घरटें होतें. त्यामुळें त्या पक्ष्याची छाया त्यांच्यावर अनायासेंच पडे. हा मोठा शुभ शकुन होत असे. वेलसली साहेबांस पुढें अपूर्व विजय व ऐश्वर्य प्राप्त झालें, त्याचें हें शुभ चिन्ह होतें, असें ह्मटलें तरी चालेल. आणि, म्हैसूरच्या स्वारींत वेलसली साहेबांस जें यश आलें, तें ह्यामुळेंच आलें, असें त्या वेळचे वेलसली साहेबांच्या परिवारांतले एतद्देशीय लोक ह्मणत असत. हा रत्नखचित अलंकार इ. स. १८४० सालीं लॉर्ड वेलसली यांस, त्यांच्या टोपीवर तुरा ह्मणून लावण्याकरितां सन्मानार्थ देण्यांत आला.

हा पक्षी ठेवण्याकरितां जी बैठक केली आहे. ती हिंदुस्थानांत केलेली नसून इंग्लंडमध्यें तयार केलेली आहे.

ह्या पक्ष्याच्या चित्रामध्यें दुसरा एक लहानसा शिक्का आहे, तो टिपू सुलतानाचा खासगी शिक्का असून, तो त्याच्या राजकीय शिक्क्यासारखाच परंतु आकारानें किंचित् लहान आहे. हा शिक्का सुवर्णखचित असून त्यांत एक लाल दगड बसविलेला आहे. त्याच्यामध्यें कुराणांतील दोन वाक्यें कोरलेलीं आहेत. त्यांपैकीं मध्यभागीं महंमदाचे **"तुला मी पूर्ण अधिकार प्राप्त करून देतों"** अशा अर्थाचे शब्द आहेत. शिक्क्याच्या वर्तुलामध्यें फारसी भाषेंतः—

> " The door was opened, so that I might bring
> Hyder Shah with royal title.
> Like sun and moon the world is under my signet."

अशा अर्थाचे शब्द आहेत.

इ. स. १८५४ सालीं हा शिक्का टिपूचे राजपुत्र गुलाम महमद व फिरोजशहा यांनीं पाहिला. त्यांनीं त्यांतील कोरलेल्या अक्षरांचा अर्थ "यावच्चंद्रदिवाकरौ परमेश्वर मला यश देवो" असा केला. हा शिक्का मार्किस आफ् वेलसली ह्यांनीं इंग्लंडच्या राजास नजर केला. तो 'विंडसर क्यासल' येथील राजकीय पदार्थसंग्रहालयामध्यें अद्यापि वास करीत आहे.

## ३. टिपूची विजयतलवार.

टिपू सुलतान श्रीरंगपट्टण येथील शेवटच्या युद्धामध्यें लढतां लढतां मृत्यु पावला. त्याचें प्रेत इंग्रज सेनापति जनरल बेअर्ड ह्यांचे हातीं सांपडलें. त्याबरोबर टिपूची रत्नजडित विजयतलवारही त्यांचे हातीं लागली. ह्या तलवारीच्या पात्याचा आकार किंचित् वेगळा असून तें फार पाणीदार आहे. हिची मूठ सोन्याचा मुलामा दिलेली असून, तिच्या टोंकास व्याघ्रमुखाचें चित्र कोरलेलें आहे. हें टिपू सुलतानाचें राजचिन्ह होय. ह्याशिवाय, मुठीच्या व पात्याच्या सांध्याजवळ दोन्ही बाजूंस लहान लहान व्याघ्रमुखें कोरलेलीं आहेत. तलवारीच्या पात्याची लांबी २ फूट ११$\frac{3}{4}$ इंच असून, त्यावर दोन्ही बाजूंस पारशी लिपींत, कुराणांतील विजयदर्शक वाक्यें कोरलेलीं आहेत. त्यांचा सारांश येणेंप्रमाणें:–

"O God! O Ali! Tipu Sultan. Help is from (God) and speedy victory. Abu Bakre. Umar Uthman."

"God is great. Mohammad. Most terrible thunderbolt to the soul of the infidels, Sword of Victory, firm foundation, Sultan of the Faith Haider. Victory is through help from (God) Sultan H."

ही टिपूची विजयतलवार, सर जॉन क्रॅडाक – जे पुढे लॉर्ड हौडेन ह्मणून प्रसिद्धीस आले, त्यांच्या संग्रहांत होती. हे गृहस्थ लॉर्ड कार्नवालिस ह्यांचे दोस्त असून, ते मद्रास येथें कांहीं दिवस गव्हरनरच्या हुद्यावर होते, आणि त्यांच्या ताब्यांत टिपूचे दोन मुलगेही होते. ह्यांनीं इ. स. १८११ मध्यें ही मूल्यवान् वस्तू इंग्लडच्या राजास नजर केली. ती अद्यापि 'विंडसर क्यासल' येथील राजवाड्यामध्यें आहे. ह्या विजयतलवारीप्रमाणें हैदरअलीची तलवारही तेथें आहे.

ह्या वस्तूंखेरीज टिपूची नक्षीदार बंदूक, त्याचें शिरस्त्राण, आणि त्याचें राजकीय निशाण वगैरे अनेक ऐतिहासिक महत्त्वाच्या मूल्यवान् वस्तू 'विंडसर क्यासल' येथील राजवाड्यामध्यें फार काळजीपूर्वक जतन करून ठेविलेल्या आहेत. त्या पाहिल्या ह्मणजे इंग्रज लोकांची, ऐतिहासिक वस्तुसंग्रहाच्या कामीं दिसून येणारी अभिरुचि व आतुरता ह्या गुणांची प्रशंसा केल्यावांचून राहवत नाहीं.



वर्तमान, चंद्र ६ बुधवारीं बाई इंदुरास दाखल जाली. बाहेर बागांत राहिली आहेत. तेथें छत्री गौतमाबाईची व मालराव होळकर याची छत्री, दोन्ही छत्र्यांचे जवळ राहिली आहेत. येथें आली ते दिवशीं जमीदार व कमाविसदार वगैरे रयत भेटीस आले होते, परंतु भेट कोणाची जाली नाहीं. मालराव याचें स्मरण होऊन खेद बहुत केला. कमाविसदार मात्र भेटले. सर्वांस मेजवानी कमाविसदार यांनीं दिधली. दुसरे दिवशीं सावकार व रयत भेटली. लोक फार अजुर्दा आहेत. राजश्री खंडो बाबुराव यांजकडे येथील मामलत, आज अकरा वर्षें जाली आहे, ती त्यांजकडेच आहे. त्यामुळें रयतेचा बोभाट फार आहे. परंतु रयतेचा गौर करून, कमाविसदार यांसी तहकिकात करीत नाहींत. चार रुपये वाजवी, कमाविसदाराचे अंगीं लागू असतां, घ्यावे हें मानस नाहीं. उत्पन्न करून चार रुपये दौलतीस मिळवावे हें लक्ष नाहीं. पदरचेच मोडून भले ह्मणवीत आहेत. येथून एक दिवस गरुडतीर्थ आहे, तेथें जाऊन मुक्काम केला. मागतीं बागांत येऊन राहिली. गंगाभारती गोसावी मातबर, महेश्वरीं राहत होता, त्यास पालखी बाईनीं दिधली होती. सुभेदारापासून येथील दरबारचा. त्याचा काल चंद्र ९ शनवारीं जाला, त्यामुळें श्रमीच जाली. राजश्री शिवराव हरीचे कबिले भेलसे येथें अटकाविले होते. बराबर राजश्री देवराव हिंगणे होते. त्यास, राजश्री पाटिलबावांचीं पत्रें आणून कबिले वगैरे यांस मोकळे केले. राजश्री देवराव हिंगणे देशास गेले. इकडून आले नाहींत. हंड्याचे घांटानें गेले. अरुणकर फडणीस यांचा बंधू राजश्री गंगाधरपंत इकडून देशीं आले. बराबर सामान वगैरे होतें. त्यास इंदुरींहून राजश्री येऊन पावतील. जांब वगैरे घांटाचा बंदोबस्त करून देऊन रवाना केलें. राजश्री रघुनाथराव नारायण यांजकडील कमाविसदार सुजालपुरास जावयास आले. तूर्त इंदुरीं आहेत. राजश्री खंडेराव हरी यांजकडे सुजालपुरची मामलत आहे. त्याच्या सोडचिठ्या राजश्री पाटिलबावांचे विद्यमानें आणावयास वकील, राजश्री रघुपतराव नारायण यांजकडील गेला आहे. तो आल्यावर हे कमाविसदार महालीं जातील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६९.

**श्री.** २ जुलई इ. स. १७८४.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान रावसाहेब स्वामींचे सेवेसीं:–विनंति सेवक केसो भिकाजी दातार चरणांवर मस्तक ठेऊन कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना तागाईत चंद्र १३ माहे साबानपावेतों मुक्काम जांब नजीक घाट येथें

सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ४ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर जाहलें. त्यांत आज्ञा कीं, खासे धोतरजोडे महेश्वराहून फर्मासी, तुह्मांकडून करून आणविले आहेत. त्यांची लांबी रुंदी पूर्वीं लिहिली आहे, त्याप्रमाणें तुह्मी पाठवितां, ते उपयोगीं याउपरी नाहींत. याजकरितां रुंदी गज एक व लांब हात नऊ, किनार पेशजी बरहुकूम, याप्रमाणें पांच जोडे तयार करून पाठविणें. त्यास, आज्ञेवरून कारागिरास सांगून पांच जोडे करवून, रुंद सरकारी गज येथील कारागिराचे गजापेक्षां अधिक, त्यास सरकारचे गजाप्रमाणें दोन व येथील कारागिराचे गजाप्रमाणें तीन, एकूण पांच जोडे नऊ हात लांबीचे, कांठ किनारा पेशजी बरहुकूम, त्यांत एक गंगाजमनी कांठाचा. तपशीलः–

१३१॥ धोतरजोडे

५४ प्रा २ दर २७
५३ प्रा २ दर २६॥
२४॥ प्रा १ एक
———
१३१॥
·॥= वेष्टण खादी व मेणकापड.
———
१३२८=

एकूण पांच जोडे व वेष्टण मिळून, एकशें बत्तीस रुपये चवलाचे घेऊन सेवेसीं पाठविले आहेत. धोतरजोडे पावल्याचें उत्तर पाठवावयाची आज्ञा करणार धनी समर्थ आहेत. गंगाजलनिर्मळ अहल्याबाई होळकर इंदुरास गेली होती. त्यांचे शरीरीं शीतज्वर लागला आहे, याजकरितां महेश्वरास गेलीं नाहींत. तूर्त येथेंच मुक्काम करून राहिलीं आहेत. आरोग्य जालें ह्मणजे महेश्वरास जाणार. धोतरजोड्याची आज्ञा येऊन बहुत दिवस जाले. त्यास, मी बाईबराबरच आहें. याजकरितां दिवसगत लागली. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.”

---

पैं चंद्र २० साबान सन **लेखांक ७०.**
खमस समान. आषाढ. **श्री.** ता. ३ जुलई इ. स. १७८४.

“सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १४ माहे साबानपावेतों मुक्काम जांब नजीक घांट येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–खासे धोतरजोडे गजाची रुंदी व नऊ हात लांबीचे, पांच तयार करून पाठवणें ह्मणून आज्ञापत्र सादर जालें होतें. आज्ञेप्रमाणें पांच धोतरजोडे करून पाठविले आहेत. सरकारांत विनंतिपत्र पाठविलें, त्याची नक्कल

करून सेवेसीं पाठविली आहे. चंद्र ६ साबानीं डांकेबराबर पत्र पाठविलें त्या-अलीकडे वर्तमानः-बाईचे शरीरीं अद्याप समाधान नाहीं. एका दिवसाआड ज्वर व हिंवाचा कांटा येतो, याजकरितां येथें मुक्काम करून राहिलीं आहेत. आषाढ वद्य तृतीया सोमवारीं महेश्वरास जावें असा निश्चय आहे, पहावें. पत्राचा अन्वय बाईचे कानांवर घातला. उत्तर केलें कीं, समाधान वाटल्यावर पत्रें वाचून पाहूं. महेश्वरास गेल्यावर पत्रें देऊन, उत्तर घेऊन सत्वरच पाठवीन. वरचेवर ऐवज रवानगीविषयीं सुचवीतच आहे. बाजी यशवंत श्रीकाशींत संन्यास घेऊन होते, ते समाधिस्त जाहले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र ९ रमजान श्रावण मास सन खमस समानीन.

## लेखांक ७१.

श्री.

ता. २० जुलई इ. स. १८७४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-चंद्र १४ साबानीं डांके-बराबर सरकारचे धोतरजोडे सुमारें पांच रवाना केले व विनंतीपत्रें लिहून पाठविलीं आहेत. त्याअलीकडील वर्तमानः-बाई जांबेस होती, ज्वर दोन तीन मातबर आले. आठ दिवस ज्वर येतच होते. अस्तांत महेश्वरास जाऊं नये हीही अशंका होती. शेवटीं सर्वांचे विचारें ठरलें कीं, घरास जाण्यास अस्त असल्यास चिंता नाहीं. असें जाणून कांहीं शरीरप्रकृतीस नीट पडेलसें पाहून, आषाढ वद्य तृतीया सोमवारीं प्रथम अकरा घटका दिवस येतांच, मुहूर्तें हवेलींत दाखल जाली. त्या दिवसा-पासून दरबार होत नाहीं. जरुरी जरूर जाणार, ते मात्र समय पाहून जातात. मी नित्य एक वेळां शरीरप्रकृति कशी आहे ह्मणून विचारण्यास जातों. चंद्र २० साबानीं पत्राचा मजकूर केला कीं, 'पत्रें येऊन बहुत दिवस जाले, हा कालवर अवलोकन जालें नाहीं. शरीरास समाधान नव्हतें, मध्यें विचारलें तों आपली प्रकृति ठीक नव्हती, आतां पत्रें पहावीं.' त्याजवरून पत्रें घेऊन राजश्री मुकुंदराव हरी यांजकडे दिलीं. त्यांनीं अक्षरशा वाचून दाखविलीं. नबाबाचे भेटीचें पत्र अगोदर दिलें. त्यांत समारंभें भेटी जाल्या. हें ऐकून बहुत संतोष पावली. मग ऐवजाचे मजकुराचें पत्र वाचून दाखविलें. त्याचें उत्तर कीं, स्वस्थ होऊन जाब लिहून देईन. तजविजींत आहे. इतकें बोलणें होऊन राहिलें. तदनंतर चंद्र २३ साबानीं उत्तराविषयीं व ऐवजाविषयीं फिरून विचारलें. उत्तर दिलें कीं, ऐवजाची तरतूद करून रवाना करीन. मीं उत्तर केलें कीं, ऐवज तर पाठवितील परंतु

सावकाराशीं करार केले आहेत त्याचें प्रमाण राहत नाहीं. पत्राचीं उत्तरें लिहून द्यावयास सांगितलें, त्या कारकुनास बरें वाटत नाहीं. इतरांनीं लिहावीं तर म्हणतात दुसऱ्यास यथास्थित लिहितां येत नाहीं. याजउपरी उत्तरें तयार जाल्यावर घेऊन पाठवीन. आजपावेतों डांक रवाना करावी, त्यास बाईचे उत्तराची वाट पाहात होतों. शेवटीं जाब तयार जाले नाहींत. दो चौ दिवसांत जाब लिहून देतील, तेव्हां रवानगी करीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र १२ रमजान सन खमस समानीन श्रावणमास.

## लेखांक ७२.

श्री.

२० जुलई इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र १७ साबानचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र १ रमजानीं दोन प्रहरां दिवसां पावलें. पत्रीं आज्ञा कीं सहा महिने जाले, हा कालवर ऐवजाची तरतूद होते हें काय? तर बाईस स्मरण देऊन ऐवजाची रवानगी करवणें. बाईस पत्र लिहिलें तें देऊन, पूर्वीं पत्रें पाठविलीं त्याचीं उत्तरें आलीं नाहींत; तीं व हलीं पत्रें पाठविलीं त्यांचीं उत्तरें घेऊन पाठविणें. त्यावरून पत्र पावतांच क्षणीं बाईचें पत्र बाईस नेऊन दिलें. लखोटा राजश्री मुकुंदराव हरी यांनीं फोडून अक्षरशा वाचून दाखविला. त्यांत मजकूर टिपूकडील वर्तणुकेचा लिहिला. त्याजमुळें पुढें मसलत प्राप्त. अश्विन मासीं फौजा जमा जाल्या पाहिजेत. राजश्री तुकोजीबावांस तयार जालें पाहिजे. पैक्याशिवाय फौज जमा कशी होईल? याजकरितां पूर्वीं लिहिलें आहे, त्या अन्वयें ऐवजाची तरतूद करून लवकर रवानगी करावी. सावकाराशीं सरकारचीं वचनें गुंतलीं आहेत, त्यांची निभावणी जाली पाहिजे. याउपरी दिवसगत लागू नये. सर्व आपणास समजतच आहे. याप्रमाणें लिहिलें होतें. त्यावरून उत्तर प्रतिउत्तर जालें नाहीं. काल चंद्र २ रोजीं पुसावयास गेलों, तों उत्तर केलें कीं, पत्राचीं उत्तरेंही देऊं व ऐवजाची रवानगी लवकरच करूं. याप्रमाणें जाबसाल आला. त्यास मसलतीचें व सरकारचें लिहिल्याअन्वयें वर्तणूक करावयाची जरूर काय आहे? मर्जीस येईल तेव्हां ऐवजाची रवानगी करितील, मी वरचेवर सूचना करीत आहें. पत्राचीं उत्तरें देतील अथवा ऐवजाची सोय सांगतील, यास्तव वीस दिवस प्रतीक्षा केली. शेवट विलंब जाणून, हुंडीचे रुपयांची मिती जाईल सबब डांकेबराबर विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ छ १६ रमजान सन खमस **लेखांक ७३.**
समानीन श्रावण मास. **श्री.** २४ जुलई इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ६ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ ३ रमजानीं विनंतिपत्रें व पंधराशा रुपयांचा भरणा, धरमदास टिकमदास यांचे दुकानची हुंडी अकराशा रुपयांची व राजश्री कृष्णाजी नारायण दातार यांजवर चिटी रुपये शंभर व राजश्री श्रीधर कृष्ण थत्ते यांजवर चिटी रुपये दोनशें साडे बहात्तरीची व हुंडणावळ अकराशा रुपयांची, रुपये साडे सत्तावीस; एकूण पंधराशें रुपये, येणेंप्रमाणें डाकेबराबर रवाना केली, ते सेवेसीं येऊन पोहचलीच असतील. त्या अलीकडील वर्तमानः—छ ४ मिनहूस बाईस ह्मटलें कीं, श्रीमंतांचीं पत्रें पेशजीं आलीं व हल्लीं पत्रें आलीं, त्याचीं उत्तरें द्यावयास दिवसगत लागते. सरकारांतून सावकाराची खातरजमा केली आहे, त्याचे वायदे भरून गेले. त्यास हे रीत अशी नसावी. त्याजवरून उत्तर बाईनीं केलें कीं, ऐवजाचे तजवीजींतच आहें. लवकरच रवाना करीन. हल्लीं पत्राचीं उत्तरें लिहून देतें, हीं पाठवून देणें. त्याजवरून पेशजीं पत्राचीं व हल्लींचे पत्राचीं उत्तरें घेऊन पाठविलीं आहेत. बाईचे बोलण्यांत तरी सत्वरच ऐवज रवाना करूं असें आहे. मी वरचेवर सूचना करीत आहें. सरकारचे पत्रांत साडेदहा लक्ष रुपयांचा भरणा जाला पाहिजे. यांचे लिहिण्यांत तर बयाजच आहे. मी तर साडेदहांची सूचना करितों. मजपाशीं ऐवजाची रवानगी करितो असें मोघम जाबसाल बोलण्यांत आहे. रवानगी करतील, तेव्हां कळेल. इंदुरचे सावकारांस बोलावणीं पाठविलीं आहेत. श्रावण शुद्ध पौर्णिमेपावेतों ऐवज रवाना होईल असें निश्चयांत आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ७४.

**श्री.** ८ आगस्ट इ. स. १७८४.

"विज्ञापनाः—अल्लीगोर पातशाहा आग्र्यास आले. पातशाहाचा पुत्र लखनौस पळोन गेला. राजश्री पाटिलबावा श्रावण वद्य प्रतिपदेस सडे फौजेनशीं पातशाहाचे भेटीस आग्र्यास जाणार. याप्रमाणें पत्र राजश्री आबाजी चिटणीस यांचें उज्जनीहून बाईस आलें. त्यावरून सेवेसीं वर्तमान लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै। छ ५ सवाल सन खमस समानीन भाद्रपद.

## लेखांक ७५.

श्री.

८ आगष्ट इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २० माहे रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—छ ६ रमजानीं बाईचे पत्राचे जाब घेऊन पाठविले, ते सेवेसीं पावलेच असतील. त्या अलीकडील वर्तमानः—ऐवजाविशीं नित्य सूचना करीत होतों. तजवीजींत आहों, लवकरच रवानगी होईल, याप्रमाणें जाबसाल आठ दहा दिवस जाले. तिलोकसी पदमसी सावकार इंदुरकर यांस बोलावून आणिलें. हुंडणावळीची रदबदल पडली होती. त्यास करार मदार ठरवून तीन लक्षांच्या हुंड्या सावकार मजकूर याच्या दुकानच्या करून, परभारा कासीदजोडीसमागमें राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे छ १९ रोजीं रवाना केल्या. बाकीचे ऐवजाची तजवीज लौकरच करून रवाना करूं, ऐसें बोलण्यांत आहे. मीं बाईस ह्मटलें कीं, आह्मीं येथें सरकारांतून ऐवजाचे रवानगीसाठीं असतां, परभारा हुंड्या पाठवाव्या हे रीत कोठील ? सरकारांतून साडेदहा लक्ष रुपयांची तोड काढून सावकारासीं वचनें गुंतलीं, तेव्हां राजश्री तुकोजी बावांचें जाणें स्वारीबरोबर जालें. ऐकोन उत्तर केलें, साडेदहा लक्ष रुपये सरकारांतून तुकोजीबावांस देऊन, त्यांची वरात आह्मांवर आणली असती, तर ऐवजाचा भरणा सरकारांत करतों. फौजेचे खर्चास पाठवणें, त्या अर्थी आमचे कारकून यशवंतराव गंगाधर तेथें आहेत. यास्तव त्यांचे मार्फत ऐवज पाठविला. आपले विद्यमानें, तुकोजी होळकर यांजकडे अथवा जिकडे आज्ञा करतील तिकडे द्यावा, त्याप्रमाणें यशवंतराव गंगाधर यांस पत्र बाईनीं लिहून पाठविलें आहे. हुंड्या व पत्रें येऊन पावतील. मीं बाईसीं भाषण केलें, त्याचें उत्तर जालें त्या अन्वयें स्वामींचे नांवें पत्र घेऊन पो आहे. यांचे बोलण्यांत तीन लक्ष रुपयांच्या हुंड्या पाठविल्या, आणखी दोन लक्ष रुपये राजश्री गणपतराव विष्णु गद्रे यांजकडून देऊं. एकूण पांच लक्ष रुपये. याजवर आणखी ऐवज मिळत नाहीं. राजश्री तुकोजी होळकर यांणीं, इंदुरचे कमाविसदारावर वरात रुपये ३५३४ पस्तीसशें चौतीस रुपयेची परभारा केली आहे. त्याजवरून यांचें ह्मणणें कीं, सरकारांत साडेदहा लक्ष रुपये मागतच आहेत, आणि तुकोजी बावा वराता करितात, हें काय? आह्मीं ऐवज कोण कोणास द्यावा? याचा बंदोबस्त सरकारांतून जाला पाहिजे कीं, परभारा वराता न होत. ह्मणून बाईचें बोलणें. त्याजवरून सेवेसीं लिहिलें असे. श्रुत होय हे विज्ञापना."

पैा चंद्र १४ सवाल सन खमस भाद्रपद मास

## लेखांक ७६.

श्री.

१९ आगष्ट इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २ माहे सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १२ रमजानचें आज्ञापत्र सादर जाहलें, तें चंद्र २२ मिनहूस पावलें. आज्ञा कीं, बाईशीं वारंवार बोलून ऐवज लवकर रवाना करावा. त्यास, आज्ञेप्रमाणें बोलत आहेंच. चंद्र १९ रमजानीं तीन लक्ष रुपयांच्या हुंड्या राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे, तिलोकसी पदमसी याच्या दुकानच्या करून बाईनीं पाठविल्या. त्या सेवेसीं येऊन पावल्याच असतील. पुढें बाकीचे ऐवजाकरितां स्मरण देत आहे. अश्विन मास पो दोन आणखी देऊं, असें बोलण्यांत. सिरोंजचे कमाविसदारांवर वराता बाईनीं पाठविल्या, त्याजविषयीं राजश्री तुकोजी बावांनीं मनाई पाठविली कीं, यांजपासून ऐवज न घ्यावा, व पिंढावे महाल याजवर अठरा हजार रुपयांची वरात तुकोजीबावांनीं पाठविली आहे. त्यास बाईच ह्मणे कीं, आह्मांपासून तर श्रीमंत साडेदहा लक्षांचा भरणा करून मागतात. तुकोजीबावा परभारा वराता करितात व आह्मी वराता करितों त्याची मनाई पाठवितात, यांप्रमाणें आहे. तेव्हां आह्मीं भरणा कोठून करावा? येविषयीं सरकारांतून तुकोजीबावांस ताकीद जाली पाहिजे कीं, परभारा वराता न करीत. बाईचे बोलण्यावरून विनंति लिहिली आहे. जयपूरचे वकील पेशजीं जांबेचे मुक्कामीं येऊन भेटले. त्यांचा जाबसाल दुखण्यामुळें जाला नाहीं. सांप्रत मातबर वकील मिसर नामें आला आहे. चंद्र २२ रमजानीं बाईस भेटला. दोन घोडे व शालजोड्या दोन व चिटें जामेवार चार असें नजर केलें. खत प्रतापसिंग राजाचें होतें तें दिलें. पत्रांत मजकूर कीं, संस्थान पूर्वीपासून तुमचें आहे; येथील मुलुखाचा बंदोबस्त नाहीं, तर आपली फौज पांच हजार पाठऊन द्यावी. आह्मी सामील होऊन आपले मुलुखाचा बंदोबस्त करून घेऊं; याप्रमाणें लिहिलें होतें, व जबानी वकील हेंच बोलतात. त्याजवरून यांचे मनांत फौज पाठवावी असें आहे. अद्याप तयारी नाहीं. कोण कोण सरदार नेमून फौज रवाना करितात हें पक्कें ठरलें ह्मणजे सेवेसीं विनंति लिहून पाठवीन. पर्जन्य आजपावेतों इकडे नव्हता. सांप्रत श्रावण वद्य पंचमीपासून रात्रंदिवस एकसारखा लागला आहे. डोळा उघडत नाहीं. मेवामल चवधरी, राजश्री पाटिलबावांनीं बऱ्हाणपुरच्या बंदोबस्ताकरितां पाठविला होता, त्याचा काल जाला ह्मणून ऐकिलें; तें सेवेसीं लिहिलें आहे. ऐवजाची तरतूद करून अश्विन मासीं रवाना करूं, असें भाषण आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

पैवस्ती चंद्र १५ सवाल सन खमस **लेखांक ७७.**

समानीन, भाद्रपदमास. **श्री.** २१ आगस्ट इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र २० रमजानचें आज्ञापत्र सादर जाहलें, तें चंद्र ३ सवालीं पावलें. बाईचे नांवें पत्र होतें तें प्रविष्ट केलें. ऐवज लौकरच रवाना होईल असें लिहितात. यास आठ महिने होत आले, परंतु ऐवज येत नाहीं. याजकरितां हल्लीं पत्र लिहिलें आहे, हें पावतें करून व तुह्मीं वरचेवर स्मरण देऊन, ऐवज लौकर रवाना करावा ह्मणोन आज्ञा. त्यास, तीन लक्ष रुपयांच्या हुंड्या राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे बाईनें पाठविल्या, त्या सेवेसीं येऊन पोहोंचल्याच असतील. बाकीचे ऐवजाविषयीं आज्ञेप्रमाणें वरचेवर सूचना करीत आहें. अश्विन मासपावेतों तजवीज होईल ऐसें बोलण्यांत आहे. हल्लींचे पत्राचें उत्तर घेऊन सेवेसीं पाठविलें आहे. पादशाहा अद्याप आग्र्यास दाखल जाले नाहींत. मथुरे आसपास आले. राजश्री पाटीलबावांनीं अंबोजी इंगळे सरदार फौज देऊन पुढें पाठविले आहेत. त्यांची भेट होऊन जाबसाल ठरेल, त्याप्रमाणें हेही जाणार. इंग्रजाकडून इंद्रसेन कोणी सरदार बोलण्याकरितां आला आहे. बोलणें होऊन कसा मजकूर ठरतो पाहावें. पाटीलबावा गुरूचा उरूस करीत असतात, त्यांत दोन चार वेळ विक्षेपाची जात दिसून आली. यास्तव निश्चय ऐकला कीं, अश्विनमासीं बिडास दर्शनास येतो, व कन्या गरोदर होती त्यास पुत्र जाला. देशीं जाण्याचा बेत बोलण्यांत बहुत आहे, असें एका गृहस्थाचें पत्र आलें. बेवीस दिवसांचें वर्तमान आहे, तें सेवेसीं लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र ९ जिलकाद सन खमस, **लेखांख ७८.**

अश्विनमास. **श्री.** १२ सप्टेंबर इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २६ माहे सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र १० सवालीं विनंतिपत्र व बाईचे पत्राचें उत्तर घेऊन पाठविलें, तें सेवेसीं येऊन पावलींच असतील. त्या अलीकडील वर्तमानः-पेशजीं तीन लक्षांच्या हुंड्या बाईनीं पाठविल्या, त्याचा भरणा जालाच असेल. बाकीचे ऐवजाविषयीं सूचना होतीच, अश्विनमासपावेतों रवाना करूं, ऐसें बोलण्यांत. त्यास चंद्र २२ रोजीं राजश्री नरहर सदाशीव दिा गणपतराव विष्णु गद्रे यांजकडे टोंक तोडा व

रामपुरा वगैरे महाल आहेत, त्यांस रसदेकरितां बोलावणें गेलें होतें. त्यावरून पंतमशारनिल्हे आले. चंद्र २४ रोजीं बाईची भेट जाली, शालजोडी व पातळ नजर केली. मागतीं बाईस स्मरण दिलें कीं, नरहरपंत आले, ऐवजाची तरतूद लौकर व्हावी. फिरोन दसऱ्याचे मुहूर्तें स्वारी निघणार, ऐवज जाऊन पोहोंचला पाहिजे. उत्तर केलें कीं, तजविजींतच आहे. कमाविसदार आला त्याचा रसदेचा करारमदार होऊन, अश्विनमासपावेतों ऐवज रवाना होईल; याप्रमाणें बोलण्यांत. दोन लक्षांचा भरणा करतील यांत उणें नाहीं. राजश्री पाटीलबावा शुद्ध भाद्रपद दशमीस स्वार होऊन, पादशाहाचे भेटीकरितां आग्र्यास गेले ह्मणून वर्तमान ऐकिलें. राजश्री देवराव हिंगणे यांचा कारकून इकडून हत्ती घेऊन देशीं गेला. ते समयीं शंभर रुपये, हत्ती सरकारांत जातो ह्मणून दिले. रुपये देऊन विनंतिपत्र लिहिलें होतें. त्यास, मशारनिल्हेंनीं रुपये अद्याप दिले नाहींत. हलीं देवराव पुण्यांत आले आहेत, ऐवजाकरितां सरकारांतून आज्ञा जालियास देतील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ७९.

श्री. २३ सप्टेंबर इ. स. १७८४

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ माहे जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र २५ व चंद्र २७ सवालीं विनंतिपत्रें पाठविलीं, तीं सेवेसीं येऊन पोहोंचलींच असतील. हलीं चंद्र १७ व चंद्र १९ सवालचीं आज्ञापत्रें सादर जालीं तीं चंद्र ४ जिलकादीं पावलीं व बाईचे नांवेंही पत्र आहे. पत्रांत आज्ञा कीं, तीन लक्षांच्या हुंड्या पोहोंचल्या. बाकीचे ऐवजाविषयीं वरचेवर स्मरण देऊन ऐवज लौकर रवाना करीत, असें करणें. त्यास, मी आज्ञेप्रमाणें वरचेवर सूचना करीत आहेंच. दसरा जाल्यावर राजश्री गणपतराव विष्णू यांजकडून दोन लक्षांचा भरणा करूं, याप्रमाणें बोलण्यांत, व राजश्री नरहर सदाशीव, गणपतराव यांजकडील कमाविसदार आले आहेत. ऐवजाविषयीं त्यांशींही बोलणें बाईचें जाहलें. करारमदार होऊन भरणा करावयास सांगावें, तों भाद्रपद वद्य ३० स प्रातःकालापासून बाईस हगवणीचा उपद्रव जाला, तो बहुतच. तीस चाळीस वेग तेच दिवशीं जाले. आमावास्या ह्मणोन औषधही घेतलें नाहीं. प्रतिपदेस औषध घेतलें, तें पचलें नाहीं. तोंडावाटे वांत्य होऊं लागली. याप्रमाणें तीन दिवस एकसारखीं दोन्हीं द्वारें

मोकळीं जालीं होतीं. पंचमीपासून कांहीं औषध लागू होऊं लागलें, अद्याप निःशेष जाहलें नाहीं. परंतु आरामाखालीं आहे. दुखण्यामुळें दरबार होत नाहीं. मी नित्य जात असतों. पत्र आलें ह्मणोन सांगितलें, परंतु उत्तर करीत नाहींत. बाईचे दिवाण, राजश्री मुकुंदराव हरी, यांस पत्राचा मजकूर सांगितला. त्यांनीं उत्तर केलें कीं, एका दो दिवसांत चांगला आराम जाला, ह्मणजे पत्रही वाचून दाखवा व ऐवजाचेंही बोलणें होईल व पेशजीं पत्राचें उत्तर व हल्लीं पत्राचें उत्तर-ही देऊं. मी परस्परें राजश्री नरहर सदाशिव यांजकडे शोध घेतला. त्यास त्यांनीं सांगितलें कीं, दोन लक्ष रुपये मागतात, द्यावे लागतील. पुढें गणपतराव यांस पुण्यास येविषयींची सूचना लिहिली आहे, तेथेंच भरणा होईल. त्यास, हा जाबसाल लौकरच होईलसा दिसतो. हा भरणा जाहला ह्मणजे बाकीचे ऐवजाचा काय जाबसाल करितात हें कळेलच. त्याप्रमाणें विनंति लिहीन. राजश्री पाटीलबावा आग्र्यास जाण्याकरितां प्रस्थानीं निघाले होते, तों गोहदचा राणा बावांपाशीं होता, तो दगा देऊन पळोन गेला. परंतु चमेलीनजीक करोलीवाल्यांनीं धरून, बावांचे हस्तगत करून दिल्हा, व पाटीलबावांची स्त्री प्रसूत होणार याजकरितां राहिले. ह्मणोन वर्तमान ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें असे. राजश्री संताजी होळकर, राजश्री तुकोजी बावांचे कनिष्ठ बंधु, शेंदव्याचे किल्ल्यास असतात. बाईस मागें दुखणें जालें होतें, हल्लीं हगवणीचें भारीच जालें. यास्तव चंद्र ५ रोजीं भेटीकरितां आले. परंतु आले ह्मणोन संतोषसा नाहीं. ते आले ह्मणून मन प्रशस्त करून खुलाशानें भाषण जाहलें नाहीं. भेट मात्र जाली. पुढें होईल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै। चंद्र २२ जिलकाद सन खंमस अश्विन मास.

## लेखांक ८०.

**श्री.**

३० सप्टेंबर इ. स. १७८४.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १४ जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र ८ जिलकादीं विनंतिपत्रें लिहून पाठविलीं, तीं सेवेसीं येऊन पावलींच असतील. सांप्रत बाईस आराम आहे. चंद्र १० रोजीं प्रकृति चांगली पाहून, सरकारचें पत्र वाचून दाखविलें. उत्तर केलें कीं, आठ पंधरा दिवसांत कमाविसदारांचे रसदेच्या ऐवजाचा करारमदार करून, सत्वरच ऐवजाची रवानगी करूं. हल्लीं दोन्हीं पत्रांचीं उत्तरें लिहून दिल्हीं, तीं घेऊन सेवेसीं पाठविलीं आहेत. मी वरचेवर साडेदहा लक्षांचा भरणा जाला पाहिजे, याप्रमाणें सुचवीत असतों. त्याचें उत्तर करितात

कीं, सन आर्बा संमानीनचे सालचा झाडा लिहून, राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे पाठविला. त्यांनीं समजाविला आहे. साल गुदस्तचे तरी, कांहीं ऐवज राहिलाच नाहीं. सालमजकूरचे रसदेचा ऐवज जमा होईल; त्यांतून येथील खर्च वजा होऊन, बाकी ऐवजाची रवानगी होईल. याप्रमाणें बोलण्यांत. त्यास, हल्लीं रवानगी करितील, तेव्हां पुढें आणखी ऐवज देतात न देतात हें कळेल. मजपाशीं मोघमच रवानगी करूं असें बोलतात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ८१.

श्री. इ. स. १७८४.

"विज्ञापना ऐसीजेः-बाईकडून पूर्वी दीडमाही दोनशें रुपये येत होते, त्याप्रमाणें ८ रोजमरे एक संवत्सरपावेतों देत होती. अलीकडे श्रीओंकारचे यात्रेस गेली; त्या दिवसांत एक दोन वेळ कारकून मागावयास गेला. उत्तर दिलें कीं, यात्रेहून आलियावर देऊं. याप्रमाणें ह्मणाली. तदनंतर यात्रेहून आलियानंतर मागावयास कारकून पाठविला. उत्तर दिलें कीं, आज उद्या सर्वांप्रमाणें द्यावयाचें आहे. सर्वांचे रोजमरे तटले ते देऊं, ते समयीं तुमचा रोजमरा देऊं, असें बोलली. त्यास १५ दिवस जाले, सर्वांस रोजमरे वाटून चुकली. आह्मांस दिला नाहीं ह्मणोन स्मरणार्थ कारभारी यांस सांगितलें. दिवस ८ जाले कीं राजश्री मुकुंद हरी दिवाण यांनीं सांगून पाठविलें कीं बाई ह्मणतात, दोनशें रुपये दीडमाही आह्मांस द्यावयास अनुकूल पडत नाहीं. पन्नास रुपये दरमहा देऊं, पाहिजे तर घ्या. असा निरोप आलियावर, पुन्हां त्यांस कारभारियास सांगून पाठविलें कीं, तुह्मीं निरोप सांगितला तो कळला. सांप्रत असें उत्तर केलें, तरी चिंता नाहीं. श्रीमंतीं उणें आह्मांस केलें नाहीं. तुह्मांपासोन पन्नास रुपये घेऊन निर्वाह नाहीं. हजारों रुपयांचे खर्च श्रीमंतांचे कृपेंकरून चालतात. तेथें आपण संकटांत पडूं नये. जे समयीं बाईची मर्जी होईल ते समयीं खर्चास द्यावें. असें सांगून पाठविलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ८२. इ. स. १७८४.

श्री.

"सेवेसीं साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजेः-एक दोन वेळ बाईशीं हेंही बोललों कीं, नवाब व भोंसले व हैदरखान यांचा उपयोग श्रीमंतांस किती, या

समयास पडला! अखंड त्यांचीं पारिपत्यें श्रीमंतीं केलीं असतां, तीं त्यांनीं मनांत न आणितां, श्रीमंतांवर मसलत, यास्तव ते मित्रभावेंच वर्तणूक करून, फौजसुद्धां चाकरीस आले, हें आपण जाणत आहांत. तुह्मी तों दौलतीचे शरीक व परंपरा. तुह्मीं किती एकनिष्ठ वर्तणूक केली असतां, सांप्रत आपली मर्जी एकरूपच जाली. कोणेही गोष्टीचा उपयोग पडूंच नये हें काय? ऐकून उत्तर दिलें नाहीं. दोन वेळ बोललों, तत्रापि ऐकून घेतलें. पत्र त्यांनीं लिहून दिल्यावर चार पांच दिवस मागतीं ह्मणत गेलों कीं, हें पत्र गेलियास आमचे चाकरीचा मुजरा चांगला होऊन, आनस्था यजमान स्वामींची होईल. कांहीं तरी सरकारचे लिहिण्याचा आशय मनांत यावा, हें सर्वोपरी चांगलें. परंतु त्यांचे ठरतीस आलें नाहीं. यावर जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करूं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना."

---

## लेखांक ८३.

पै॥ चंद्र १८ रविलावल

सन खमस माघ मास. **श्री.** २१ जानेवारी इ. स. १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ रविलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १६ सफरचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ५ रविलोवलीं पावलें. बाकीचे ऐवजाविशीं बाईस पत्र लिहिलें आहे, तें प्रविष्ट करून, ऐवजाविशीं वरचेवर स्मरण देऊन रवानगी करावी ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें पत्र प्रविष्ट केलें. उत्तर केलें कीं, साडेदहा लक्षांची भरती कोठून व्हावी? माळवे प्रांतींचे महालचे झाडे, राजश्री यशवंतराव गंगाधर यांनीं समजाविलेच आहेत. त्यांत येथील खर्च वजा होऊन ऐवज द्यावा, त्यापैकीं तीन लक्ष पेशजीं पाठविलें, हल्लीं दोन लक्षांची तरतूद केली होती; परंतु राजश्री तुकोजी होळकर यांनीं, उंटें व बैल खरेदी करावयास रामपुरेकर कमाविसदार यांस सांगितलें. त्याजबद्दल पंचवीस हजार अजमासें तहकूब ठेवून, बाकी पावणेदोन लक्षांच्या हुंड्या रवाना करूं; याप्रमाणें बोलण्यांत. त्यास, हल्लीं बाईनीं पावणेदोन लक्षांच्या हुंड्या रामपुरास, टोंक येथील रसदेबद्दल राजश्री गणपतराव विष्णु गद्रे यांच्या नांवच्या, राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे परभारा चंद्र ८ रविलावलीं रवाना केल्या. सेवेसीं येऊन पोंचतील. आह्मांजवळ पत्राचें उत्तर लिहून दिल्हें, तें सेवेसीं पाठविलें आहे. याउपरी आणखी ऐवजाची रवानगी होतां दिसत नाहीं. याप्रमाणें त्यांचें ह्मणणें आहे. यावर जशी आज्ञा येईल त्याअन्वयें सूचना करीत जाऊं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र २० रविलाखरसन **लेखांक ८४.**

खंमस संमानीन फाल्गुन मास. **श्री.** २० फेब्रुवारी सन १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १० माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र १७ रविलावलीं विनंतिपत्र पाठविलें त्या अलीकडील वर्तमानः– राजश्री मुरारराव जाधव वऱ्हाड प्रांतीं होते. राजश्री मुधोजी भोंसले सेनाधुरंधर यांची भेट न घेतां उठोन बऱ्हाणपुरास आले. तेथें राहून सरकारांत विनंति लिहून मग इकडे यावें, तेंही न केलें. तेथून ओंकार मांधाता येथें येऊन, चार दिवस राहून तेथून मंडलेश्वरास आले. तेथून कारकून बाईकडे व मजकडे पाठविला कीं, आमची खर्चाची तारांबळ आहे. तरी सिऊर, धोंदलगांव व जामगांव येथील ऐवजीं दोन हजार रुपये द्यावे; ह्मणजे आह्मी येथून राजश्री पाटीलबावांकडे जाऊं. त्यावरून कारकुनानें बाईस विनंति केली. बाईंनीं उत्तर दिलें कीं, तुह्मीं जवळ आलां तर भेटीस यावें. मग उत्तर सांगणें तें सांगूं. त्यावरून चंद्र ८ रविलाखरीं भेटीस आले. बराबर पंचवीस राऊत व पालखी वगैरे माणसें घेऊन आले. रामराम छातीवर हात ठेवून केला. वरकड कोणास भेटले नाहींत. चार घटका बसून उत्तरप्रतिउत्तर कीं, आमचा बंदोबस्त श्रीमंत करीनात, सबब तीर्थरूपांच्या अस्थी घेऊन श्रीस जातों. बाईंनीं बहुत प्रकारें सांगितलें कीं, तूर्त जाऊं नये. माघारें जावें, अथवा येथें रहावें. तुमचा बंदोबस्त कसा असेल तसा लिहून करवूं. तथापि त्यांची रजपुती टेक, तीच शेवटीं वस्त्रें घेऊन उठोन मंडलेश्वरास गेले. त्यांचा कारकून नवाच एक आहे. त्यांस आह्मांकडे जाधवराव यांनीं पाठविलें. जाधवराव यांचा आमचा परिचय पूर्वींपासून आहे. त्याजवरून कारकून आह्मांकडे पाठविला कीं, बाईच्यानें आमचा बंदोबस्त होत असला तर आह्मी येथें राहूं, नाहीं तरी जाऊं. त्यावरून मीं सांगून पाठविलें कीं, बाई तर सरदारच आहेत. तुमचा बंदोबस्त करून देतील, कठीण नाहीं. तुह्मी मात्र सुरळीतपणें चालल्यास, एखादा कारकून तुमचा बंदोबस्त करून देईल. तुह्मीं पुढें गेलियास खराब फार व्हाल. येथून माघारें फिरावें हेंच उत्तम. किंवा येथून विनंतिपत्रें लिहावीं. दोन्हींतून कोणतें मर्जीस येईल तें करावें. याप्रमाणें चंद्र ९ रोजीं सांगून पाठविलें. याउपरी त्यांची मर्जी. कशी काय उत्तर पाठवितील तें नकळे! शरीरप्रकृतीकरून बरे आहेत. सेवेसीं श्रुत हे विज्ञापना."

पैवस्ती चंद्र २७ रविलाखर **लेखांक ८५.**

सन खंमस संमानिन फाल्गुन मास. **श्री.** ३ मार्च इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:– चंद्र १० रविलाखरीं विनंतिपत्र लिहून पाठविलें, त्यांत राजश्री मुरारराव जाधव यांचें वर्तमान लिहिलें आहे. त्या अलीकडील वर्तमान:–बाईस सिऊर व धोंदलगांव येथील ऐवजीं दोन हजार रुपये खर्चास मागत होते, बाईंनीं कबूल केलें. परंतु दोन हजारांचें खत व सगुणाबाईचे नांवें पत्र लिहून द्यावें कीं, दोन हजार रुपये यांस मजुरा द्यावे, याप्रमाणें ठरून पत्र लिहून दिल्हें. तें मुरारराव श्रीगिरीकर जाधव लिहितात. यांचें ह्मणणें कीं श्रीगिरीकर लिहूं नये, ह्मणजे ऐवज देऊं. त्यांची एकच अट, तें यांस मान्य पडेना. यास्तव ऐवज दिल्हा नाहीं. चार पांच दिवस कारकूनच जाबसाल घेऊन जात होता. शेवटीं आपण खांसा, चंद्र १४ रविलाखरीं आले. त्यास, बाईस शैत्याचा उपद्रव जाला आहे, त्यामुळें पांच सात दिवस हैराणच आहेत. याजकरितां भेट जाली नाहीं. कारभाऱ्यांची भेट जाली. त्यांजपाशीं बोलिलें कीं, आह्मांस पुढें जाणें. दोन हजार रुपये दिल्यास चिंता नाहीं. यांणीं एकच उत्तर केलें कीं, विना कागदपत्र सुरळीत दिल्ह्याशिवाय रुपया मिळणार नाहीं. याप्रमाणें बोलून विडे दिल्हे. चंद्र १६ रविलाखरीं मंडलेश्वराहून कूच करून गेले. बुद्धीचे शाश्वत नाहीं. याजमुळें यांनींही मन घातलें नाहीं. हैदराबादेहून नवाबाकडून राजश्री हणमंतराव कायत आहे, ते वकिलीचे कामास राजश्री पाटीलबावांकडे जाण्याकरितां, चंद्र १५ रोजीं येथें आले. समागमें हत्ती अंबारीसुद्धां, व पालखी, व घोडीं लहान थोर मिळून ६ व गाड्या २ व उंट १ व गाडदी वगैरे पंचवीस तीसपावेतों आहेत. पुढें जाणें, तेव्हां घाटाचे वगैरे मार्गाचे बंदोबस्तीकरितां, बाईचे भेटीस चंद्र १७ रोजीं येऊन पातळ १ बंगाली दिल्हें. बाईंनीं शेलापागोटें देऊन दस्तक व पत्रें करून दिल्हीं. चंद्र १८ रविलाखरीं येथून पुढें लष्करांत गेले. ठरतीवर नाहींत. आह्मांकडे दोन तीन वेळ कारकून पाठविला कीं, आमचा बंदोबस्त करून देणें, असें सांगून मात्र पाठवीत. निश्चय कोणता, तर तें कांहीं बोलण्यांत न ये. सांप्रत राजश्री पाटीलबावांपाशीं जाऊन रहावें, असें बोलून गेले आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र २७ रबिलाखर सन खमस संमानीन फाल्गुन मास

## लेखांक ८६.

श्री.

३ मार्च इ. स. १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र २९ रविलावलचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ९ रविलाखरीं चार घटका रात्रीं येऊन पोंचलें. पत्रीं आज्ञा कीं, पावणेदोन लक्षांच्या हुंड्या पाठविल्या, त्या पावल्या. बाकी पंचवीस हजार रुपये उंट व बैल खरेदीबद्दल तहकूब ठेविले. त्यास, राजश्री नारो गणेश यांचें ह्मणणें, आह्मांस ठाऊक नाहीं. तरी बाईशीं बोलून पंचवीस हजार रुपये बाकी राहिले आहेत ते पाठवावे. त्यास, आज्ञेप्रमाणें बाईचे नांवें पत्र होतें तें चंद्र १० रोजीं प्रविष्ट करून, पंचवीस हजार रुपयांविशीं बोलणें जाहलें, व पत्राचाही अन्वय त्यांचे ध्यानास आला. उत्तर केलें कीं, रामपुऱ्यास परभारा वरात व जासूदजोडी कमाविसदारांकडे, चिरंजीव राजश्री तुकबानें पाठविली आहे. कमाविसदारांनीं दिक्कत केली, तेव्हां जासूद पांघुणें जाऊन माघारे जात होते. आह्मांस वर्तमान कळलियावर कमाविसदारांस सांगितलें कीं, चिरंजीवांनीं उंट व बैल आणविले आहेत, त्यापक्षीं पंचवीस हजार रुपये रसदेंत तहकूब ठेवणें; हिशेबीं मजुरा पडतील. ऐसी ताकीद कमाविसदारांस केली असतां तेथें हा जाबसाल! ठाऊक नाहीं ह्मणतात, तरी उत्तम! त्यांजकडे देवविले आहेत, ते मना करून सरकारांतच हुंडी करून पाठवूं. याप्रमाणें बोलण्यांत येऊन रामपुऱ्यास जासूदजोडी येऊन बसली आहे, त्यास आणावयाकरितां येथून पत्र, चंद्र १२ रविलाखरीं कमाविसदारांकडे गेलें आहे. तेथून वरात व जासूद राजश्री तुकोजीबावांकडून आलीयाप्रमाणें बाईशीं बोलण्यांत आलें. त्याजवरून सेवसीं विनंति लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ८७.

पै॥ छ २९ जमादिलावल

श्री.

१४ मार्च इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं.

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ ३० रविलावलचीं पत्रें दोन व छ ३ रविलाखरचीं पत्रें दोन असीं पत्रें ४ चार सादर जालीं, तीं छ २७ रविलाखरीं पावलीं, व बाईच्या नांवें दोन पत्रें, एक ऐवजाचें मजकुराचें व टिपूचे मसलतीचें--एकूण दोन पत्रें, व तीळ रविसंक्रमणाचे,

त्याची थैली तिळाची एक, व पत्र लाखोटा. अशीं तीन पत्रें व तीळ बाईस प्रविष्ट केलें. सेवकास तीळ पाठविले ते पावून फार संतोष जाला. श्रीसंनिध जाऊन, सर्वांस व कुटुंबास व देवास देऊन, शेवटीं मीं स्वीकार केला. तो दिवस बहुत आनंदमय जाला. आह्मी किंमात्र! खावंदांनीं स्मरण करून तीळ पाठविले, येणेंकरून कृपेस पात्र जालों. तदनंतर छ २४ रविलाखरीं कलकत्त्यास कासीदजोड्या सरकारच्या गेल्या होत्या, त्या येथें आल्या. त्यांजसमागमें छ २४ चें विनंतिपत्र पाठविलें आहे. बाईशीं बोलणें जालें ऐवजाविषयीं, तें लिहिलें आहे. साफ उत्तर दिल्हें. याप्रमाणेंच राजश्री दादाजी गंगाधर यांस लिहिलें आहे. दादाजींनीं बाईस व बाजी पारनेरकर या उभयतांनीं फार लिहिलें होतें. शेवटीं असें लिहिलें होतें कीं, १५ लक्ष रुपये तुह्मांकडे नेमले आहेत, त्यांजपैकीं ५ लक्ष तुह्मीं पाठविले. बाकी १० लक्ष राहिले. त्याजपैकीं ५ लक्ष हरतजवीज करून पाठवावे. नाहीं तर श्रीमंतांची मर्जी कडवी होईल, येथवर लिहिलें होतें. त्याचें उत्तर उभयतांस बाईनीं लिहिलें कीं, "माळवाप्रांतीं १५ लक्ष. त्याजपैकीं यंदा समजाविशीमुळें सा सात लक्ष लागले. पांच लक्ष सरकारांत दिल्हे. कांहीं सरदारीखर्च वजा जाला. असें करितां श्रीमंतांची मर्जी प्रसन्न होत नाहीं, तर लाख पन्नासा हजारांची तरतूद करून पाहूं. तूर्त ऐवज नाहीं." याप्रमाणें उत्तर दिल्हें, असें ऐकिलें. मीं विनंति केली कीं, आपणास दादाजींनीं लिहिलें आहे त्याप्रमाणें अमलांत आणिलें असेल. त्याचें उत्तर बाईनीं दिल्हें कीं "घराव पत्रें येतात, त्याचा अर्थ तुह्मांस काय सांगावा. आह्मांस जें लिहिणें तें लिहित असों." आह्मांस वर्तमान कळूं देत नाहींत. बातमी राखून ऐकिलें तें वर्तमान सेवेसीं लिहिलें असे. सांप्रत पत्रें जोडीबराबर पाठविलीं, तीं प्रविष्ट केलीं. आजच पावतीं केलीं. छ २७ रविलाखरीं पत्रें आलीं, ते दिवशीं तिळाचें पत्र व तीळ दिल्हे. दोन दिवस मध्यें ठीक नवतें. पत्रें आज छ २ माहे मजकुरीं दिधलीं. पत्रें दिधलीयाचा सारांश बोलण्याचा परस्परें होत आहे. जाला ह्मणजे जोडीस रवाना करितों. राजश्री गवाजी सदाशिव यांस सरकारचें पत्र, कान्हापुरचे फडणिसाविषयीं पाठविलें ह्मणोन आज्ञा, परंतु पत्र पावलें नाहीं. फडणिसास तूर्त मोकळें केलें. घरास जाऊं दिल्हें नाहीं. कान्हापुरास फडणीस गेले. तेथील काम इजाराच आहे. फडणिसाकडे दाखला नाहीं. परंतु त्या स्थलीं आहेत. महालचें वर्तमान फडणीस लिहीतच असतील. डांक उठविली. चार जोड्या उज्जनीस राजश्री नारो हरी आहेत, ते तुह्मांकडे पाठवितील. त्याजबरोबर बातमी लिहित जावी ह्मणून आज्ञा. त्यास, छ ६ रविलाखरीं पत्र राजश्री बाळाजी शंकर सबनिसांचें याप्रमाणें

आलें. आह्मीं एक दोन वेळां राजश्री नारो हरीस लिहिलें होतें. हा कालवर जोड्या येथें पाठविल्या नाहींत. आलियावर सेवेसीं लिहीन. पुण्याहून सरकारची जोडी मकरसंक्रमणाचे तीळ घेऊन व पत्र सरकारचें घेऊन आली. त्याचें उत्तर बाईचें घेऊन पुण्यास रवाना केलें. त्याची नकल सेवेसीं पाठविली असे. वरकड पत्राचीं उत्तरें, मागाहून जोडी रवाना लौकरच करितों. राजश्री पाटीलबावा डिगेस आहेत. हिंमतबहादर गोसावी व नारायणदास, उभयतांस कैद पाटीलबावांनीं केलें ह्मणून ऐकिलें. तें सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ८८.

पौ छ ११ जमादिलावल सन खंमस संमानीन अधिक चैत्र

**श्री.**

१५ मार्च इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ १ जमादिलावलीं विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. रामपुऱ्याहून कमाविसदारांनीं, राजश्री तुकोजीबावांकडून पत्रें आलीं होतीं, तींच बाईकडे पाठविलीं. बाईचे बोलण्यांत होतें कीं, पत्रें आलीं ह्मणजे हुंडी रवाना करूं. त्यास, पत्रें येऊन पोहोंचलीयावर फिरोन बाईस सूचना केली कीं, ऐवजाची रवानगी व्हावी. त्याजवरून पंचवीस हजार रुपयांची हुंडी व अस्सल पत्रें राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे, कासीदजोडीबराबर छ २ रोजीं रवाना केलें. सेवेसीं येऊन पोहोंचतील. आह्मांजवळ पत्राचें उत्तर दिल्हें, तें घेऊन सेवेसीं पाठविलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ८९.

पै॥ चंद्र १४ जमादिलाखर खंमस संमानीन

**श्री.**

२४ एप्रिल इ. स १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १६ जमादिलावलीं विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. त्या अलीकडील वर्तमानः— राजश्री पाटीलबावा आग्र्याचे किल्यानजीक आहेत. किल्ला अद्याप हस्तगत जाला नाहीं. राजश्री देवजी गवळी बऱ्हाणपुरीं होते. त्यांजला दहा

हजार फौज ठेवून घेऊन येणें, ह्मणून पाटीलबावांनीं लिहिलें होतें. त्याजवरून देवजी गवळी पांच हजार फौजेनिशीं पाटीलबावांकडे गेले. चार दिवस जाले. मागाहून आणखी फौज दहा हजारांची भरती जाणार ह्मणून ऐकिलें आहे. पंचवीस हजार रुपयांची हुंडी पावलीयाचें आज्ञापत्र आलें नाहीं. बाईनीं सांगितलें कीं, आमचा जाब पंचवीस हजार पावल्याचा आला. राजश्री बापूजी होळकर सेंदव्यांतच आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र २७ जमादिलाखर सन खंमस संमानीन चैत्र मास

## लेखांक ९०.

श्री.

२ मे इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ७ जमादिलाखरीं विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. त्याअलीकडील वर्तमानः– चंद्र २९ जमादिलावल व चंद्र १ जमादिलाखर एकूण दोन आज्ञापत्रें सादर जाहलीं, तीं चंद्र ९ जमादिलाखरीं पावलीं. राजश्री दादाजी गंगाधर यांनीं पत्र व पंचवीस हजारांची हुंडी आणून दाखविली. हुंडींत मुदत लिहिली आहे, त्याप्रमाणें ऐवज घेतला जाईल ह्मणून पत्रीं आज्ञा आली, त्याजवरून कळलें. बाईस पेशजीं पत्र हुंडी पावलीयाचें आलें होतें. परंतु आह्मीं सांगितलें कीं आमचे पत्राचा जाब आला. राजश्री पाटीलबावा मथुरेवर आहेत, राजश्री अंबोजी इंगळे दिल्लीस फौजसुद्धां आहेत. शिखांचा त्यांचा सलुखा होणार ह्मणून वर्तमान ऐकिलें. तें सेवेसीं लिहिलें असे. राणेखान पाटीलबावांजवळ आहेत. त्यांचा पुत्र समशेरखान, त्यांजपासून रुसून येथें आला. पंधरा वीस पो॥ लहान मोठीं घोडीं आहेत. त्यांजला बाईनीं आपले जवळ ठेऊन, घोड्यांची चंदी चालती केली, खाशांची बोली करार करून देणार आहेत, सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

पै॥ छ १५ रजब सन खंमस संमानीन वैशाख मास

## लेखांक ९१.

श्री.

१६ मे इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ६ माहे रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–छ २२ जमादि-

लाखरीं विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. राजश्री पाटीलबावा मथुरेनजीक आहेत, ह्मणोन वर्तमान आहे. राजश्री हैबतराव वाघ देशींहून माळवे प्रांतीं महतपुरास आले होते. कृष्णाजी तानदेव यांजकडून दहा पंधरा वर्षांचा, महतपूरचे मामलत-संबंधीं फडशा होणें राहिला होता. त्यास, राजश्री लक्ष्मणराव कृष्ण यांजपासून, फडशा हिशेबाचा करून घेऊन येथें आले. बाईची भेट झाली. दहा बारा दिवस होते. राजश्री तुकोजीबावांचींही पत्रें त्यांस दोन तीन आलीं कीं, आह्मांस स्वारीस जाणें आहे, लौकर येणें. त्याजवरून बाईचा निरोप घेऊन, छ ४ रजबीं स्वार होऊन, सेंदव्याचे घांटानें देशीं गेले. सेवेसीं श्रुत होय विज्ञापना."

---

## लेखांक ९२.

श्री. २२ मे इ. स. १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—बाईचे नांवें पत्र आमचे पत्रांत सादर जालें, तें चंद्र ७ रजबीं येऊन पोहोंचलें. लाखोटा होता तैसाच बाईकडे घेऊन गेलों, पत्र प्रविष्ट करून, एकीकडे बसोन, अक्षरशहा वाचिलें. उत्तर त्या समयीं इतकेंच दिलें कीं, यापूर्वीं राजश्री दादाजी गंगाधर यांजकडून व आपलीं पत्रें आलीं. त्यांतील अर्थ सविस्तर समजले, व तुमचे विद्यमानचे पत्राचे अर्थ ध्यानांत आले. त्यास, त्या पत्रांचीं उत्तरें व तुह्मांकडील पत्रांचीं उत्तरें, उदईक बसोन, विचार करोन, लिहून देऊं. इतकें उत्तर होऊन, दुसरे कारभारास लागली. तो दिवस तसाच गेला. दुसरे दिवशीं शुद्ध दशमीस, बाईनीं अडीच प्रहर दिवस आला तोंच, जासूद बोलावूं पाठविला. त्यावरून मी गेलों तों, बाई व राजश्री मुकुंदराव व राजश्री गोविंदपंत गानू ऐसे त्रिवर्ग बसले होते. मजला पुसों लागले कीं, याचीं उत्तरें कशीं लिहावीं? मीं उत्तर दिलें कीं, मजपेक्षां आपली कक्षा उणी आहे ऐसें नाहीं. आपण सरदार आहेत, पूर्वींपासून मसलतीची तोडजोड करीत अहांत. सांप्रत टिपू शेर जाला. त्याचें पारिपत्य न होय; तर राज्यास अपाय! तेव्हां तुह्मी मातबर सरदार, तीर्थ करून बसला तों बसणें कसें घडेल? ऐसें ऐकून उत्तर दिलें कीं, सालाबाद महालचे झाडे पाठवीत आहे, आतांही जो ऐवज होईल तो, येथील खर्च वजा होऊन, बाकीचा ऐवज रवाना करीन, यास अंतर करणार नाहीं. कर्जवाम घेऊन तरी पाठवीन. इतकें मजकडे, तें करीन. वरकड मसलत मीं काय करावी? तदनंतर दुसरे दिवशीं एकादशी जाली. द्वादशीस रात्रीस गेलों. समक्षच मागतीं बोलणें

जालें, ते समयीं मुत्सद्दी नव्हते. त्यांचे नातू, धोंडिबा फणशे जवळ होते. तेव्हां चित्ताचे उल्लेख काढले कीं, चिरंजिवास टिका गादीचा देऊन दौलतीस धनी केला, त्या दिवसापासून वर्तणूक मजपाशीं शुद्ध केली नाहीं. सात वर्षें हिंदुस्थानची मुलुखगिरी केली, तर एक पैसा ठाऊक नाहीं. असें असोन कागदीं पत्रींही वर्तमान, सविस्तरें खुलासा करून लिहित नाहीं. खावंद जवळ असोन चार वर्षें देशीं सरदार आहेत, या दिवसापासून चाकरीस फौज किती होती व महालचा ऐवज किती, याचा शोध खावंदांजवळ असोन, मनांत आणीत नाहींत. वारंवार मजला लिहितात कीं, काय अंतर केलें? घरचा विषय श्रीमंतांस लोपला नाहीं. तेथेंच चवकशी करावी, ती करीत नाहींत. मीं उत्तर दिलें कीं, आपली निष्ठा श्रीमंतांचे चरणीं. त्यापक्षीं, कित्येक प्रकार घरचे ध्यानांत न आणितां, पूर्वींपासून चाल आहे, त्याप्रमाणें घडत असावें. दोन नेत्र श्रीमंतांचे. एक नेत्र उजवा होळकर व एक नेत्र शिंदे. यांत उजवा नेत्र केवळ तेजहीन जाला. त्यास उपाय हाच कीं, या मसलतीस उपयोग पडोन, तेजवृद्धि व्हावी. हे प्रकार आपले ध्यानांत, परंतु आपला भर दौलतीवर नाहीं. दानधर्म, ब्राह्मणभोजन, शिवालय, हेच करितां. परंतु दौलतींत कमी पडतें याचा विचार ध्यानांत येत नाहीं. ऐसें समक्ष कित्येक प्रकारें भाषणें जाहलीं. त्याचें दिलें उत्तर कीं, सांप्रत तुकबानें नंदूरबारची तरफ शिंदखेड, राजश्री वामनाजी हरी यांजकडे सांगितली. तेथील पाटील, भाऊबंदावर फिर्यादीस आले. त्याची चवकशी मनास आणितां, गांवांत कसर होती ती काढून, फिर्याद आले त्यास काम सांगून, कसरेसुद्धां ऐवज, चिरंजिवाकडील कमाविसदाराकडे देविला. आपलेकडे न घेतां कारकून मात्र चौकशीस दिला, यांत गैरवाजवी नव्हे. परंतु अविवेक करून, वामनाजी हरी यांचे लिहिल्याप्रमाणें पागा पाठवून, आमचा कारकून उठऊन दिला. तेव्हां माझी अब्रू काय राहिली? अशी वर्तणूक त्यांची. याप्रमाणें बोलणीं जालियावर, मीं विनंति केली कीं, हीं जीं भाषणें जालीं तीं मी श्रीमंतांस लिहितों. त्याचें उत्तर बाईनीं दिलें कीं, या भाकडकथा लिहूं नका; उगेच आठवलें ह्मणोन तुह्मांपाशीं बोललें. बोलणें हें लिहूं नये ऐसें त्यांनीं सांगितलें. परंतु मीं तर सेवेसीं, कच्चें जालें तें लिहावें, जाणून विनंति लिहिली. इकडील महालचा ऐवज बाईकडील संतोषानेंच येईल, याचा गुंता नाहीं. कारण मसलत टिपूची, वर्तणूक शुद्ध नाहीं. येथेंही वर्तमान, भागानगरीं होळकराचा वकील आहे, तेही लिहितात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ९३.

श्री. २२ मे १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ माहे रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ ६ रजबीं विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. हल्लीं छ २७ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ ७ रजबीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, टिपूचे वर्तणुकेचे प्रकार ठीक नाहींत, याजकरितां मसलत करणें प्राप्त. राजश्री हरीपंत तात्या यांस रवाना करावयाची तरतूद होत आहे. राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांणीं, या समयीं मसलतीस जावें. सरदारीचें स्वरूप रहावें येविषयींचे अर्थ, राजश्री यशवंतराव गंगाधर यांसीं, सविस्तर बोलण्यांत आले आहेत, व तपशीलवार पत्रही, गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांस लिहून, मशारनिल्हेजवळ दिल्हें आहे. त्यांनीं रवाना केलें असेल, व मशारनिल्हेंनीं सविस्तर लिहिलें असेल. हल्लीं पत्र लिहिलें आहे हें बाईस द्यावें. आणि येविषयीं तुह्मीं बोलून, पत्राचें उत्तर घेऊन, लवकर पाठवून द्यावें, ह्मणोन आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें बाईस पत्र प्रविष्ट करून वाचून दाखविलें. पत्राचा अन्वय मनन करून उत्तर केलें कीं, याच मजकुराचीं पत्रें तपशीलवार, राजश्री यशवंतराव गंगाधर यांणींही पाठविलीं. सर्व अर्थ समजले. मी बोलिलों कीं, हे अर्थ आपणांस समजावे आणि थोर सरदारीयाचें स्वरूप राहून सरकारचाकरी घडोन यावी. दौलतीस विषम न दिसावें ऐसें जाणोनच, आपणांस विस्तारपूर्वक श्रीमंत पत्रें लिहितात. हें ध्यानांत आणून सरदारीचें रूप होय आणि शत्रु पराभव पावे, ऐसे अर्थ घडल्यानें मोठ्या सरदारीस युक्त. ऐकोन उत्तर बाईनीं केलें कीं, "माळव्यांतील महालचे वगैरे कच्चे, श्रीमंतांस विदित आहे. चिरंजीव राजश्री तुकबा श्रीमंतांजवळ. त्याजपाशीं सरंजामी सरदार व इतलाखी फौज व महालाचा आकार किती, याची माहितगारी आह्मीं ल्याहावी, त्यावरून सरकारांत समजावावी, ऐसें नाहीं. इकडील महालचा आकार होतो, त्याचे झाडे सालाचे सालास पाठवितों. येथें जो खर्च आहे तो, कार्याकारणच आहे. श्रीमंतांचे चरणीं प्रतारणा व्हावयाची नाहीं. सरदारी मोठी, ओढीस आली, ऐसें असोन चाकरी घडावी हेंच मानस." याप्रमाणें बोलणें होऊन, राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे पत्रें, तपशीलवार लिहून रवाना केलीं, व आह्माजवळही उत्तर लिहून दिल्हें, तें सेवेसीं पाठविलें आहे. पुढें पत्रीं आज्ञा येईल, त्या अन्वयें बोलण्यांत येत जाईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ९४.

पौ॥ चंद्र २७ साबान सन सीत ज्येष्ठ. **श्री.** १३ जून इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- चंद्र २७ रजबीं विनंतिपत्र लिहून पाठविलें आहे. त्या अलीकडील वर्तमानः- खेचिवाडा प्रांत तेथील अंमल बलीभद्रसिंग राजाचा. त्यांनीं खंडांत, महाल गुगरछबडा, राजश्री होळकर यांस दिल्हा. होळकरांकडून राजश्री इंगळे होते. त्यास बहुत दिवस जाहले ह्मणून, बलीभद्र राजानें वकील येथें बाईकडे पाठविला. बाईशीं बोलणें कीं, आमचा महाल सोडून द्यावा. तुमचे खंडणीचा ऐवज पोहोंचला, आतां महाल सोडावा. यांनीं न ऐकिलें. आमचा ऐवज बाकी येणें आहे, तो फडशा जाल्याखेरीज महाल सोडीत नाहींत. त्यावरून वकील येथून उठून गेला. त्यानंतर बलीभद्रसिंग यांनीं जमाव करून, घुगरछबडा घेतला आणि एक दोन ठाणीं होतीं तींही घेतलीं. हें वर्तमान राजश्री पाटीलबावांस कळल्यावर, दहा हजार फौज तेथून आली. त्या फौजेनें घुगरगड छबडा तो घेतला, ठाणीं घेतलीं. मुख्य, राजाकडील राघोगड यास मोरचे लाविले. पेटा घेतल्या, गडही हस्तगत होईल. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें व राजश्री आबा चिटणीस यांस, कांहीं कारभार फडशा करावयास सांगितला. त्यांत अंतर पडलें ह्मणून, तीन लक्ष रुपये घेतले, असें ऐकिलें. तें सेवेसीं लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ९५.

**श्री.** २७ जून इ. स. १७८५.

पैवस्ती चंद्र २७ साबान सन सीत

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:-

आज्ञाधारक केसो भिकाजी दातार कृतानेक सां॥ नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. पूर्वीं सेवेसीं विनंतिपत्रें लिहून पाठविलीं आहेत. त्या अलीकडे वर्तमानः- राजश्री रंगराव महादेव देशीं जावयाकरितां धारेहून निघोन धर्मपुरीस आले. येथें कांहीं मुक्काम आहेत. येथें येऊन बाईची भेट घेऊन जाणार. गंगाजी हुजरे, राजश्री पाटीलबावांचे लष्करांतून येऊन उज्जनीस दाखल जाले. उज्जनीहून सडे, बाईचे भेटीस आले; मार्गाचें दस्तक घेऊन काल माघारें गेले. जांबेस त्यांजकडील

आटाळा अडकला आहे, तो घेऊन येणार. कांहीं मरातब व हत्ती व नालकी वगैरे उज्जनीस येऊन, आपण पुढें श्रीमंतांच्या दर्शनास जाणार, असें आहे. एका दो दिवसां येथें येतील, आल्यावर येथून देशीं येतात, सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ९६.

श्री. २७ जून १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–विनंतिपत्रें तीन चार पाठविलीं आहेत, तीं पावलीं असतील. राजश्री गबाजी सदाशिव यांनीं आजुरदार करून, विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं, त्या पत्रीं जमीदाराचा मजकूर लिहिला होता. तदनंतर जमीदाराविषयीं बाईशीं बोलणें होतें. ८–१० दिवस रदबदली जाली कीं, जमीदार आमचे स्वाधीन करावा. त्याचें मानस अनमानींत होतें. परंतु सरकारचें भय जाणून, जमीदार कृष्णराव मंडलोई यास, चंद्र १६ साबानीं शनवारीं, गबाजी सदाशिव यांचे स्वाधीन केला. तेच दिवशीं जमीदारास घेऊन मंडलेश्वरीं गेले. त्याच्या पायांत बेड्या घालून किल्ल्यांत ठेविला. येणेंकरून नक्ष जाला व परगण्यांतील बखेडा राहिला. पुढें बाईनीं गबाजी सदाशिव यांजपासून लिहून घेतलें कीं, जमीदारास येथेंच ठेवावें, पुण्यास पाठवूं नये. असें लिहिलें देऊन, जमीदारास घेऊन गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ९७.

पै॥ चंद्र १६ रमजान. श्री. १२ जुलई इ. स. १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री पाटीलबावांनीं, प्रांत ग्वालेर व पंचमहाल व प्रांत भिंडभदावर व प्रांत कचवाघाट व प्रांत आहेर हवेली व प्रांत भांडेर. एकूण पांच महालांचीं वस्त्रें सरसुभेदाराचीं, राजश्री खंडेराव हरी यांस दिलीं. याखेरीज एक चवकडा व एक हत्ती व मुतालकी शिक्के दिले. पाटीलबावांची स्त्री व कन्या गरोदर आहे. छावणी करावयास उज्जनीस येणार ह्मणून वर्तमान ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें आहे. राजश्री आबा चिटणीस, पाटीलबावांचे लष्करांतून उज्जनीस आले. त्यांनीं आपले तीर्थरूपास चतुर्थाश्रम दिला. चार महिने चातुर्मास्य राहणार. हरकूबाई महेश्वरीहून सरंजामसुद्धां सिरपुरवाघाडीस गेली. महिना दोन महिने तिकडेच राहून येणार. आजच

येथून गेली. बाईचे शरीरीं आतां आरोग्य आहे. यंदां श्रावण मासचा धर्म, गुदस्ताप्रमाणें जाला नाहीं. अनुष्ठानास ब्राह्मण घालीत असतात, ते अस्तामुळें घातले नाहींत. भूयशीही थोडक्यांतच दिली. पर्जन्य पहिले, मृगाचे दोन तीन पडले. त्याउपरी आजपावेतों निस्तूक नाहीं. दहा पंधरा कोसीं आसमंतात् नाहीं. वरकड चहूंकडे आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ९८.

**श्री.** १६ जुलई इ. स. १७८५.

" सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री रामजीपाटील लष्करांतून जावयानिमित्त चंद्र ८ रोजीं काल येथें आले. बाईची भेट काल व मेजवानी कालच जाली. आज मुक्काम आहे. प्रातःकाळीं राजश्री पाटीलबावांकडे स्वार होऊन जाणार. राजश्री रायाजी पाटील यांचे वि॥ पत्र आणऊन भेटीस जातात. पूर्वीं राघोगडास फौजा, राजश्री पाटीलबावांच्या आल्या आहेत. एक दोन स्थळें घेतलीं. हें वर्तमान सेवेसीं पूर्वीं लिहिलें होतें. त्या अलीकडील वर्तमानः– फौजेनें कांहीं सिकत घेऊन, माघारें कूच करून राहिली, हें वर्तमान लष्करांत गेलें. तेथून मदत येणार आहे. राघोगडवाला मजबूत होऊन फौज जमा केली. येथें वकील येऊन गेला, पत्रें मागत होता. बाईनीं साहित्यपत्रें राजश्री पाटीलबावांस दिलीं नाहींत. वकील उठोन गेला. वरकड वर्तमान यथास्थित आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ९९.

**श्री.** ता. २ आगष्ट इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः–

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ५ रमजानचें आज्ञापत्र पावलें. त्याचीं उत्तरें विनंतिपत्रें लिहून, चंद्र १९ माहे मिनहूस रवाना केलीं. भटजीपासून बाईनीं कागद लिहून घेतला. त्याची नक्कल व गबाभट यांचें पत्र, अशीं दोन्हीं पत्रें सेवेसीं पूर्वीं पाठविलीं आहेत, सेवेसीं पावतील. राजश्री रामजी पाटील देशींहून येथें आले. एक दिवस राहून पुढें राजश्री पाटीलबावांकडे गेले. राजश्री रायाजी पाटिलांनीं त्यांजविषयीं रद-

## १३. पेशव्यांबद्दल निजामाचें मत.

हैदराबाद येथील निजामाच्या दरबारांतील पेशव्यांचे वकील गोविंदराव काळे यांनीं नानाफडणविसांस लिहिलेलीं पत्रें, अनेक दृष्टींनीं मनोरंजक आहेत. कांहीं पत्रें राजकारस्थानांनीं ओतप्रोत भरलेलीं आहेत; कांहीं पत्रांमध्यें निजामाच्या दरबाराचें हुबेहूब चित्र रंगविलेलें आहे; कांहीं पत्रांमध्यें नाजूक बातम्या दिलेल्या आहेत; तर कांहीं पत्रांमध्यें तत्कालीन मुत्सद्यांच्या अंगीं वसणाऱ्या धूर्तपणाची व सूक्ष्म निरीक्षणाची कमाल केलेली दिसून येते. हीं सर्व पत्रें छापून प्रसिद्ध झालीं, तर तत्कालीन इतिहासावर विलक्षण प्रकाश पडेल यांत शंका नाहीं. ह्या पत्रांचे कांहीं मासले आह्मीं मधून मधून देण्याचें योजिलें आहे. पुढील पत्रामध्यें नबाब निजामअलीखान यांनीं सर्व पेशव्यांबद्दल काढलेले उद्गार व सवाई-माधवरावसाहेब यांच्या भेटीसाठीं दर्शविलेली इच्छा हीं लक्ष्यांत घेण्यासारखीं आहेतः—

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"विनंति ऐसीजेः– छ २९ माहे रविलाखर शनिवारीं नवाबाचा इशारा आला कीं, आखर वख्तीं दरबारास यावें. त्यावरून रात्रीं दरबारास गेलों. दरबार आम होता. याचा तपशील पेशजीं थोडासा लिहिला आहे. प्रथम नवाबांनीं कैलासवासी नानासाहेबांची गोष्ट काढली कीं, त्यांचें थोरपण व दुरंदेशी बहुत, आणि तालेंही मोठें. यावरी मनुष्याचें जव्हर जाणार असें शक्स होणें दुर्लभ ? सलाबतजंग, बंदेगानअली असतां, सर्व नजर नानासाहेबांची आह्मांकडे होती. नाइत्फाकामुळें वऱ्हाडांत गेलों ते वख्तीं, सर्व गोष्टीनें त्यांणीं रुजू केली. सदाशिवराव कारकर्ते, लेकिन् गरुर मोठा. त्याच सबबानें गारती जाली, व कित्येक प्रसंगही तसेच येऊन, बाज सालेबाद रघुनाथराव जाले. ते वंशांत कोण्ही असेही असतात तशा चालीचे. तों कैलासवासी माधवरावसाहेब निघाले. त्यांची कायेमी व जवामर्दी दोस्तीस मजबूत. हे उपमा त्यांसच योग्य. परंतु दुनयादारी किसमतींत थोडे दिवस होती. बाद नारायणरावसाहेब. त्यांचे चालीचा वोध पहावा, तोंच जो सदमा गुजरला हा जाहीरच आहे. बाद रघुनाथराव जाले. सर्व गोष्टींचा बंद तुटला. परंतु नानासाहेब व माधवराव यांचे दोस्तीवर नजर ठेवून, पुढें गंगाबाईसाहेबांस काय होतें हा अंदेशा न घेतां, जो इरादा खातरेंत गुजरला, तो जाला. दुसरा ख्याल अगर मनसबा दिलास बार देईचना. खुदायतालानें अशी फजल केली कीं, जसें चाहावें त्याचप्रमाणें फल प्राप्त जालें. भोंसले व घरचे सरदार व इतर सर्व, हल्लीं ह्मणतात कीं, आह्मी दौलतीचे कामावर पडलों, हें सही. लेकीन्, खेरीज साबाजी भोंसले काय, मुधोजी व शिंदे होळकर सर्वत्र लहान मोठे, अशा चोरचालीं चालत होते, कीं बयान् करितां हद्द. ते वख्तांत इकडील कायेमी समजून मग सर्वांनीं रुजू आणीत आणीत आणिली. या

गोष्टीस वाकबगार चौघे. पैकीं सखारामपंत व कृष्णरावजी हे गेले. हल्लीं मदारुल्‌महाम व पंडतजी आहेत. यांचा बयान्‌ इतका करावयाचें कारण हेंच जे, बफजलइलाही राव पंतप्रधान दिनबदिन थोर होत होत शादी जाली. पुढें बिलफैल दुनयाईची लजत, राज्य दौलत आपली, हें समजूं लागले. याची खुषी बयान करावी ऐसी नाहीं. हल्लीं हें खातरेंत गुजरलें कीं, त्यांस एक वेळ पहावें. येणेंकडून केले कर्माचें सार्थक जालें. हें ऐन खुलास व खुषी. जाहिराणा प्रकार तरी, दोन्ही दौलती चो ली दा व ण दोस्ती अधिक, सलाह तदबीर एक, हें कुल आलमांस महशूर आहे. हल्लीं राव पंतप्रधान यांची आमची भेट व्हावी, यांत कुल दौलतदार विलायतपावेतों दाब. बादशाहीचा ख्याल कोणी करूं पावणार नाहीं. घरचे सरदार यांजवर तेज व गालबता, टिपूवर दरदरा. बिलफैल त्यांजकडील मातबर आले आहेत. राजकारण उमदें, आह्मांस कांहीं रावपंतप्रधान यांस सोडून करणें नाहीं. तेव्हां तर फेजच्यानें जें होणें तें व्हावें. अशा गोष्टी कागदीं पत्रीं लिहिल्यानें भाग काय वारतो? खान तूर्त मसलतशीर, दौलती एक, हें मातबर पहातील. ··· ··· यांचे मगज तर होऊन खावंदास लिहितील. दबावाचे पोटीं कांहीं एक निघेल. सर्वां गोष्टींस भेटी होणें हें चांगलें. हे मसलत मदारुल्‌माहम यांसही मानेल. या गोष्टीस फार दिवस लागूं नयेत. चैत्रअखेरपावेतों भेटी होऊन, बरसातीचे अगोदर आपलाले मकाणास पोहोंचणें व्हावें. याप्रमाणें मुफसल तुह्मीं लिहावें. आह्मींही राव पंतप्रधान व मदारुल्‌माहम व पंडतजीस पत्रें रवाना करावीं. जाब लवकर यावे. इत्यादिक बोलणें जालें. नवाबांनीं व मध्यस्तांनीं खलिते व पत्रें दिल्हीं ते पाठविलीं; पावतील. याचा मनसबा होऊन, निश्चयाची आज्ञा सत्वर व्हावी. जालें वर्तमान कळावें. मनसब्यांत घोळून काय ते आज्ञा अगोदर यावी. नंतर नवाबाचे पत्राचे जाब. कारण कीं, तसाच धोरवट येथें धरला पाहिजे. नवाबाकडील जाब येणें ते मोघम हवाला देऊनच येतील. तेव्हां बोलण्यास ठीक पडेल. रवाना छ ७ जमादिलावल हे विनंति."



## १४. गोविंदराव काळे यांचें सूक्ष्म निरीक्षण.

गोविंदराव काळे हे निजामाच्या दरबारांतून नानांस सविस्तर हकीकतीचीं पत्रें पाठवीत असत. तीं मननपूर्वक वाचलीं, तर त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणाचें व अगदीं क्षुल्लक गोष्टी देखील टांचून ठेवण्याचे कामीं दिसून येणाऱ्या त्यांच्या दक्षतेचें, कौतुक केल्यावांचून कोणासही राहवणार नाहीं. एके वेळीं गोविंदराव काळे यांस नवाब निजामअलीखान यांचें उघडें शरीर पहाण्याचा प्रसंग आला. त्या वेळीं त्यांनीं निजामाची शरीरसंपत्ति कशी आहे तें निरीक्षण करून, ही बारीक गोष्ट देखील आपल्या पत्रांत नमूद करून पेशव्यांस कळविली आहे. तें पत्र येणेंप्रमाणें:—

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"सेवेसीं विज्ञापना.—नवाबाचे पोटास फोड जाला. त्यास किनवी, बेंगरूळचें फत्तेचें वर्तमान सांगावयास आला, ते दिवसीं आह्मीही गेलों होतों. चार घटका बैठक पडली. तेव्हां फोड, जामानिमा घातला तेणेंकडून चोळून, अधिक जाला. त्याजवर मध्यस्त गेले. ते समयीं नवाब खुल्या आंगानें होते. संवत्सर प्रतिपदेस रात्रौ गेलों, ते वेळेस निमा घातला होता. आह्मीं अर्ज केला कीं, मध्यस्तादेखतां खुलें बसावें, आणि आह्मी परकी, सबब तसदी सोसून निमा घालावा कीं काय ? नवाब हांसून बोलिले कीं, "तुह्मास परकी मोजित नाहीं." ऐसें ह्मणोन निम्याचा कसा सोडून फोड दाखविला. बुधवारीं संध्याकाळीं निरोपास गेलों. ते दिवसीं एकांतीं खुले बसले होते. आह्मांस ह्मणाले कीं, "परवां तुह्मी असें बोललां सबब आज खुला बसलों." सर्व अंग नवाबाचें पाहिलें. ईश्वरसत्तेनें शरीरसंपत चांगली, दंड वगैरे मोठे पैलवानासारिखे आहेत. रवाना छ ५ साबान हे विज्ञापना."

## १५. सवाई माधवरावांच्या दिनचर्येचा मासला.

नानाफडणविसांनीं, श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांची दिनचर्या लिहून ठेवण्याकरितां, चांगलीं चतुर व शहाणीं माणसें ठेविलीं होतीं, व केव्हां केव्हां तें काम सरदार लोकांसही करावें लागे. ह्या दिनचर्येचे संपूर्ण कागद उपलब्ध झाले तर पेशव्यांच्या दरबाराची व पुण्याच्या तत्कालीन समाजस्थितीची पुष्कळ माहिती समजून येईल. महिपतराव कृष्ण नांवाच्या इसमानें ता० १४ जून इ. स. १७८७ रोजीं लिहिलेला दिनचर्येचा कागद मासल्याकरितां खालीं दिला आहे. त्यामध्यें सरकारवाड्यांतील चौकीपहारा व पुण्यांतील बाजारभाव यांची देखील माहिती आहे.

[ मेणवलीदप्तर. ] श्रीभवानी शंकर.

छ २७ साबान समान समानीन श्री. ता. १४ जून इ. स. १७८७.

"सेवेसीं महिपतराव कृष्ण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २४ साबान ऊर्फ वैशाख वद्य ११ रोज शनिवारपावेतों स्वामिकृपेंकरून यथास्थित असों. विशेषः-

छ २२ रोज गुरुवार.

श्रीमंत प्रातःकालीं पागेंत घोडीं फिरवावयास गेले होते. समागमें राजश्री दाजीबा व माधवराव व तात्या जोशी गेले होते. श्रीमंतांनीं दोन घोडीं फिरविलीं. कलम १.

राजश्री आपास ज्वर येत असतो. स्नान दोन तीन दिवस नाहीं. ह्मणून राजश्री तात्या गेले होते. मींही जाऊन पाहिलें. बहुत विशेषांत नाहीं. कलम १.

राजश्री तात्या दोन प्रहरां उपरी, शिवाजी विठ्ठल यांचे वाड्यांत विंचूरकर, रंगोबा नाईक वानवळे यांचे सोयरे उतरले, त्यांचे येथें गेले. त्यांनीं तात्यांस वस्त्रें दिल्हीं. तेथून वाड्यांत आले.

कलम १

चौकीपहारा सरकारवाड्यांत.

७९ दिवसांचे स्वार.
- ८ यादो शामराज.
- ११ शितोळे.
- ६० मैराळजी पायघुडे.
  - व हणमंतराव कवडे
  - व रामचंद्र शिवाजी
  - व परशरामपंत कुंटे.

७९

१५० रात्रौ स्वार, तोफखाना चाकरीस खंडेराव.

१२२ बारगीर
- ३० आंतील चौकांत, चांपेखण वगैरे.
  - १० आपांचे.
  - १० रखमाजीपंत वाघ.
  - १० शिंदे पोरगे.
  - ३०
- १२ गिरजोजी बारगे लग्नफड.
- ६० गारदी बाहेर.
- २० दरवाजांत मराठे गारदी.
- १२२

२७२

येणेंप्रमाणें आंतील चौक व बाहेर असतात. याशिवाय आंतील चौक्या नेहमींच असतात.

कलम १.

बाजारची धारण

꠸=।·॥ कैली गल्ला.
꠸꠸=। हरभरे
꠸।·꠸= ज्वारी
꠸꠸=॥। उडीद
꠸꠸=॥ गहूं.
꠸꠸=। ꠸꠸=॥
꠸꠸=॥। मूग
꠸꠸=॥।= बाजरी
꠸।= तांदुळ बारीक.
꠸꠸=॥। असडीक.
꠸꠸=। सडीक.
꠸।=
꠸।≡॥ तांदूळ मोठे.
꠸। असडीक.
꠸꠸=॥ सडीक.
꠸।=॥
꠸=।·॥।
꠸॥।· वजनी.
꠸꠸= तूप
꠸꠸२ ꠸꠸१॥।
꠸꠸७॥ गूळ
꠸।· कणीक
꠸꠸७॥ हळद
꠸꠸३। तेल
꠸॥।·।

० भाव बट्टा.
- ४॥ पोते चाल
- ६ चांदवड कोरे
- ८ चांदवड छापी
- ९ जुने हुकेरी
- ३ सराफी पोते चाल
- १७॥ मलकापुरी
- २॥। फरशी.

छ २३ रोज शुक्रवार.

श्रीमंतांचा हरण काळवीट सुटून गेला, तो पर्वतीचे हरणांत जाऊन मिळाला. तो धरूं देत नाहीं. याजकरितां झाडून हरणें दाणा खावयास रमण्यांस येत असतात. त्यासी, पायदळ झाडून भोंवतें उभें करून, त्यांचे मागें स्वार उभे करून, आंत झाडून हरण कोंडावें, हे मसलत करून, झाडून गारदी व चौकेबंदीचे लोक प्रातःकालीं पुढें पाठविले. आपण व राजश्री तात्या ऐसे हिराबागांत भोजनास गेले. तेथून दिनकरपंत भडभडे व बाळाजीपंतांस, पुढें हरणें कोंडावयास पाठविले. लोक पर्वतीवर चढूं लागले हें पाहून, हरणें होतीं ते नीट पहाड चढून पळून गेलीं. हें वर्तमान श्रीमंतांस कळतांच रागें भरून माघारें आले. कलम १.

राजश्री तात्यांकडे दोनप्रहर उपरांतीक गुरुजीबावा आले. त्यांचें खलबत जालें. उपरांतीक बाळू मीया हबशी जंजिरेवाला आला. त्याचें खलबत संध्याकाळपावेतों जालें. राजश्री दाजीबा व बहिरोपंत मेहेंदळे खलबतांत होते. मग संध्या करून, राजश्री बाळाजी शंकर फरासखानी यांचे येथें वसंतपूजा जाली, तेथें आले. बाबूराव केशवही होते. आंबे फराळास आणले होते. कलम १.

ग्रहणास श्रीमंतांची स्वारी तुळापूर येथें जाणार होती. ते जाऊं नये, पुण्यांतच ग्रहण करावें, ऐसा बेत दोन प्रहरपासून ठरला आहे. कलम १.

छ १२ साबानीं, मुदोजी भोंसले यांचा काल जाला. दोनचार दिवस ज्वर येत होता. त्यांत वायू जाला, आणि वाचा राहून मृत्यु पावले. त्यांची स्त्री चिमाबाईचाही आग्रह आहे कीं, समागमें जावें. परंतु मृत्यु होतांच पत्रें आलीं, ह्मणून पुरतें लिहिलें नाहीं. नागपूर येथें अग्नीचा उपद्रव उत्तरेकडून जाला; दक्षिणपावेतों पांच सातशें घर जळालें; ऐसें वर्तमान आलें. कलम १.

छ २४ शनिवार श्रीमंतांची स्वारी प्रातःकाळीं पर्वतीस गेली. तेथेंच भोजन करावें व हरणांस कोंडावयास माणसें स्वार मागतीं गेले आहेत. कलम १.

सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## १६. भूमिगत द्रव्य.

पूर्वीं भूमिगत द्रव्य सांपडलें, तर सरकार त्याची कशी व्यवस्था करीत असे, याची माहिती समजणें इष्ट आहे. इ. स. १७९२ मध्यें धारवाड येथें भूमिगत द्रव्य सांपडलें त्याबद्दलची माहिती पुढील यादीवरून दिसून येते.

[मेणवलीदप्तर.] **श्री.** ता. ११ फेब्रुवारी इ. स. १७७२.

"यादी नाजूक काम म॥ हणमंतराव नरसिंह व भीमराव रामचंद्र वगैरे यांणीं सरकारांत येऊन विनंति केली कीं, धारवाडचे नजीक अर्ध कोसावर रानांत, बदरी–

जमाखान धारवाडाहून निघाला, ते समयीं चार लक्ष होन व पांच लक्ष रुपये अजमासें भूमिगत करून ठेविले आहेत. त्याची चौकशी सरकारांतून जाली पाहिजे ह्मणोन. त्यावरून येविसींचे बंदोबस्त प्रकरणीं. सुमा इसन्ने तिसैन मया व अलफ.

जें भूमिगत द्रव्य वगैरें असेल तें, सरकारांतून चिमणाजी रामचंद्र पाठविले असेत, यांचे रुबरू काढावें, आणि हुजूर समजावें. नंतर जें उत्पन्न होईल त्याची व्यवस्थाः–

१ सरकारांत सात हिस्से घ्यावे.
१ हणमंतराव व भीमराव वगैरे मिळोन द्यावे.
  १ हणमंतराव यांस शेंकडा दहा रुपयेप्रमाणें
  १ भीमराव वगैरे यांस शेंकडा अडीच रुपयेप्रमाणें
  ———
  २
———
२

सदरहू दोन कलमें लिहिलीं असेत, त्याप्रमाणें करावें. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

धारवाडकर त्रिंबकराव येशवंत यांस कीं, सरकारांतून चिमणाजी रामचंद्र नाजूक कामाकरितां पाठविले असेत. तर हे ज्या समयीं तुह्मांस सांगतील, ते समयीं लागेल तो सरंजाम देणें ह्मणोन सनद देवावी. देणें.

सरकारकाम खातरजमा जालीयानंतर तुमचें ऊर्जित समजोन केलें जाईल. येणेंप्रमाणें करार करावें. करार.

कारकून व खिजमतगार व जासूद तेथें राहतील. तो रोजमरा अलाहिदा यादी-प्रमाणें देणें ह्मणोन सनद देवावी. देणें.

छ १७ जमादिलाखर सन इसन्ने तिसैन माघ मास सनद लिहिणें."



## १७. श्रीरंगपट्टणास जाण्याचे मार्ग.

पेशवाईमध्यें निरनिराळ्या ठिकाणचे रस्ते व मार्ग यांची माहिती मिळवीत असत. परराज्यावर ज्या वेळीं मोहीम होत असे, त्या वेळीं ही भूगोलविषयक माहिती फार जरूर लागत असे. श्रीरंगपट्टणावर पेशवे, इंग्रज व निजाम या त्रिवर्गांनीं स्वारी करण्याचें ठरविलें, त्या वेळीं मराठ्यांनीं तिकडील रस्त्यांची माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला होता, असें पुढील पत्रावरून दिसून येतें.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"विनंति ऐसीजेः–श्रीरंगपट्टणास जाण्याचे रस्ते तीन. त्यांचा तपशीलः–

१ गोकाकेपासीं कृष्णा उतरून गदक, लखमेश्वर, हरिहर, बसवापुर, हागलवाडी, चिकनाईकहल्ली, नागमंगलावरून पट्टण, हा एक रस्ता. सरकारच्या फौजा हमेश जाण्याची वाट.

१ तालेकोट तालुकियांतून, मुधेबयाळ संगमापासीं कृष्णा उतरून, गजेंद्रगडावरून कंपलीपासीं तुंगभद्रा उतरून, बल्हारी, रायदुर्ग, चित्रदुर्ग, सिरें, मदगिरी, देवरायदुर्गावरून, हा एक रस्ता.

१ हैदराबादेवरून पागटुरापासीं कृष्णा उतरोन कर्नोल, नंद्याळ, सिरवळ, च्यांगल, मारिधुर, कडपे, सिंधवट, गंजीकोटा, तेथून चिख्यालचा घाट चढून, गुरूमकोंडा डावे हातें सोडून, सरसीपाल्यावरून बेंगरूळावर रस्ता उतरतो. मध्यें सरसीपाल्यापासून थोडी झाडी आहे. हे एक वाट.

३ एकूण रस्ते तीन आहेत. पैकीं सदरीं लिहिलेले रस्ते ते शुद्ध टिपूच्या भर तालुक्यांतून जात आहेत. कडप्यावरील रस्ता सरहद्देचा शेवट. डावें बाजूनें घाटाखालीं तमाम अर्काटाखालीं मुलूख महमदअली व इंग्रज आहेत. ध्यानांत यावें सबब विनंति. रवाना छ १६ मोहरम हे विनंति.”

## १८. जनरल गॉडर्ड ह्याच्या लष्करांतील बातमीदार गुलाब वा॥ रूपचंद जाट.

पहिल्या मराठी युद्धांतील सुप्रसिद्ध इंग्रज सरदार जनरल गॉडर्ड ह्याच्या लष्करांत, गुलाम वा॥ रूपचंद जाट ह्या नांवाचा बातमीदार होता. तो गॉडर्डचा दिवाण चिनापाल ह्याचीं पत्रें घेऊन पनवेलीस जात असतां, त्यास मराठी सैन्यांतील पेंढाऱ्यांनीं पकडून परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांच्या लष्करांत नेलें. तेथें त्यानें आपल्या जबानीमध्यें जनरल गॉडर्ड ह्याच्या लष्करची सर्व हकीकत पुढें लिहिल्याप्रमाणें सांगितली आहे; ती वाचनीय आहे.

[ मेणवलीदप्तर ] श्री. ता. ७ मार्च इ. स. १७८१.

“जबानी—गुलाब वा॥ रूपचंद जाट, हल्लीं वस्ती उज्जन, लिहून दिल्हें ऐसीजेः— आपण उज्जनीहून निघोन गाडर इंग्रज यांचे लष्करांत मौजे गळे कांबळे नजीक सुरत येथील मुक्कामीं भाद्रपदमासीं आलों. तेथें रामदास कासीद सावकारी मिर्धा याजवळ राहिलों. आजुऱ्याचें कामकाज करीत होतों. नंतर गाडर लष्कर सुद्धां कूच करून वसईकडे येऊं लागला. तेव्हां आपणही लष्कराबरोबर आलों. येतेसमयीं वाटेनें चिनापाल, गॉडराजवळ दिवाणगिरीचें कामकाज करीत असतो. त्याणें, मानाजी गायकवाड, फत्तेसिंग याचा भाऊ, यांस पत्र देऊन अमदाबाजेस पाठविलें. त्यास अमदाबाजेस पत्रें पोहोंचावून, मानाजी गायकवाड यांचीं उत्तरें घेऊन, मागतीं माघारा वसईचे मुक्कामीं आलों. तों वसई गाडरानें घेतली होती. वसईस पंधरा दिवस आपण होतों. नंतर रामानंद सावकार याणें आपले गुमास्ते यांस पत्रें देऊन, सुरतेस पाठविलें. तेथें जाऊन पत्राचीं उत्तरें घेऊन, माघारा खोपवलीचे मुक्कामीं गाडराचे लष्करांत आलों. त्यास बारा तेरा दिवस जाले. लष्करांत पांच सात रोज होतों. नंतर चिनापाल

दिवाण याणें, जीवन वणजारा यास पत्रें देऊन पनवेलीस पाठविलें. तीं पत्रें घेऊन पनवेलीस जात होतों. तों पनवेलीचे अलीकडे चार पांच कोसांवर पेंढारी यांची गांठ पडली. त्यांनीं धरून परशरामभाऊ यांचे लष्करांत आणिलें. त्यास तीन रोज जाले. गाडराची लष्कराची बातमी बितपशीलः—

### बोरघाटावर येणेंप्रमाणें.

१ शिपाई लोकांचीं पलटणें.
१ गोरे यांचें एक.
२ कर्नाटकी माणूस.
५ बंगाली माणूस
———
९
१ खांसा गाडर घाटावर चढून आठ रोज जहाले.
१ पनवेलीहून रसद येती ती घाटावर येते.

### रस्ता आणावयास.

१ पनवेलीस दोन पलटणें बंगाली आहेत.
१ रस्तेचे बैल भरून चौकावर चार पांच हजार आले आहेत.
बरोबर एक पलटण व खंदारी स्वार पांचशेंपर्यंत आहेत.

### लष्करांत धारण.

१ तांदुळ सहा पैसे शेर.
१ कणीक बारा पैसे शेर.
१ पीठ आठ पैसे शेर.
१ दाळ बारा पैसे शेर.
१ तूप रुपयाचें दीड शेर.

### खोपवलीस येणेंप्रमाणें.

१ शिपाई यांचीं पलटणें दोन मुंबईकराचीं आहेत, त्यांत शेंपन्नास गोरे आहेत.
१ मुर्णग हजार.
१ तुरुक स्वार शेंपन्नास.
१ हत्ती दहा बारा उंटें फार आहेत.

गाडराचा मजकूर तळेगांवास यावयाचा आहे. यास कारण, मागें इष्टुर फांकडा तळेगांवास आला होता, त्यानें तळेगांवचे तळ्यांत कांहीं मालाच्या पेट्या टाकिल्या आहेत, त्या काढावयास जरूर तळेगांवास येणार. असें त्याचे लष्करांत लोक लहान थोर फार बोलतात.

झाडून तोफा व गर्नाळा शें सवाशेंपर्यंत आहेत. देखील पनवेल व चौक लाकूडफांटा, वैरण बोरघाटांतून आणितात.

येणेंप्रमाणें जबानी छ ११ रविलावल मु॥ इहिंदे समानीन."

❧ ❧ ❧

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।

पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



**संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.**

पुस्तक ३ रें.] डिसेंबर १९१०. [अंक ५ वा.

## विषयानुक्रम.


| विषय. | पृष्ठांक. |
|---|---|
| १ ऐतिहासिक संस्मरणीय वस्तू. ... ... ... ... | १३–१८ |
| २ ऐतिहासिक स्फुट लेख. ... ... ... ... ... | ९३–९४ |
| ३ ऐतिहासिक चरित्रें. ... ... ... ... ... ... | ७७–८४ |
| ४ ऐतिहासिक स्थलें. ... ... ... ... ... ... | ९–१६ |
| ५ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें, भाग २ रा.... ... ... | ८१–९६ |
| ६ ऐतिहासिक टिपणें, भाग ३ रा. ... ... ... ... | २५–३२ |

चित्रें—१ पेशव्यांचा दरबार. २ त्रिचनापल्लीचा किल्ला.





मुंबई येथें

**तुकाराम जावजी ह्यांनीं**

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# 'काव्यसंग्रहग्रंथमालें'तून छापून प्रसिद्ध झालेले ग्रंथ.

कि. ट. ख.

**अनेककविकृत पदसंग्रह**—भाग पहिला. (आवृत्ति दुसरी.) या भागांत मुकुंदराज, ज्ञानदेव, मुक्ताबाई, नामदेव, जनाबाई, एकनाथ, त्र्यंबक, तुकाराम, कान्होबा, रामदास, केशवस्वामी, या कवींचीं भक्तिरसानें थबथबलेलीं अशीं सुमारें ८०० पदें अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसुद्धां आलीं आहेत. ... ... ... ... ... ... १॥। ८=

**अनेककविकृत पदसंग्रह**—भाग दुसरा. या भागांत मुकुंदराज, ज्ञानेश्वर, श्यामसुंदर, कृष्णदास, मुक्ताबाई, नामदेव, रमणतनय, विठ्ठलनाथ, रामकृष्ण, रामकवि, कृष्णकिंकर, अवधूत, गिरिधर, श्यामात्मज, चिन्मयनंदन, आणि गोविंद या कवींचीं भक्तिरसानें थबथबलेलीं अशीं सुमारें ३२५ पदें अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसुद्धां आलीं आहेत. ॥। ८-॥

**अनेककविकृत पदसंग्रह**—भाग तिसरा. या भागांत आदिनारायण, काशिकवि, निजानंदस्वामी, शिवदिनकेसरी, रंगनाथस्वामी, शिवरामस्वामी, मध्वनाथ, नरहरि, महिपति, गोपाळनाथ, आत्माराम, देवराय, गंगाधर, गणपति, पांडुरंग, श्रीधरस्वामी, परमानंद, जनार्दन, राघव, बल्लव, राम, भुजंगनाथ, कोकिळ, निरंजन, कृष्णदयार्णव, शुकानंद, हरि, निंबराज, दीनानाथ, माधव, हनुमंत, शिशुमति, गिरिधर, मानपुरी, व्यंकटसुत, जीवनतनय, गोसावीनंदन, गोपालात्मज, जयरामात्मज, शिवरामात्मज, त्र्यंबककविसुत, गंगाधरात्मज, शिवदासतनय, रामतनय, अनंतकविसुत, शुकानंदनाथतनय, राजारामप्रासादी, माणिकप्रभु, रविदास, जगज्जीवनात्मज, प्रेमाबाई, गुरुदास, नारायणबोवा, शिवदासात्मज, वासुदेवस्वामी, सुबरावबावा, माधव, शिवराम, नरहरि, गोसावीनंदन, पांडुरंग, गोपालात्मज, जयरामात्मज आणि अनामकवि या कवींचीं भक्तिरसानें थबथबलेलीं अशीं सुमारें ५१५ पदें आलीं आहेत. ... ... ... ... ... ... १ ८-॥

## ४. पेशवाईतल्या ऐतिहासिक तसबिरी.

पुणें येथें, सवाई माधवराव यांचे कारकीर्दींत, इ. स. १७९० चे सुमारास, जेम्स् वेल्स् नांवाचा एक सुप्रसिद्ध चित्रकार आला होता. यानें, त्या वेळचे पुण्याचे रेसिडेंट सर चार्लस् म्यॅलेट यांच्या शिफारशीनें, पुणें दरबारांत प्रवेश करून, श्रीमंत सवाई माधवराव पेशवे, नाना फडणवीस, महादजी शिंदे, परशुरामभाऊ पटवर्धन इत्यादि सुप्रसिद्ध पुरुषांचीं चित्रें काढिलीं आहेत. त्याचप्रमाणें, सवाई माधवराव पेशव्यांच्या गणपतिमहालांतील दरबाराचें एक चित्र त्यानें उत्तम प्रकारें तयार केलें आहे. हीं त्याचीं सर्व चित्रें इतिहासदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचीं असून, त्यांची गणना मराठ्यांच्या संस्मरणीय वस्तूंमध्यें करण्यास हरकत नाहीं.

मि. वेल्स् हा चित्रकार, पुणें येथें इ. स. १७९० पासून इ. स. १७९५ पर्यंत राहिला होता. त्यानें या मुदतींत पुणें येथील प्रमुख मराठे सरदारांच्या तसबिरी काढण्याबद्दल प्रयत्न केला होता, हें तत्कालीन पुराव्यानेंही सिद्ध होतें. पुण्याचे रेसिडेंट् सर चार्लस् म्यॅलेट यांच्याजवळ पेशव्यांचा, महादाजी चिंतामण या नांवाचा, एक बातमीदार होता. त्यानें आपल्या बातमीपत्रामध्यें जेम्स वेल्स् ह्या चित्रकाराचा 'वेलज मुसावर' या नांवानें अनेक वेळां उल्लेख केला असून, त्यानें श्रीमंत सवाई माधवराव पेशवे, नाना फडणवीस, महादजी शिंदे प्रभृति मराठे मुत्सद्यांच्या तसबिरी त्यांच्या चेहऱ्याबरहुकूम तयार केल्याचें लिहिलें आहे.* त्याचप्रमाणें या वेळीं पुण्यांत हजर असलेला कॅप्टन् मूर ह्या इंग्रज गृहस्थानेंही या चित्रकाराचा उल्लेख आपल्या 'Hindu Pantheon' नामक ग्रंथांत केला आहे. तो लिहितोः—

"The reputation of Mr. Wales, as a portrait painter, reached the Poona Durbar; and the Peshwa, as we learn, expressing his desire to be drawn by a European artist, Mr. Wales went to Poona for that purpose, and had the honour of taking the portraits of some of the most distinguished characters under the Mahratta Empire. Both Scindia and Pursheram Bhow were at Poona during Mr. Wales' stay there; and should they with Nana Furnevise and others, have come under the artist's hand and he, as we hope he has, kept copies of their portraits, they will be curious articles to introduce in England."

* ह्यांपैकीं कांहीं बातमीपत्रें 'सवाई माधवराव पेशव्यांचा दरबार' ह्या पुस्तकांत छापलीं आहेत. पृष्ठ ६५ ते ६९ पहा.

ह्यावरून मि. वेल्स यानें पुणेंदरबारांत आपल्या चित्रकलानैपुण्याची चांगली प्रसिद्धि केली होती, हें सिद्ध होतें. महादाजी चिंतामण याच्या बातमीपत्रांवरून व अन्य माहितीवरून, ह्या आंग्ल चित्रकारास त्याच्या अलौकिक गुणाबद्दल मोठमोठीं पारितोषिकेंही मिळालीं होतीं, असें दिसून येतें. हा चित्रकार आपल्या वयाच्या ४८ व्या वर्षी ह्मणजे ता० १३ नोव्हेंबर इ. स. १७९५ रोजीं मृत्यु पावला. याची वडील मुलगी 'सुसन वेल्स' हिनें, पुण्याचे रेसिडेंट सर चार्लस म्यॉलेट यांच्याशीं, इ. स. १७९९ मध्यें लग्न लाविलें. ही बाई इ. स. १८६८ पर्यंत जीवंत होती. हिचे वंशज अद्यापि इंग्लंडमध्यें विद्यमान आहेत.

मि. वेल्स् यानें महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध थोर पुरुषांचीं जीं चित्रें काढिलीं होतीं, तीं सर्व उपलब्ध झाल्यास फार चांगलें होईल. त्यांचा शोध लावून, तीं हिंदुस्थानांतील एखाद्या ऐतिहासिक पदार्थसंग्रहालयांत जतन करून ठेवणें हें फार अगत्याचें आहे. हीं चित्रें ह्मणजे महाराष्ट्रांतील थोर विभूतींच्या हुबेहूब प्रतिकृति असून, तीं एका तत्कालीन कुशल चित्रकारानें तयार केलीं आहेत. अर्थात् त्यांची योग्यता इतिहासदृष्टीनें फारच अद्वितीय आहे. या चित्रांपैकीं फक्त तीन चित्रें महाराष्ट्रांत सांप्रत विद्यमान आहेत. त्यांची माहिती येणेंप्रमाणें:—

**१ श्रीमंत पेशवे सवाई माधवराव, नाना फडणवीस आणि महादजी शिंदे:**—हें चित्र पुणें येथें गणेशखिंडींतील 'गव्हरमेंट हौस'मध्यें आहे. हें पूर्वी सर चार्लस म्यॉलेट यांच्या संगमावरील रेसिडेन्सी बंगल्यामध्यें होतें. तें पुष्कळ वर्षांपूर्वीं गणेशखिंड येथील गव्हर्नरसाहेबांच्या बंगल्यांत नेऊन ठेविलें आहे. तें प्रस्तुत तेथील बिलीयर्ड रूममध्यें आहे.

**२ श्रीमंत सवाई माधवराव पेशवे:**—ही फक्त सवाई माधवराव पेशव्यांची एकट्यांचीच तसबीर असून, तिच्यामध्यें या तरुण पेशव्यांचा चेहरा हुबेहूब रंगविलेला आहे. ही तसबीर पूर्वीं मेणवली येथील नाना फडणविसांच्या वाड्यामध्यें ठेविलेली होती. ती इ. स. १८४८ मध्यें मुंबईस लॉर्ड फॉक्लंड या नांवाचे जे गव्हर्नर आले होते, त्यांच्या पत्नी लेडी फॉक्लंड यांनीं मेणवली येथें जाऊन पाहिली होती.

**३ नाना फडणवीस:**— ही तसबीर नानांच्या दरबारी पोषाखानिशीं काढिलेली आहे. हींत, नाना, दरबारी पोषाख घालून, लोडास टेंकून गादीवर बसले आहेत, व त्यांचे पुढें दौत, कलमदान आणि रत्नजडित समशेर ठेवलेली आहे, असें दाखविलें आहे. त्यांच्या पागोट्यावर बहुमूल्य शिरपेंच चमकत असून त्यांच्या कानांत मोत्यांचा चौकडा व गळ्यांत मोत्यांचा बहुमूल्य कंठा घातलेला

आहे. ही तसबीरही लेडी फॉक्लंड यांनीं मेणवली येथें नानांच्या वाड्यांत पाहिली होती. सांप्रत या दोन्ही तसबिरी मुंबई येथें शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी यांच्या 'विश्रामभुवन' पदार्थसंग्रहालयामध्यें आहेत. या दोन्ही तसबिरी पुणें येथील चित्रशाळेनें छापून प्रसिद्ध केल्या आहेत, व त्या आतां सर्वत्र प्रसिद्ध आहेत.

४ **पेशव्यांचा दरबारः—** ही तसबीर इतिहासदृष्ट्या अत्यंत महत्त्वाची आहे. हिच्यावरून मराठ्यांच्या दरबाराची चांगली कल्पना करितां येते. हा दरबार पुणें येथील शनिवारवाड्यांत गणपतिमहालांत भरलेला आहे. ह्या चित्राची अस्सल तसबीर कोठें आहे हें समजत नाहीं. इ. स. १८१० मध्यें कॅपटन् मूर ह्यांनीं 'हिंदु पँथियन्' या नांवाचा एक उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यांनीं ह्या पुणेंदरबारच्या चित्राचा उल्लेख केला असून, तें मि० वेल्स यानें काढिलेल्या रेखाचित्रावरून मि० डानियल या नांवाच्या दुसऱ्या एका नामांकित चित्रकारानें तयार केलें आहे, असें स्पष्ट लिहिलें आहे.* हें चित्र मि. जेम्स् डगलस यांनीं आपल्या **'बॉम्बे ॲण्ड वेस्टर्न इंडिया'** नामक ग्रंथांत मूळ प्रसिद्ध केलें आहे. त्याची प्रतिकृति यासोबत आह्मीं जोडिली आहे. ह्या चित्राचा प्रसंग ह्मटला ह्मणजे टिपूवर स्वारी करण्यासाठीं, पेशवे, इंग्रज व निजाम ह्या त्रिवर्गांचा जो संयुक्त तह झाला, त्या संबंधानें पुणें येथें भरलेला दरबार होय. ह्या दरबारामध्यें श्रीमंत सवाई माधवराव पेशवे, नाना फडणवीस, परशुरामभाऊ पटवर्धन प्रभृति मराठ्यांकडील मुख्य मुत्सद्दी हजर असून, पुण्याचे इंग्रज रेसिडेन्ट सर चार्लस् म्यॅलेट व त्यांच्या हाताखालचे लोक आणि निजामाकडील वकील वगैरे प्रमुख मंडळी आहेत. या चित्रावरून ह्या मराठ्यांच्या राजकीय दरबाराची चांगली कल्पना करितां येते. ज्या इतिहासप्रसिद्ध पेशव्यांच्या दरबाराचें हें चित्र आहे, त्या दरबारामध्यें त्या वेळीं प्रत्यक्ष हजर असलेल्या एका युरोपियन गृहस्थानें त्याचें लिहिलेलें वर्णन आह्मांस उपलब्ध झालें आहे. तें अत्यंत वाचनीय असल्यामुळें तें येथें सादर केल्यावांचून आह्मांस राहवत नाहीं. तें वर्णन येणेंप्रमाणेंः—

---

* "Mr. Daniell's fine picture of the Poona Darbar is unrivalled perhaps in Oriental grouping, character, and costume......It was painted for Sir Charles Malet from sketches by the late Mr. Wales, and our artist has shown the time when Sir Charles, then our ambassador at the Court of Poona, attended by his suite, delivered to his Highness Srhimant the Peshwah in full Darbar, the treaty of alliance ratified by His Majesty between Great Britain and His Highness, made preparatory to the war between the Triple Allied Powers and Tipu."

—:Moor's Hindu Pantheon (1810) P. 174.

"The Resident, attended by the whole of his suite, European and native, and preceded by the escort of sepoys—about 80 in number—crossed the ford of the Moota; and proceeding through the middle of the crowded city, we came to the entrance of the palace, which looks to the east. This, leading through a lofty gateway, we passed to the left, along a very ordinary colonnade, which appeared, indeed, as yet in an unfinished state; and at the termination of this, a sharp turn to the right brought us at once into the *diwankhana*—or hall of audience. This was specious and lofty, but perfectly simple, and without ornament, unless we except the usual carving in the wood-work. The side towards the area—which as far as I recollect was to the north—was entirely open, the roof being sustained by wooden pillars; and the floor was covered, from end to end, with a spotless piece of white calico. The young prince was seated on his regal cushion—or *gaddy*—his minister, the veteran and intelligent Nana Furnoveis, on his right hand, and functionaries, and military chiefs, forming a semicircle at the head, and one side, of the saloon.

As we were, in conformity with prior arrangements, all in Satin shoes and silk stocking, we advanced without interruption, being, of course, announced by numerous *Choubdaurs* or silver sticks, towards the prince, who stood up to receive us; and having treated each of us, without exception, with the buggulguiry, or accolade—which was also done by the minister—we all of us then seated ourselves, as best as we could, upon our hams, as much as possible concealing the soles of our shoes, which it would have been considered the extreme of indecorum to discover.

The Resident communicated with the Peshwa, through the minister, in a manner which appeared most cordial and unreserved. And I cannot forget the splendid display of jewels which decorated the person of the young prince; but more particularly a superb necklace, descending far down the breast, and consisting of alternate diamonds and emeralds, each fully as large as a nut-meg, which must have been of inestimable value.

While we were thus seated, we had full leisure to contemplate the assembly which was sufficiently numerous, and composed of many of the most distinguished feudatories of the Mahratta state; and among others, that more particularly

attracted our attention, was Manajee Faukra, long known to the Bombay army, for his reckless bravery. His grotesque appearance, on the present occasion, was peculiarly striking—like the genuine Mahratta, he was naked from the waist upwards, with merely a loose scarf thrown over his shoulders. His face, breast and arms, were so strangely painted in streaks of white and yellow, as might have taken the conceit out of the wildest of the red chiefs of the American wilderness,—and certainly, when leaning on his shield, with a settled scowl upon his countenance, he exhibited an exterior of savage ferocity, whatever might have been the animating spirit. He probably argued, that after turning our backs upon him at Tullagaum, he scarcely expected to witness the cordial reception which we now experienced at Poonah.

After we had continued thus seated for some time, a tray was carried round ; and to each of the gentlemen of the escort were presented the materials for a *Khelaut,* or dress of honour ; consisting of a pair of Cashmirian shawls, a piece of *kinkhab,* or gold brocade, and a complement of white calico ; all of which were delivered to our servants in waiting. A distribution of betel, and an aspersion of autter and rose-water, then took place; that on the Resident being made by the minister himself. We were now permitted to withdraw, and we returned in the same order, and by the same way as we came, to the Residency at the Sungum. And this, with the exception of the accolade, was the ceremonial observed on every other visit."*

---

* या इंग्रजी वर्णनाचा सारांश येणेंप्रमाणें:—"रेसिडेंटसाहेब आपल्या लवाजम्यांतील युरोपियन व नेटिव लोक बरोबर घेऊन व तैनातींतील ८० स्वार पुढें पाठवून, मुठा नदी उतरून, गांवांत येण्यास निघाले; आणि शहराच्या गजबजलेल्या मध्यवस्तींतून राजवाड्याच्या प्रवेशद्वाराजवळ दाखल झाले. या प्रवेशद्वाराचें मुख पूर्वेकडे होतें. या दरवाजाच्या अत्युच्च कमानीमधून आह्मी डाव्या बाजूकडे गेलों. या बाजूच्या कमानी अगदीं सामान्य असून त्यांचें काम अगदीं अपुरें आहे असें दिसत होतें. नंतर आह्मी एकदम उजव्या बाजूस वळून मुख्य दिवाणखान्यांत प्रविष्ट झालों. हा दिवाणखाना भव्य व अति उंच असून अगदीं साधा होता. त्याच्या मध्यें विशेष नक्षीकाम केलेलें दिसत नव्हतें. याची उत्तरेकडील बाजू अगदीं खुली होती. दिवाणखान्याचे सर्व खांब लांकडी होते. आणि सर्व बिछाईत अगदीं स्वच्छ पांढऱ्या कापडाची होती. तरुण पेशवे सरकार गादीवर बसले होते. त्यांचे अनुभवी आणि बुद्धिमान् दिवाण नाना फडणवीस हे त्यांच्या उजव्या बाजूस होते. आणि सरदार मुत्सद्दी लोक वगैरे मागच्या बाजूस अर्धवतुलाकृतींत बसले होते.

अगोदर ठरलेल्या व्यवस्थेप्रमाणें आह्मी साटिनीचे बूट आणि रेशमी मोजे घालून दरबारांत गेलों होतों. आह्मी रुप्याच्या काठ्या हातीं घेतलेले चोपदार ललकारत असतांना पेशव्यांच्या गादीजवळ जाऊन पोहोंचलों. आह्मी जातांच पेशव्यांनीं खडी ताजीम देऊन आमचा सत्कार केला. आणि आह्मां प्रत्येकास वेगळें वेगळें उत्थापन देऊन आह्मांस आपआपल्या जागीं

हें वर्णन लिहिणाऱ्या इसमाचें नांव मेजर प्राईस असें असून, तो या दरबारांत सर चार्लस म्यालेट ह्यांच्या बरोबर हजर होता. यानें या दरबाराची तारीख ९ सप्टेंबर इ. स. १७९१ ही दिली आहे. या सुमारास भाद्रपद महिना असून, पेशव्यांच्या वाड्यांत गणपतिउत्सव चालू होता. त्यामुळें हा दरबार गणपतिमहालांत भरणें संभवनीय दिसतें. ह्या प्रसंगीं मि. वेल्स् हा पुणें येथें रहात होता. तेव्हां त्यानें, प्रत्यक्ष स्वनेत्रांनीं हा अपूर्व थाटाचा मराठ्यांचा दरबार अवलोकन करून, त्याचें हुबेहूब चित्र रंगविलें आहे, असें ह्मटलें असतां अयथार्थ होणार नाहीं

ह्या दरबाराची एक रंगीत तसबीर मुंबई येथें 'विश्रामभुवन' संग्रहालयामध्यें दृष्टीस पडते. ह्या तसबिरीची अस्सल प्रत कोठें आहे त्याचा शोध, कोणी जिज्ञासु इतिहाससंशोधक लावतील काय ?

---

बसविण्यांत आलें. आह्मी सर्व, आमच्या सोयीप्रमाणें, मांड्या घालून जमिनीवर बसलों. पण आम्ही आमच्या चर्मपादुकांचा तळभाग बिलकूल दिसूं न देण्याचा प्रयत्न केला! हा तळभाग जर कां दिसला असता, तर आमच्या असभ्यपणाची परमावधि समजली गेली असती! असो.

रेसिडेंट साहेबांनीं दिवाणाच्या मार्फत मोठ्या अगत्यानें आणि मोकळेपणानें पेशव्यांशीं जें खलबत करावयाचें होतें तें केलें. पेशव्यांनीं जे अप्रतिम रत्नालंकार आपल्या अंगावर घातले होते, त्यांचें तेज मी कधींही विसरणार नाहीं. या अलंकारांत विशेषेंकरून जो एक दिव्य रत्नहार होता, तो पेशव्यांच्या गळ्यांत खालपर्यंत लोंबत असून, त्यामध्यें एका आड एक असे जायफळाच्या आकाराचे तेजस्वी हिरे व पाचा बसविलेल्या होत्या. हा रत्नहार फारच मूल्यवान् असेल यांत शंका नाहीं. आह्मी अशा रीतीनें दरबारांत बसल्यानंतर, दरबारामध्यें भव्य सभामंडळ जमलें होतें, त्याचें शांतपणानें निरीक्षण करण्यास आह्मांस पुष्कळ वेळ सांपडला. या दरबारामध्यें मराठ्यांचे मोठमोठे नामांकित सरदार व जहागीरदार आले होते. या सर्व मंडळींत मानाजी फांकडे याकडे आमचें विशेष लक्ष्य वेधलें. या सरदाराच्या अचाट शौर्याची माहिती मुंबईच्या सैन्यास पुष्कळ दिवसापासून झाली होती. त्याचा भव्य चेहेरा या प्रसंगीं विशेष लक्ष्यांत घेण्यासारखा होता. अस्सल मराठ्याप्रमाणें त्याचें सर्वांग उघडें असून त्यानें कपाळ, छाती व दंड यांवर गंधाचे पांढरे व पिंवळे पट्टे ओढले होते. आंगांत झगा वगैरे घातलेला नसून, खांद्यावर एक शेल्याचा साधा पदर मात्र टाकिला होता. याची मूर्ति पाहिली ह्मणजे अमेरिकेंतल्या रानटी लोकांचें स्मरण झाल्यावांचून रहात नसे. त्यानें ढालीवर टेंकून जेव्हां आपलें रुद्रस्वरूप व्यक्त केलें, त्या वेळीं त्याची चर्या फार क्रूर व भेसूर दिसली. त्यानें या मुद्रेवरून असें ध्वनित केलें कीं, तळेगांवच्या लढाईमध्यें आह्मी माघार घेऊन पळाल्यानंतर, पुणें दरबाराकडून आमचें असें प्रेमपूर्वक स्वागत होईल, असें त्याच्या स्वप्नींही नव्हतें! असो.

याप्रमाणें आह्मी कांहीं वेळपर्यंत ह्या दरबारांत बसल्यानंतर, आह्मां प्रत्येकास एक एक पोषाख देण्यांत आला. या पोषाखामध्यें काश्मीरी शालीचीं दोन फर्दें, किनखाब, पांढरी मलमल याप्रमाणें वस्त्रें होतीं. हीं सर्व आमच्या नौकर लोकांच्या स्वाधीन करण्यांत आलीं. नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब देण्यांत आला. रेसिडेंट साहेबांस दिवाणांनीं स्वतः पानसुपारी व अत्तर दिलें. नंतर दरबार बरखास्त झाला. आणि आह्मी आल्या मार्गानें संगमावर रेसिडेन्सीमध्यें परत गेलों. आमच्या प्रत्येक भेटीमध्यें अशा प्रकारचा स्वागतविधि पेशव्यांकडून होत असे."

# १७. औरंगजेबाच्या कारकीर्दीचे राजशक.



औरंगजेब बादशाहा हा छ १ जिल्काद हिजरी सन १०६८ ह्मणजे ता. ३१ जुलई इ. स. १६५८ रोजीं दिल्ली येथें तक्तनशीन झाला. त्यानें सुमारें ५१ वर्षें व तीन महिने राज्य केलें. तो अहमदनगर येथें छ १८ जिल्काद हिजरी शक १११८ ह्मणजे ता. ३ मार्च इ. स. १७०७ रोजीं मृत्यु पावला. ह्याच्या कारकीर्दीचीं वर्षें व त्यांच्या प्रारंभींच्या इंग्रजी तारखा ह्यांचें कोष्टक, प्रसिद्ध मोंगल इतिहासकार मि० आयर्व्हिन ह्यांनीं प्रसिद्ध केलें आहे. तें इतिहाससंशोधकांस विशेष उपयुक्त असल्यामुळें येथें सादर करितोंः–

| राजशक. | मुसलमानी ता० व सन. | | | इंग्रजी तारीख व सन. |
|---|---|---|---|---|
| १ | १ जिल्काद | हिजरीसन | १०६८. | ३१ जुलई इ. स. १६५८. |
| २ | ,, | रमजान | १०६९. | २३ मे इ. स. १६५९. |
| ३ | ,, | ,, | १०७०. | १२ मे इ. स. १६६०. |
| ४ | ,, | ,, | १०७१. | २९ एप्रिल इ. स. १६६१. |
| ५ | ,, | ,, | १०७२. | २० एप्रिल इ. स. १६६२. |
| ६ | ,, | ,, | १०७३. | ९ एप्रिल इ. स. १६६३. |
| ७ | ,, | ,, | १०७४. | २९ मार्च इ. स. १६६४. |
| ८ | ,, | ,, | १०७५. | १९ मार्च इ. स. १६६५. |
| ९ | ,, | ,, | १०७६. | ७ मार्च इ. स. १६६६. |
| १० | ,, | ,, | १०७७. | २५ फेब्रुवारी इ. स. १६६७. |
| ११ | ,, | ,, | १०७८. | १४ फेब्रुवारी इ. स. १६६८. |
| १२ | ,, | ,, | १०७९. | ३ फेब्रुवारी इ. स. १६६९. |
| १३ | ,, | ,, | १०८०. | २३ जानेवारी इ. स. १६७०. |
| १४ | ,, | ,, | १०८१. | १२ जानेवारी इ. स. १६७१. |
| १५ | ,, | ,, | १०८२. | १ जानेवारी इ. स. १६७२. |
| १६ | ,, | ,, | १०८३. | २१ दिसेंबर इ. स. १६७२. |
| १७ | ,, | ,, | १०८४. | १० दिसेंबर इ. स. १६७३. |
| १८ | ,, | ,, | १०८५. | २९ नोव्हेंबर इ. स. १६७४. |
| १९ | ,, | ,, | १०८६. | १९ नोव्हेंबर इ. स. १६७५. |
| २० | ,, | ,, | १०८७. | ८ नोव्हेंबर इ. स. १६७६. |
| २१ | ,, | ,, | १०८८. | २८ आक्टोबर इ. स. १६७७. |
| २२ | ,, | ,, | १०८९. | १७ आक्टोबर इ. स. १६७८. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २३ | ,, | ,, | १०९०. | ६ आक्टोबर इ. स. १६७९. |
| २४ | ,, | ,, | १०९१. | २५ सेप्टेंबर इ. स. १६८०. |
| २५ | ,, | ,, | १०९२. | १४ सेप्टेंबर इ. स. १६८१. |
| २६ | ,, | ,, | १०९३. | ३ सेप्टेंबर इ. स. १६८२. |
| २७ | ,, | ,, | १०९४. | २४ आगस्ट इ. स. १६८३. |
| २८ | ,, | ,, | १०९५. | १३ आगस्ट इ. स. १६८४. |
| २९ | ,, | ,, | १०९६. | १ आगस्ट इ. स. १६८५. |
| ३० | ,, | ,, | १०९७. | २२ जुलई इ. स. १६८६. |
| ३१ | ,, | ,, | १०९८. | ११ जुलई इ. स. १६८७. |
| ३२ | ,, | ,, | १०९९. | १ जुलई इ. स. १६८८. |
| ३३ | ,, | ,, | ११००. | २० जून इ. स. १६८९. |
| ३४ | ,, | ,, | ११०१. | ८ जून इ. स. १६९०. |
| ३५ | ,, | ,, | ११०२. | २९ मे इ. स. १६९१. |
| ३६ | ,, | ,, | ११०३. | १८ मे इ. स. १६९२. |
| ३७ | ,, | ,, | ११०४. | ७ मे इ. स. १६९३. |
| ३८ | ,, | ,, | ११०५. | २६ एप्रिल इ. स. १६९४. |
| ३९ | ,, | ,, | ११०६. | १५ एप्रिल इ. स. १६९५. |
| ४० | ,, | ,, | ११०७. | ५ एप्रिल इ. स. १६९६. |
| ४१ | ,, | ,, | ११०८. | २४ मार्च इ. स. १६९७. |
| ४२ | ,, | ,, | ११०९. | १३ मार्च इ. स. १६९८. |
| ४३ | ,, | ,, | १११०. | ३ मार्च इ. स. १६९९. |
| ४४ | ,, | ,, | ११११. | १९ फेब्रुवारी इ. स. १७००. |
| ४५ | ,, | ,, | १११२. | ९ फेब्रुवारी इ. स. १७०१. |
| ४६ | ,, | ,, | १११३. | ३० जानेवारी इ. स. १७०२. |
| ४७ | ,, | ,, | १११४. | १९ जानेवारी इ. स. १७०३. |
| ४८ | ,, | ,, | १११५. | ८ जानेवारी इ. स. १७०४. |
| ४९ | ,, | ,, | १११६. | २९ दिसेंबर इ. स. १७०४. |
| ५० | ,, | ,, | १११७. | १७ दिसेंबर इ. स. १७०५. |
| ५१ | ,, | ,, | १११८. | ७ दिसेंबर इ. स. १७०६. |
| कारकीर्द समाप्त २८ जिल्काद | | | ,, | ३ मार्च इ. स. १७०७. |

# ८. मुरारराव घोरपडे गुत्तीकर.

मराठ्यांच्या इतिहासांत जीं अति प्राचीन व सर्व श्रेष्ठ अशीं सुप्रसिद्ध घराणीं आहेत, त्यांत घोरपड्यांचें घराणें अग्रगण्य मानिलें जातें. या घराण्याचें मूळचें उपनांव भोंसले हेंच असून, त्यांतील पुरुषांच्या विशिष्ट पराक्रमावरून त्यांचें **'घोरपडे'** हें उपनांव प्रचारांत आलें. याबद्दल अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं,-"एके वेळीं विजापूरचे बादशाहाचे कारकीर्दींत, या घराण्यांतील एका पुरुषानें कांहीं फौजेनिशीं कोंकणांतील एक बळकट किल्ला सर करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो किल्ला अत्यंत दुर्गम असल्यामुळे व त्यावरील प्रतिपक्षाचे लोक फार बंदोबस्तानें असल्यामुळें, तो त्यांस हस्तगत होईना. तेव्हां त्यानें घोरपडीच्या कमरेस दोर बांधून ती किल्ल्यावर सोडून दिली, आणि आपण त्या दोराच्या साह्यानें त्या किल्ल्यांत मोठ्या शिताफीनें चढून जाऊन, तो जिंकून घेतला. त्यामुळें विजापूरदरबारांत त्याचा मोठा लौकिक होऊन, त्यास कांहीं प्रांताची जहागीर देण्यांत आली. त्या वेळेपासून त्याच्या ह्या प्रशंसनीय कृत्याचें स्मारक ह्मणून ह्या घराण्यास **'घोरपडे'** हें अभिधान प्राप्त झालें."*

घोरपडे हे भोंसल्यांप्रमाणें अस्सल क्षत्रिय मराठे असून, त्यांची उत्पत्ति उदेपूरच्या रजपूत घराण्यापासून झाली आहे असें समजतात. परंतु त्याबद्दलची विश्वसनीय माहिती मिळत नाहीं. तथापि हें घराणें महाराष्ट्रमंडळांत अतिशय सन्मान्य असून, यांतील पुरुषांनीं, आपल्या अलौकिक रणशौर्यानें, अद्वितीय स्वामिभक्तीनें आणि अचाट साहसानें, मराठ्यांच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या घराण्याच्या शाखा अद्यापि सोंडूर, कापशी, गजेंद्रगड, दतवाड, वगैरे ठिकाणीं विद्यमान आहेत. परंतु ऐतिहासिक माहितीच्या अभावामुळें या घराण्यांतील पुरुषांचे लोकोत्तर पराक्रम व त्यांचीं अचाट कृत्यें, अद्यापि जगास अविश्रुत आहेत. घोरपड्यांच्या घराण्यामध्यें संताजी घोरपडे व त्याचा नातू मुरारराव घोरपडे हे दोन अद्वितीय पुरुष होऊन गेले. यांचीं चरित्रें वीररसानें अत्यंत भरलेलीं असून तीं मराठी भाषेंत प्रसिद्ध नाहींत, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. यांपैकीं मुरारराव घोरपडे यांच्या चरित्राची अल्प माहिती आह्मी येथें सादर करितों.

घोरपड्यांचें घराणें मुसलमानी अमदानीमध्यें उदयास आलें हें निश्चित आहे. याचा मूळपुरुष कोण होता, त्याची माहिती बरोबर समजत नाहीं. परंतु मालोजी

* भारतवर्ष पुस्तक २ अंक १.

नामक पुरुषापासून यांची माहिती संगतवार मिळते. मालोजी ऊर्फ ह्माळोजी घोरपडे हे छत्रपति शिवाजी महाराज यांचे कारकीर्दींत उदय पावून, पांचशें स्वारांचे अधिकारी झाले होते. हे मोठे स्वामिनिष्ठ व तरवारबहाद्दर असल्यामुळें शिवाजीमहाराजांनीं यांस पन्हाळा किल्ल्याची सरनोबत देऊन तेथील बंदोबस्ताचें काम त्यांजकडे सोंपविलें होतें. शिवाजीमहाराज यांचे वडील चिरंजीव संभाजीराजे हे दुर्वृत्त निपजल्यामुळें महाराजांनीं त्यांस पन्हाळगडावर कैदेंत ठेविले होतें. त्या वेळीं शिवाजीमहाराजांनीं, मालोजी घोरपडे हे आपले परम विश्वासू सेवक ह्मणून, त्यांचा बंदोबस्त यांजकडे सोंपविला होता. मालोजी घोरपडे यांनीं मोठ्या चातुर्यानें वागून संभाजी राजे यांची मर्जी संपादन केली होती. हे, संगमेश्वर येथें संभाजीमहाराजांस औरंगजेब बादशाहानें कैद करून नेलें, त्या वेळीं तेथें गर्दीमध्यें मारले गेले. यांच्या मृत्यूची मिती ज्येष्ठ शु. १० शके १६१० विभव-नाम संवत्सरे ( इ. स. १६८८ ) ही आहे. यांस संताजी घोरपडे, बहिरजी घोरपडे व मालोजी घोरपडे असे तीन पुत्र होते. हे 'बापसे बेटा सवाई' या ह्मणीप्रमाणें तरवारबहाद्दरींत निष्णात असून, त्यांनीं या प्रसंगीं मराठी राज्याची जी उत्कृष्ट सेवा केली, ती इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखी आहे. हा समय ह्मणजे मराठी राज्यावर ओढवलेला अत्यंत दुर्धर व बिकट असा संकट-प्रसंग असून, या वेळीं मराठ्यांचें खरें शौर्य, खरें तेज आणि खरें कर्तृत्व निदर्शनास आलें. या वेळीं संताजी घोरपडे व त्यांचें बंधुद्वय, आणि धनाजी जाधव यांच्यासारखे रणझुंजार योद्धे महाराष्ट्रांत निर्माण झाले नसते, तर मराठी राज्य त्या वेळींच रसातळास गेलें असतें. संताजी घोरपडे यांनीं या प्रसंगीं औरंगजेब बादशाहाच्या लष्करावर छापा घालून, त्याच्या डेऱ्याचे सोन्याचे कळस जिंकून आणिले, व ते विशालगड मुक्कामीं राजाराम महाराजांपुढें सादर केले, ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. ह्या त्यांच्या बहादुरीबद्दल महाराजांनीं त्या त्रिवर्ग बंधूंस 'ममलकतमदार', 'हिंदुराव', 'अमीर-उल्-उमराव' असे वेगळे वेगळे किताब देऊन त्यांचा फार बहुमान केला. याच प्रसंगीं संताजी घोरपडे यांस सेनापति-पदाचीं वस्त्रें मिळालीं. यानंतर संताजी घोरपडे यांनीं महाराष्ट्रांत व कर्नाटकांत जीं मर्दुमकीचीं व धाडसाचीं कामें केलीं, तीं अगदीं अवर्णनीय अशीं आहेत. त्यांनीं सात वर्षेंपर्यंत मोंगलांशीं टक्कर देऊन त्यांस त्राहित्राहि करून सोडिलें, आणि त्राणरहित झालेल्या मराठी राजसत्तेचें पुनरुज्जीवन केलें. मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफ साहेब लिहितात, "संताजी घोरपडे हा मराठ्यांच्या अत्युत्तम सेनापतींपैकीं एक सेनापति असून, त्याचें गुणवर्णन करण्यास मराठी इतिहासकारांस गर्व वाटेल. सतत सात वर्षेंपर्यंत मोंगल सैन्यास तो कर्दनकाळ

होऊन राहिला होता, एवढें ह्मटलें ह्मणजे संताजीच्या शूरत्वाची निराळी स्तुति करण्याचें कारण नाहीं.''*

असो. संताजी घोरपडे हे महाराष्ट्रास आणखी कांहीं दिवस लाभले असते, तर त्यांचें नांव हिंदुस्थानांतल्या वीररत्नांमध्यें याहीपेक्षां अधिक चमकलें असतें. परंतु दुर्दैवानें हे, ह्मसवडचे नागोजी माने देशमुख यांच्या खाजगी द्वेषामुळें इ. स. १६९८ मध्यें मारले गेले. नंतर त्यांचीं सेनापतिपदाचीं वस्त्रें त्यांचे चिरंजीव पिराजी घोरपडे यांस मिळालीं. त्यांचे वंशज कापशीकर घोरपडे या नांवानें प्रसिद्ध आहेत. संताजीचे बंधू बहिरजी घोरपडे हेही अत्यंत पराक्रमी असून, त्यांनीं मराठ्यांचा अंमल दक्षिण हिंदुस्थानांत पेन्नुकोंडा, मदकशिरे वगैरे प्रांतांत बसवून, तो त्रिचनापल्लीपर्यंत नेऊन पोंचविला होता. ह्यांचा मृत्युशक समजत नाहीं. त्यांच्या मागून ह्यांचा मुलगा सिधोजी हा ह्यांच्या पदाचा अधिपति झाला. हाही अत्यंत शूर निपजून त्यानें बेरड लोकांचें पारिपत्य करून, कर्नाटकांत आपला चांगला दरारा बसविला. त्यानें सोंडूर नामक एक बळकट किल्ला हस्तगत करून घेऊन, तेथें आपलें रहाण्याचें ठिकाण केलें. हेंच सांप्रत विद्यमान असलेलें घोरपड्यांचें सोंडूर संस्थान होय. हें कर्नाटकाच्या इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. येथील कार्तिकस्वामीच्या देवालयामुळें यास 'कार्तिकस्वामीचें सोंडूर' असेंही ह्मणतात. येथें सिधोजी घोरपडे इ. स. १७१५ मध्यें मृत्यु पावले. त्यांस दौलतराव, गोपाळराव, मुरारराव व भुजंगराव असे चार पुत्र होते. यांपैकीं पहिले दौलतराव हे गजेंद्रगड संस्थानचे अधिपति झाले. दुसरे गोपाळराव ऊर्फ सुभानराव हे सोंडूर संस्थानचे अधिपति झाले. तिसरे सुप्रसिद्ध मुरारराव हे स्वतःच्या कर्तबगारीनें कर्नाटकांत स्वतंत्र सत्ताधारी होऊन त्यांनीं गुत्ती येथें आपली राजधानी स्थापित केली. ह्मणून यांस गुत्तीकर घोरपडे असें ह्मणतात. हेच प्रकृत चरित्राचे नायक होत.

मुरारराव घोरपडे यांचा जन्म केव्हां झाला हें समजण्यास मार्ग नाहीं. तथापि स्थूलमानानें अठराव्या शतकाच्या प्रारंभीं ते जन्मले असावेत, असा अजमास आहे. कर्नल मॅकंझी यांच्या जुन्या कागदपत्रांच्या संग्रहामध्यें घोरपड्यांची एक बखर उपलब्ध झाली आहे. तिच्यामध्यें एक आख्यायिका दिली आहे. तिच्यावरून अजमासानें, ह्यांचा जन्म इ. स. १७०४ मध्यें झाला असावा, असा तर्क करितां येतो. मुरारराव ह्यांचे वडील सिधोजीराव हे इ. स. १७१५ मध्यें मृत्यु पावल्यानंतर, त्यांची बहीण सगुणाबाई निंबाळकर ही मुरारराव घोरपडे यांस बरोबर

* "Santajee Ghorepuray was one of the best officers of whom the Mahratta annals can boast, and his eulogy is best recorded when we say he was the terror of the Moghul detachements for seven years."

—*Grant-Duff's History of the Mahrattas*, Page 172.

घेऊन, सातारा येथें शाहूमहाराज यांचे दरबारांत आली, व तिनें त्यांना शाहूमहाराजांचे पायांवर घातलें. शाहूमहाराज ह्या मुलाचा तेजस्वी चेहेरा व पाणीदार नेत्र अवलोकन करून फार खूष झाले व यांनीं त्यास 'तुला काय पाहिजे?' ह्मणून प्रश्न विचारिला. त्यानें 'कर्नाटकची सरदारी पाहिजे' असें बाणेदार उत्तर दिलें. त्यावरून महाराज फार संतुष्ट झाले व त्यांनीं त्यास वस्त्रें अलंकार देऊन आपल्या जवळ ठेऊन घेतलें, आणि आपल्या चुलत बहिणीची मुलगी त्यास देऊन त्याचें लग्न केलें. या समयीं त्याचें वय सुमारें बारा वर्षांचें होतें. अर्थात् ही गोष्ट इ. स. १७१६ सालीं घडून आली असें मानिलें, तर त्यांचा जन्म इ. स. १७०४ सालीं झाला असावा, असें साधारणपणें गृहीत धरितां येईल. परंतु अस्सल कागदपत्रांच्या अभावीं ह्याबद्दल निश्चितपणें कांहींच ठरवितां येत नाहीं.

इ. स. १७०४ सालापासून इ. स. १७४० पर्यंत मुरारराव घोरपडे यांच्या संबंधाचे अस्सल कागदपत्र बिलकूल उपलब्ध नाहींत. त्यामुळें त्यांनीं कर्नाटक प्रांतामध्यें ज्या हालचाली केल्या आणि जीं शौर्याचीं कामें केलीं, त्यांची माहिती अगदीं अंधकारांत लपून गेली आहे. या मुदतीमध्यें मुरारराव घोरपड्यांनीं कर्नाटकांतील पाळेगारांस विनम्र करून, सोंडूर व गुत्ती वगैरे ठिकाणीं आपला अंमल चांगला बसविला होता, हें निःसंशय आहे. इ. स. १७४० मध्यें ज्या वेळीं कर्नाटक प्रांतावर स्वारी करण्याचा मराठ्यांचा कृतनिश्चय झाला, त्या वेळीं मुरारराव घोरपडे हे त्या प्रांतांतील एक नामांकित व प्रबल असे स्वतंत्र सरदार असून, त्यांचें साहाय्य घेणें शाहूमहाराजांस आवश्यक वाटलें होतें. कर्नाटकचा नबाब दोस्तअल्ली याजवर मराठ्यांच्या फौजा, फत्तेसिंग भोंसले व रघोजी भोंसलें यांच्या बरोबर, ज्या वेळीं चालून गेल्या, त्या वेळीं मुरारराव घोरपडे यांचें निवडक सैन्य त्यांच्या साहाय्यास आलें होतें. दमलचेरी येथील युद्धामध्यें त्यांनीं त्यांस चांगली मदत केली होती. या युद्धामध्यें ता. ९ मे इ. स. १७४० रोजीं, अर्काटचा नबाब दोस्तअल्लीखान हा मारला गेला व मराठ्यांस अद्वितीय यश प्राप्त झालें, हें इतिहासप्रसिद्धच आहे. या यशाचा बराच वांटा मुरारराव घोरपडे यांस देणें रास्त आहे. या युद्धानंतर मुरारराव यांच्या शौर्यप्रदर्शनाचें खरें काम ह्मटलें ह्मणजे इ. स. १७४१ मध्यें त्रिचनापल्ली येथें झालेला, चंदासाहेब व मराठे यांचा, घनघोर रणसंग्राम हें होय. या समयीं मराठ्यांनीं त्रिचनापल्लीस वेढा देऊन चंदासाहेबाशीं मोठ्या निकराचें युद्ध केलें, आणि त्रिचनापल्लीचा बळकट किल्ला सर करण्याचा पण केला. इकडे चंदासाहेब यानें आपले युद्धकलेंत निष्णात असलेलें सर्व सैन्य एकत्र जमवून, मराठ्यांचा हल्ला परत फिरविण्याचा आटोकाट प्रयत्न केला. उभयपक्षांच्या अनेक चकमकी होऊन पुष्कळ लोक जायां झाले. परंतु मराठ्यांच्या अतुल शौर्यप्रभावामुळें चंदासाहेब हताश होऊन मराठ्यांस शरण आला; आणि त्यानें ता. २६ मार्च

इ. स. १७४१ रोजीं त्रिचनापल्लीचा किल्ला मराठ्यांच्या स्वाधीन केला. या युद्धामध्यें मुरारराव घोरपडे यांनीं आपल्या पराक्रमाची शर्थ करून जी स्वामिसेवा बजाविली, ती केवळ अवर्णनीय होती. फत्तेसिंग भोंसले व रघोजी भोंसले यांनीं मुराररावांच्या कर्तबगारीची हकीकत शाहूमहाराजांस कळविली. त्यावरून महाराज फार प्रसन्न झाले, व त्यांनीं त्यांस कर्नाटकाच्या सरदेशमुखीचें वतन बक्षीस करून दिलें. आणि, हे मराठी राज्याचे पिढीजाद एकनिष्ठ सेवक, महापराक्रमी, कार्यकर्ते, असें समजून, त्यांस त्रिचनापल्लीच्या किल्ल्याची सुभेदारी सांगितली. या प्रसंगीं छत्रपति शाहूमहाराज यांच्या वतीनें, फत्तेसिंग व रघोजी भोंसले यांनीं, मुरारराव घोरपडे यांजकडून ता. ५ एप्रिल इ. स. १७४१ रोजीं जो करारमदार करून घेतला आहे, तो फार महत्त्वाचा आहे. तो येणेंप्रमाणेः—

"तहनामा संस्थान त्रिचनापल्ली नि॥ राजश्री मुरारजी हिंदुराव घोरपडे वजारतमाहा. सुरुसन इहिदे अर्बैन मया व अलफ. शके १६६३ दुर्मति नाम संवत्सरे वैशाख शु॥ १ प्रतिपदा रविवारः—

किल्ल्याचे रखवालीस संस्थानास फौज जादी ठेवाल, त्याचा खर्च सरकारकुनाच्या मार्फतीनें होईल तो वजा करून, बाकी ऐवज राहील तो सरकारांत देऊं. कलम १

त्रिचनापल्लीचें संस्थान आमच्या हवाला केलें आहे. त्यास हुजूर महाराज राजश्री स्वामींचा व आपला हुकूम होईल, तेव्हां शिबंदीखर्च सरकारकुनाचे मार्फतीनें जो हिशेब होईल तो सरकारांतून द्यावा. किंवा ज्याच्या हवाला करवाल त्याचे स्वाधीन हुकुमाप्रमाणें करून सोडून देऊं. आमचें सरदेशमुखीचें वतन चालवावें. कलम १

पूर्वीपासून महाराज राजश्री स्वामींनीं सरदेशमुखीचें वतन आह्मांस करून दिलें आहे, तेणेंप्रमाणें आह्मांस अनुभवून चालवावें. कलम १

देवब्राह्मणांची पुरातन मोईन वर्धमान चालत आलें असेल ती व देवाचा उत्सव पूर्वीप्रमाणें चालवूं. कलम १

राजश्री रामाजी दामोदर गाडगीळ यांस त्रिचनापल्लीचे संस्थानचें देशपांडेपणाचें वतन करून दिलें आहे. त्याचा कर्जा मामल्यानें चालवूं. कलम १

एकूण कलमें पांच. येणेंप्रमाणें करार तहनामा करून दिल्हा असे. याप्रमाणें आह्मी इमानें इतबारें, स्वामींच्या हुकमाप्रमाणें स्वामिसेवा करून, आपलें ऊर्जित करून घेऊं. जाणिजे. छ २५ माहे मोहरम (मोर्तब)."

याप्रमाणें करारमदार होऊन मुरारराव घोरपडे मराठ्यांच्या वतीनें त्रिचनापल्ली येथील प्रमुख सुभेदार झाले. यांच्या हाताखालीं चवदा हजार सैन्य त्रिचनापल्लीचे बंदोबस्तासाठीं ठेवण्यांत आलें होतें. या सैन्यामध्यें पेशव्यांची कांहीं

पायदळ फौज होती. या सर्व सैन्याचा खर्च शाहूमहाराजांनीं द्यावा असें ठरलें होतें. आणखी, असाही करार झाला होता कीं, अर्काट प्रांताची जी वार्षिक खंडणी येईल, त्यापैकीं वीस हजार रुपये बाळाजी बाजीराव पेशवे यांस द्यावेत. याप्रमाणें ठराव होऊन, मुरारराव घोरपडे हे त्रिचनापल्ली प्रांताचा बंदोबस्त करूं लागले. मुरारराव घोरपडे यांनीं सुमारें चार वर्षेंपर्यंत त्रिचनापल्लीचा राज्यकारभार केला. या मुदतीमध्यें त्यांनीं सर्व प्रजेस सुख देऊन, हिंदू लोकांचीं देवस्थानें व ब्राह्मणांचे अग्रहार वगैरे जे मुसलमानांच्या अमदानीमध्यें मध्यंतरीं बंद पडले होते, ते पुन्हां सुरू केले.*

इ. स. १७४१ पासून १७४४ पर्यंत त्रिचनापल्ली प्रांत मुरारराव घोरपडे यांच्या ताब्यांत होता, व मराठ्यांचा अंमल तेथें पूर्णपणें संस्थापित झाला होता. तथापि कर्नाटकच्या गादीविषयीं सफदरअल्ली व त्याचा मेहुणा मूर्तिजाअल्ली यांच्यामध्यें चुरस लागली होती, व सर्वत्र झोटिंगपादशाही माजली होती. ही संधि पाहून, निजामउल्मुलुख यांस कर्नाटकामध्यें आपला पगडा बसवून अर्काटचा नबाब सफदरअल्ली याजकडून व दुसऱ्या जमीनदार लोकांकडून पुष्कळ दिवस तुंबलेल्या खंडण्या वसूल करण्याची लालसा उत्पन्न झाली. त्यानें इ. स. १७४३ च्या प्रारंभीं प्रचंड सैन्य घेऊन अर्काट प्रांतावर स्वारी केली. या वेळीं त्याजबरोबर ऐशीं हजार घोडे स्वार व दोन लक्ष पायदळ इतकें सैन्य होतें. ही प्रचंड सेना पहातांच सर्व जमीनदार व किल्लेदार भयभीत होऊन, त्यांनीं आपापल्या प्रांतावरील त्याचें स्वामित्व कबूल केलें. ह्याच संधीस सफदरअल्ली व मूर्तिजाअल्ली ह्यांचें वेलोर येथें युद्ध होऊन सफदरअल्ली मारला गेला. तेव्हां निजामउल्मुलुख ह्यास कर्नाटकची नबाबगिरी तोंडांत टाकण्यास उत्कृष्ट संधि सांपडली. त्यानें अर्काटप्रांत आपल्या हातीं येतांच, आपला सेनापति खोजा अबदुल्लाखान यास अर्काटचा नबाब नेमिलें, आणि त्रिचनापल्लीचे सुभेदार मुरारराव घोरपडे यांस

* ह्या समयीं श्रीमंत छत्रपति शाहूमहाराज यांजकडे त्रिचनापल्ली प्रांतांतील ब्राह्मण लोकांनीं तिकडील देवस्थानाच्या पूजाअर्चा बंद पडल्याबद्दल तक्रारी केल्या. तेव्हां शाहूमहाराजांनीं हिंदुधर्माचा अभिमान बाळगून, मुरारराव घोरपडे यांस त्या पुन्हां सुरू करण्याबद्दल पत्रें लिहिलीं. यावरून हिंदुधर्माचें संरक्षण करण्याकडे त्यांचा कसा कल होता हें दिसून येतें. अशा पत्रांपैकीं पुढील पत्र मासल्यासाठीं येथें दिलें आहे:—"राजश्री मुरारजी हिंदुराव घोरपडे वजारतमाहा यांसी पत्र जे:— श्री येथून वेदशास्त्रसंपन्न मुराराचार्य गिरीहून हुजूर येऊन विदित केलें जे, संस्थान त्रिचनापल्ली येथून श्रीस महाभिषेक व पूजा पूर्वींपासून चालत होती, तेणेंप्रमाणें सांप्रत चालत नाहीं ह्मणून विदित केलें. तरी श्रीचा अभिषेक व पूजेची मोईन पूर्वीं असेल तेणेंप्रमाणें मनास आणून, आचार्यांचे विद्यमानें श्रीचा अभिषेक व पूजा चालविणें ह्मणून पत्र १."—शाहू महाराजांची रोजनिशी.

त्रिचनापल्ली सोडून देण्याबद्दल सक्तीचा हुकूम पाठविला. कर्नाटक प्रांतांतील मराठ्यांची सत्ता निजामउल्मुलुख याचे डोळ्यांत सलत होती, तेव्हां त्यानें तिचें निर्मूलन करण्यासाठीं त्रिचनापल्लीस शह दिला. या प्रसंगीं मराठ्यांचीं जीं गुप्त राजकारणें झालीं, तीं अस्सल कागदपत्रांच्या अभावामुळें नीटशीं समजत नाहींत. तथापि निजामउल्मुलुख याचा त्रिचनापल्ली घेण्याचा बेत मराठ्यांच्या दरबारांत कळलेला होता व मुरारराव घोरपडे यांस कुमक करण्याचे त्यांचे प्रयत्न चालू होते, हें अस्सल कागदांवरून सिद्ध होतें. छत्रपति शाहूमहाराज यांनीं ता. २ फेब्रुवारी इ. स. १७४३ रोजीं मुरारराव घोरपडे यांचे कारभारी भिवराव अनंत ह्यांस पुढील पत्र लिहिलें आहेः—

"निजाम उल्मुलुख नवाब कडपे याजवरी गेले. पुढें अर्काटपावेतों जाणार ह्मणून वर्तमान आलें आहे. ऐशीयास अर्काटवर गेले ह्मणजे त्रिचनापल्लीशीं खवडळी करितील. त्यास, त्रिचनापल्ली महास्थल, तेथें चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोंसले यांनीं राजश्री मुरारजी हिंदुराव घोरपडे वजारतमाहा यांस ठेविले आहेत. तेथील कुमक करणें स्वामींस अत्यावश्यक. येविषयींची तरतूद करणें ती केली आहे. हा सविस्तर अर्थ मशारनिल्हे यांनीं तुह्मांस लिहिला आहे, त्यावरून कळों येईल. तुह्मी त्यांचे वडील वडिलांपासून सेवक, श्रमसाहस विशेष केले आहेत, हें स्वामींस विदित आहे. त्यांनींही राज्याभिवृद्धीकरितां कष्ट मेहेनत केली आहे, हें तुह्मी जाणतच आहां. ऐसियास सांप्रत नवाबाचें आगमन जालेंच तरी टक्कर देणें. घाटाखालीं नवाब गेले तरी, बातमी येऊन पावतांच फौजाही कुमकेस येतील, हा निशा असों देणें. किल्ला सामान पुरें करून बंदोबस्त करणें. अंतर न करणें."*

या पत्रावरून मराठ्यांना निजामाचें राजकारण पूर्ण माहीत होतें, हें उघड आहे. ह्मणून मुरारराव घोरपडे यांस त्रिचनापल्लीचा बंदोबस्त करण्याबद्दल शाहूमहाराजांनीं पत्रें लिहिलीं होतीं. त्याचप्रमाणें, त्यांच्या मदतीस फौज व सरदार पाठविण्याचा प्रयत्न केला होता, असेंही दिसून येतें. ता. २ मे इ. स. १७४३ रोजीं शाहूमहाराजांनीं धारराव पाटणकर यांस पुढील आज्ञापत्र पाठविलें होतेंः—

"तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें, तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ विदित जाहला. महाराजांची आज्ञा घेऊन स्वार जाहला, ते राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यांची भेट घेतली. पुढें त्रिचनापल्लीकडे जाण्याचा विचार आहे ह्मणून लिहिलें. ऐसियास नवाब निजामउल्मुलुक त्रिचनापल्लीस जाऊन बैसला आहे. तेथील उपराळ्यास जावयाची आज्ञा राजश्री हिंदुराव घोरपडे ममलकतमदार

* शाहूमहाराजांची रोजनिशी पृ० २. ह्या पत्राचा सन रोजनिशीमध्यें 'समा अशरीन' हा दिला आहे, परंतु तो चुकीचा आहे. सन खमस आर्बैन हाच सन बरोबर आहे.

यांस केली आहे. ते फौजेसहवर्तमान जातील. त्यांसमागमें तुह्मीं फौजेसहवर्तमान जाऊन तेथील उपराळा करून, आपले सेवेचा मजरा करून घेणें."

ह्या पत्रांवरून निजामउल्मुलुख हा, फेब्रुवारी व मे या दोन महिन्यांचे दरम्यान, त्रिचनापल्लीस येऊन बिलगला होता, असें दिसून येतें. मुराराव घोरपडे यांनीं या प्रसंगीं निजामाशीं युद्ध न करितां, त्रिचनापल्ली मुकाट्यानें त्याच्या स्वाधीन केली, असें ऑर्म व ग्रांटडफ् यांनीं लिहिलें आहे; व मुराररावांवर अप्रत्यक्ष रीतीनें दगाबाजी केल्याचा आरोप ध्वनित केला आहे.* परंतु या राजकारणाचे अस्सल कागदपत्र मिळाल्यावांचून त्याबद्दल कोणतेंच मत देणें रास्त होणार नाहीं. शाहूमहाराजांच्या वर दिलेल्या पत्रावरून मुराररावांनीं स्वामिद्रोह केला असेल, असें संभवनीय दिसत नाहीं. परंतु निजामाच्या कांहीं कृत्रिम राजकारस्थानामुळें किंवा मराठ्यांच्या विशिष्ट हेतूमुळें, त्यांनीं त्रिचनापल्ली निजामाच्या ताब्यांत दिली असावी, असें मानणें अधिक सयुक्तिक होईल. मुरारराव घोरपडे यांच्या एकंदर चरित्रावरून ते स्वार्थाकरितां स्वराष्ट्राचा द्रोह करितील असें ह्मणवत नाहीं.

---

* मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रांटडफ साहेब लिहितातः—

"The murder of Sufdur Ali, Nabob of Arcot, by his brother-in-law, Mortiza Khan, in 1742 ; and the general confusion existing in the Moghul territories south of the Kistna, presented a favourable opportunity for Nizam-ul-Moolk's interference, to establish his power, and to restore tranquillity to the country. He accordingly marched from Hyderabad at the head of an immense army in January 1743, and upwards of a year was spent in concluding the arrangements he had contemplated. To obtain possession of Trichinopoly was an object of importance, but as matters stood with the Mahrattas, as the acquisition was prized by them, it must have been an affair of some political management. The family of Ghorapurey, however, was never firmly united with their countrymen after the murder of Suntajee; it is true they would rather have joined the Mahrattas, but superior advantages, and the chance of plunder, would induce them to fight on the side of the Moghuls or Europeans. Moorar Rao was recognized as chief of Gooty by Nizam-ool-Moolk, and evacuated the Carnatic with all his troops in August 1743."

—*Grant-Duff's History of the Mahrattas,* Page 262.

कर्नाटकचे इतिहासकार ऑर्म लिहितातः—

"[Nizam-ul-muluck] sent a summons to Morari Row, the Governor of Tritchinopoly to surrender the city. Finding that the Morathas persisted in refusing to obey his orders, he marched with his whole army, and sat down before it. Presents and promises supplied the place of hostilities in reducing it. In the month of August, Morari Row evacuated Tritchinopoly and soon after quitted the Carnatic with all his Morathas."

—*Orme's History of the Carnatic* Vol I. Page. 51



त्रिचनापल्लीचा किल्ला.

## ३. त्रिचनापल्ली.

क ५/८१



त्रिचनापल्ली हें इतिहासप्रसिद्ध शहर मद्रास इलाख्यांत कावेरी नदीचे कांठीं आहे. येथें अनेक राजकीय घडामोडी झाल्या असल्यामुळें, इतिहासांत या स्थलाचें महत्त्व विशेष मानिलें जातें. कावेरी नदीच्या दक्षिण तीरावर, गांवापासून एक मैलाच्या अंतरावर, त्रिचनापल्लीचा सुप्रसिद्ध किल्ला आहे. तो कावेरी नदीच्या प्रवाहानें निसर्गतःच बनलेल्या अत्युच्च खडकावर फार प्राचीनकाळीं बांधलेला आहे. त्याची उंची सुमारें ६०० फूट असून, दुरून त्याचा देखावा फार उत्कृष्ट दिसतो. हा किल्ला विश्वनाथनामक नायक राजानें सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें बांधिला असें ह्मणतात. पूर्वीं या किल्यासभोंवतीं उत्तम तटबंदीचें काम केलें असून खोल खंदकही खणलेला होता. या किल्याच्या मध्यंतरीं सुमारें २७३ फूट उंचीचा एक उंच खडकाचा सुळका असून, त्याच्या माथ्यावर एक शिवमंदिर बांधलेलें आहे. हा खडक, एक निसर्गदेवतेचें कौतुक असून, तो पाहाण्यासाठीं अनेक प्रेक्षकजन त्रिचनापल्ली येथें जातात. या स्थलापासून थोड्याशा अंतरावर 'नवाबाचा राजवाडा' ह्मणून एक प्रसिद्ध इमारत आहे. ही इमारत सुमारें सव्वादोनशें वर्षांपूर्वीं चोकनायकनामक राजानें बांधिली व तेथेंच अर्काटच्या नवाबांनीं आपलें निवासस्थान केलें, ह्मणून त्यास 'नवाबाचा राजवाडा' असें नांव पडलें आहे. त्या राजवाड्याची ब्रिटिश सरकारांनीं इ. स. १८७३ सालीं दुरुस्ती केली असल्यामुळें तो अद्यापि चांगल्या स्थितींत आहे.

त्रिचनापल्ली येथें अनेक हिंदू राजे होऊन गेले. सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं तेथें चोल राजे राज्य करीत असून, त्यांची पूर्वींची जुनी राजधानी 'उरेयूर' नांवाची होती. हें प्राचीन स्थल सांप्रतच्या त्रिचनापल्ली शहराजवळच असून, त्रिचनापल्लींतच त्याचा समावेश होतो. चोल राजांच्या मागून तेथें नायक राजे झाले. शेवटचा नायक राजा विजयरंग हा इ. स. १७३१ सालीं मृत्यु पावला. नंतर त्याची राणी मीनाक्षी इच्यापासून त्रिचनापल्ली संस्थान चंदासाहेबानें विश्वासघातानें हस्तगत केलें. त्रिचनापल्ली येथें श्रीरंगम् नांवाचें हिंदूंचें अति पवित्र देवस्थान आहे, त्यास यवनांचा उपसर्ग होऊं लागला. ह्यास्तव, व दुसऱ्या अनेक राजकारणांस्तव मराठ्यांनीं कर्नाटकावर स्वारी करून, त्रिचनापल्ली इ. स. १७४१ मध्यें जिंकून घेतली; आणि चंदासाहेब यास कैद करून साताराच्या किल्यावर नेऊन ठेविलें. तेथें तो इ. स. १७४८ पर्यंत कैदेंत होता. मराठ्यांनीं

त्रिचनापल्लीचा बंदोबस्त मुरारराव घोरपडे गुत्तीकर यांजकडे सांगितला. त्यांनीं इ. स. १७४१ पासून इ. स. १७४४ पर्यंत येथील राज्यकारभार केला. इ. स. १७४४ मध्यें त्रिचनापल्ली निजामउल्मुलुख याचे ताब्यांत गेली. तदनंतर थोड्याच दिवसांनीं चंदासाहेब मराठ्यांच्या बंदीवासांतून सुटून परत कर्नाटकांत आला; आणि फ्रेंच लोकांचें साहाय्य घेऊन, अर्काटचा नवाब महंमदअल्ली याजबरोबर लढूं लागला. महंमदअल्लीनें इंग्रज लोकांचें साहाय्य घेतलें व चंदासाहेबानें फ्रेंचांची मदत घेतली. नंतर या उभयपक्षांचें युद्ध सुरू झालें. तें इ. स. १७६३ पर्यंत चालू होतें. ह्या युद्धामध्यें त्रिचनापल्ली हें केंद्रस्थान बनून, तेथें इंग्रज योद्धयांचें रणशौर्य चांगलें व्यक्त झालें. ह्या युद्धामध्येंच चंदासाहेब हा इ. स. १७५२ मध्यें मारला गेला. इंग्रज व फ्रेंच ह्यांचें युद्ध पुढें बरेच दिवस चालू होतें, तें इ. स. १७६३ मध्यें पारिस येथील तहानें बंद झालें. पुढें कांहीं दिवस हैदर व टिपू ह्यांनींही ह्या स्थलास त्रास दिला. अखेर ब्रिटिश सत्तेचाच दक्षिण हिंदुस्थानांत विजय होऊन, त्रिचनापल्ली हें ठिकाण इंग्रजांच्या ताब्यांत गेलें.

त्रिचनापल्ली येथें मराठ्यांचा अंमल वास्तविक रीतीनें इ. स. १७४१ पासून १७४४ पर्यंतच होता. परंतु त्यांनीं येथील खंडणी वसूल करण्याचा प्रयत्न पुढें पुष्कळ दिवस केला होता असें दिसतें. त्रिचनापल्लीसंबंधानें शाहूमहाराज, फत्तेसिंग भोंसले व पेशवे ह्यांच्यामध्यें जे परस्पर करारमदार व यादी झाल्या आहेत, त्यांपैकीं कांहीं कागद उपलब्ध झाले आहेत. ते मासल्यासाठीं पुढें दिले आहेत. त्यांवरून त्रिचनापल्ली प्रांतांतून मराठे आपली खंडणी अथवा घांसदाणा इ. स. १७५२ पर्यंत तरी घेत होते, हें निश्चित आहे.

### लेखांक १.

श्री.		ता. १ नोव्हेंबर इ. स. १७४४.

"तीर्थरूप महाराज राजश्री आबासाहेब यांचे सेवेसीं:—

अपत्य फत्तेसिंग भोंसले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. साहेबीं कृपा होऊन, संस्थान त्रिचनापल्ली पूर्ववत्प्रमाणें आपली आपल्यास दिल्ही. ऐसियास कर्नाटकचा आंख संस्थानावरी सरकारचा मक्ता बसला आहे, त्याची वांटणी जे त्रिचनापल्लीवर बसेल, ते आपण सरकारांत देऊं. यास अंतर करणार नाहीं. स्वामींच्या पायांची शफत आहे. हे विज्ञापना. छ ७ सवाल सु॥ खमस आर्बैन मया व अलफ."

लेखांक २.

श्री. ता. ८ नोव्हेंबर इ. स. १७४४.

"श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री फत्तेसिंग भोंसले यांसी प्रति आशीर्वाद उपरीः– संस्थान त्रिचनापल्ली तुह्मीं पराक्रमें करून साध्य केली. यास्तव तुह्मांस सरमजामांत उस्तवारीबद्दल पूर्वींच दिली आहे, त्याजप्रमाणें करार केली असे. तरी तुह्मीं संस्थान मजकूरचा बंदोबस्त करून, अविच्छिन्न अनुभवणें. संस्थानावरी हुजूर रसद द्यावयाचा तह मुकर केला आहे. त्याजप्रमाणें दरसाल हुजूर पावतां करीत जाणें. संस्थानावरी रुपये ७५००० पाऊण लक्ष करार केले असेत. हुजूर देत जाणें. जाणिजे. छ १४ सवाल सु॥ खमस आर्बैन मया व अलफ. तुह्मांस पूर्वींच त्रिचनापल्ली संस्थान दिलें. संस्थानांत उस्तवारी करणें, ते करार असे. अनुभवणें. त्यावर रसद जे असल ते, तहप्रमाण ते हुजूर द्यावे. बहुत काय लिहिणें. आशीर्वाद."

लेखांक ३.

श्री. इ. स. १७४४.

"याद संस्थान त्रिचनापल्ली येथील करार सु॥ सन खंमस आर्बैन मया व अलफः–

| रुपये. | |
|---|---|
| १,७५,००० | ऐन. |
| २५,००० | दरबारखर्च. |
| २,००,००० | |

पैकीं वजा राजश्री बाबूजी नाईक जोशी संस्थान मजकुरीं गेले, पायमल्ली जाहली, सबब सोड रुपये ५०,०००.

बाकी करार रुपये १,५०,०००

तपशील

| | |
|---|---|
| १,२५,००० | ऐन बेरीज |
| २५,००० | दरबारखर्च |
| १,५०,००० | |

ऐन बेरीज रुपये १२५००० पैकीं राजश्री स्वामींस द्यावयाचा करार रुपये ७५०००

राजश्री फत्तेसिंगबाबा यांजकडे द्यावे. रुपये

७५,००० राजश्री स्वामींचे द्यावे.
२५,००० राजश्री फत्तेसिंग बाबा यांचे.
१,००,०००

बाकी ऐवज रुपये ५०,००० तपशील.

२५,००० राजश्री फत्तेसिंग बाबा.
२५,००० राजश्री पंतप्रधान.
५०,०००

सदरहूचा झाडा अलाहिदा लिहून दिला आहे.

## लेखांक ४.

श्री. ता. ९ जानेवारी इ. स. १७४५.

"तहनामा राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांनीं राजश्री फत्तेसिंग भोंसले यांस तह करून दिल्हा. सु॥ संवत्सर परगणे कुंभारी प्रांत गंगथडी विद्यमान राजश्री रामाजी दामोदर व गोविंदराव चिटणीस व त्रिंबक हरी सु॥ खंमस अर्बैन मया व अलफ.

सालमजकुरीं फौज स्वारीबद्दल खडी गणती फौज ३००० तीन हजारांची जोडी. कलम १.

मुरारजी घोरपडे व राणोजी घोरपडे वगैरे सरदार त्या वळणांतील (?) येतील त्यांस गणती देणें लागेल. ते ऐन बेरजेवर वजा करून त्यांस द्यावी. बाकी राहील त्याजवरी वांटणी दरसदे रुपये ३३ तेतीस प्रमाणें घेऊं. कलम १.

घांसदाणा वगैरे खंडणीमुळें जो पैका आला असेल, त्यास दरसदे रुपये ३३ तेतीस प्रमाणें घेऊं. कलम १.

सुभा भागानगर सुटले, तरी देखील गड कोट ठाणीं निमेनिम वांटून घ्यावीं. दिवाण देणें पडेल तें निमेनिम वांटणीप्रमाणें द्यावें. कलम १.

भागानगरचा पैका सांप्रत तहाप्रमाणें येत आहे. तो खेरीज करून जास्ती साधेल तरी निमेनिम वांटून घ्यावे.

सरमजाम महाल मुकासे देखील घांसदाणा महाल.

१ परगणे नांदेड हवेली.
१ ,, बरवाल.
१ ,, करकंब खेरीज टोपाळें.
१ ,, भोसें.
१ ,, सगार अथवा चितापुर दोन्हीपैकीं एक तुमचे खातरेस येईल तो.
॥ ,, लातूर.

येणेंप्रमाणें साडेपांच महाल सरंजाम द्यावा.

नक्त रुपये २५००० पंचवीस हजार स्वारींत समाईक ऐवजीं घेऊं. कलम १.

संस्थान त्रिचनापल्ली येथील गड कोट किल्ले निमेनिम वांटून घेऊं. दिवाण देणें पडेल तें उभयतांनीं वांटणीबरहुकूम द्यावें. कलम १.

त्रिचनापल्लीचा पैकाच आला, तरी दिवाण देणें देऊन, बाकी राहील तें निमेनिम वांटून घ्यावें.

गांव दहा, जुन्नर कडेवळीत व कर्डे रांजणगांव वगैरे प्रांत बरहुकूम गांव १०.

येणेप्रमाणें कलमें अकरा करार केलीं आहेत. यांत अंतर न करितां परस्परें चालवावें. छ १६ जिल्हेज (खुद्दाचीं अक्षरें) बहुत काय लिहिणें लेखनसीमा."

## लेखांक ५.

फसली सन ११५६. **श्री.** इ. स. १७४६ । ४७.

"विनंति उपरी. आपणापासून आह्मीं कर्ज घेतलें रुपये एक लक्ष. याचें खत अलाहिदा आपणांस लिहून दिलें आहे. या रुपयांचा ऐवज संस्थान त्रिचनापल्ली आह्मांकडे आहे. येथील सालमजकूरचा ऐवज, कराराप्रमाणें सदरहू कर्जाच्या ऐवजास दिला आहे. त्यास, संस्थानमजकूरचा जो आमचा ऐवज येईल तो, या कर्जाचे ऐवजीं आपण घ्यावा. हा ऐवज वजा होऊन कर्जाची बाकी राहिली, अगर संस्थानमजकूर पैकीं कांहीं न आलें तर, हरएक ऐवज देऊं. तो न दिला, तर सदरहू रुपयांच्या ऐवजास, पेस्तर सालापासून महाल पांच बितपशीलः—पे॥ वैजापूर, पे॥ अंतुर, पे॥ सुलतानपूर, पे॥ वेरूळ, पे॥ खंडाळें येकूण पांच महाल बाकी मक्ता रुपये ५०००० पन्नास हजारांस करार करून दिले आहेत. त्यास आतांप्रमाणें मुद्दल व व्याज जोंपावेतों फिटेल तोंपावेतों सदरहू महाल मक्तयानें दिल्हे असेत. तुह्मीं कमावीस करणें. तुमचा ऐवज फिटल्यावरी आमचे महाल आह्मी घेऊं. छ सु॥ सबा आर्बैन मया व अलफ."

## लेखांक ६.

फसली सन ११५७. **श्री.** इ. स. १७४७ । ४८.

"श्रियासह चिरंजीव राजमान्य राजश्री फत्तेसिंग भोंसले यांसीः—प्रति आशीर्वाद. राजश्री रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा यांचा आशीर्वाद ऐसाजेः— पूर्वीं तुमचे स्वाधीन कर्नाटकचे मामल्याचा बंदोबस्त करून, मामल्याच्या सनदा देऊन तुमची रवानगी केलीच आहे. त्याप्रमाणें करार असेत. आज्ञेप्रमाणें प्रांत मजकुरीं जाऊन, बंदोबस्त करून, हुजूरचा ऐवज कराराप्रमाणें हुजूर प्रविष्ट करणें.

हरएकविशीं चित्तांत संशय न आणणें. जाणिजे. "प्रांत सर करनाटकांतील लिहिल्याप्रमान् वर्तणूक करून उभैतां सुखी असां. आशीर्वाद."

### लेखांक ७.

श्री. ता. ६ एप्रिल इ. स. १७५१.

"अखंडित अलंकृत राजमान्य राजश्री शिवराव नारायण गोसावी यांसीं:-

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान सु॥ इहिदे खमसैन मया व अलफ. त्रिचनापल्लीचा ऐवज राजश्री फत्तेसिंग भोंसले यांचा तिस्सा खमसैनचा दुसाला येणें. त्या ऐवजापैकीं रुपये ३,१०,००० तीन लक्ष दहा हजार मशारनिल्हेकडे देवविले असेत. तर त्रिचनापल्लीचा ऐवज येईल, त्यांपैकीं सदरहू ऐवज मशारनिल्हेकडील कारकून येईल त्याचे पदरीं घालून कबज घेणें. जाणिजे. छ २० जमादिलावल. आज्ञाप्रमाण. लेखनसीमा."

### लेखांक ८.

श्री. ता. १४ एप्रिल इ. स. १७४९.

"यादी दास्त मतलब राजश्री फत्तेसिंग भोंसले यांजकडील आहेत. नबाबाकडून करून देववावे. सु॥ तिस्सा अर्बैन मया व अलफ (११४९).

अर्काटचा तह राजश्री बाबूराव सदाशिव यांचे वेळेस पांच लाख रुपयांचा होता. त्याप्रमाणें देववावा. कलम १.

चंदी, सरकारांत आमचें स्वराज्य आहे, अर्काटखालीं ओढत आहे; तें आमचें राज्य आह्मांस सोडून द्यावें. कलम १.

श्रीव्यंकटेश स्वामींस [तंका?] घेतात, ते आह्मांवरी मेहेरबानी करून माफ करून द्यावा. येविषयीं तीर्थरूप महाराज राजश्री स्वामींनींही आज्ञा केली आहे. हें पत्र करून द्यावें. कलम १.

पौन गौडा हा गांव राजश्री भिमाजी हनगे यांस इनाम आहे. तें चालत आहे. नबाबांनीं दिल्हें आहे. सांप्रत याचाही परवाना देवविला पाहिजे. कलम १.

कडपे, व कर्नोल, व अदवानी व सिरे या प्रांतास चौथाई सरदेशमुखीचा परवाना बाजवी देणें ह्मणून द्यावा. कलम १.

त्रिचनापल्लीस श्रीरंगराज, व्यंकटेश्वर व मातुभागेश्वर देवांस पूर्वीपासून इनाम गांव आहेत. त्यास नबाबांनीं परवाने करून दिले होते, ते तालुकदार चालवीत नाहीं. येविषयीं त्यांस ताकीद करून, सुदामतप्रमाणें श्रीचें इनाम चालतें करावें. कलम १.

राजश्री गोविंदराव पांढरे समशेरबहाद्दर यांस सरंजामाची सनद करून दिल्ही आहे. त्यास नबाबाकडील तालुकदारांस पत्रें देववावीं.

१ राजेश्वर.
१ सादुल्लाखान.
१ किल्लदार बेदर येथील.
१ मिरडीचा?
१ रामचंद्र जाधवराव.
१ रुस्तुमराव पांढरे.
१ हुसमखान.
१ तालुकदारास.

एकूण सहा पत्रें देववावीं. येणेंप्रमाणें करार करून देववावीं.

एकूण कलमें सात आहेत. छ ७ जमादिलावल."

लेखांक ९.

श्री. इ. स. १७४९–५०.

"यादी सरंजाम राजश्री फत्तेसिंग भोंसलें सु॥ खमसेन मय्या व अलफ. प्लवनाम संवत्सरे. बेरीज रुपये:—

२५,०९,२५५ कदीम सरंजाम.
४,६५,००० कानोजी भोंसले यांचे सरंजामापैकीं.
४,०५,५०० होनाजी अनंत यांचे सरंजामापैकीं.
५०,००० भागानगरपैकीं.
२०,७०,२४५ घांसदाणीयाचे महाल. त्रिचन्नापल्ली तालुका मधुरा, श्रीरंगपट्टण तालुका, तिणेवल्ली, जगदेवगड, मुद्गल, रायचूर, कर्यात [हवेली एकूण महाल १५०.]

५५,००,०००

पैकीं सरंमजाम महाराज कैलासवासी जाहलीयावर वरचेवर गेला. रुपये ५२,५०,०००

बाकी सरकारचे दप्तरीं बेरीज रुपये २,५०,०००

तपशील

१,५०,००० परगणे अक्कलकोट इनाम चालत होते.
१,००,००० दौलतीचा खर्च, वांटणी यांची, महालचे शिबंदी व स्वार कांहीं चाकरीस जात होते.

२,५०,०००

तपशील.

२,२६,३५५ अंमल येतो.

२३,६४५ अंमल येत नाहीं.

२,५०,०००

## लेखांक १०.

### श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेब यांचे मखलाशीची याद.

श्री. इ. स. १७५२.

"यादी कार्यें राजश्री पंतप्रधान यांजकडून करून घ्यावीं. सन ११६२.

त्रिचनापल्ली व भागानगर येथील ऐवज आज तीन वर्षें पावत नाहीं. तो देववावा. कलम.

"दंग्यामुळें ऐवज न आला. येईल तसा पावेल."

बाबतीचें वचन गुदस्तां गुंतलें आहे कीं, पेस्तर सालांकारणें सोडून द्याव्या.

"मामला, आह्मी रुपये देतच आहों, आह्मांकडे करार करावा."

भागानगरचा मजकूर चौथाई द्यावचा गुदस्तां सांगितला आहे, तेणेंप्रमाणें करारांत आणावा. गाजुद्दीखानापासून भागानगरविसीं सरकारची चौथाई पेशजी-प्रमाणें द्यावी. मक्त्यांतून देवावे.

"तूर्त नाहीं. सरदार आह्मी एक जाल्यावर विचार करणें तो करूं."

परांडे, हवेली वगैरे तालुके यांत राजश्री जानोजी निंबाळकर यांचा तह आपल्या विद्यमानें जाहलाच आहे. स्वराज्यांतील उपसर्ग लागलीयानें ऐवज मजुरा घेतात. असें असतां सालगुदस्तां राजश्री शामराव दिवाण सरलष्कर यांस समक्षा-नुवादें सांगितलें असतां, त्यांणीं गुदस्तां रुपये घेतले. प्रस्तुत त्यांस ताकीद करून, गुदस्तां रुपये घेतले आहेत ते फिरोन देववावे, व पुढें त्यांचा उपसर्ग न लागे तें करावें. कलम.

"यांचे मामल्यांत उपद्रव एकंदर न देणें. गुदस्तांचा ऐवज माघारा देणें असें पत्र द्यावें."



बदली करून, त्यांचीं पत्रें येऊन हे गेले, असें ऐकिलें. राजश्री रंगराव महादेव येथें वरचे वर बाईचे भेटीस आले. सहा घटकांपावेतों राहून, मागतीं रेवापार होऊन, देशास आले आहेत. बाईशीं बोलणें विशेष जालें नाहीं. शिष्टाचारपूर्वक बोलणें जालें. मी प्रसंगीं होतों. इकडे पर्जन्य बहुत. अतिवृष्टि जाली. सरकारचे उंट व घोडीं कुशलरूप आहेत. बाईकडून खर्चाचा विचार घडत नाहीं. त्यांची मर्जी ! सरकारचे पदरचे, त्यांजवर लोभ करणें त्यांस संकट पडतें. मी तर आज्ञे-प्रमाणें वर्तत आहें. समाचार घेणें खावंद समर्थ आहेत. तेथें सेवकांनीं चिंता कशास करावी? सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १००.

श्री. ३ आगष्ट १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र २४ रमजानचें विनंतिपत्र लिहून रवाना केलें. त्याअलीकडील वर्तमानः—बऱ्हाणपूरची मामलत व खांडवें, दोन्ही मामलती भुसकुटे यांनीं सोडल्या. बऱ्हाणपूर, मेवामल यांचे चिरंजीव ओंकारमल यांनीं केलें. खांडवें, रुद्राजी खंडेराव यांचे नातवांनीं केलें. जैनाबाद, तेही महाल इकडील रांगडा पटवारी, त्यानें केले. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. राघोगडच्या फौजा राजश्री पाटीलबावांकडील आहेत. हस्तगत किल्ला जाला नाहीं. राजश्री लक्ष्मणराव कृष्ण परांजपे हे सरकारांत राहून, कांहीं चाकरी करून मुजरा करावा, असें त्यांचें मानस. मर्द, शिपाईगिरीस चांगले, घरचे घोडे दोनशें तीनशें पावेतों आहे. येथें बाईकडून खरगोण व देपाळपूर ही मामलत आहे. राजश्री शिवाजी विठ्ठल यांजकडून अष्टें वगैरे चार महाल आहेत. राजश्री तुळसाजी वाघाकडून महतपूर आहे. परंतु श्रीमंतांच्या चरणांजवळ राहून, मोठेंसें काम काज करून रहावें, येविषयीं विनंति. त्यांस अभयपत्र सादर जाल्यास, सेवेसीं दर्शनास येतात. जी चाकरी साहेब आज्ञा करितील त्याप्रमाणें वर्तणूक करूं, ह्मणून विनंति करितात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०१.

पैवस्ती चंद्र २० सवाल. **श्री.** १३ आगष्ट १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र ८ रमजानचें विनंतिपत्र लिहून सेवेसीं पाठविलें, त्या अलीकडील वर्तमानः–राजश्री आनंदराव शेषगीर, राजश्री पाटीलबावांचे लष्करांत, आनंदराव पवार यांजकडे गेले होते. ते तिकडून येऊन, येथें दोन मुक्काम करून देशास गेले. डांकेचे रोजमुरे डांकेस पावले. लिंगोजीनाईकाकडील फडनाईक येऊन रोजमुरे देऊन गेला. राघोगडचे मोरचे आहेत. अद्यापि फडशा जाला नाहीं. भोपाळकरास शह देणार. राजश्री लक्ष्मणराव कृष्ण परांजपे यांची इच्छा, जमियतीनिशीं सेवा सरकारची करावी. घरचा सरंजाम, दोनशें तीनशेंपावेतों पागा आहे. यांजविषयीं विज्ञापना पेशजीं लिहिली असे. आज्ञापत्र मशारनिल्हेस आल्यावर हुजूर येतील. यावर आज्ञा करणार धनी समर्थ. इकडे पर्जन्य बहुत जाला. अतिवृष्टि जाली. येथील खर्चाविषयीं म्यां विज्ञापना लिहावी, त्यास सेवकास खांवदांवेगळी इतरांची आशा नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०२.

पै॥ चंद्र २७ सवाल सन सीत समानीन श्रावण मास. **श्री.** २७ आगष्ट १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ माहे सवालपावेतों श्रीकृपें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र २४ साबानींचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ८ सवालीं राजश्री शिवराम नारायण यांनीं पाठविलें. वरकड पत्रें व स्वार चौघे, घेऊन परभारें मंडलेश्वरास गेले. माझ्या पत्रीं आज्ञा कीं, मंडलोई कसरावदकर बाईनीं राजश्री गबाजी सदाशिव यांचे हवालें केला असेल. नसला केला, तर बाईशीं बोलून हवाला मंडलोई करवावा ह्मणून आज्ञा. त्यास, मंडलोई मजकूर पूर्वींच हवाला जाला आहे. हें वर्तमान सेवेसीं लिहिलें होतें. त्याउपरी चंद्र ५ रमजानचें पत्र प्रविष्ट जालें. तेथें आज्ञा कीं, मंडलोई यास हुजूर आणविलें आहे. कमावीसदार पाठवितील. बाईनीं दिक्कत केली तर तुह्मीं बोलावें, असें पत्र आलें. तें चंद्र १६ रमजानीं डांकेवरून पावलें. त्याउपरी स्वारांची प्रतीक्षा होती, तों स्वार राजश्री शिवराम

नारायण यांनीं पाठविले. ते चंद्र ९ सवालीं मंडळेश्वरीं, २५ पैकीं चौघे पावले. दुसरे दिवशीं भटजी येथें आले, वर्तमान कळलें. स्वारांस सांगितलें कीं बाकीचे स्वार घेऊन येणें. त्यावरून स्वार माघारे त्यांपैकीं एक गेला. बाकीचे तीन स्वार मंडळेश्वरीं आहेत. सेवसीं, मंडलोई यांचा मजकूर पेशजीं लिहून पाठविला आहे, व बाबा भटजींनीं बाईस लिहून दिल्हें त्याची नक्कल पाठविली, त्याउपरी हे स्वार आले. त्यावरून बाईशीं बोलून ठेविलें आहे. बाईचें बोलणें कीं, "मंडलोई हरामखोर आहे; सोडावयाचा नाहीं. येथें येऊन सरकारची नुकसानी महालीं केली, ती भरून घ्यावी. सरकारचें ठाणें आहे तेथें कैदेंत बिडी घालून ठेविलाच आहे. आमचे मनांत विपरीतच असतें, तर मी कमाविसदार याचे हवालीं मंडलोई यास न करतें. सांप्रत सरकारची आज्ञा आली तर उजूर नाहीं. तेथें गेल्यास सरकारचे नुकसानी भरून घ्यावी. ब्राह्मण आहे. त्यास मारितां येत नाहीं. कैदेंतच ठेवावा. पाठवावयाविषयीं त्याचा आग्रह तर नाहीं. परंतु साफ ह्मणत नाहींत कीं, रवाना करा. याप्रमाणें मजशीं बोलणें जालें, व भटजींशींहि याप्रमाणेंच. त्यांत तुह्मी कमावीसदार आहांत; येथें येऊन त्याचा बंदोबस्त केला तर होईल." भटजींनीं उत्तर दिलें कीं, हें खरें, परंतु आज्ञा सरकारची आली आहे, त्यास उपाय काय? तूर्त श्रावणमासींचे उत्सवाचे दिवस आहेत. गांठ फार करून पडत नाहीं. स्वारही झाडून आले नाहींत. एका दो दिवशीं आल्यानंतर रवानगी ठरेल. त्याप्रमाणें जालें वर्तमान सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०३.

पै॥ चंद्र १६ जिल्काद सन सीत समानीन भाद्रपदमास

श्री.

१६ सप्टेंबर इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १० माहे जिल्कादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र २४ चें आज्ञापत्र सादर जालें. त्यांत बाईचे नांवें पत्र तपशीलवार लिहिलें होतें. सदरहू दोन्हीं पत्रें चंद्र ३ जिलकादीं प्रथम प्रहरीं पावलीं. पत्रार्थ श्रवण करून, बाईचे पत्राची तालीक मीं आपलेपाशीं लिहून घेऊन, बाईचें पत्र बाईस दिल्हें. कारभारी ४ व मातुश्री, एकजागें बसोन पत्र अक्षरशहा राजश्री मुकुंदराव हरी यांनीं वाचून दाखविलें. मजला आज्ञा होती, पत्रान्वयें बोलून क्षेपनिक्षेप कार्य घडून यावें ह्मणून. त्यावरून आज्ञेप्रमाणें बोलावें, त्यास ते दिवशीं

बाईनीं पत्र ऐकून कांहींच उत्तर दिलें नाहीं. स्नानास उठोन गेली. रात्रीं भोजन करून बसलीयावर मी गेलों. त्यांजपाशीं रामपुरेकर कमाविसदार होते. त्यांस निरोप देऊन मजशीं बोलावयास लागली. उभयतांच होतों. बोलणें सर्व आज्ञेप्रमाणें बोलत असतां, बाईची मर्जी कीं, "देशींचे महाल व खानदेशचे महालाचे झाडे श्रीमंतीं पाहून आह्मांकडे पाठविले. इकडील माळव्यांतील माहितगिरी साल दरसाल आह्मी झाडे लिहून पाठवितों. असें असतां त्यांजकडील महालाचा ऐवज थोडका समजावितात, महालीं पायमल्ली जाहली ह्मणतात, हें कसें श्रीमंतांचे ध्यानांत येत नाहीं? देशीं पायमल्ली कोणती जाहली आहे; कोणाचे फौजा येऊन महालीं उपसर्ग जाहला? पागेचीं घोडीं लिहिलीं किती, खर्च जास्त वाढवून लिहिला? बारगीर पंधराशें लिहिले, चार हजार कमपेष घोडीं लिहिलीं; त्यांत १५शें स्वार हे कसे? वरकड घोडीं काय जाहलीं? सरकारांतून जातीस सरंजाम निराळा, फौजेचा सरंजाम निराळा. सात वर्षें चाकरी घडली नाहीं. ऐवज कोठें गेला, हें खावंदांनीं त्यांस विचारावें कीं नाहीं? त्यांजकडील महालाचा ऐवज रदकर्ज वजा होऊन, सहा लक्षांची बेरीज दाखविली, ही कशी समजूत जाहली? मजवरच काय ह्मणोन लिहितात? मी आपला खर्च करितें, त्यांत सरंजाम महालाचा ऐवज येत नाहीं. सरंजामी महाल मजकडे किती आहेत? त्यांत सरदारी खर्च वजा होऊन, बाकी ऐवज राहील तो झाडून रवाना करीन. त्यांत अंतर करीन तर दोषी होईन. खावंद धनी, आपली दौलत उणी अधिक पाहून करितात. तसें आमचें पहात असावें. आह्मी नको ह्मणत नाहीं. दुसाला रसदा घेऊन, जमीदारी हक्क व दरकदार यांचे बद्दल मुशाहिरे घेऊन, पंधराचा भरणा करून पाठवावा असें लिहिलें. त्यास माझें ह्मातारपण, माझे भरंशावर लोक रसद दुसाला कसे देतील? सरदारी जिकडे, तिकडून खातरजमा असावी. माळव्यांत महाल त्यांजकडे पाटणसुद्धां शिरोंज वगैरे आहेत. तो ऐवज परभारा त्याजकडे पडतो. मजकडे महाल, त्याचा जावसाल लिहिला आहे. मजला परभारें पत्रें राजश्री दादाजीचे विद्यमानें आलीं, त्यांचे जाब रवाना केले. ते समजावितील. जो ऐवज आहे त्यांत एक पैसा न ठेवितां पाठवीन. तुमचे मार्फत पत्रें आलीं, त्याचीं उत्तरें तुह्मांपाशीं लिहून देईन; तूर्त देत नाहीं. भागवताचा सप्ता आरंभिला आहे, त्याची समाप्ति होय तोंवर फावत नाहीं. इतकें बोलून शेवटीं बोलली कीं, हें बोलणें तेथें लिहूं नये. तुमचें आमचें बोलणें. त्याउपर अलीकडे बोलणें जाहलें नाहीं. पौर्णिमेइतकें पारायण समाप्त होईल. त्याउपरी आज्ञेप्रमाणें बोलून पत्राचा जाब घेऊन पाठवितों. तूर्त तीन लक्षांची तरतूद करितात.

भाद्रपद अखेरींइतका ऐवज पाठवितील. सारा ऐवज पांच साडेपांचपावेतों पाठविणार. महालकरी दुसाला रसदा देतील, गुंता नाहीं. मीही बाईस बोललों कीं, आपण दुसाला रसदा घेऊन ऐवज पाठवावा. त्यांचें मानस कीं, मजला भरंवसा पुरत नाहीं. उदासीनतेचे प्रकार आहेत. कारभारी यांचें बोलणें याप्रमाणेंच आहे. राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे पत्रांचीं उत्तरें सविस्तरें लिहून पाठविलीं आहेत. सेवेसीं सविस्तर कळेल. राघोगडास फौजा आहेत. किल्ला खाली जाहला. तेथील राजा पळोन गेला, असें वर्तमान ऐकिलें. मागाहून पक्कें वर्तमान कळल्यावर सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १०४.

पै॥ छ १ जिल्हेज सन सीत आश्विन **श्री.** २७ सपटेंबर १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ माहे जिल्कादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ २४ सवालचीं पत्रें, एक बाईस व सेवकास सादर जालीं. त्याचें विनंतिपत्र मीं आपलें लिहून छ १० मिनहूस रवाना केलें. त्या पत्रीं, येथें बाईशीं बोलणें जालें त्याचा तपसील लिहिला होता. बाईच्या पत्राचें उत्तर, सप्ता प्रारंभ जाला म्हणोन उत्तर जालें नव्हतें. सांप्रत नित्य बोलत असतां, काल पत्राचें उत्तर दिल्हें. त्या पत्रीं सारांश कीं, कर्जास महाल दिल्हे त्यांचा ऐवज व आणखी महालचा ऐवज घेऊन लौकर रवानगी करूं, म्हणोन आहे. तेथून लिहिल्याअन्वयें दुसाला रसदा व कमाविसदारांचीं वेतनें व दरकदार यांचीं वेतनें घेऊन, पंधरा लक्षांचा भरणा करावा हें मानस नाहीं. मी वारंवार स्मरण देतों कीं, मसलत एक वेळ पडते. घडीघडी मसलतीचा जाबसाल पडतो असें नाहीं. त्यांत ये मसलतीविषयीं आगाव चार सा महिने सूचना लिहीत आहेत. प्रसंगास उपयोग आपणांकडून पडावा. असें असतां आपलें लिहिलें हेंच कीं, दौलतींत उणें न पडून सरकारचाकरी घडावी अशीं पत्रें मात्र लिहितां, त्याप्रमाणें अमलांत येत नाहीं! असें बाईशीं बोललों. त्यावरून बाईनीं उत्तर दिल्हें कीं, देशीं राजश्री तुकोजीबावांनीं दुसाला रसदा घेतल्या हें वर्तमान कळलीयावर, मी घेईन असें बोलली. यावर मीं उत्तर दिल्हें कीं, ही गोष्ट त्यांचे चालीवर तर नाहीं. सरकारचें लिहिणें आहे, तेव्हां तेथें याप्रमाणेंच घडेल. त्याप्रमाणें तुम्हीं करावें. परंतु त्यांच्या मर्जीस येत नाहीं. बोलणें तेंही बोलत असावें, परंतु त्यांचें करणें तें करितात. दुसाला रसदा व

मामलेदार वगैरे यांचीं वेतनें घेऊन, लिहिल्याप्रमाणें रवानगी करितां दिसत नाहीं. लिहिण्यांत व बोलण्यांत गोड आहेत. करणें तादृश आहे. स्वामींनीं पत्रीं विस्तारपूर्वक मसलतीचा प्रकार लिहिला होता, त्याप्रमाणें उत्तर येथून लिहिलें नाहीं. घराऊ पत्रें राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे गेलीं आहेत. त्या पत्रीं खुलासा लिहिला असेल. शोध घेतांना तेथेंही याच अन्वयें आहे. मग न कळे. ऐवज रवानगीविषयीं, लौकरच हुंड्या पाठवितें ह्मणून बोलतात. रवानगी केलीयावर सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै। छ १० मोहरम सन सीत. **लेखांक १०५.**

**श्री.** ३१ आक्टोबर इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं: —

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ माहे जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री पाटीलबावांचे लष्करचें वर्तमान, श्रीमथुरेनजीक मुकाम आहे. राजश्री राघो मल्हार यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें आश्विन शुद्ध २ होणार होतीं, तीं जालीं असतील. राजश्री माधवराव गंगाधर यांजकडून कारभार काढावा असें ऐकिलें. व राजश्री रामजी पाटील जाधव लष्करांतून खिचीचे प्रांतांत आले. राघोगडास मोर्चे आहेत, ती फौज घेऊन रामगडास जावें. राघोगडवाले यांचा दारमदार करून फौज उठवून न्यावी असें ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०६.

**श्री.** ३१ आक्टोबर इ. स. १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ माहे जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—राजश्री गोविंद रघुनाथ गानू, निसबत बाई याजकडील खासगी कारभारी, श्रीस जावयास निरोप घेऊन, अश्विन वद्य सप्तमीस स्वार होऊन गेले. कुटुंबसुद्धां व खर्चास रुपये दहा हजार दिले, व विश्वनाथ भट मालवी ब्राह्मण, तेही कुटुंबसुद्धां गेले. त्यांस तीन हजार रुपये दिले. व मनकर्णिकेचा घाट नूतन बांधावयास बाईंनीं कारकून व पंचवीस हजारांच्या हुंड्या देऊन श्रीस पाठविला, व दशाश्वमेधीचा घाट व गयेस विष्णुपदाचें देवालय सिद्ध जालें. त्याचा वास्तु, गोविंद रघुनाथ जाऊन

करितील. त्यांस सांगितलें. सोरटी सोमनाथ येथील देवालय नूतन करविलें. तेथें दहा हजारांच्या हुंड्या देऊन कारकून पाठविला. दोन्ही कारकुनांची रवानगी अश्विन मासांत केली. दुसरें वर्तमान, भिलाणगांव सरकार बिजयागड येथील मंडलोई परांगदा आहे. त्यानें खांडवे परगण्यांत राहून, तेथून येऊन, भिलाणगांवचें ठाणें मारून, दोन बारगीर ठाण्यांत होते ते मारले. गांवचे बंद धरून नेले. हें वर्तमान बाईस कळल्यावर जमियत पाठवून, खांडवे परगण्याचा गांव मातबर मारून, बादवें धरून गुरें ढोरें आणलीं. पुढें होईल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०७.

**श्री.** १३ नोव्हेंबर इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १० माहे मोहोरम भानुवासरपावेतों सेवकाचें वर्तमान स्वामिकृपाकटाक्षेंकडून यथास्थित असे. विशेषः—येथून सेवेसीं विनंतिपत्रें छ ६ जिल्हेज व छ २७ जिल्हेज दोन पत्रें पाठविलीं. त्यांचीं उत्तरें यावयाची आज्ञा करणार स्वामी समर्थ. तेणेंकरून सेवकाचे चित्तवृत्तीस संतोष होतो. सांप्रतचें वर्तमानः—राजश्री मल्हारराव पवार त्यांची स्त्री, राजश्री पाटीलबावांचे लष्करांतून देशास जावयानिमित्य येथें आली. येऊन बाईची भेट घेऊन, आज स्वार होऊन गेली. मातुश्रीपासोन पत्रें लिहून घेतलीं. एक आपले नांवें व एक राजश्री हरिपंत तात्यांचे नांवें, व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांस, असीं तीन पत्रें बाईनीं लिहून देऊन, मजला बाईनीं बोलावून सांगितलें कीं, मल्हारराव पवार यांच्या साहित्याविषयीं राजश्री महादजी शिंदे यांणीं पत्रें सरकारांत लिहून पाठविलीं, त्याच अन्वयें आह्मीं पत्रें सरकारांत लिहिलीं आहेत. अशी सांगों लागली. मीं उत्तर दिल्हें कीं, कारण काय सांगावयाचें? तर बाई बोलली कीं, सरकारचे कारभारांत लिहिणें कसें? त्याचें उत्तर म्यां दिधलें कीं, आपले लिहिण्याचा व करणें त्याचे ठायीं सरकारचा अनादर कधीं जाला कीं? असें संशय घेऊन बोलावें याचें प्रयोजन नाहीं. इतकेंच बोलणें छ ८ मोहोरम शुक्रवारीं जालें. सेवेसीं कळावें. छ ७ मोहोरमीं राजश्री बाळाजी बावाजी हरी बावाजीचे बंधु, देशींहून राजश्री पाटीलबावांकडे जावयानिमित्य कुटुंबसुद्धां येथें आले. बाईची भेट घेऊन परस्परें वस्त्रादिक शिष्टाचार होऊन गेले. बाईजवळ सांगत होते कीं, राजश्री पाटीलबावांचीं पत्रें आलीं

कीं दोनशें राऊत घेऊन येणें. त्याजवरून दीडशें लोक बराबर घेतले. कांहीं मागाहून येतील. तोंपावेतों उज्जनीस राहून, ते स्वार आलीयावर पुढें जाऊं. याप्रमाणें सांगोन काल छ ९ मोहरमीं पुढें उज्जनीस गेले. पेंढारी यांणीं इकडे फार हरामखोरी आरंभली आहे. पवार कवठेकर यांचे तालुक्यांत वगैरे प्रांतांत धूम करितात. लुटून गांवचे गांव खराब केले. त्याजवरून राजश्री मकाजी गीते वगैरे पागा बाईनीं त्यांजवर पाठविल्या, व राजश्री तुकोजी होळकर यांस पत्रें लिहिलीं कीं, यांस निरोप द्यावा, अथवा कोठें घेऊन जावें. नाहींतर या प्रांतांत वस्ती होऊं देणार नाहींत, असें लिहिलें. सेवेसीं कळावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०८.

श्री. १३ नोव्हेंबर १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १०मोहोरम भानुवासरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–सरकारांत धोतरजोडे पाठविले, त्याची बाकीसाकी येणें होतें ह्मणून येथून विनंतिपत्र लिहून, सेवेसीं राजश्री धोंडोपंत पाठविले, व येथील वर्तमान कळावें ह्मणोन त्यांस पाठविलें. त्यांचें दर्शन बेलबागेंत जालें. पत्र लिहून त्यांजपाशीं दिल्हें. तें द्यावयास त्यांजला अवसर साधला नाहीं. धोतरजोड्याची याद करून, राजश्री कृष्णाजी नाईक तात्याजवळ दिधली. त्यांणीं सेवेसीं विनंति करून, मखलासी होऊन स्वामी कृपाळु होऊन देणें करून दिल्हे; परंतु ऐवज पावत नाहीं. कारण कीं, पूर्वीं एकुणीसशें रुपयांची वरात गंगाजलनिर्मल अहिल्याबाई होळकर यांजवर सरकारांतून जाली. त्या वरातीचा रुपया बाई देत नवती. पंचवीस हजार शिरोंज पै॥ न द्यावें, यामुळें तसीच वरात होती. पुढें परियाय करून रुपये एकुणीसशें वसूल केले. त्यापै॥ येथें खर्चास घेतले रुपये ४००. त्याविषयीं विनंतिपत्र तेच समई लिहून सेवेसीं पाठविलें. बाकी १५०० रुपये राहिले, त्याच्या हुंड्या करून पाठविल्या. त्याचा जाब आला. ते चारशें रुपये तसलमातीस माझे नांवें सरकारांत पडले आहेत. त्यांत धोतरजोड्याचे वजा करूं ह्मणोन फडके कारकून ह्मणतात, असें धोंडोपंतांनीं लिहिलें. यावरून सेवेसीं विनंति. तो ऐवज परभारें येथील मारूचा देणें, तो सावकारापासोन घेऊन दिल्हा आहे. राजश्री कृष्णाजी नाईक तात्या यांकडील येथें लक्ष्मणराव कृष्ण यांजपासोन ऐवज आजपावेतों खर्चास घेत आहे. त्यांजला ऐवज पावत नाहीं ह्मणोन त्यांणीं येथें लिहून मना करविलें.

परदरबारीं स्थित कसी राहील? बाईकडून खर्चास यावें तर ती गोष्ट नाहीं. सा महिन्यां एक रोजमरा देतात. आर्बा व खंमस व सीत, तीन वर्षें जालीं. तीन हजार रुपये आजपावेतों येथें कर्ज जालें. त्याचा निर्गम होईल, चिंता वाटत नाहीं. परंतु सेवेसीं हें लिहिणें प्राप्त जालें. सरकारचाकरीचा प्रकार सेवकाकडून घडल्यास सेवेसीं लिहिलें तर हर्ष वाटतो. पोटाचें लिहिणें तें संकट चित्ताचे ठाईं, जाणोन कधींही विनंति लिहीत नाहीं. जरूर जाणोन लिहिलें. सेवक परदरबारीं आहे. स्वरूप राखावयाचें अंकिताकडे काय? सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १०९.

**श्री.** २४ नोव्हेंबर १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ मोहोरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १ मोहोरमचें विनंतिपत्र पाठविलें, तें सेवेसीं येऊन पोहोंचलेंच असेल. त्या अलीकडील वर्तमानः— ऐवजाकरितां बाईस वरचेवर स्मरण देत गेलों. त्यास, पावणेदोन लक्ष रुपयांची रवानगी करितों, असें बोलण्यांत. हुंडी करून राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे रवाना करावी, याप्रमाणें ठरलें असतां पाठविली नाहीं. फिरोन हटकिलें कीं, ऐवज पाठविण्यास स्थीरता दिसून येते, याचें कारण काय? उत्तर केलें कीं, श्रीमंतांची स्वारी नाशकास गेली, त्याजसमागमें यशवंतराव गंगाधरही गेले आहेत; यास्तव पाठविला नाहीं. स्वारी फिरली ह्मणजे रवानगी करूं, असें आहे. यावरून दिसून येतें कीं, दादाजींनीं कांहीं सूचना लिहिली असेल. ऐवज राजश्री गणपतराव विष्णू यांजकडून देविणार. पुढें साडेदहा लक्ष रुपयांचे भरण्यासाठीं सुचवीत असतों. उत्तर करितात कीं, महालचे झाडे यशवंतराव यांनीं समजाविले आहेत. पुढें हा ऐवज रवाना जाहला ह्मणजे झाडे समजाऊन देतील. याप्रमाणें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. आमदानी पादशाहाकडील बदलून, फौज धरून धूमधाम करीत होता. त्याचें पारिपत्य राजश्री पाटीलबावांनीं केलें. त्यास आपले डेऱ्यानजीक ठेविलें. त्याजकडील तोफखाना झाडून आपले कारखान्यांत लाविला. पलटणें व फौज होती त्यांस निरोप देणार होते. पादशाहाचा पुत्र इंग्रजांनीं समागमें नेला होता, तो परतोन येऊन पादशाहास भेटला. पातशाहांनीं पाटीलबावांस माहीमरातब दिली. ऐशीं पत्रें आलीं, त्यावरून सेवेसीं लिहिलें आहे. श्रीकाशीची यात्रा, मार्गशीर्ष वद्य पंचमी श्रीओंकारास गेली. मर्दान्याचे घाटानें उतरून उज्जनीवरून जाणार. येथून बाईंनीं पागा बंदोबस्तास पाठविल्या आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ११०.

श्री. १६ डिसेंबर १७८५.

"विज्ञापना ऐसीजेः– श्रीमहायात्रा बारा तेरा हजार देशीहून आली. श्री-ओंकार-मांधाता येथें दर्शन घेऊन शेंमुर्ज्याच्या घांटानें इंदुरावरून उज्जनीस गेली. मजल दरमजल सागरास पौष शुद्ध पौर्णिमेपावेतों जाणार. राजश्री मोरो बापूजी फडके यांनीं, सरकारचीं पत्रें जासूदजोडीबराबर देऊन बाईकडे पाठविलीं होतीं. त्याजवरून बाईनीं पागा वगैरे देऊन, ओंकारापासून उज्जनीपावेतोंच चवकीपाहरा करून पोंहचावून दिले. ओंकारचे मुक्कामींहून राजश्री मोरोपंत यात्रा घेऊन उज्जनीस गेले. राजश्री रामराव त्रिंबक व राजश्री बाबुराव वैद्य व राजश्री केसोपंत कुंटे असे त्रिवर्ग सडेच इकडे बाईचे भेटीकरितां आले. भेट होऊन एक दिवस ठेवून घेतले. तिसरे दिवशीं रामराव यांस पागोटें व शालजोडी, व त्यांचे मातुश्रीस पातळ व स्त्रीस लुगडें खण, व बाबुराव यांस पागोटें व शालजोडी, व केसोपंत यांस शेला पागोटें याप्रमाणें वस्त्रें देऊन, उज्जनीपावेतों पंचवीस राऊत देऊन, निरोप दिल्हा. माझे वडील बंधु कुटुंबासुद्धां पुण्याहून श्रीयात्रेस गेले. त्यांचे भेटीकरितां उज्जनीपावेतों गेलों होतों. भेट घेऊन माघारें आलों. सेवेसीं श्रुत होय. उज्जनीस वर्तमान ऐकिलेंः—राजश्री पाटीलबावा पादशाहास बराबर घेऊन जयपुरचे रोंहकावर कूच करून गेले. आग्र्याचा किल्ला व आमदानीकडे जो मुलूख होता तो, पाद-शाहांनीं सरकारांत दिला, ऐसें वर्तमान आलें. राजश्री शिवाजी विठ्ठल यांचे दोघे पुत्र गत जाले, ह्मणून देशीहून त्यांची सापत्न माता व राजश्री बाजीराव व राजश्री खंडेराव कुटुंबासुद्धां पाटीलबावांचे लष्करांत जाणार. ते पौष शुद्ध पंचमीस महे-श्वरास आले. दोन दिवस मुक्काम होता. बाईनीं त्यांस मेजवानी केली, वस्त्रें दिल्हीं. राजश्री माधवराव गंगाधर यांचें कुटुंब लष्करांत जावयाकरितां, येथें सोबतीं मुलें होतीं, त्यास तेंही यांजसमागमें गेलीं. राजे प्रतापसिंग जयपुरकर यांजकडून वकील पूर्वीं येथें आला होता. बाईकडून फौज घेऊन जावें या मजकुरांत होते. तिकडे पादशाहा खांसा व पाटीलबावा गेले, हें वर्तमान कळल्यावर प्रतापसिंग राजे यांचे साहित्याविषयीं पाटीलबावांस पत्रें देऊन, वकिलास चंद्र ७ सफरीं बिदा केलें. राजाकडून नजर घेऊन फौज बराबर देऊन मुलूख घ्यावा, तो विचार राहिला. साहित्यपत्रें मात्र दिल्हीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १११.

श्री. १६ डिसेंबर इ. स. १७८५.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १३ सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-चंद्र ९ सफरीं विनंतिपत्र लिहून पाठविलें, तें सेवेसीं पोहोंचलेंच असेल. त्या अलीकडील वर्तमानः-"कादर महंमदखान, फैजमहंमदखान याचा पुतण्या, भूपालकर यांजकडून भला माणूस पत्रें घेऊन आला होता. त्यांत मजकूर कीं, हल्लीं राज्य दुसरा करितो. पहिलेपासून राज्याचे धनी आह्मी. असें असतां आह्मांसीं बदलून आमचें चालूं देत नाहीं. त्यास, सरकारची आज्ञा जाहली तरी भेटीस जाऊन सविस्तर वर्तमान विदित करीन. सरकारांतून बंदोबस्त करून दिल्यास नजरही देऊं." याचें उत्तर मीं पाठविलें कीं, श्रीमंतांची स्वारी नासिकास गेली आहे. पुण्यास आल्यावर विनंति लिहून, आज्ञा येईल त्याप्रमाणें तुह्मांस लिहून पाठवूं. त्याजवरून सेवेसीं विनंति लिहिली आहे. आज्ञा येईल त्याअन्वयें त्यास लिहून उत्तर आणवीन. हल्लीं कादर महंमदखान अष्ट्यास आहे व दतीया वोडशाचे राजाकडून वकील, श्रीमंतांस लग्नाचा आहेर घेऊन आला. येथें बाईची भेट घेऊन चंद्र ११ सफरीं पुण्यास जावयास रवाना जाहला. बरोबर दोन तीन घोडीं व माणसें आहेत. व जयपूरवाल्याचें राजकारण बाईकडे चांगलें आलें होतें. पत्र धरिते तरी, नजर व मुलूख द्यावयास कबूल जाहले होते. सात आठ महिने वकिलास ठेवून घेऊन, राजश्री पाटीलबावांस जयपुरवाल्याविषयीं साहित्यपत्रें मात्र लिहून दिलीं. वकिलास हजार रुपयांचा गांव टोंक परगण्यांत इनाम करून देऊन मार्गस्त केलें. पाटीलबावा व पादशाहा जयपूरचे सुमारें आले ह्मणून वर्तमान आहे. पूर्वीं वकीलाशीं करार बाईनीं केला होता कीं, पांच हजार फौज तुमचे मदतीस देऊं, याप्रमाणें बोलणें होतें. सरदार बरोबर कोण द्यावा या अंदेशांत दिवसगत लागले. तिकडे राजश्री पाटीलबावा गेले ऐकून, साहित्यपत्रें लिहून देऊन वकिलांस रवाना केलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ११२.

श्री. १८ डिसेंबर इ. स. १७८५.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-चंद्र १३ मोहोरमीस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमानः—

राजश्री पाटीलबावांचें पत्र बाईस आलें, तें चंद्र २९ मोहोरमीं पावलें. पत्रीं मजकूर कीं, राजश्री तुकोजीबावांचे शरीरास समाधान नाहीं. पथ्या कुपथ्याची ताकीद जाली पाहिजे. याजकरितां त्यांच्या कुटुंबाची रवानगी करावी. व राजश्री नारो गणेश यांचेंही कुटुंब पाठवून द्यावें. याप्रमाणें पत्र आलें. त्याचें उत्तर बाईनीं लिहिलें कीं, चिरंजीवाचें अथवा नारोपंतांचें पत्र आलियावर उभयतांच्या कुटुंबांची रवानगी करून देऊं. पथ्याकुपथ्याविशीं ताकीद लिहावी ऐसें नाहीं. तुह्मी जवळ आहांत; सांगीत जावें. याप्रमाणें उत्तर लिहून पाठविलें. कलम १.

पूर्वीं चंद्र १३ मोहरमीस पत्रें पाठविलीं, त्या पत्रीं हुंडी रुपये ४००० चौ हजारांची पाठविली होती; ती हुंडी पावलियाचें उत्तर आलें नाहीं. उत्तराविशीं आज्ञा व्हावी. कलम १.

राजश्री तुकोजीबावांचीं पत्रें बाईस आलीं. त्यांत मजकूर कीं, वांटणीचे जाबसाल होत आहेत, त्यांत पाटीलबावांची मर्जी दहा लक्षांचा मुलूख लावून द्यावा ऐसें आहे. परंतु मुलूख वसुली ती चौ लक्षांचा आहे. अधिक नाहीं. त्यास येणेंप्रमाणें घेऊन करारांत आणावें, किंवा कैसें करावें याचें उत्तर पाठवावें. याप्रमाणें पत्रें आलीं. त्याचीं उत्तरें बाईनी लिहिलीं कीं, तुह्मी कराल तें विचारून कराल. आग्रह करावा तर तुह्मी घरीं बसून वांटा मागतां. पाटीलबावांबरोबर तुमचे कोण होते? ज्याअर्थीं चाकरीचें घडली नाहीं, तेव्हां जें देतील तें घेऊन ओढ न करावी, ऐसें उत्तर लिहिलें. कलम १.

राजश्री सुभेदार यांजकडे कापड रवाना चंद्र २ सफरीस केलें. त्याज समागमें वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामचंद्र दीक्षित ओक यांची रवानगी बाईनीं केली. दीक्षित लष्करास गेले. कलम १.

येकूण कलमें सुमार चार सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ११३.

श्री. इ. स. १७८५.

"विज्ञापना ऐसीजे:—श्रीमंत कैलासवासी दादासाहेब यांनीं महेश्वरीं रेवातीरीं घांट मातबर बांधला आहे. त्या घांटावर सर्व काळ ब्राह्मण स्नानसंध्यादिक कर्म करितात. वस्तीचे लोक पाणी तेथेंच भरितात. घाट मजबुतीचा बांधला, परंतु माथा घांटाचा तेथें तालीहून भर घालून ठेविली आहे. दोन देवालयें दोन्हीं बाजूस जाहलीं

आहेत. एक श्रीसदाशिवाचें जुनेंच आहे, व नवें श्रीपरशराममूर्ति करून बाईनीं देवालय केलें. दोन्हीं देवालयांमुळें पर्जन्यकाळीं रस्त्याचें पाणी घाटांत उतरत आहे. त्या पाण्यामुळें घाटाचे दगड अस्ताव्यस्त जाहले. पूर्व पश्चिम हात ६५ व उत्तर दक्षिण हात १८ एकूण रुमाली हात सुमार ११७० अकराशें सत्तर हात जागा चिरे घालावयाचे आहेत. तितक्यानें काम उत्तम होऊन घांट चांगला राहील. कामाचा अजमास पाथरवट बोलावून विचारले, त्यांस पंधराशें सोळाशें रुपयांचा अजमास त्यानें सांगितला. सरकारची आज्ञा नसतां हें वर्तमान सेवेसीं लिहूं नये, परंतु रेवातीरीं घांटाचें काम युगपर्यंत राहावयाचें जाणोन, विज्ञापना केली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ११४.

**श्री.** इ. स. १७८५.

"विज्ञापना ऐसीजेः–राजश्री रामजी पाटील व भगीरथ शिंदे व देवजी गवळी राघोगडीं आहेत. बळवंतसिंग याजकडे पैगाम, भेटीस येतो ह्मणोन लाविला. दरम्यान कोणी भला माणूस पाठवून, दारमदार भेटीचा ठराऊन तिघे सरदार, नांवें लिहिले आहेत तेच, तिघे भेटीस, एक खिजमतगार व पालखी एक, याप्रमाणें गडाजवळ गेले. राजा बळवंतसिंग तोही किल्यांतून बाहेर येऊन यांस भेटला. तो जाबसाल रदबदल खंडणीची वगैरे होत होत अडीच प्रहर रात्र जाली. त्या संधीमध्यें आमदानी आपली जमीयत घेऊन निघोन गेला. त्रिवर्ग सरदार आपले डेरेदाखल जाले. तदनंतर आमदानी गेला हें समजलें. जयपूरवाले याजकडे गेला ह्मणोन वर्तमान ऐकिलें, तें सेवेसीं कळावें ह्मणोन विनंतिपत्रीं लिहिलें. दुसरें ऐकिलें कीं, जोतपूर जयपूर यांचे वकील, राजश्री पाटीलबावांचे लष्करांत होते ते उठोन आले. उभयता फौज जमा आहे, याप्रमाणें ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ११५.

छ २१ रविलावल सीत समानीन. **श्री.** ता. १७ जानेवारी इ. स. १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत पौष्य वद्य ३ भोमवारपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–टिपूची दाटी फार ऐकून बहुत चिंता प्राप्त जाली. त्यावरून श्रीमारुतीची सेवा शरीरेंकडून व ब्राह्मण २ यांजकडून करविली. यथाशक्ति नित्य ब्राह्मणभोजन करविलें. त्यास श्रीचा साक्षात्कार जाला कीं, पोष वद्य २ सोमवारपासून दिवस ४१ पावेतों

टिपूचा उत्कर्ष पुढें, एकेचाळीस ४१ दिवस गेल्यानंतर त्याचा उपमर्द होऊन सरकारचा प्रताप अधिकोत्तर होईल, याप्रमाणें दृष्टांत जाला. पूर्वीं राजश्री मोरोबादादा व होळकर पुरंदरास आले, ते समयीं मीं याप्रमाणें श्रीमारुतीची सेवा केली. ते वेळेस याप्रमाणें दृष्टांत कीं, अकरा दिवसपावेतों श्रम आपणास होतील, पुढें अधिकोत्तर यशप्राप्ति घडेल. हें वर्तमान राजश्री मल्हारपंत भडभडे यांस व कैलासवासी देशमुख यांस पुरतेपणें सांगितलें होतें. त्याचा अनुभव श्रीनें घडविला. त्याउपरीं फिरंगी व कैलासवासी दादासाहेब आले, ते समयीं संकट जाणून श्रीमारुतीची सेवा लष्करांत केली. तेव्हां दृष्टांत, १८ दिवसांनंतर यशप्राप्ति. त्याप्रमाणें अनुभव आला. सांप्रत हें संकट प्राप्त! देशीहून वर्तमान येऊं लागलें कीं, टिपूची दाटी फार, त्यावरून चिंता प्राप्त जाहली. सर्वस्वें श्रीमंतांचे दौलतीचें वोझें सर्व स्वामीकडे. त्यावरून श्रीची प्रार्थना बहुत केली. त्यावरून ४१ एकेचाळीस दिवसांनंतर सरकारचा उत्कर्ष बहुत होईल, त्याचा अनुभव श्रीप्रतापें घडेल. चिंता नाहीं. पूर्वीं दोनी दृष्टांत अनुभवास आले, त्याचा संकल्प व हल्लीं श्रीचा संकल्प केला तो सिद्धीस न्यावयाची विनंति समक्ष आल्यावर करीन. पूर्वींचा संकल्प देशमुखास सांगितलें होतें. श्रीकृपेंकरून सरकारचा नक्ष व महाराजांस यशप्राप्ति व्हावी हेंच निरंतर इच्छा व प्रार्थना श्रीमारुतीजवळ करीत आहे. सांप्रत दृष्टांत जाला हें वर्तमान स्वामींस न लिहावें. कारण येथें कोणी स्वकीय नाहीं, यास्तव सेवेसीं लिहिलें. सिद्धीस गेल्यावर प्रत्योत्तराची आज्ञा करणार स्वामी समर्थ. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ११६.

छ २८ रबिलावल सीत. **श्री.** २२ जानेवारी १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र माहे रबिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ ११ सफरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. हुंड्या दोन लक्षांच्या बाईकडून रवाना करविल्या, त्या हुंड्या पावल्या असतील. त्या अलीकडील वर्तमानः–राजश्री दादाजी गंगाधर यांचे विद्यमानें बाईचें नांवें पत्रें आलीं व पावती तीन लक्ष रुपयांची आली, व पुढें ऐवजाविषयीं बहुत निकडीनें सरकारचे पत्रीं व दादाजीचे पत्रीं लिहिलें होतें, तीं पत्रें अक्षरशहा बाईनीं ऐकून उत्तर प्रत्युत्तर कारभारी यांसी केलें कीं, आतां ऐवज कोठून द्यावा ? जो महालचा ऐवज होता तो, येथील सरदारीचा खर्च जाऊन, पांच लक्ष रवाना केल; याउपर पैसा मिळत नाहीं.

याप्रमाणें परस्परें भाषणें जालीं. मीं उत्तर दिलें कीं, मोहीमशीर सरदार, चाकरी सरकारची जाली पाहिजे. शत्रु प्रबल जाला आहे. त्याचें पारिपत्य फौजेवेगळें कसें होईल ? फौज ठेवावी तेव्हां ऐवज पाहिजे. यास्तव दुसाला रसदा व वेतनें महालकरी व दरकदार यांचीं घ्यावीं; ऐवज रवाना करावा. या बोलण्यावर कांहीं दोष, कांहीं समाधान ! याचें उत्तर मुत्सद्दी यांनीं दिलें कीं, अशी मसलत भारी कोठें कीं, दुसाला रसदा व दरकदारांचीं वेतनें घ्यावीं. तोही भरंवसा कोठें पुरतो ? कमाविसदारांस इतबार पुरत नाहीं. त्यांत समय पडल्यास करूं. याचें उत्तर मीं दिलें कीं, समयास कांहींच होणें नाहीं. अगोदर तजवीज करावी ही गोष्ट ठीक. दुसाला वेतनें व रसदा घ्यावया इतबार पुरत नाहीं ह्मणतां, तर आजपर्यंत तुह्मांकडील महालची घालमेल काय जाली ? याप्रमाणें बोलणें मात्र जालें. करणें तें आपलें विचारें करीतच आहेत. आह्मी वारंवार रवानगीविषयीं स्मरण देतच आहों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ११७.

पै॥ चंद्र १७ रबिलाखर सन सीत माघ. **श्री.** ४ फेब्रुवारी इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ माहे रबिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १५ रबिलावलचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २७ माहे मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, दोन लक्ष रुपयांच्या हुंड्या पावल्या, राजश्री तुकोजी होळकर यांजकडे दिल्या. त्यांचे जाब राजश्री दादाजीस लिहून पाठविले, व त्यांचीं पत्रें व दादाजीचीं पत्रें महेश्वरास परभारें पुण्याहून आलीं असतील त्यावरून कळेल. पुढें फौजेचा खर्च चालला पाहिजे. तर, पेशजीं लिहिल्या प्रमाणें बाईसीं बोलून ऐवजाची रवानगी लवकर करवावी ह्मणून आज्ञा. त्यावरून बाईशीं मजकूर केला. बाईनीं उत्तर दिलें कीं, आमचे जाब आले नाहींत. आल्यावर कळेल. परंतु ऐवज होता तो, येथील खर्च वजा सालाबादी होऊन, राहिला ऐवज झाडून रवानगी केली. याउपर ऐवज कोठून द्यावा हें बोलणें. त्यांत ग्रहणाचे दिवस, धर्माचा उत्कर्ष आरंभ केला, त्यामुळें प्रशस्त बोलणें जालें नाहीं. परंतु खुलासा दिसतो कीं, याउपरी ऐवजाची तोड पडत नाहीं. त्यांजला संकट कोणतें ? पूर्वीं स्वामींनीं दुसाला रसदा व दरकदारांचीं वेतनें घेऊन ऐवजाचा भरणा करावा, ती गोष्ट येथें मनीं मानसीं भरत नाहीं. आह्मीं या गोष्टीचें स्मरण द्यावें, तर त्रास येतो. दरकदार आहेत

ते होळीचे होळकर! त्यास दवलत राहिली अथवा न राहिली ही काळजी नाहीं. आज चार वर्षें यथास्थित पाहत आहे. होळकराची दवलत चालावी असें येथें माणूस मातबर मनसुबेस कोणी नाहीं. देखिलें तें सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ११८.

श्री. २४ फेब्रुवारी १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांगनमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र ६ रविलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. राजश्री रामराव त्रिंबक व राजश्री केसो गणेश कुंटे उभयतां माघ शुद्ध १० स्वार होऊन गेले. राजश्री रामराव त्रिंबक यांनीं बाईस विनंति केली कीं, मजवर पूर्वींप्रमाणें कृपा असों द्यावी. चिटी पत्रीं लिहीत जावी. त्यावरून बाईनीं दरबारांत यांची रया ठेविली नाहीं. बहुत उपन्यास केलें. वस्त्रें शेला पोगोटें देऊन बिदा केलें. राजश्री केसो गणेश कुंटे यांनीं राजश्री नारो गणेश यांचा मजकूर एकांतीं केला कीं, त्याजवर ममता करून पदरीं घ्यावें. त्याचें उत्तर बाईनीं दिलें, तें ऐकिलें. परभारें बाईनीं उत्तर हेंच दिलें कीं, ही गोष्ट मजकडेस नाहीं. जें करणें तें श्रीमंत करितील व राजश्री महादजी शिंदे. याप्रमाणें जाबसाल जाला तो ऐकिला. त्यांवरून सेवेसीं लिहिलें. माझे शरिरास हा कालवर सावकाश नाहीं. खर्चावांचून विपत्य. येथें अगत्य नाहीं. येविषयीं विनंति महाराजांस लिहिली, परंतु आज्ञा येत नाहीं. स्वामी खावंद, आमचा त्राता, आपणां वेगळे कोणी नाहीं. चरणाचा वियोग बहुत दिवस जाला आहे. येथें आहे. निरंतर चरणीं निजध्यास धरून स्वस्थ आहे. येथील स्थितीवर उदासीनता. आज्ञेखेरीज वर्तणूक नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक ११९.

पै॥ चंद्र २३ जमादिलावल सन सीत श्री. २४ फेब्रुवारी १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ माहे रबिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–राजश्री रामराव त्रिंबक वगैरे यात्रा गेल्यानंतर, आज्ञेप्रमाणें बाईशीं ऐवजाचे विषयीं बोलणें जालें. बहुत प्रकारें सांगितलें, मोहिमशीर फौजा आहेत, काम काज लढा-ईचें, लोकांस पैसा दिला पाहिजे. सरदारीचा नक्ष राहून सरकारचाकरी जाहली

## १९. मुल्हेरजवळील लढाई.

दुर्गोजी भापकर यांची व श्रीमंत दादासाहेब पेशवे यांच्या बाजूचे मानाजी शिंदे, सटवोजी भोंसले वगैरे सरदारांची, इ. स. १७७९ मध्यें मुल्हेरजवळ मौजे सामळें येथें जी लढाई झाली, तिची हकिकत दुर्गोजी भापकर यांनीं पेशव्यांस कळविली आहे. तिच्यावरून विस्तृत व साद्यंत माहिती देण्याची त्या वेळीं कशी पद्धति होती तें चांगलें दिसून येतें. हें पत्र येणेंप्रमाणेंः—

श्री.

"राजश्री रावसाहेब साहेबांचे सेवेसींः—

श्रीमंत अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित दुर्गोजी भापकर दंडवत विनंति उपरी येथील कुशल ता॥ जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे. विशेषः- आमची व राजश्री मानाजी शिंदे व सटवोजी भोंसले व बाजीराव बर्वे, भोंसले, व पांढरे व जाधव यांची लढाई, छ १५ रजबीं सायंकाळीं मौजे सामळें परगणे मुल्हेर येथें लढाई भारी जाली. तिकडील पठाण व रजपूत व मराठे लोक यांणीं उड्या टाकिल्या व आह्मांकडीलही लोकांनीं उड्या टाकिल्या. तेथें लोक कामास आले, व जखमी जाले. घोडीं ठार जालीं व जखमी जालीं. बितपशिल नांवनिशीः-

१ पर्वतराव भापकर -उजवे हाताचीं बोटें दोन तरवारीनें उडालीं.

२ कुसाजी भापकर

१ मशारनिल्हेस भाल्याची जखम १ व तरवारीच्या २.

१ घोडीवर तरवारीच्या जखमा २.

२

२ खेत्रोजी भापकर

१ मशारनिल्हेस तरवारीच्या जखमा ७.

१ घोडी तरवारीचे वार व गोळी लागून ठार जाली.

२

१ निंबाजी भापकर -भाल्याची १ व तरवारीची १ एकूण दोन.

१ हैबतराव भापकर -खुद्द तरवारीच्या जखमा २.

२ संक्राजी भापकर

१ मशारनिल्हेस तरवारीच्या जखमा ४.

१ घोडी तरवारीचे जखमेनें ठार जाली.

२

१ निळकंठराव भापकर -यांचे घोड्याचे तोंडावर तरवारीच्या जखमा दोन.

१ हैबतराव भापकर यांचा घोडा ठार जाला.

१ खंडोजी भापकर यांचे घोडीस तरवारीचे वार ५, ठार जाली.

१ ...शिंग तरवारी जखम १.

२ शिवराम तावरे.

 १ मशारनिल्हेस तरवारीची जखम १.

 १ घोड्यास तरवारीची १.

 २

१ गोविंदराव जाधव–तरवारीच्या दोन.

१ गोविंदराव कुतवाल–घोडी गोळीनें ठार जाली.

१ यमाजी कुतवाल–घोडी गोळीनें ठार जाली.

१ उदाजी पवार–भाल्याची जखम १.

२ जानबा वीर

 १ मशारनिल्हेस तरवारीची १.

 १ घोडें तरवारीनें ठार जालें.

 २

१ गोदाजी घरे–तरवारीच्या जखमा २.

२ नारो जनार्दन

 १ भाल्याची जखम मशारनिल्हेस.

 २ घोड्यास भाल्याची जखम.

 २

२ शिवराम तिलप

 १ मशारनिल्हेस तरवारीची जखम १.

 १ घोड्यास तरवारीची १.

 २

१ मानसिंग संकपाळ–तरवारीची जखम १.

१ ......वामन तरवारीची जखम १ व गोळीची १.

१ सुभानजी पडवळ–जखम गोळीची १.

२ सदाशिव ताटे

 १ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या ३.

 १ घोड्यास तरवार व गोळी लागून ठार जाला.

 २

२ मानाजी रणनवरे

 १ मशारनिल्हेस तरवारीच्या जखमा २.

 १ घोडा गोळीनें ठार.

 २

१ भिवजी देवकांते–जखम भाल्याची १ व तरवारीची १.

१ संकोजी देवकांते–जखम भाल्याची १.

१ चांदभाई–मशारनिल्हेस जखम तरवारीची १.
१ हुसेनभाई–जखमा तरवारीची १ भाल्याची १.
१ चांदराव काकडे–तरवारीची जखम १.
१ दुर्गाजी जाधव–तरवारीची जखम १.
२ सेख मलिक
१ मशारनिल्हेस तरवारीच्या जखमा २.
१ घोडा पाडाव गेला.
२
२ यशवंतराव जगताप
१ मशारनिल्हेस गोळी १ भाल्याची जखम १ व तरवारीच्या २.
१ घोडा गोळीनें ठार.
२
१ होनाजी गाढवे–तरवारीची जखम १.
१ गिरमाजी बाबर–घोडा गोळीनें ठार जाला.
१ गोमाजीपंत–तरवारीनें घोडी ठार जाली.
१ अर्जुनजी सूर्यवंशी–घोडा गोळीनें व तरवारीनें ठार जाला.
१ भिकाजी पवार–घोडी गोळीनें ठार जाली.
१ रहिमखान–घोडा निळा गोळीनें ठार जाला.
१ निंबाजी संखपाल–घोडी पाडाव गेली.
१ दारकोजी पडवळ–घोडी गोळीनें ठार जाली.
१ अमृतराव भापकर ठार जाले. जखम भाल्याची १.
तरवारीची १.
५०
२ मयाजी शिलीमकर
१ मशारनिल्हेस भाल्याची जखम १.
१ घोडीस तरवारीची १.
२
२ गोविंदराव शिलिमकर
१ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या २.
१ घोडीस वार १.
२
२ भोवनराव सोनवणी
१ मशारनिल्हेस जखम भाल्याची १ तरवारीची.
१ घोडीस तरवारीची.
२

२ हिराखान
  १ तरवारीच्या जखमा ५.
  १ मशारल्हेची १ घोडी ठार जाली.
  ―
  २
२ बावानाईक
  १ मशारनिल्हेस भाल्याची १ तरवारीच्या ३.
  १ घोडी गोळी लागून ठार जाली.
  ―
  २
२ बहिरजी जगताप
  १ मशारनिल्हेस तरवारीच्या जखमा २.
  १ घोडी तरवारीनें ठार जाली.
  ―
  २
२ संताजी माने
  १ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या ४.
  १ घोडी गोळीनें ठार जाली.
  ―
  २
२ शहाजी थोरात
  १ मशारनिल्हेस तरवारीची १.
  १ घोड्यास जखम गोळीची १.
  ―
  २
१ जोतिबा मुरूमकर—तरवारीची जखम १.
१ गणोजी घम —तरवारीची जखम १.
२ महिपतराव भोंसले
  १ मशारनिल्हेस भाल्याची १.
  १ घोडें गोळी लागून ठार जालें.
  ―
  २
१ काशी धोंडाजी—घोडीस जखम तरवारीची.
२ शेटीबा भोईटे घोड्यास.
  १ घोडीस जखम तरवारीची.
  १ घोडा ठार जाला गोळी लागून.
  ―
  २
१ बहिरजी काकडे
  १ खासा गोळी व तरवार लागून ठार जाले.
  १ घोडीस जखमा तरवारीच्या २.
  ―
  २

१ पिराजी शिंदे—घोड्यास जखमा गोळ्याच्या २.
१ खुमानसिंग—घोडीस जखम गोळीची १.
२ देवराव प॥
 १ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या २.
 १ घोडीस जखम तरवारीची १.
 २
१ जनाजी जाधव घोडी गोळी लागून ठार जाली. मशारनिल्हेचें कामकाज चांगलें जालें.
२ सुभानजी तनपुरे
 १ खासा ठार जाला.
 १ घोडा ठार जाला.
 २
१ आंदोजी जगताप—जखम भाल्याची १.
२ निंबाजी गायकवाड—घोडीं पाडाव गेलीं.
 १ घोडीं पाडाव गेलीं.
 १ मशारनिल्हेस जखम तरवारीची.
 २
२ नाथूराम.
 १ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या ५.
 १ घोडें पाडाव गेलें.
 २
२ इमामखान.
 १ मशारनिल्हेस गुरगुजाची जखम १.
 १ घोडा पाडाव गेला.
 २
२ महादजी लबाडे
 १ मशारनिल्हेस तरवारीची जखम १.
 १ घोडें पाडाव गेलें.
 २
१ रामजी लबाडे—घोडी पाडाव गेली.
२ ह्मसाजी बाबर.
 १ मशारनिल्हेस भाला लागला जखम १.
 १ घोडा गोळीनें ठार.
 २
१ संताजी गायकवाड जखम गोळीची १.
२ गुंडाजी परदेशी—घोडें पाडाव गेलें १ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या २.

२ बहिरजी पिंगळे
 १ मशारनिल्हेस जखमा तरवारीच्या ३ भाल्याची १.
 १ घोडा पाडाव गेला.
 २
१ सुलतानजी कदम–घोडा पाडाव गेला.
१ शेटीवा धस–घोडी पाडाव गेली.
१ नेमाजी गायकवाड–घोडी गोळीनें ठार जाली.
१ बरमाजी गायकवाड–घोडी तरवारीचे जखमेनें ठार जाली.
१ राणोजी सावत–घोडा तरवार व गोळी लागून ठार जाला.
१ हिरोजी मोरे–घोडी पायास गोळी लागून, घोडी राहिली.
१ सटवोजी पोंवार–घोडी तरवारीचे जखमेनें ठार जाली.
१ त्रिंबकराव जगताप–घोडा गोळीनें ठार जाला.
१ सोमाजी भापकर–गोळी लागून ठार जाले.
३ पागा दि॥ गोरसोजी भापकर–घोडी ठार जाली.
६१

१११

तपशील

| | |
|---|---|
| ५३ भले लोक खासे | ५८ घोडीं |
| ४ ठार जाले. | २९ ठार जालीं. |
| ४९ जखमी आहेत. | २० जखमी. |
| ५३ | ९ पाडाव गेलीं. |
| १११ | ५८ |

सदरहूप्रमाणें तपशील, लोक जखमी व ठार व घोडीं जखमी व ठार व पाडाव गेले यांचा तपशील लिहिला आहे, त्यावरून श्रुत होईल. त्यांजकडील घोडीं, आह्मांकडील शिलेदारांस पंधरा वीस सांपडलीं, व निशाणही घेतलें. त्या समयीं त्यांजकडील मोड जाला. तेव्हां त्यांचे कबिले पाठीमागें होते. त्यांपैकीं कांहीं लोकांनीं कबिले पाठीमागें बांधून पळूं लागले, व कित्येक बायका कटारा उठोन मरावयासी सिद्ध जाल्या. ते समयीं आह्मांकडील लोक, त्यांत लुटीस ऐवज पाहून शिरले. तेव्हां ते दांतकिसालीस येऊन, अब्रूवर आली ऐसें जाणून, लढाई जमविली. निशाणासाठीं त्यांजकडील मारामार फार जाली. तेव्हां निशाणास दोहींकडील वोढावोढ जाली. आह्मांकडील लोकांस निशाणाचे बंद व पटका हातास आला. बाकीचे सांभाळून जाऊन उभे राहिले. उपरांत संध्याकाळही जाला, पाऊसही आला. मग आह्मी वारिसास मुक्कामास आलों. ते सिनपेस राहिले. आह्मांजवळ सरंजाम तेव्हां फारच थोडा होता. लोक घाटांनीं चौकीस होते. थोडक्या सरंजामानसीं गेलों ह्मणून पेंच पडला. सरंजाम आमचा जथला नाहीं. यामुळें घाटाची बंदोबस्ती न जाली. दुसरे दिवशीं घाटाकडे जाईल तों, ते पहाटें कूच करून घाटाखालीं गेले. त्यांजवळ सरंजाम, हजार बाराशें लोक पठाण, मोगल, रजपूत, मराठे, चांगले लोक आहेत. हजरी गणतीचा

राऊत नाहीं. याशिवाय पायउतार लोक चांगले पांच सातशें, बरोबर घेऊन गेले आहेत. बाणाच्या कैच्या चार होत्या. येणेंप्रमाणें सरंजाम त्यांजवळ आहे. गुजराथ प्रांतीं फौज जमा आहे. राजश्री फत्तेसिंग गायकवाड सात आठ हजारपर्यंत आहेत. श्रीमंत दादासाहेबांजवळ गुलजारखान व केसो कृष्ण, दोन हजारपर्यंत जमा जाले आहेत. शिवाय हें खूळ गेलें, हें वेगळें. या प्रांतांत फितूर फार जाला आहे. याचा बंदोबस्त पुरतेपणें होय ऐसी आज्ञा करावी. हा फौजेचा मजकूर इंग्रजांचे विद्यमानें जाला आहे. श्रीमंतांस इंग्रजांनीं सांगितलें कीं, देशीहून फौज आणावी; पैका आह्मी देऊं. त्यावरून हा जमाव करितात. जितका मजकूर पक्केपणें समजला, तितका सेवेसीं लिहिला आहे. वारंवार लिहिणें हेंच कीं, याचा बंदोबस्त लवकर करावयाची आज्ञा करावी. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंति."



## २०. ब्रह्मेंद्रस्वामींची कोंकणांतील कामगिरी.

श्रीमंत छत्रपति शाहूमहाराज व थोरले बाजीराव पेशवे ह्यांचे गुरु, श्रीमत् ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर ह्यांनीं, कोंकणांत असतांना पुष्कळ लोकांना द्रव्यद्वारें मदत देऊन त्यांना ऊर्जित दशेस आणिलें. ह्या संबंधाची माहिती ब्रह्मेंद्रस्वामींचे चरित्रांत प्रसिद्ध झालीच आहे. संगमेश्वरचे काशीशेट शेठ्ये ह्यांच्या एका पत्रामध्यें स्वामींनीं अशा प्रकारें तारूं तरांडें देऊन, कांहीं लोकांस मदत केल्याचा उल्लेख आहे. तो येथें नमूद करण्यासारखा आहे.

[ किरकोळ.] श्री.

"श्रीमत् सच्चिदानंदपरायण यमनियम साष्टांग योग-
साधन श्री परमहंस बावा स्वामींचे सेवेसीं:–

विनंति सेवेसीं चरणरज कासी सेट सेठ्ये संगमेश्वर सेवेसीं विज्ञापना येथील क्षेम तागाईत छ ९ जमादिलावलपावेतों स्वामींच्या कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः–स्वामींचें कर्ज सेतवडेकर सावकार यांजकडे होतें, त्याविसीं सविस्तर पूर्वी स्वामींचे सेवेसीं विज्ञापना लिहिलीच होती. त्याची आज्ञा कांहीं आली नाहीं. हल्लीं स्वामींच्या चरणांपाशीं इबजी नाखवा पांगारकर व दावजी नाखवा मोडक व फुलाजी नाखवा मालीम हे त्रिवर्ग सेवेसीं आले आहेत. ऐशास, सेतवडेकर सावकार पूर्वीं बहुत होते, ते कालगतीनें मोडून, कांहीं पालवी, स्वामींच्या आश्वासनोदकेंकरून राहिली आहे. त्यामध्यें पुढें पुढें प्रसंगीं नांवरूप अगदींच सेतोडेकरांचें मोडलें होतें. त्यास, स्वामींनीं कृपाळू होऊन, या त्रिवर्गांवर नजर देऊन, श्रीमत् राजश्री सरखेल साहेब यांस स्वामींनीं सांगोन, यांचें ऊर्जित केलें. त्याविरहित जे यांसीं अतिशयेंकरून संकट होतें, तेवढें स्वामींनीं निवारण करून, यांस तारूं तरांडें देऊन, व वित्त विषय भांडवल देऊन, यांची सर्वाप्रकारेंकरून उभारणीकरून, उस्तवारी स्वामींनीं बरीच करून, अन्नास लाविलें. तेव्हां सेतोडेकर कांहीं आहेत, ऐसा प्रताप स्वामींच्या अन्नाचा

जाहला. तेणेंकरून प्रगट होऊं लागले. मुलखांतही सर्वांस कळलें कीं, स्वामी कृपाळू जाहल्यावरी यांची डोई पुढें जहाली. त्यास, यांचें प्राक्तन सबळ. तें यांचीं अगदीं तरांडीं तीन स्वामींनीं दिल्हीं होतीं तीं, मुंबईस हिरोन घेतलीं. त्यामुळें हे खस्त बहुत जहाले. स्वामींचे वाढविले आणि यांजवरी एक प्रसंग पडिला! तेणेंकरून तगादलेच होते. त्यांहीमध्यें स्वामींचा कृपावलोकनघन होताच. परंतु काळ विषम पडिला. यांचें प्राक्तन सबळ, त्यामुळें दुर्दशा जहाली! बायका मेल्या, मुलें मेलीं. एकले सडे मात्र उरले. केवळ देशत्यागें जावें, परंतु स्वामींचे नांवाजीस समर्थांचा आश्रय. याकरितां जीव मात्र रक्षून आहेत. परंतु त्राण एके काडीचें उरलें नाहीं. ऐशास, लौकिकामध्यें स्वामींचे स्थापित ऐसें सर्वतोमुखीं. ह्मणोन वरकड कर्जदारी फारसे गळां पडत नाहींत. यांचा तो हेत ऐसा आहे जे, आह्मी अगदींच सेतवडेकर मागाडीस पडिलों होतों, तें ज्यांणीं आह्मांस नांवारूपास आणिलें, त्यांकडे जाऊन, त्यांची आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. ह्मणून हे सेवेसीं आले आहेत. स्वामींचें कर्ज खरें आहे. यांचा तो नाश बहुतांप्रकारेंकरून जहाला आहे. ऐशा समयामध्यें स्वामींपासून मुक्तता करून घ्यावी ह्मणून सेवेसीं आले आहेत. यांचें ऊर्जित करणार स्वामी मात्र आहेत. जेणेंकरून नवाजीस वाढतील ते पूर्ण कृपा करणार स्वामी समर्थ असेत. यांचें सविस्तर वर्तमान खंडोबा सेवेसीं निवेदन करितां श्रुत होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## २१. फिरंग्यांचे लष्करांतील हुंड्यांचे भाव.

पेशवेसरकारांत प्रांतोप्रांतींहून हुंड्यांचे भाव लिहून येत असत. त्यामध्यें इंग्रज, फिरंगी, फरासीस वगैरे परराष्ट्रस्थ लोकांच्या लष्करांत हुंड्यांचे भाव जे चालत असत, त्यांची माहितीही येत असे. इ. स. १७८० मध्यें फिरंग्यांचे लष्करांत ठिकठिकाणच्या हुंड्यांचा भाव कसकसा असे, ह्याबद्दलची माहिती पुढील टिपणांत दाखल आहे.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"यादी फिरंगी यांचे लष्करांतून हुंडीचे भाव देशावरचे येणेंप्रमाणें:-

१ फिरंगी याचे लष्करांत बहात्तर रुपये द्यावे आणि मकसुदाबादेस शंभर घ्यावे.
१ व्याऐशीं रुपयांची हुंडी घेऊन सुरतेस शंभर घ्यावे.
१ बनारशी शंभर रुपये यांची हुंडी घेऊन लष्करांत शाहात्तर रुपये घ्यावे.
१ शाहाण्णव रुपये लष्करांत घेऊन भागानगरीं शंभरांची हुंडी देतात.
१ मछली बंदरी तीन रुपये याचा भाव.
१ करकी होन लष्करांत भाव दर ४ प्रमाणें.
१ फुली होनाचा भाव दर ४८ प्रमाणें.

येणेंप्रमाणें भाव आहेत."



# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ३ रें.] जानुआरी १९११. [अंक ६ वा.

## विषयानुक्रम.


| विषय. | पृष्ठांक. |
|---|---|
| १ जुन्या ऐतिहासिक गोष्टी. ... ... ... ... | ६७–७० |
| २ ऐतिहासिक स्फुट लेख. ... ... ... ... ... | ९५–१०६ |
| ३ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें, भाग २ रा.... ... ... | ९७–१२० |
| ४ ऐतिहासिक टिपणें, भाग ३ रा. ... ... ... ... | ३३–४० |

चित्रें—१ नबाब अनवरुद्दीनखान. २ तंजावरची राणी सुजानबाई.


मुंबई येथें
तुकाराम जावजी ह्यांनीं
'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



नबाब अनवर्द्दीनखान.

## ४३. कर्नाटकचा नबाब अनवरुद्दीनखान.

नबाब अनवरुद्दीनखान हा, दैवाच्या अनुकूलतेनें उदय पावलेल्या लष्करी योद्ध्यांपैकीं एक सुप्रसिद्ध पुरुष होय. अठराव्या शतकाच्या मध्यंतरीं, कर्नाटकांमध्यें ज्या उलाढाली व जीं राजकारणें घडून आलीं, त्यांत प्रत्यक्षपणें या पुरुषाचा संबंध होता. ह्यानें केवळ नशीबाच्या जोरावर अर्काटचें राजपदही कांहीं दिवस उपभोगिलें. याचें नांव कर्नाटकचे इतिहासांत फार प्रसिद्ध आहे. हा पुरुष प्रथमतः दिल्लीच्या बादशाहाच्या पदरीं नौकरीस राहिला. तेथून पुढें तो कोरा जहानाबाद या प्रांताचा सुभेदार झाला. तेथें असतांना त्याची कारकीर्द यशस्वी झाली नाहीं, व त्याच्या अमलाखालील प्रांताचा वसूल बादशाहास बरोबर मिळाला नाहीं, ह्मणून त्याजवर कांहीं ठपका आला. तेव्हां त्यानें गुप्त रीतीनें तेथील सुभेदारी सोडून, तो अमदाबाद येथें आला. ह्या वेळीं गुजराथ प्रांताचा सुभेदार, निजाम उल्मुलुकाचा बाप, गाजीउद्दीनखान हा होता. त्याच्याकडे संधान बांधून, अनवरुद्दीनखान यानें सुरत येथें मोठी महत्त्वाची व अधिकाराची नौकरी मिळविली. गाजीउद्दीनखान हा मृत्यु पावल्यानंतर त्याचा मुलगा निजामउल्मुलुक यास दक्षिणची सुभेदारी मिळाली. त्यानेंही अनवरुद्दीनखान याची कर्तबगारी व शौर्य हीं लक्ष्यांत घेऊन, त्यास कर्नाटकांत एक मोठी जागा दिली. तो इ. स. १७२५ पासून इ. स. १७४१ पर्यंत वेलोर येथील सुभेदार होता. इ. स. १७४४ मध्यें त्यास निजामउल्मुलुकानें कर्नाटकाच्या नबाबाचीं वस्त्रें दिलीं. इ. स. १७४४ पासून इ. स. १७४९ पर्यंत दक्षिण हिंदुस्थानांत ज्या घडामोडी झाल्या, त्यांत अनवरुद्दीनखानाचें अंग होतेंच. इ. स. १७४८ मध्यें चंदासाहेब हा मराठ्यांच्या प्रतिबंधांतून मुक्त होऊन कर्नाटकांत आला, व त्यानें गादीविषयीं तंटा सुरू केला. या तंट्यामध्यें इंग्रज व फ्रेंच हे उभय पक्षांस सामील झाले. अनवरुद्दीनखान व त्याचे प्रतिपक्षी यांच्या मध्यें बऱ्याच लढाया झाल्या. त्यांतील एका लढाईमध्यें अनवरुद्दीनखान हा ता. २३ जुलई इ. स. १७४९ मध्यें मारला गेला. हीच अंबूरची प्रसिद्ध लढाई होय. ह्याच्या मागून ह्याचा मुलगा महंमदअल्ली हा अर्काटचा नबाब झाला.

अनवरुद्दीनखान याचें वय मरणसमयीं १०७ वर्षांचें होतें. ह्याचे कारकीर्दीवर ‘अनवरनामा’ या नांवाचें एक फारसी भाषेंत लिहिलेलें काव्य प्रसिद्ध आहे. त्यामध्यें वीररस ओतप्रोत भरलेला असून अनवरुद्दीनखान याची फार स्तुति केलेली आहे. त्याचप्रमाणें, त्यांत इंग्रज व फ्रेंच यांच्यामधील युद्धाचें यथातथ्य वर्णन असून, त्यांत मेजर लॉरेन्स यांच्या पराक्रमांचीही यथास्थित उल्लेख आहे.

## ४४. शिवाजीची पितृभक्ति.

जगामध्यें जे जे राज्यसंस्थापक व लोकोत्तर पुरुष अवतीर्ण झाले, त्यांच्या ठिकाणीं पितृभक्ति आणि मातृभक्ति हे गुण वसत असल्याचें इतिहासावरून दिसून येतें. मराठ्यांचें राज्य स्थापन करणारे छत्रपति शिवाजी महाराज हे, आई-बापांस अत्यंत पूज्य मानून, त्यांची भक्ति करण्यांत अगदीं तत्पर असत. यांचे वडील शहाजी राजे विजापूरच्या बादशाहाच्या पदरीं असून त्यांच्याकडे कर्नाटक-ची सुभेदारी होती. ते कर्नाटक प्रांताच्या बंदोबस्तासाठीं बंगलूर येथें रहात असत. त्यांची व शिवाजीची भेट इ. स. १६५० पासून इ. स. १६६२ पर्यंत झाली नव्हती. शिवाजी महाराजांनीं आपल्या पराक्रमानें महाराष्ट्रप्रांतांत नवीन राजसत्ता संस्थापित करून मोठें वैभव प्राप्त करून घेतलें. त्यांच्या उत्कर्षाचें वर्तमान शहाजी राजे यांस कर्नाटकांत विदित झालें. त्यांनाही पुत्रद-र्शनाची इच्छा होऊन, ते कर्नाटकांतून बादशाहाच्या परवानगीनें महाराष्ट्र देशांत येण्यास निघाले. त्यांनीं आपल्या बरोबर आपलें दुसरें कुटुंब तुकाबाई आणि कनिष्ठ पुत्र व्यंकोजी राजे यांस आणिलें. ते कूच दर कूच तुळजापुर येथें आले. तेथील कुलदेवतेचें दर्शन घेऊन, भोंसल्याचें मूळ गांव जें शिंगणापुर तेथें गेले. तेथें शंभुमहादेवाचें दर्शन घेऊन ते पंढरपुरास आले. तेथें श्रीविठोबाचें दर्शन घेऊन ते शिवाजी महाराजांस भेटण्यासाठीं पुणें प्रांतीं येण्यास निघाले. शिवाजी महाराजांनीं आपल्या वडिलांची भेट श्रीजेजुरी येथें घेण्याचें ठरवून त्यांच्या स्वागताची उत्कृष्ट तयारी केली. ते कित्येक कोसपर्यंत आपल्या वडिलांस सामोरे जाण्यासाठीं पायीं चालत गेले. नंतर त्यांनीं मोरोपंत पेशवे यांस पुढें पाठवून, भेटीचा मुहूर्त ठरवून, जेजुरी येथें श्रीचे देवालयांत भेटीचा बेत योजिला. शहाजी राजे व शिवाजी महाराज यांची पुष्कळ वर्षें भेट न झाल्यामुळें प्रथम त्यांची देवालयांत शास्त्रोक्त विधिपूर्वक भेट झाली. नंतर शहाजी राजांच्या चरणीं शिवाजी महाराजांनीं मस्तक ठेवून, उभयतां पितापुत्र प्रेमपूर्वक भेटले. नंतर महाराजांनीं शहाजी राजे यांस पालखींत बसवून व आपण स्वतः पालखीची तबकडी धरून, पायीं चालत आपल्या डेऱ्यास गेले. ही शिवाजी महाराजांची अलौकिक पितृ-भक्ति पाहून, सर्वांस अतिशय आश्चर्य व कौतुक वाटलें.

नंतर शिवाजी महाराजांनीं वडिलांपुढें हात जोडून आपल्या सर्व अपराधांबद्दल त्यांची क्षमा मागितली. शिवाजी महाराजांचें अतिशय विनम्र भाषण ऐकून शहाजी राजे सद्गदित झाले, व त्यांनीं महाराजांस पोटाशीं धरून त्यांची फार स्तुति केली, व त्यांच्या कर्तृत्वाबद्दल व सद्गुणांबद्दल धन्योद्गार काढिले. शिवाजी महा-

राजांनीं सहा महिनेपर्यंत शहाजी राजांस आपल्या जवळ ठेवून घेतलें, आणि त्यांचा अनेक रीतींनीं सत्कार करून त्यांची मर्जी सुप्रसन्न करून सोडली. नंतर शहाजी राजे कर्नाटकामध्यें तंजावर प्रांतीं निघून गेले. पुढें ते दोन वर्षांनीं ह्मणजे इ. स. १६६४ सालीं, बासवापट्टण येथें तुंगभद्रेच्या कांठीं शिकारीस गेले असतां, घोड्यावरून पडून मृत्यु पावले. त्यामुळें शिवाजी महाराजांस अत्यंत दुःख झालें. शिवाजी महाराजांनीं आपल्या वडिलांचें यरगटनहळ्ळी येथें वृंदावन बांधून त्याच्या पूजेअर्चेसाठीं तो गांव इनाम करून दिला आहे. हें वृंदावन शिवाजी महाराजांची पितृभक्ति अद्यापि व्यक्त करीत आहे.



## ४५. अलौकिक धैर्याची स्वामिभक्त स्त्री.



कुलाब्याच्या आंग्रे घराण्याचा मूळ संस्थापक कान्होजी आंग्रे हा होय. यानें हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर लढाऊ आरमार तयार करून, परशत्रूंपासून सर्व कोंकण किनाऱ्याचें चांगलें संरक्षण केलें होतें. हा इ. स. १७२९ मध्यें मृत्यु पावला. त्याच्या मागून त्याचा पुत्र सेखोजी यास सरखेलीचीं वस्त्रें मिळालीं. तो इ. स. १७३३ सालीं मृत्यु पावला. त्याची आई लक्ष्मीबाई ही फार चतुर व राजकारणी बायको होती. हिच्या ठिकाणीं, रणशूर मराठ्यांच्या स्त्रियांस साजतील असे धैर्य व स्वामिभक्ति हे गुण फार अपूर्व होते. कान्होजी आंग्र्याच्या पश्चात् आरमाराची व्यवस्था ही बाई स्वतः पहात असे. त्यामुळें पेशव्यांच्या दरबारीं हिचें वजन व प्रतिष्ठा विशेष असे. सेखोजी आंग्रे वारल्याचें वृत्त जेव्हां थोरले बाजीराव साहेब यांस समजलें, तेव्हां त्यांनीं लक्ष्मीबाईचें समाधान करण्यासाठीं एक पत्र पाठविलें. त्या पत्रामध्यें त्यांनीं, "पुत्रशोक न करितां विचारानें दुःखाचें परिमार्जन करावें, आणि लोकांचीं समाधानें करावीं" इत्यादि मजकूर लिहिला होता. हें पत्र वाचून या धैर्यवती स्त्रीनें पेशव्यांस उत्तर लिहिलें:– "ईश्वराच्या इच्छेनें जो प्रसंग ज्या समयीं यावयाचा तो येतच आहे. भवितव्यता कधींही टळणार नाहीं. तेव्हां घडलेल्या गोष्टीबद्दल खेद करण्यांत काय अर्थ आहे? दुःखाचें परिमार्जन करून, आमच्या घराण्यानें जो पूर्वापार लौकिक संपादिला आहे त्याचें संरक्षण करणें हाच माझा स्वधर्म आहे असें मी समजतें. आणि, स्वामिकार्यावर दृष्टि देऊन, तें सिद्धीस नेण्यांतच सर्व कृतार्थता आहे असें मी मानितें. मजला माझ्या पुत्रापेक्षां स्वामिकार्याच्या यशःसिद्धीचें महत्त्व अधिक वाटतें. पुत्रशोकांत गुंतून मी सरदारीचा लौकिक कधींही गमाविणार नाहीं." केवढें हें धैर्य! केवढी ही स्वामिभक्ति!!



## ४६. जिवाऊ शिंदे.

मराठ्यांच्या इतिहासाचें सूक्ष्म निरीक्षण केलें तर असें दिसून येतें कीं, मराठी राज्य संस्थापित करण्याचे कामीं, शिवाजी, राजाराम व शाहू यांच्या कारकीर्दींमध्यें, ज्या रणशूर व स्वामिभक्त मराठ्यांनीं आपल्या अद्वितीय गुणांची सीमा करून दाखविली, त्यांच्या बायकाही तशाच कर्तबगारीच्या आणि योग्यतेच्या होऊन गेल्या. त्यांच्या अंगीं, धैर्य, सहनशीलता, स्वामिनिष्ठा आणि स्वार्थत्याग हे गुण अतिशयेंकरून वसत होते. त्यामुळें मराठी राज्याच्या अभ्युदयास त्यांचें साहाय्य प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें बहुत झालें आहे. ह्या स्त्रियांची प्रतिष्ठा व वजन राजदरबारीं चांगलें असे, आणि त्यांच्या शब्दास विशेष मान असे. या वेळच्या जुन्या घराण्यांतील महाराष्ट्रस्त्रियांची संपूर्ण माहिती मिळाली व त्यांचा पत्रव्यवहार उपलब्ध झाला, तर त्या कालीं स्त्रियांची योग्यता समाजामध्यें कोणत्या प्रकारची होती, तें चांगलें निदर्शनास येईल. शिवाजी महाराज, संभाजी महाराज व राजाराम महाराज यांच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आलेलें रविराव शिंद्याचें घराणें प्रसिद्ध आहे. या घराण्यापैकीं नेमाजी शिंदे यानें राजाराम व शाहू महाराज यांस अप्रतिम साहाय्य केलें होतें. या नेमाजी शिंद्याची बायको जिवाऊ शिंदे ही मोठी कर्ती बाई होती. तिला थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांनीं लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून ह्या बाईची योग्यता कळण्यासारखी आहे. तें पत्र येणेंप्रमाणेंः—

श्री.

"गंगाजळनिर्मळ जिवाऊ शिंदे यांसीः-

प्रतिपूर्वक बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेषः- तुह्मांकडून राजश्री त्रिंबक गोपाळ आले; यांणीं कितेक अर्थ निवेदन केला, त्याजवरून सविस्तर कळों आलें, व राजश्री महीपतराव शिंदे यांचेविसीं कितेक विदित केलें. ऐशास, मशारनिल्हे पुरातन राज्यांतील सेवक, व पूर्वीं राजश्री नेमाजी शिंदे यांणीं या राज्यांत कोणे रीतीनें सेवा केली आहे व कितेक काम काजें केलीं; त्याचे जागां मशारनिल्हे आहेत. यांणीं सर्व प्रकारें जातीनें अंगेज करून, तोलदार फौज धरून, दुष्टास नतीजा देऊन, आपला नक्ष करावा, हा समय हाच आहे. व येविसीं कित्येक अर्थ राजश्री त्रिंबक गोपाळ यांस सांगितला आहे. हे तुह्मांस सांगतील. तीं वचनें आमचींच जाणोन, तुह्मीं मशारनिल्हेस उत्तेजन देऊन, सांगितल्याप्रमाणें कार्यभाग केल्यानें हें घर तुमचेंच आहे. आह्मी सर्वस्वें तुमचे असों. यास संदेह नाहीं. जाणिजे. छ. ६ जिल्हेज."



# १८. दिल्लीचा वजीर आफरासियाबखान ह्याचा वध आणि महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबावा यांचे वरील एक निराधार आरोप.



महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबावा यांचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत सुप्रसिद्धच आहे. पानिपतच्या लढाईमध्यें मराठ्यांच्या साम्राज्यास जो मोठा धक्का बसला, त्याच्या योगानें त्यांची उत्तर हिंदुस्थानांतील सत्ता कमजोर झाली – किंबहुना नष्टप्राय झाली; ती पुन्हां संस्थापित करण्याचें बिकट काम केवळ या अद्वितीय योद्ध्यानेंच तडीस नेलें, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. पाटीलबावांचे उत्तरहिंदुस्थानांतील भारतीय पराक्रम, त्यांचें रणशौर्य, त्यांचें राजकारणपटुत्व आणि त्यांचें दूरदर्शित्व इत्यादि गुण त्यांच्या प्रसिद्ध असलेल्या चरित्रावरून व्यक्त होतात. त्यावरून ह्या बाणेदार व रणशूर योद्ध्याच्या हातून एखादें कपटपटुत्वाचें नीच व अघोर कृत्य घडलें जाईल असें संभवत नाहीं. उदार, धैर्यशाली, आणि रणझुंजार असा कोणताही योद्धा अत्यंत नीच व अपवित्र असें खुनाचें कृत्य करून, आपलें यश दूषित करणार नाहीं. तथापि, महादजी शिंद्यासारख्या थोर पुरुषावरही एक खुनाचा आरोप इंग्रजी ग्रंथांत ध्वनित केलेला दिसून येतो. हा आरोप अगदीं निराधार व असत्य आहे, हें सकृत्‌दर्शनीं कोणासही दिसून येईल. तथापि, इतिहासग्रंथांत एक वेळ तो नमूद झाला आहे, सबब त्याचें साधार खंडन करणें अवश्य आहे.

दुसरा शहाअलम पादशाहा दिल्ली येथें इ. स. १७७१ सालीं सिंहासनारूढ झाल्यानंतर, दिल्लीचा सर्व राज्यकारभार वजीर नजबखान पहात असे. ह्यानें मराठ्यांशीं वरकरणीं सख्य ठेवून, सर्व बादशाही सत्ता आपल्या मुठींत ठेविली होती. हा तारीख २२ एप्रिल सन १७८२ रोजीं मृत्यु पावला. त्याचीं वस्त्रें त्याचा दत्तक पुत्र आफरासियाबखान यास देण्यांत आलीं. परंतु त्याचा नातेवाईक मिर्झा सफी हा सत्ताधिकारी होऊन, त्यानें बादशाहाची दिवाणगिरी आपणा स्वतःकडे घेतली, व सर्व राज्यकारभार तो स्वतःच पाहूं लागला. शहाअलम बादशाहा अत्यंत दुर्बल आणि चंचल बुद्धीचा असल्यामुळें दिल्लीच्या राज्यकारभारांत अनेक घोटाळे सुरू झाले. आग्र्याचा सुभेदार महमद बेग आमदानी हा, मिर्झा सफीच्या विरुद्ध एक प्रबल पक्ष निर्माण करून, सर्व राज्यकारभार आपले हातांत

घेण्याचा प्रयत्न करूं लागला. येणेंप्रमाणें दिल्लीचे दरबारांत द्वेष, मत्सर व तंटे-बखेडे सुरू झाले; आणि त्यांत मिर्झा सफी हा, अहमद बेग आमदानी याचा पुतण्या इस्मायल बेग याचेकडून, ता० ३० सप्टेंबर इ. स. १७८३ रोजीं मारला गेला.

मिर्झा सफी ह्याच्या मृत्यूची हकीकत एका अस्सल पत्रामध्यें पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहे. हें पत्र येणेंप्रमाणें—

श्री.

"विज्ञापना ऐसी जेः– मिर्जा शफी – नजबखानाचा भाचा, आफरासियाबखान, नजबकुलीखान व आमदानी तिघे चेलेही फौजा बाळगून आहेत. त्यांपैकीं आमदानी मिर्जा शफीशीं बाकाबाक करी, सलूखही करी. गोहदकर जाटाचा पैगाम आमदानीकडे कुमकेविशीं होता कीं, तीन लक्ष रुपये देतों; माझी कुमक करून दक्षण्यांशीं स्पर्धा करावी. त्याचेंही मानस होतें. परंतु मिर्झा शफी मना करीत असे कीं, "जाटाची बिशाद किती? दक्षिण्यांशीं बिघाड करणें ठीक नाहीं. त्यांचा जमाव भारी. त्यांशीं बिघाड केल्या, आपलें पारपत्य करितील. त्यांशीं स्नेह करून, मेळऊन घेतल्यास फार कामावर पडतील." असा निरंतर निषेध करीत असे. आमदानीविशीं खतराही बाळगीत होताच. अनुपगीर गोसावी याचे विद्यमानें राजश्री पाटीलबावांशीं सूत्र लावून, यांस नेऊन, भेट पातशाजाद्यासुद्धां घेऊन, परस्परें सख्यवचनप्रमाण देऊन घेऊन ऐक्य केलें. काम पडल्या परस्परें कुमक करावी असा प्रसंग करून, डिगेंत स्वस्थ होता. भेटीचे प्रसंगीं पाटीलबावांनीं पैगाम घातला कीं, आमदानीशीं आह्मी भेटणार नाहीं. मध्यस्थ अनुपगीर गोसावी, त्याचें अमदानीचें वांकडेंच होतें. त्यानें बावांचे मर्जीप्रमाणें मिर्जा शफीस बोध करून, भेटीचे प्रसंगीं आमदानीस फौजसुद्धां दहा पांच कोस लाऊन देऊन, बावांची व मिर्जा शफीची सफाई केली. चमेलपार बावा गेले. तिकडून शहाजादा, मिर्जाशफी आले. भेटी होऊन सफाई जाल्याचें वर्तमान पूर्वी विनविलेंच आहे. त्या प्रसंगांत आमदानीस काढून दिलें. तो कुन्हा चित्तांत धरिला, किंवा अगोदरचा कुन्हा होता नकळे,–मिर्जा शफीशीं पैगाम भेटीचा करून प्रसंग केला. त्या दिवशीं आपण आपली फौज, गाडद, तोफखाना सजऊन तयार होऊन आला. दहा बारा हजार फौज, गाडद, व तीस चाळीस तोफ घेऊन चालून आला. सडे यावें, असें बोलणें लाविलें. त्यावरून मिर्जा शफी दोन तीन हजार, व आफरासियाबखान दीड दोन हजारानशीं, असे सडे आले. दरम्यान डेरा अमदानीनें दिला. तेथें उभा असतां, आफरासियाबखान आपले

जमावानशीं जाऊन, सडे स्वारींतच आमदानीशीं भेटून आला. नंतर मिर्जा शफी दो चौशांनशीं भेटीस गेले. हत्तीवर स्वारी असतां दोघांचे हत्ती जवळ जवळ जाले. हाताशीं हात लावावा तों, आमदानीचा पुतण्या आपले हत्तीवरून उडून, मिर्जा शफीचे अंबारींत खवासींत जाऊन, मागून मिर्जा शफीची मान दाबून धरून, पोटांत कटार मारून ठार केला. आफरासियाबखान व गोसावी थोडे जमावानशीं होते. तितक्यांनशीं लढाईस उभे राहिले. किंचित् प्रसंग जाला, तों अस्तमान जाला. आमदानी तसाच जाऊन कुंभेरीस मुक्काम केला. आफरासियाबखान, गोसावी डिगेस गेले. तेथें नजबखानाची बहीण आहे, तिनें दरबार करून सर्वांचीं संमतें मेळऊन, आफरासियाबखानास बक्षीगिरीचीं वस्त्रें दिलीं. नजबकुलीही तेथेंच सारे जमून आहेत. वीस हजार फौज व वीस पलटणें व तोफखानाही मातबर आहे. उमरावगीर अनुपगीर गोसावीही आहेत. सारे एक होऊन आमदानीवर जाणार, असें वर्तमान बावांजवळ आलें. अनुपगीर गोसावी यानें बावांस लिहिलें आहे कीं, या प्रसंगीं कुमक करावी, उचित आहे. त्यावरून आंबूजी इंगळे यांची रवानगी डिगेस करणार. पांच हजार फौज, दोन पलटणें समागमें देऊं ह्मणतात. इतक्यावर होईल वर्तमान तें विनंति करीन. आफरासियाबखानानें बक्षीगिरीचीं वस्त्रें दुसरे दिवशींच नजफखानाचे बहिणीकडे माघारीं पाठऊन दिलीं. सारे आमदानीचे कुटांत आहेत. मिर्जा शफीच्या मारण्यांत आफरासियाबखानाचेंही मत होतें, अशी चर्चा आहे. गोसावी मात्र जातीनें वेगळे आहेत. वरकड सारे फितुरांत आहेत ऐकतों. हे विज्ञापना."

मिर्झा सफी मारला गेल्यानंतर, नजीबखानाचा पुत्र आफरासियाबखान आणि महमद बेग आमदानी यांच्यामध्यें प्रधानपदाबद्दल स्पर्धा उत्पन्न झाली. अशा प्रसंगीं महादजी शिंद्याचें साह्य घेणें त्या दोघांसही अवश्य वाटलें. ह्या वेळीं उत्तरहिंदुस्थानामध्यें महादजी शिंद्याची कर्तृत्वशक्ति व शौर्यप्रताप हीं विशेष महशूर झालीं होतीं. त्यामुळें दिल्लीचे राजकारणांत त्यांचें साह्य घेतल्यावांचून दुसरें गत्यंतरच नव्हतें. महादजी शिंदे यांजकडे आफरासियाबखान व महमद बेग आमदानी या दोघांचेही वकील गेले. परंतु, आफरासियाबखान व शहाअलम बादशाहा एका जुटींत असल्यामुळें, त्यांनीं त्यांच्या विनंतीस अधिक मान दिला, व आग्र्यास जाऊन बादशाहाची भेट घेण्याचें योजिलें. त्याप्रमाणें महादजी शिंदे व आफरासियाबखान ह्यांची तारीख २२ आक्टोबर इ. स. १७८४ रोजीं आग्रा येथें मुलाखत झाली. त्यानंतर आकस्मिक रीतीनें आफरासियाबखान ह्याचा खून झाला. त्यावरून महादजी शिंदे यांचें त्या कृत्यांत अंग असावें असा, कांहीं इति-

हासकारांनीं अनुदारपणाचा तर्क करून, ह्या थोर पुरुषाच्या कीर्तीस थोडा कलंक लाविला आहे. परंतु तो तर्क अगदीं असत्य आहे, हें अस्सल पुराव्यानें आह्मीं येथें सिद्ध करून देण्याचें योजिलें आहे.

आफरासियाबखान याच्या खुनाचे कामांत महादजी शिंदे यांचें अंग असावें हा तर्क, प्रथम कॅप्टन फ्रँक्लीन यांनीं, 'शहाअलम बादशाहाचे कारकीर्दीचा इतिहास' ह्मणून जो ग्रंथ इ. स. १७९८ मध्यें प्रसिद्ध केला आहे, त्यांत ध्वनित केला आहे. त्याचाच अनुवाद, मराठ्यांचे इतिहासकार कॅप्टन ग्रांटडफ, व 'माधवराव शिंदे' यांच्या चरित्राचे कर्ते मि. कीन यांनीं आपल्या ग्रंथांत अंशतः करून, हा आरोप कितपत सत्य आहे, याविषयीं आपला संशय प्रदर्शित केला आहे. कॅप्टन फ्रँक्लीन यांनीं प्रायः एखाद्या मुसलमानी तवारिखेवर फाजील विश्वास ठेवून हा चुकीचा आरोप व्यक्त केला असावा, हें उघड आहे.*

क्याप्टन ग्रांटडफ व मि. कीन ह्यांनीं, क्याप्टन फ्रांक्लीनप्रमाणें डोळे झांकून ही खोटी गोष्ट सर्वथा मान्य केली नाहीं. तथापि ती संशयग्रस्त असावी एवढेंच ध्वनित करून, त्यावरून महादजी शिंद्यांचें यश कलंकित होत नाहीं असें सिद्ध करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला आहे.† परंतु अस्सल कागदपत्र पाहिले, तर ह्या

* "The conduct of the Mahratta chief in countenancing Zein-Al-Abudeen after the perpetration of so foul a crime, calls loudly for the severest reprehension ; it is a strong presumptive proof that he was accessary to the deed. In recording the transactions of a wicked and dissipated court, the impartiality of history demands the strictest scrutiny, whilst the multiplied assassinations which, in later times, have disgraced the politics of Delhi, in a reflecting and susceptible mind, must excite horror."

—*Francklin's History of Shah-Aulum P. 130.*

† क्याप्टन ग्रांटडफ व मि. कीन ह्यांच्या ग्रंथांतील उतारे खालीं दिले आहेत:—

"A meeting took place on the 22nd October ; but immediately afterwards Afrasiab Khan was assassinated by the brother of the late Mirza Shuffee, in whose murder Afrasiab Khan secretly participated. As Sindia derived most advantage from the death of Afrasiab Khan, and as the assassin sought and found an asylum in his camp, he did not escape suspicion of being accessory to the murder ; but those who knew Mahadajee best, never accused him of a deed so atrocious. The event, however, vested Sindia with complete authority at Delhi, and placed him in a situation which he had only hoped to attain at some remote period."

—*Grant Duff's History of the Marathas—P. 462.*

"Afrasyab marched, therefore, without the sanction of his sovereign puppet ; and, on arrival at Agra, encamped under the walls and awaited the coming of Sindhia. In October 1784, Sindhia arrived, had a friendly in-

खुनाची खरी हकीकत अगदींच वेगळी असून, हा आरोप सर्वस्वी चुकीचा व खोटा आहे असें दिसून येतें. सुदैवानें ह्या प्रसंगाचें अस्सल पत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे, तेंच आह्मी येथें सादर करितों.

आफरासियाबखान ह्याचा आग्रा येथें खून झाला, त्या वेळीं महादजी शिंदे ह्यांच्या जवळ सदाशिव दिनकर ह्या नांवाचा एक इसम हजर होता. त्यानें नाना फडणविसांस ह्या प्रसंगाची सविस्तर हकीकत पुढें लिहिल्याप्रमाणें लिहिली आहे. ती अत्यंत महत्त्वाची व वाचनीय असून, तिच्यावरून पाटीलबावांवरील मिथ्या आरोप तेव्हांच नाहींसा होतो. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"विज्ञापना ऐसीजे:- आफरासियाबखान यास आमदानीनें दगा करून जिवें मारिला, हें वर्तमान छ १९ जिल्हेजचे रवानगींत पत्रीं विनंति केली आहे. याचा शोध लागला जे, गुदस्तां मिर्जा शफी यास आमदानीनेंच दगा करून मारिला. त्या संमतांत आफरासियाबखानही होता. आतां राजश्री पाटीलबावा यांचे सा-

---

terview with the minister, pitched his camp as near as possible, and began to concert matters for an assault upon the rebel garrison.

Three days later Afrasyab was stabbed in his tent by Zain-ul-abidin, brother to the late Mirza Shafi. As the murderer escaped punishment, though known to be a refugee in the Maratha camp, it was at once conjectured that the murder, though certainly not unprovoked, might not have been committed without suggestion from Sindhia. The truth cannot be positively known; the suspicion may possibly —nay, probably— have been little more than the outcome of the ordinary question *Cui bono?*

In the absence of positive evidence there is nothing but conjecture to aid us in considering whether or no a certain historic character was guilty of any particular crime. The manner of Afrasyab's death would have been a reproach to Sindhia if it were brought home to him. But it would have been so far as the record shows, an isolated instance in a life otherwise free from cold-blooded atrocity. From Grant Duff's remarks it may fairly be inferred that not only is there no convincing reason for charging Sindhia with the instigation of this murder, but that the best informed of his contemporaries never suspected him; and the actual assassin had a sufficient motive, in revenge for the murder of his brother. It is true that Sindhia does not appear to have made any attempt to punish him; but the spirit of those anarchic times would warrant his getting the benefit of the *lex talionis.* We are not entitled to demand of a politician that he shall be independent of the spirit of his time, or be guided by principles of which he had never heard. As for the maxim *Cui bono,* it is doubtless a help to the historical detective; but it is no more an infallible guide for him than for the police of daily life."

| *Keene's Madhava Rao Sindhia, p. p. 100—102.*

हित्यानें, मदतीनें, बादशाहाजवळ कारभारी मुख्तार आफराशाबखानच होऊन, बक्षीगिरीस किताब 'अमिरुल उमरा' आहे, तो किताबही मिळाला. नजबखाना-जवळील फौज, मोगले वगैरे मिर्जा शफीजवळ होती. मिर्जामजकूर जबरदस्त; कोणाचें चालू देईना. हें विषम सर्वांस जालें. तेव्हां त्याजवळचे मोगले, फौजेचे सरदार, जागीरदार, सारे आमदानींत मिळून, मिर्जा शफीस ठिकाणीं लाविलें, तेच सरदार, मोगल जागीरदारच होते. आफराशाबखानाजवळ ते व आमदानी एक होते. मिर्जा शफीचा भाऊ जैनुल आबदीखान राजश्री पाटीलबावांजवळ सहा महिने येऊन राहिला होता. मातबर, आल्याचें चालविलेंच पाहिजे, ह्मणून बावा खर्चास देऊन त्याचें चालवीत असतां, आमदानीचे मतांत मिळाला. आमदानी, जैनुल आबदीखान व मोगले, सर्वांचा मनसबा ठरला जे, आफराशाबखान दक्षणी-यांसीं मिळाला; पाटीलबावांचे सलहेनें चालतो; बादशाही दौलत दक्षणीयांचे घरांत घालितो; यास जैनुल आबदीखानानें मारावा, ह्मणजे पाटीलबावा सहजच राहिले. बादशाही बंदोबस्त करण्याचा विचार, अमिरुलउमराई जैनुल आबदी-खानास द्यावी. ज्ञान यांचें कळलेंच आहे. नांवाचा धनी यास करावा. कारभारांत यखत्यार मुख्तार आमदानी होऊन काम चालवावें. मोगले सरदार फौजेचे आहेतच. असा घाट करून, जैनुल आबदीखानास उमेदवार केला. त्यानेंही मान्य केलें, आणि आपले घरचा बारगीर मोगल याजकडून हें काम करविलें. जैनुल आबदीखान बारगिरास बरोबर घेऊन आफराशाबखानाचे डेऱ्यास गेला. दोन चार घटिका बरोबर फिरून, आफराशाबखान एकटा डेऱ्यांत पाहून, बार-गिरानें झपट करून, गळची धरून, कटार स्कंदावर उभा चालऊन, वरून भार घालून दाबला. तो स्तनापावेतों आला. कारगर जाला. काम आखेरच जालें. कांहींसा जीव हंसमात्र राहिला. तेव्हां लोक मिळाले. त्यांनीं बारगीर मोगल्या मारिला. त्या गलबलींत जैनुदीखान तेथून निघोन पाटीलबावांजवळ डेऱ्यांत येऊन वर्तमान सांगितलें:—"मी जवळ होतों. तो बारगीरही माझाच. मजलाच कोणी बदनाम करितील, तुफान घेतील, यास्तव आपणाकडे वर्तमान सांगावयास आलों." तें श्रवण करून बावांनीं जैनुल आबदीखानास धरून पाहऱ्यांत तेच समयीं दिलें. तसेंच आपले खिजमतगार पाठऊन खबर आणविली. तों आफराशाबखानाचें काम जालें, हंस मात्र बाकी आहे. वर्तमान कळल्यावर विचार प्राप्त जाला कीं, आफराशाबखानाची फौज, मोगले, आमदानींत मिळालेच आहेत. ते हे एक जाले ह्मणजे तोफखानाही मेळऊन घेतील. मग संकटच पडेल. राजश्री आंबूजी इंगळे याजबरोबर दोन तीन हजार फौज व दोन पलटणें

त्यांचे फौजेचे संरक्षणास पाठऊन, चौकीबंदी करून, त्यांचे लोकांची खातरजमा केली. तों संध्याकाळ जाला. आफराशाबखानाचा हंस उरला होता, तोही जाऊन मृत्यु पावला. त्याचा ताबूत शिकरीफत्तेपुरास न्यावयाचा, तों मोगले व पलटणवाले साऱ्यांनींच बंद केला. 'तलबेची निशा होईल तेव्हां नेऊं देऊं,' ह्मणाले. बावांनीं विचार केला कीं, आह्मीं आंगानिराळें टाकिलें ह्मणजे आमदानी व मोगले तोफखान्यासुद्धां एक जाल्यास गोष्ट वाईट. या समयीं हिंमत करणें सलाह जाणून, मोगले, तोफखाना, पलटणवाले यांची खातरजमा केली कीं, 'तुमची तलब निघेल ती, बादशाहाकडून आह्मी देवऊं.' त्यांनीं मुद्दा घातला कीं, पुढें आह्मांस चाकर ठेऊन जागिरी बहाल करून द्याव्या. तेंही बावांनीं मान्य केलें कीं, आफराशाबखान चालवीत होता त्याप्रमाणें बादशाहास सांगोन तुमचें चालऊं. आंबुजी इंगळे फौजसुद्धां पलटणसुद्धां त्यांचे लष्करांत राहिले, ह्मणून वसवास खाऊं लागले. त्याजविशीं खातरजमा केली जे, तुमचे संरक्षणार्थ फौज, पलटणें, आह्मीं ठेविलीं आहेत. स्वस्थ राहावें. फौज उठवून आणावी तर सलतनत लुटली जाते. गोसावी हिंमतबहादूर याचा आमदानीचा दावा. आफराशाबखानाचा कारभारी नारायणदास याचें संरक्षण होणार नाहीं. ते दोघे ठिकाणीं लागले, तर सारा मनसबा बुडतो. यांचें संरक्षण आमच्यानें न जाल्यास, दाब उठून, आमदानी व हे सारे फितुरी एक होऊन, फिरून गोष्ट सांगतील. यास्तव फौजपलटणें तसींच त्यांचे फौजेंत ठेऊन दोघांचें संरक्षण केलें. सारे फितुऱ्यांनीं, जैनुल आबदीखान बावांचे चौकींत बंद केला, त्यास कोणेही प्रकारें काढून न्यावें, येविशीं युक्तिप्रयुक्ति करून पाहिल्या. परंतु साध्य न जालें. अद्यापवर जैनुल आबदीखान बावांचे बंदांत आहेच. रात्रीस बावांनीं कारभारी मेळऊन मसलत केली कीं, 'यांत त्या गरमींतच दाब बसविल्यास बसेल. एक दोन रोज उगेंच स्वस्थ राहिल्यानें, सारे फितुरी एक होऊन शेर जाले, तर मग दबणार नाहींत. प्रातःकालींच सडी स्वारी करून आमदानीवर जावें. राजश्री रायाजी पाटील व जिवाजी बल्लाळ बक्षी यांची रवानगी दोन दिवस अगोदरच फौजसुद्धां आमदानीवर केलीच होती. दोन तीन कोस पुढें जाऊन मुक्काम केलाच होता. आफराशाबखानाची फौज, तोफखाना, येथून कूच करून त्यांत सामील जाला, ह्मणिजे रायाजी पाटील व बक्षी यांनीं आमदानीवर जावें. ही सलाह आफराशाबखान व गोसावी यांचे विचारेंच ठरून, पाटील व जिवबा बक्षी यांची रवानगी फौजसुद्धां केली. दुसरे दिवशीं खानमरहूम याची फौज तोफखाना जावा, तों त्याचा मृत्यु जाला. मग आमदानीचें पारपत्य जातीनसींच करणें प्राप्त जालें.

रात्रीसच चिठी, रायाजी पाटील व जिवबा बक्षीस पाठविली कीं, उदईक आमचा मुक्काम तुमचे जागां होईल. तुह्मीं कूच करून, एक कोस पुढें जाऊन मुक्काम करणें. आमदानीचे वकील जाबसालास आले होते. एक घोडा चांगला आणून नजर केला होता. त्यास वकिलास रात्रीसच बोलाऊन आणून, घोडा त्यांचे स्वाधीन करून, निरोप दिला कीं, तुह्मीं आमदानीकडे जाणें. घोडा माघारा देणें. उत्तर आमचें सांगणें जे, "तुह्मांजवळ तोफखाना, हत्ती, घोडे, उंट आदिकरून कारखाने असतील, ते आमचे हवाला करणें; आणि आपले कबिले घेऊन निघोन, जाणें असेल तिकडे जाणें. असें कराल तर तुमचे अबरूस खता होणार नाहीं. हें कबूल नसेल तर लढाईस उभें राहणें." हें कृत्य छ १९ चे रात्रीस केलें. मागील सहा घटिका रात्र राहतां बुणगे रूपबसावर टाकून, सडी स्वारी करून, निघोन, रायाजी पाटील व बक्षीचे तळावर मुक्काम केला. पाटील व बक्षी पुढें कोसभर गेले. जलदी करून जाऊन गळीं पडावें, तर वकील काल बिदा केले, त्यांनीं जाऊन वर्तमान धन्यास सांगून जाब आणिला नाहीं, याजकरतां दम खादला. वकिलांनीं आमदानीकडे जाऊन वर्तमान सांगोन उत्तर आणिलें जे, 'बादशाही सरंजाम मजजवळ पंधरा तोफा मात्र आहेत त्या देतों. वरकड........आहे तो मी देणार नाहीं. मेल्यानंतर कोणी घेऊन........' बावांनीं सांगोन पाठविलें कीं, 'तोफखाना, हत्ती........तुह्मांजवळ असतील ते झाडून द्यावे लागतील. खासे घोडे बसावयाचे असतील तितके तुह्मांजवळ राहतील. बाकी बिलकूल देणें पडेल.' या जाबसालामुळें दोन तीन रोज टाळा दिला. त्यांत नारायणदास व गोसावी यांस बोलाऊन आणून, त्यांचे फौजेची तऱ्हा काढून, रुपये तूर्तचे खर्चास नख्त आपणापासोन देऊन, त्यांची फौज, पलटणें, तोफखाना आपल्याजवळ आणविला. मोगलेच काय, हिंदुस्थानी माणूस ब्राह्मणापासोन अतिशूद्र व मुसलमानपावेतों दगाबाज, मात्रागमनी, बेइमान, खुषामदी, व तत्कालच निर्दय प्राण घेणार, पोटच्या संतानापावेतों. त्यांतही विलायती मोगल व कशमिरी हे तर आधीं खुषामद इतकी दाखवावी कीं आसच केवळ, आणशफतही करावी. तेच समयीं काबू फावला तर, तेच समयीं मान कापावी. आफराशाबखानाचे फौजेंत दिल्लीवाला विलायती मोंगल व कशमिरी झाडून यांशींच गांठ! आमदानीचें अनुसंधान अगोदरचेंच त्याशीं होतें. मग जाबसाल काय लाविला? "आफराशाबखान मेला, आतां बादशाही बंदोबस्त पाटीलबावा करितील. बादशाहाची दौलत हिंदूंच्या घरांत जात आहे. तुमचा धनी आफराशाबखान मेला. आतां तेथें राहणें तुमचें सलाह नाहीं. उठून

मजकडे येणें. तुमचा रुपायाही मी देतों." असा फंद टाकून फितूर माजविला. बावांनीं धैर्य धरून, दम खाऊन, बाहिरून दाब घालून, नारायणदास व गोसावी यांचे हातून अनुसंधानें लाऊन, लोभ दाखऊन, कारस्थानानें फौज, तोफखाना, पलटणें आपणांजवळ आणऊन, तोफा लाऊन आमदानीचें पारपत्य करावें असें ठरविलें. अंतर पाहतां, भरतपुराअलीकडे दोन अडीच कोसांवर आमदानी; त्या अलीकडे तीन साडेतीन कोसांवर बावांचे सडे स्वारीचा मुक्काम. आफराशाबखानाचे मोगले आदिकरून फंदी. बुद्धीचें शाश्वत नाहीं. जलदी करून मतलब गाठला तरीच बरें, असें समजून, बुणगे रूपबसावर होते ते सडे स्वारींत मेळविले. शेजारीं आद कोसावर यवनाचे बुणगे याचा मुक्काम करविला, आणि फौजेचा घेरा आद आद कोसाचे अंतऱ्यानें आपली फौज, आफराशाबखानाची फौज, जैपूरवाले, माचेडी-वाला अशा फौजेचा ताटवा पुरला तितका उभा करून, आपण खासा पाटीलबावांनीं एका कोसावर उभे राहून, आपला व आफराशाबखानाचा ऐसे दोन्ही तोफखाने आम-दानीवर सुरू केले. रसद बंद केली. लढाई सुरू जाली........थोडी मारगिरी केली. त्यांच्याही तोफा सुरू जाल्या..... संध्याकाळीं तोफा व फौजेच्या............ बुणग्यांत आले. आफराशाबखानाचा तोफखाना........बुणग्यांत आला. दुसरे दिवशीं उजाडतांच, बावांनीं तोफांजवळ जाऊन तोफा सुरू केल्या. नंतर आ-वाज आफराशाबकडील तोफखाना जाऊन लागू जाला. इकडे लढाई होते; मोगले आफराशाबचे उभे आहेत; आमदानीचे फौजेंतून राऊत निघोन मोगल्या-कडे यावे, मोगल्यांनीं दोघां चौघांनीं निघोन, त्या रावतांकडे जाऊन परस्परें बोलून माघारें जावें, हे जाबसाल आमदानीकडे चालले. बावांशीं जाबसाल घातला कीं, "बादशाहीचा बंदोबस्त तुह्मी करणार. आह्मी तुमचे शरीक होऊन, भांडावें मरावें कशास?" बावांनीं उत्तर केलें कीं, "आह्मांस बादशाहीचा अगर कारभाराचा लोभ असता, तर मागें किती वेळ काबू आमचे लागले? बादशाहतच घेतों, अगर कारभारांत कबजा करितों! उफराटें बादशाहाच्याच स्थापना व मदती करीत गेलों. आतांही आह्मांस लोभ नाहीं. बादशाहाचीं दरसाल पत्रें देशीं येत गेलीं. ग्वालेरीस असतां मिर्जाशफी आदिकरून बोलावूं लागले. आलों; भेटी घेऊन ग्वालेरीस माघारें गेलों. आतां पुन्हां बादशाहा व आफरा-शाबखान यांचीं पत्रें, वकील येऊन आह्मांस घेऊन आले. बादशाहा आगऱ्यांत

ठेवून आफराशाबखान पुढें आले. भेटले. बादशाही बंदोबस्ताचें बोलत होते. आम्हीही बोलत होतों. त्याची दशा, आम्ही जवळ असतां, अशी जाली. बादशाहाचे षुके वरचेवर येत आहेत. असें असतां टाकून जाणें उचित नाहीं. बंदोबस्त करून देऊन माघारें जावें. येथें कारभारास आफराशाबखानाचा पुत्र आहे. त्याची स्थापना करून द्यावी." हें उत्तर करून, आफराशाबखानाचे पुत्राचे नांवें पत्र, मातंपुरसी व पुढील बंदोबस्ताचें व वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे दिले. ते त्यांनीं रामगड अंतरवेदींत आहे, तेथें आफराशाबखानाचे पुत्राकडे रवाना केले. मग तोफखाना लागू करून मारगिरी भारी केली. आसपास घेरा पडला. यामुळें आंत दाणा नाहीं. अडीच शेर तीन शेर धारण आमदानीचे फौजेंत जाली. पदरीं रुपया नाहीं. तीन चार रोज गुरें मारमारून खादलीं. तेव्हां लाचार होऊन, आंबूजी इंगळे यांजकडे पैगाम लाऊन, त्यास दरम्यान घालून करार केला कीं, माझे घरचे घोडे, उंट, हत्ती असतील, ते मजला द्यावे; आणि तोफखाना, हत्ती घोडे असतील ते घ्यावे. मोगल, पठाण, रोहिले, पलटणे, यांस हत्यारां-सुधां जाऊं द्यावें. स्वार बरोबर देऊन पोंहचाऊन द्यावें. एक दोन रोज बावांनीं ऐकिलेंच नाहीं. नंतर मान्य करून, तोफा मवकूफ केल्या. दुसरे दिवशीं आम-दानीस बाहेर काढावयास, भाई व दिवाणजी, चिटणीस, इंगळे ऐसे जाऊन, त्यांस वचनप्रमाण देऊन, शेंपन्नास स्वारांनशीं बाहेर आणून, भाई आदिकरून सर्वांच्या भेटी घेऊन, आंबूजी इंगळ्यांचे गोटांत उतरला. रोहिले, मोगल व चाकर पलटणें होतीं, तीं यांस, स्वार जासूद बरोबर देऊन, हत्यारांसुद्धां कुंभेरीपार करून दिलें. नंतर हद्द खिजमतगार वगैरे पाठऊन, तोफखाना व पलटणांत बं-दुका आमदानीच्या होत्या व हत्तीघोडे यांची मोजदाद करून आंबूजीच्या गोटांत ठेविलें आहे. त्यांची सुमारी कळल्यावर विनंति करीन. तोफा वगैरे सरंजाम बादशाहाकडे जातो किंवा आफराशाबखानाकडे जाईल, किंवा हे घेतील, अगर वांटणी होईल. चाळीस पंचेताळीस तोफ आहे, ऐकतों. त्याचा निर्णय कसा होतो पाहावा. बादशाहा आगऱ्यास होते. त्यांस आणावयास राजश्री खंडेराव हरी व आणखी पथकें पलटणें पाठऊन, आणून, दों कोसांवर मुक्काम करविला. बादशा-जवळ कांहीं नाहीं. सभोंवतें आवर्ण, खंडेराव हरी आदिकरून फौज व पलटणें बावांचीं यांचें आहे. जिल्हेजाचे चंद्रदर्शनाचे दिवशीं बादशाहाची बावांची भेटी

जाली. मीही गेलों होतों. बादशाहाजादा पुढें आला होता. त्यास बावांनीं अकरा खवाज व जगा, शिरपेंच, कलगी, मोत्यांची माळ, हत्ती, घोडा दिला. मग मुख्य बादशाहाकडे जाऊन भेटी घेतली. समागमें पवार मंडळी, बळवंतराव धोंडदेव वगैरे होते. त्यांस एक निमअस्तीन सारें सनंग, वरकड चिंधोट्या चिंधोट्या, एकून पांच वस्त्रें, कोणास जगा शिरपेंच अशीं दिलीं. संध्याकाळीं बावा आपले डेऱ्यास आले. छ २ मोहरमीं बादशाहाचें कूच जालें. पाटीलबावा प्रातःकालींच सडे स्वार होऊन, जाऊन बादशाहास स्वार करून घेऊन आले. आपलेपुढें बादशाहाचा मुक्काम करविला. तेथें डेरे दाखल करून आपले डेऱ्यास आले. हिंदुस्थानाप्रमाणें बेइमान, बेपीर माणूस कोठें पाहिलें नाहीं. आफराशाब मारल्यावर, खुशालीराम जैपूरकराचे फौजेबरोबर होता. मातबर शाहणा, त्यासही मारेकऱ्यांनीं मारिला. तेच दिवशीं आफराशाबखानाकडील एक मोगल तोही कारभारीच होता, त्यासही जखमा केल्या. दग्यानेंच! परंतु अद्यापीवर तो जिवंत आहे. अशी दग्याची प्रवृत्ति चालली आहे. बादशाहाचें ह्मणणें आफराशाब असता, तरी आह्मांस यापैकीं कोणाचा भरंवसा नाहीं. तुह्मीं बंदोबस्त करावा. असें बावांस ह्मणतात. बावांचा विचार............कीं, येथील राहण्यास पैका पाहिजे. आपणाजवळ रुपया नाहीं. कर्ज मिळत नाहीं. राहणें कसें होईल? भलतासा तोडजोड बादशाहाचा करून देऊन, आपण निघावें, देशास जावें, असें बाहेर ऐकतों. पुढें होईल वर्तमान ती विनंति करीन. रवानग्याचे पत्रांचीं उत्तरें जालीं नाहींत. मी मागतों. तयार होऊन आलीं ह्मणजे रवाना होतील. मेरट वगैरे महाल व बक्षीगिरीचा मजकूर बावांचे पत्रीं होता. पत्रेंच त्यांस दिलीं. मींही मेरट वगैरे व बक्षीगिरीविशीं सूचना केली. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## १९. श्री. बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं दिलेली ताम्रपत्राची सनद.



रा. रा. दिवाकर भालचंद्र कामत बी. ए. ह्यांनीं, गोरेगांव जिल्हा कुलाबा येथील एका मुसलमान गृहस्थास, श्रीबाळाजी बाजीराव पेशवे ह्यांनीं दिलेल्या एका ताम्रपत्रावरील सनदेचा शोध लावून, तिची नक्कल आमच्याकडे पाठविली आहे.

ताम्रपट सुवाच्य मोडी अक्षरांत असून त्याची लांबी ७ ६/८ इंच असून रुंदी ६ इंच आहे. ह्या ताम्रपटांत ज्या टोळांचा उल्लेख केला आहे, त्यांच्याच वंशजांजवळ तो आहे. सांप्रतच्या वंशजांचें नांव इब्राहिम ऊर्फ बावा टोळ असें आहे. ह्या सनदेवरून पेशवाईमध्यें ताम्रपत्राच्या सनदा देत होते असें दिसून येतें.

## ताम्रपत्र.

### एक बाजू.

"राजश्री खंडोजी माणकर गोसावी यांस
१ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य
२ रो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद सु॥
३ इहिदे आर्बैन मया अलफ. वल्ली महमद बिन मह-
४ मदी टोळ फकीर वस्ती कसबे गोरेगांव यांणीं
५ हुजूर येऊन विदित केलें कीं आपण कस-
६ बे मजकुरीं बहुत दिवस राहातों. परं-
७ तु आपली पोटाची बेगमी नाहीं. तर साहेबीं
८ मेहेरबान होऊन कांहीं इनाम जमीन देविली पा-
९ हिजे. ह्मणोन विनंति केली. त्याजवरून मनास आणू-
१० न कसबे गोरेगांव व तो मजकूर येथें थळ
११ टोळपट्टी शेत आहे त्यापैकीं सरकारतर्फेनें जमी-
१२ न यांचे दुमाला करून इनाम यांस व
१३ यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इना-

### दुसरी बाजू.

(शिक्का) १ म चालविणें. प्रतिवर्षीं नूतन प-
२ त्राची अपेक्षा न करणें. या
३ पत्राची नक्कल घेऊन अस-
४ ल फकीर मजकूर जवळ भोगव-
५ टीयास परतोन देणें. जाणीजे छ २६
६ जमादिलाखर बहुत काय लिहिणें.

( लेखन सीमा )"

वार.



तंजावरची राणी सुजानबाई.

पाहिजे. परंतु त्याचीं उत्तरें यथास्थित नाहींत. ऐवज कोठें सालमजकुरींचा ऐवज आला तो ठेविला नाहीं. तूर्त एक पैसा मिळत नाहीं. पेस्तर सालावर गोष्ट टाकली याप्रमाणें ह्मणतात. यावर आज्ञा येईल त्याप्रमाणें बोलत जाईन. मुत्सद्दी आहेत त्यांचा प्रकार पूर्वीं लिहिला असे. त्यास दौलतीचा प्रकार अगत्यवाद नाहीं. त्यांची तपश्चर्या उत्तम. ह्यांस काडीइतकी चिंता नाहीं. तिसरां प्रहरां दरबारास यावें. चार सहा घटका बसून घरास जावें. याप्रमाणें नित्याची वर्तणूक आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १२०.

**श्री.** ६ मार्च इ. स. १७८६.

" श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ जमादिलावलपावेतों श्रीकृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. चंद्र ३० रबिलावलचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २७ रविलाखरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, महेश्वराहून पुण्यापर्यंत डांक होती ते उठवून जासूद बोलाविले आहेत, सबब तुह्मांपाशीं कासीदजोड्या चार उज्जनीहून नारो हरीकडून देविल्या आहेत; त्या तुह्मी आपणांपाशीं ठेवून कागदजोडीबरोबर पाठवित जाणें ह्मणून आज्ञा. त्यावरून राजश्री नारो हरी यांनीं जोड्या कासीदाच्या चार आह्मांपाशीं, राजश्री आपाजी सदाशिव यांजला बराबर देऊन पाठविल्या, त्या चंद्र ३ जमादिलावलीं येऊन पोंहचल्या. याउपरी आज्ञेप्रमाणें जोडीबराबर विनंतिपत्रें पाठवीत जाईन. डांक उठवून बराबर कासीदजोड्या घेऊन, राजश्री आपाजी सदाशिव हुजूर आले आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १२१.

**श्री.** ६ मार्च इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:– चंद्र ३ रविलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २७ मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, परशरामपंत सोमण यांचे रुपये बाकी राहिले ते त्यांस देऊन, आटक केली असलयास मोकळे करणें, व दरकाचें कामकाज मशारनिल्हे-

पासून घेणें ह्मणून राजश्री गबाजी सदाशिव यांस सरकारचें पत्र पाठविलें आहे. याउपर त्यांस गैरवाजवी उपद्रव करणार नाहींत व दरकाचें कामकाज घेत जातील ह्मणून पत्रीं आज्ञा जाली. त्यास सरकारचें पत्र परभारें राजश्री गबाजी सदाशिव यांस गेलें असेल तर न कळे. आमच्या पत्रांत सरकारचें पत्र नव्हतें जें त्यांस द्यावें. तूर्त त्यांची मोकळीक करून कान्हापुरास पाठविलें आहे. दरकाचें कामकाज घ्यावें, तर इजारा महालाचा जमीदारास करून दिला आहे. तेथें इजारदार दरकदाराचे हातें काम काय घेईल? तूर्त कमाविसदाराचे आज्ञेप्रमाणें परगणे कान्हापूर येथें परशरामपंत गेले आहेत. वेदशास्त्रसंपन्न राजश्री ओंकारभट, गबाजी सदाशिव यांचे चिरंजीव, यांणीं सालगुदस्तां सरकारांत विनंतिपत्र लिहिलें होतें. त्यास, आज्ञापत्र सादर त्यांस जालें, तें त्यांनीं दाखविलें. त्यावरून येथें शोध करितां, त्यांनीं लिहिलें त्याजपेक्षां चार रुपये अधिक लागू होतील, गुंता नाहीं. परंतु त्याचा हिशेब जाला नाहीं तोंवर सरकारांतून त्यांस आज्ञा होणार नाहीं. त्या अर्थीं आमचे खर्चीचे ऐवजीं आलेले हिशेब वरात जाली तर राजश्री कृष्णाजी नाईक थत्ते यांचे कर्जापासून मुक्त होऊं. पुढें त्यांजकडील ऐवज येणें कठीणच आहे. चार वर्षें मामलतींची रसद पाठवीत गेले, परंतु शिवाय कांहीं पाठविलें नाहीं. ह्मणून विनंति लिहिली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १२२.

श्री. ६ मार्च इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ३ व चंद्र ५ रविलाखरचीं पत्रें सादर जालीं, तीं चंद्र २७ मिनहूस पावलीं. आज्ञेप्रमाणें बाईस तिळाची थैली व पत्र लखोटे तर चंद्र मजकुरींच पावले दिवशीं दिलें. दोन पत्रें खुलीं माझे पत्रांत होतीं, तीं चंद्र २ जमादिलावलीस दिधलीं. पत्रें राजश्री मुकुंद हरींनीं वाचून दाखविलीं. बाई व मुकुंद हरी व मी त्रिवर्गच होतों. पत्रें ऐकून संतोष पावली. टिपूकडील मजकूर लिहिला होता व ऐवजाविषयीं लिहिलें होतें. या वेळेस श्रम पावली नाहींत. संतोषेंकरूनच बोलणें जालें. मुत्सद्दी यांसीं, 'दरकदार यांचीं वेतनें घ्यावीं व दुसाला रसदा द्याव्या, तर कोणाचे भरंवशावर द्याव्या? भरंवसा लोकांस पुरत नाहीं; मजपासून हें घडत

नाहीं;' हेंच बोलणें जाहलें. मसलत सक्त आहे ह्मणून पत्रीं लिहिलें होतें. यास्तव थोडेंबहुत तजवीज कर्ज घेऊन करीन, याप्रमाणेंच बोलली. मीही विनंति करितच होतों. दुसरे दिवशीं एकांतीं बाईशींच प्रसंग केला कीं, ही वेळ पुन्हां येत नाहीं. या समयीं आपण मातबर साहित्यास उपयोगीं पडावें. आपणांकडे आपले दौलतीचें वडीलपण. कारभारी मसलत मर्जीनुरूप देतील, परंतु राजश्री दादाजी गंगाधर यांनीं आपणास लिहिलें तें सरकारची मर्जी पाहूनच लिहिलें असेल, असें कित्येक प्रकारें समजाविलें. त्यांच्या चित्तांत भासलें. मागें जीं बोलणीं होत होतीं तीं न करितां, बोलली कीं, हुताशनी जाल्यावर सावकारापासून कर्ज तूर्त दोन लक्ष रुपये घेऊन पाठवितें. त्यास मामलेदार यांचा ऐवज लावून देईन. यावर ऐवज पाठवावयास सोय नाहीं. इतकेंच समाधानरूप बोलणें जालें. मीही अधिक बोललों नाहीं. तदनंतर राजश्री विनायक बाजी निसबत दादाजी गंगाधर यांसीं बोलणें जालें. पंधरा लक्ष रुपये इकडून जावे. त्यांत ५ गेले आहेत. दोन लक्ष सांप्रत बाई पाठविणार. पुढें तजवीज करावी. त्याचें उत्तर विनायक बाजींनीं दिलें कीं, कमाविसदार यांस सरकारचीं पत्रें पाहिजेत कीं, तुह्मांपासून दुसाला ऐवज घेतला तो फिटे तोंवर घालमेल होणार नाहीं, अशीं पत्रें यावीं. मीं उत्तर दिलें कीं, याप्रमाणें पाहिजे तर पत्रें मी श्रीमंतांस विनंति लिहून पत्रें आणवितों. त्यांनीं याउपरी पत्राविषयीं सांगितलें तर विनंति लिहीन. परंतु ही मसलत बाईचे विचारास येणार नाहीं. तेंही बाईस पुसून सांगितलें. तेव्हां सेवेसीं लिहून विनंतिपत्र पाठवीन. सांप्रत तिळासमेत तीन पत्रें बाईसीं होतीं. त्याचें उत्तर एकेच पत्रांत लिहून पत्र दिलें. तें बजिन्नस सेवेसीं पाठविलें आहे. हुताशनी जाल्यावर स्मरण देऊन ऐवजाची रवानगी लवकर करवितों. पुढें टिपूचे मसलतीचें वर्तमान होईल तें बाईस लेख करावयास आज्ञा करावी. तेणेंकरून त्यांस संतोष आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र ३ जमादिलाखर

## लेखांक १२३.

सीत समानीन चैत्र मास. **श्री.** २५ मार्च इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य यशवंतराव गंगाधर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम तागाईत फाल्गुन वद्य १० दशमीपर्यंत मुक्काम निंबगांव येथें स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असे. विशेषः– आपण स्वारीस जातेसमयीं श्रीमंत मातुश्रीबाईस पत्रें लिहावयाविषयीं आज्ञा केली. त्यावरून आज्ञेप्रमाणें महेश्वरास मातुश्रीकडे तीन चार जोड्या पाठविल्या. मसलत मातबर, या समयीं उपयोगीं पडावें. आनमान

कदापि होऊं नये. निदानीं दहांची तऱ्ही तजवीज व्हावी. अशा अन्वयें बहुतां प्रकारें सुचलें तितकें लिहिलें. त्याजवरून त्यांनीं आपल्यास व आह्मांस पत्रें लिहिलीं आहेत. तींच बजिन्नस सेवेसीं पहावयास पाठविलीं आहेत. त्याजवरून सविस्तर ध्यानास येईल. पत्रांत मजकूर आहे कीं, आठ पंधरा दिवसां दोंच्या हुंड्या पाठवितों. यंदाचा ऐवज खर्चीं पडून चुकला आणि तुह्मीं तो मसलतीच्या वोढीमुळें फार लिहिलें. त्याजवरून मामलेदारांपासून पेस्तर सालचे ऐवजीं दोन लक्ष रुपये घेऊन, हुंड्या करून, रवाना करतों. पांच लक्षांच्या हुंड्या तुमचे विद्यमानें पेशजीं पाठविल्या आहेत. राहिले तीन. त्यास, इकडील माळव्यांतील महाल परगणे बुंदी, पाटण, सिरोंज वगैरे येथील तीन लक्ष रुपये रसद चिरंजीव राजश्री तुकबांनीं घेतलेच आहेत. एकूण दहांचा झाडा त्यांनीं याप्रमाणें लिहिला. त्यास दों लक्षाच्या हुंड्या सत्वरच येणार. त्या आल्या ह्मणजे सेवेसीं पावत्या होतील. त्यांची पावती त्यांच्या लिहिल्याप्रमाणें, पेस्तर साल ऐवजीं पावले अशी, पाठवयासी आज्ञा जाली पाहिजे. ती लक्षांचा त॥ मातुश्रींनीं लिहिला आहे. त्यास श्रीमंत राजश्री सुभेदार यांनीं माळव्यापैकीं महालचा ऐवज वोहडला, परंतु इकडे मसलत तेव्हां ऐवजाची सरबरा कोणेही प्रकारें घडावी ह्मणून आपण पत्रें मातुश्रीस परभारें लिहितील. त्यास तिकडीलही ऐवज सालमजकूर खर्च पडून, इकडील निकड जाणून पेस्तरसालऐवजीं आणखी दोन पाठविणार, तेव्हां ऐवजास जागा तों राहिलीं नाहीं. परंतु मसलतीचे अडचणीमुळें योजना आणखी शेष राहिले त्याची जाहली पाहिजे. त्याजमुळें आपलीं पत्रें मातुश्रीकडे रवाना होतील. त्या समयीं पेस्तर सालचा अन्वय आणून पत्रें गेलयास मातुश्रीचे पत्रास एकवाक्यता पडून, तरतूद घडावयाची तितकी घडेल. मर्जीस आल्यास आपलीं पत्रें परभारें जातील. त्या अन्वयें इकडेही एकादें पत्र आल्यास आज्ञेप्रमाणें रवानगी घडेल. मातुश्री दुरंदेश व आपला लोभ त्यांचे ठायीं अकृत्रिम, त्यापक्षीं दुसरा अर्थ किमपि परस्परें नाहीं. त्यांत मजलाही यथामतीनें सुचेल तितकें स्वामींचे मर्जीचे अन्वयें लिहितच आहें. कार्यभाग व्हावयाचा सर्व प्रताप स्वामींचा आहे. विशेष विनंति लिहावीशी नाहीं. सांप्रत मसलतीचा प्रसंग, या समयीं पत्राची रवानगी वरचेवर होत जावी ह्मणून स्वामींची स्वारी जातेसमयीं विनंति केली होती. त्याअन्वयें एक दोन वेळ परस्परें आपल्याकडून पत्रें गेलींच असतील. प्रस्तुतही विनंति लिहिल्याअन्वयें रवानगी व्हावी. मी इकडून वारंवार पत्रें लिहितों. तथापि स्वामींकडून पुरवणी जाहल्यास माझे लिहिण्यास दृढीकरण होईल. यास्तव सूचनार्थ विनंति लिहिली असे. उत्तराची आज्ञा जाली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १२४.

पै॥ चंद्र १६ जमादिलाखर सन सीत. **श्री.** २६ मार्च इ. स. १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– श्रीमंत राजश्री पंत प्रधान रावसाहेब स्वामी यांसी राजश्री महादजी शिंदे पाटीलबावांनीं नजर पाठविली. राघोजी जामदार त्याजबराबर. ते बाईचे भेटीस आले होते. त्यांची जबानी हत्ती नग एक व घोडे उत्तम रास २ व जवाहीर फार चांगलें व तपेली सोन्याची वर जडाव केला अशी. आपत दोन व तरवारा व बंदुखा, वस्त्रें बहुत सुंदर याप्रमाणें पाठविलें. ते येथून चंद्र १५ जमादिलावलीस देशास गेले. राजश्री रामजी पाटील, राघोगडचा बंदोबस्त करून, ठाणें ठेऊन, खर्चास घेऊन पाटीलबावांकडे गेले. पातशाहा व पाटीलबावा जयपुरानजीक आहेत. जयपूरचा प्रांत गढ्या वगैरे लुटून फस्त केल्या आहेत. दारमदार सलुखाचा आहे. मग काय घडेल तें न कळे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना".

---

## लेखांक १२५.

पै॥ चंद्र १६ जमादिलाखर सन सीत. **श्री.** २६ मार्च इ. स. १७८६.

श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसींः—

"विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ५ माहे जमादिलावलचीं विनंतिपत्रें व बाईच्या पत्राचें उत्तर घेऊन सदरहू सेवेसीं रवाना केलीं. त्याज अलीकडील वर्तमानः– ऐवजाविषयीं स्मरण देत होतों. त्यावरून सांप्रत बाईनीं राजश्री गणपतराव विष्णु गद्रे यांजकडील गुमास्ते येथें आहेत, त्यांस बोलावून त्यांजपासून दोन लक्षांच्या हुंड्या लिहून घेतल्या, व राजश्री सुभेदार व राजश्री यशवंतराव गंगाधर व राजश्री नारो गणेश यांस पत्रें लिहून कासीदजोडी रवाना केली. मजला सांगितलें कीं, तुह्मीं आपली जोडी रवाना करणें. मीं उत्तर केलें कीं, आपण एक पत्र लिहून द्यावें ह्मणजे उत्तम. त्यास बाई बोलली कीं, आमचीं पत्रें परभारां जात आहेत. तुह्मीं पत्रें लिहून पाठवावीं कीं, हुंड्या दोन लक्षांच्या करून पाठविल्या आहेत, त्या पावतील. याप्रमाणें उत्तर जालें. परभारें शोध घेतांना ठिकाण लागलें. हुंड्या गणपतराव विष्णु यांचे अनुमतें नाहींत. गुमास्ते येथें आहेत, त्यांनींच हुंड्या लिहून दिधल्या. त्याप्रमाणें त्यांनीं कबूल केल्यास उत्तम. तथापि गुमास्त्याचा

धनी विकला जात आहे. मान्य करितील. हुंड्या लष्करच्या लिहून दिल्या नाहींत. पुणेंखातें लिहून दिल्या. याप्रमाणें ऐकिलें वर्तमान सेवेसीं लिहिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १२६.

पौ चंद्र २ रजब सन सीत चैत्र. श्री. ५ एप्रिल इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–छ १ जमादिलावलचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ३ जमादिलाखरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री तुकोजी होळकर स्वारीबरोबर फौजसुद्धां आहेत; त्यांजकडील फौजेच्या खर्चाचा मजकूर लिहून पूर्वीं गंगाजलनिर्मळ अहल्याबाई यांस पत्रें पाठविलीं आहेत; त्यांपैकीं पांच लक्ष रुपये आले, बाकी ऐवज अद्याप येत नाहीं. येविषयीं बाईस अलाहिदा पत्र लिहून पाठविलें. पत्र तुह्मीं देऊन, पत्रान्वयें मजकूर बोलून, उत्तर होईल तें लिहून पाठविणें. वरचेवर ऐवजाचे रवानगीविषयीं स्मरण करून रवानगी होय असें करणें. टिपूची मसलत भारी, हें लोपलें नाहीं. राजश्री सुभेदारांनींही सरकारांतून सांगितल्यावरून फौज वगैरे सरंजाम बरा केला. त्याचा खर्च चालून नांवलौकिकाप्रमाणें काम जाहलें पाहिजे. त्यास, ऐवजाची सरबरा जरूर करून पाठवावी. येविषयीं तुह्मीं बोलून ऐवज रवाना होय तें करावें. अशी मसलत वारंवार होत नाहीं ह्मणून आज्ञा. त्यावरून बाईचें पत्र बाईस दिलें. पत्र अक्षरशः वाचून दाखविलें व एक दोघे मुत्सद्दी होते. विशेष कोणी नव्हते. चंद्र १३ जमादिलाखरीं रात्रीस पत्रें दाखविलीं. माझे पत्राचे अन्वयें विनंति केली व सरकारचे पत्रीं सर्व अर्थ लिहिले होते. सांप्रत पत्रावरून मर्जी प्रसन्नच आहे. त्यास बाईनीं उत्तर हेंच केलें कीं, ज्या अर्थीं मसलत भारी आणि सरदारकी मोठी, नांवलौकिक होऊन सरकारचाकरी घडावी हीच इच्छा, त्याप्रमाणें तूर्त दोन लक्ष रुपये रवाना केले. त्यांची हुंडी पुण्याची पाठविली. त्यास कमपेष पंधरा दिवस होत आले. हा ऐवज पाऊन उत्तर आल्यावर पुढें छावणीचे दिवस समीपच आले आहेत, त्या समयीं इकडून कांहीं गुंता पडणार नाहीं. याप्रमाणें बोलणें जालें. बाईनीं पत्राचीं उत्तरें लिहून दिधलीं आहेत. तीं सेवेसीं रवाना केलीं असत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १२७.

श्री. ५ एप्रील इ. स. १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री पाटीलबावांचा मुक्काम लालसोट येथें आहे. तिकडील वर्तमान, हिंमतबहाद्दर गोसावी याजवर फौजेची चौकी होती, त्यास तो आपले जमावानिशीं निघून डंघईत गेला; व इंग्रजांचा वकील राजश्री पाटीलबावांस न पुसतां उठून लखनऊस गेला. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. राजश्री कृष्णाजीपंत भावे व पांडुरंग रघुनाथ व गंगाजी हुजरे असें येथें छ ६ जमादिलाखर गुरुवारीं आलें. रामनवमी व दशमी दोन मुक्काम आहेत. बाईची भेट, उत्साहाचे गडबड याजकरितां जाहली नाहीं. भेटी जाहल्यावर वर्तमान होईल तसें सेवेसीं लिहीन. त्यांनीं एक पत्र दिलें तें पाठविलें. सेवेसीं पावेल. पुढें राजश्री पाटीलबावांकडे जातात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १२८.

पैवस्ती चंद्र साबान.
येथून जोडी गेली त्याबरोबर आले.

श्री. ८ मे इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचें सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र २९ जमादिलाखरचें पत्र सादर जालें, तें चंद्र ४ रजबीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, चंद्र २४ रविलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सर्व कळला. याप्रमाणें पुढें होत जाईल तें लिहित जाणें ह्मणून आज्ञा, व ऐवजाचे रवानगीविषयीं बाईस बोलला त्याचें उत्तर, साल मजकुराचा ऐवज जाला तो दिला, तूर्त एक पैसा मिळत नाहीं, पेस्तर सालावर गोष्ट टाकिली ह्मणून लिहिलें. त्यास हें बोलणें चांगलें कीं काय? माळव्यांतील वगैरे महालचे पांच लाख रुपये जमा कीं काय, हें बोलणें कसें ठीक दिसतें? राजश्री सुभेदार मातबर, फौज जमा करून सरकारआज्ञेवरून तयार जाले, बराबर आले. हल्लीं स्वतंत्र कितुराकडे टिपूची फौज होती, त्याजवर गेले आहेत. पुढें छावणीचे दिवस आले. तेव्हां छावणी करणें प्राप्त. फौजेचा खर्च चालून सरदारीचा नक्ष राहिला पाहिजे. पांच लाख रुपये बाईनीं पाठविले, त्यास, फौज पंधरा हजार, शिवाय गाडदी व तोफा यांस दरमहा खर्च किती लागतो? पांच लाख रुपये किती दिवस पुरतील? याजकरितां बाईनीं कसेंही करून बाकीचा ऐवज पाठवावा ह्मणून बाईस व तुह्मांस दोन पत्रें लिहून पाठविलीं

आहेत. तीं पावलींच असतील. त्याप्रमाणें बाईशीं बोलून ऐवजाची रवानगी लवकर करवावी. सरदारींत खर्चाचा गवगवा जाहल्यानें नक्ष कसा राहील, याचा विचार बाईनीं पुर्तेपणें मनांत आणावा, आणि ऐवजाची रवानगी करावी हें चांगलें. विलंबालाखालीं टाकूं नये. याप्रमाणें तुह्मीं बोलावें. या समयीं मोबदला घेऊन ऐवजाची रवानगी लवकर होय तें करावें. समय रक्षावा हें चांगलें. सुभेदारांनीं अठरा हजार फौज ठेविली. स्वतंत्र टिपूची फौज कितुराकडे होती त्यावर गेले. हे जातांच, ती फौज पंधरा वीस कोस मागें सरून झाडीचे आश्रयानें गेली. हे पाठीमागून त्यावर गेले. ही बातमी परस्परें बाईकडेही जातच असेल. आह्मीं नबाबासुद्धां कपटसंगमास कृष्णा उतरून दक्षिणतीरास आलों. टिपूही भारी सरंजामानिशीं येत आहे. श्रीमंतांचे प्रतापें घडेल तें लिहून पाठवूं ह्मणून आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें पत्रार्थ अक्षरशा दोन तीन दिवस बाईस सांगत गेलों व मुत्सद्दी राजश्री मुकुंदराव हरी व बाळाजी कृष्ण व विनायक बाजी त्रिवर्ग व मातुश्री व पांच मंत्री याप्रमाणें चंद्र ७ रजब शनिवारीं एकांत-समयीं घाट घालून वर्तमान पत्राचें निवेदिलें. त्याचें उत्तर म्यां कसें लिहावें? तें आपण सांगितलें तसें लिहीन. त्यावरून बाईचे समक्ष उत्तर द्यावयास सांगितलें कीं, तूर्त दोन लक्ष रुपये पाठविले ते पावलेच आहेत. त्याचा जाब येईल. छावणीचा मजकूर समजला. तर पेस्तर सालचे ऐवजीं ऐवज घेऊन रवाना करूं. मीं उत्तर दिलें कीं, छावणीचे दिवस दूर कोठें? एक मास मृग लागावयास आहे. त्यांतही पत्रें जातात. तोंवर मृग लागलाच जाणावा. ऐवज मोबदला करून समय रक्षावा हें विहित. परंतु त्यांचीं बोलणीं जीं आहेत तींच. कोणाचें कर्ज घेऊन ऐवज मोबदला करून माळव्यांतील महालचा ऐवज पांच लक्ष कीं काय ह्मणून त्यास सुचविलें. त्याचें उत्तर कीं वारंवार काय सांगावें? अखंड ताळेबंद जातात. राजश्री दादाजी गंगाधर दाखवितात. ऐवज असून ठेवीत नाहींत. सरदारी खर्च व नक्ष ठेवणें श्रीमंतांकडे आहे. याप्रमाणें जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें असे. सरकारचे आज्ञेवरून वारंवार त्यांस स्मरण देत आहें. करणें त्यांची आकत्यारी आहे. पूर्वीं दोन लक्षांच्या हुंड्या पाठविल्या, त्या पावल्या असतील. त्याचें उत्तर आल्यावर आणीक ऐवज रवाना होईल, असें आहे. यावर दिवसगत काय लावितील हें कळेना. राजश्री बाबुराव रायदुर्गकर यांचा मजकूर आलादा पुरवणींत लिहिला आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.”

---

पै॥ चंद्र २५ साबान — लेखांक १२९.

सबा समानीन ज्येष्ठ मास. — श्री. — २ जून इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:- चंद्र १५ जमादिलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २६ रजबीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री यशवंतराव गंगाधर यांजकडे हुंड्या दोन लक्षांच्या आल्या, त्या येथें लष्करांत हुंड्या आल्यावर ऐवज लिहिल्याप्रमाणें घेतला जाईल व पत्राचीं उत्तरें दिलीं जातील. बाकी ऐवज राहिला, त्याविषयीं दोन पत्रें बाईस व तुह्मांस लिहून पाठविलीं आहेत, तीं पावलीं असतील. त्याप्रमाणें बाईशीं बोलून बाकीचे ऐवजाची तरतूद करून, लवकर रवानगी होय असें करावें, व इकडील वर्तमान, आह्मी नबाबासुद्धां बदामी नजीक आलों. पुढें बदामी वगैरे किल्ले घ्यावयाचा मजकूर आहे. राजश्री सुभेदार कितुराकडे आहेत. कितूर तालुक्यांत दरोबस्त ठाणीं बसविलीं. कितुरास मोर्चे बसविले असेत. लवकरच येईल. टिपू पट्टणांत आहे. लवकर निघणार. कांहीं फौजा पुढें रवाना केल्या आहेत. अशी बातमी आली. पुढें होईल तें लिहून पाठवूं. सुभेदार मसलतीवर आहेत व फौज भारी आहे. याजकरितां बाईशीं तुह्मीं लिहिल्यान्वयें बोलून, खर्चाची सरबरा लवकर करीत असें करावें ह्मणून आज्ञा. ऐसीयासी स्वामीकडून पत्रें परभारें बाईस आलीं. माझे नांवाचीं पत्रें पेशजीं आलीं तींच पावलीं, व राजश्री सुभेदाराचीं पत्रें वरचेवर येतात. ऐवजाची निकड वारंवार पत्रीं लिहितच आहेत, हें वर्तमान परस्परें येथें ऐकिलें. मसलतीवर आहेत हें पुरतेपणें समजलें आहे. अखंड विनंति प्रसंगानुरूप मी करीतच आहें. येथील विचार दर पत्रीं विनंति लिहित आहें. सांप्रत यांचा विचार कीं, छावणीच जाली तर ऐवज रवाना करावा. तूर्त ऐवज घेऊन पाठविला, त्याची भरती सावकाराची जाहली. कांहीं राहिली, ती करून पुढें लवकरच रवानगी करूं, असें ह्मणतात. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें, वरचेवर ऐवजासाठीं सांप्रत दोन चार आलीं आहेत. त्याचीं उत्तरेंही त्यांस गेलीं. आपणांकडील पत्रांचीं उत्तरें परभारें पाठविलीं आहेत, त्यांवरून श्रुत होईल. सांप्रत माझे नांवें चंद्र १५ जमादिलाखरचें पत्र सादर जालें, त्या पत्राचा अर्थ बाईस श्रवण करविला. ऐवजाचे रवानगीविषयीं समक्ष सूचना केली आहे. ह्मणतात कीं, आह्मी त्या विचारांत आहोंत. उत्तरें येथून रवाना केलीं आहेत. ऐवज छावणीचे सुमारास पाठवूं. चिंता नाहीं. याप्रमाणें बोललीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

पै। चंद्र १० रमजान

## लेखांक १३०.

सबा समानीन. **श्री.** २३ जून इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २६ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र ६ साबानचीं पत्रें सेवेसीं लिहून रवाना केलीं, तीं पावलीं असतील. सांप्रत राजश्री सुभेदार यांचीं पत्रें लष्करांतून आलीं. लिहिलें होतें कीं, श्रीमंत राजश्री नाना बदामीचा किल्ला घेऊन, वरकड फौजा येथें छावणीस ठेऊन, आपण स्वार होऊन पुण्यास गेले. आह्मी येथें छावणीस राहिलों. खर्चाची तजवीज लौकर करून पाठवावी, व तोफा दहा शेर वजनी गोळ्याच्या, चार पांच आह्मांकडे रवाना कराव्या. कृष्णेपारचा मुलूख कुल लुटून फस्त केला. जमीयत भारी आहे. दुसरें, छावणीचा प्रकार, त्यास खर्चाची तारांबळ न होय तें करावें. याप्रमाणें बाईस पत्रें त्यांचीं आलीं. त्यावरून कळलें कीं, स्वामी पुण्यास आले, किल्ला बदामीचा हस्तगत जाला, फार काम जाहलें. शत्रू स्थळ सोडून आला नाहीं. त्याचा पराजयच आहे. श्रीमारुतीचा दृष्टांत जाहला, तो खरा आहे. येथें तेलंग ब्राह्मण कित्येक येतात. वर्तमान सांगतात कीं, टिपूचे घरांत फितूर फार आहे. सरकारच्या फौजा श्रीरंगपट्टणापावेतों गेल्या, तरी तो बाहेरी निघत नाहीं. रायदुर्ग व चितलदुर्ग, हरपणहल्ळी या संस्थानचा भेदी येथें आहे. त्याविषयीं पूर्वींच विनंति लिहिली होती. रायदुर्गप्रांतीं त्याची माहीतगिरी वगैरे फार आहे. लष्करांत आल्यास तेथील संस्थानांचा बंदोबस्त करून देईन ह्मणतो. पूर्वीं राजश्री परशरामपंतभाऊस एक वेळ भेटला. त्यांची मर्जी न पाहिली. मग उठोन इकडे श्रीकाशीस जावयास आला. तो चार मास येथें राहिला. त्याचें वर्तमान पेशजीं लिहिलें आहे. आज्ञा आलियासारखें त्यासीं बोलोन त्याची रवानगी करूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३१.

पै॥ चंद्र २४ रमजान सबा. **श्री.** २९ जून इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र १० रजबचें आज्ञापत्र एक माझे नांवें व एक बाईचे नांवें, एकूण दोन पत्रें कासीद-

जोड्यांजवळ देववून रवाना केलीं. त्याच जोडीजवळ चंद्र २५ रजबचीं आज्ञापत्रें दोन, एक माझे नांवें व एक बाईस, किल्याचा मजकूर लिहून रवाना केलीं. तीं पत्रें परभारें जोडीदार यांनीं बाईकडे दिधलीं. त्याचा मजकूर त्यांणीं उत्तरीं लिहून दिधला. चंद्र १० रजबचे पत्रीं खर्चाचे विषयीं आज्ञा होती कीं, १० लक्षांपैकीं सात लक्ष पावले, बाकीचे तीन लक्ष राहिले, त्याची रवानगी करावी; व पुढें सन सबाचे ऐवजीं तरतूद करून, वरचेवर छावणीचे उपयोगीं ऐवजाची रवानगी करवीत जावी. वारंवार स्मरण देऊन ऐवज समयासे पावेसें करावें. छावणीचे दिवस, त्या वेळेस बाईकडून गुंता पडावयाचा नाहीं; ह्मणून तुह्मांशीं भाषण जालें आहे. तर वरचेवर स्मरण करून लिहिल्यान्वयें ऐवजाची रवानगी होय असें करणें, ह्मणून आज्ञा. त्यावरून बाईशीं बोलणें जालें. बहुत प्रकारें पहिलेसारखी वर्तणूक आतां नाहीं. 'मी कोठून देऊं? मजपाशीं काय आहे?' हीं भाषणें सांप्रत नाहींत. तीन लक्ष रुपये राहिले, त्यांची रवानगी करितात. परंतु सन सबाचे ऐवजीं त्यांचें बोलणें आहे. मीं उत्तर दिलें कीं, सीत समानीनचे सालापैकींच तीन बाकी आहेत, व सन सबा, एकूण ऐवजाची तरतूद करून छावणीस पोहचेसें आपण करावें. यावर त्यांनीं उत्तर लिहून दिलें. त्यांतील अर्थ, सालमजकूरचे ऐवजीं तीन लक्ष राहिले, ते रुपये रवाना करूं. आह्मी वारंवार झाडे वगैरे समजावीत असतां, मागतीं मागील ऐवज राहिला, त्याजविषयीं लिहिलीं येतात हें काय? आंत बाहेर कूस राखून आह्मी वर्तणूक करीत नाहीं. याप्रमाणें उत्तरें दिधलीं आहेत. आह्मी विनंति करीतच आहों. त्यांचें ह्मणणें तसें आहे. पुढें घडेल तें खरें. किल्याचें वर्तमान ऐकल्यानंतर बहुत संतोष पावली. सरकारचा नक्ष जाला. येणेंकडून सर्वांस आनंद आहे. छावणीचे दिवस, छावणी कोणें स्थळीं नेमिली? कृष्णेपार छावणी जालीयास फार चांगलें. फार करून कृष्णेपारच होईल. शत्रूचें संधान राखून किल्याचे सन्निध छावणी जालीयास ठीक आहे. टिपूकडील बातमी वरचेवर असावी. त्याजकडील बातमी, येथें तेलंग लोक येतात, ते सांगतात कीं, हा कालवर पट्टणांत आहे. पुढें आला गेला नाहीं. बरसात सुरू जाली ह्मणजे पायदळ घेऊन निघणार, असें सांगतात. महाराजांनीं ती बातमी राखली असेल. धारवाड सरकारांत आली असे जनवदंता आहे. श्रीकृपेंकरून सरकारचा नक्षच होईल. शत्रूचें पारिपत्य यथास्थित घडेल. वरकड आमचे खर्चाविषयीं पूर्वीं विनंति लिहिली होती. आज्ञा जाली नाहीं. कर्ज लोकांचें फार जालें आहे. तेथें राजश्री कृष्णाजी भैरव थत्ते यांचें देणें व येथें देणें जालें आहे. यावर खावंद स्वामी कृपा करून जसें ठेवतील तसें राहूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती छ २७ सव्वाल सन सीत समानीन.

## लेखांक १३२.

श्री.

१६ आगष्ट इ. स. १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ माहे सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—आनंदीबाई निंबाळकरीण देशीं जात होती. राजश्री पाटीलबावांपासून निरोप घेऊन ग्वालेरीपावेतों आली. तेथें शरीरास समाधान नव्हतें. त्यावरून तेथेंच मृत्यु पावली. ह्मणून वर्तमान आलें. व पादशाहा रमजानचे इदीकरितां दिल्लीस गेले ह्मणून ऐकिलें. ते सेवेसीं लिहिलें असे. राघोगड हा कालवर हस्तगत जाला नाहीं. राजश्री लक्ष्मणराव कृष्ण परांजपे यांजविषयीं विनंति लिहिली होती. त्यांचें मानस कीं भोपाळ संस्थान बहुत खराब आहे; तेथील बंदोबस्त जाला तर सरकारकिफायत चांगलीच आहे. याविषयीं मजला आज्ञा आली, तर सेवेसीं येऊन तेथील वर्तमान किफायतीचें वगैरे निवेदन करीन, ह्मणून सांगतात. त्यावरून सेवेसीं लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३३.

पै॥ चंद्र ३ जिल्हेज सबा संमानीन.

श्री.

९ सप्टेंबर इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १६ माहे जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेषः—चंद्र १७ रमजानचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ११ जिलकाद भोमवारीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, कर्नाटक प्रांतींचे ब्राह्मण आहेत, परंतु एकाच्यानें कांहीं होत नाहीं. राजश्री हरीपंत तात्यांकडे संधानें येतात. ते समजून करणें तें करितील. व वाईचे पत्रांचीं उत्तरें जालीं ह्मणजे रवाना करणें, व ऐवजाची रवानगी लवकर करावी ह्मणून पत्रीं आज्ञा जाली. त्यास, कर्नाटक प्रांतींचा बोलणार ब्राह्मण त्यास निरोप दिला. व बाईच्या पत्राचीं उत्तरें घेऊन बीरम कासद दि॥ कृपाराम मिर्धा यांजसमागमें पाठविलीं आहेत. त्याजबरावर विनंतिपत्रें मीं आपलीं लिहिलीं आहेत. तीं चंद्र २७ रमजानीं सेवेसीं येथून रवाना केलीं असेत. ऐवजाची निकड बाईस करीतच आहें. श्रावणमासाकरितां विलंब लागला. येथें हुंडणावळ फार पडती, ह्मणून राजश्री दादाजी गंगाधर यांस बाईनीं पत्रें पाठविलीं कीं, येथून रोकडा ऐवज रवाना करूं. पुण्यांत ऐवज पावल्यावर, राजश्री सुभेदार यांनीं

स्वार व उंटें पाठवून ऐवज घेऊन जावा. याप्रमाणें पत्रें राजश्री सुभेदार यांजकडे व त्यांजकडे गेलीं आहेत. ऐवज रोकडा जमा करितात. मध्यें सप्ता आरंभिला, त्यामुळें जाबसाल जाला नाहीं. आतां रवानगी करितात. नित्य वरचेवर स्मरण देत आहें. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें श्रावण वद्य ११ स आलीं. पत्रीं बहुत खर्चाची निकड बाईस लिहिली होती, व आदवानीचा किल्ला टिपूनें माघारा घेतला; तेथें ठाणें ठेऊन टिपू फिरून गेला. जातांना हंपी विरुपाक्ष यास तैलादिक वस्त्रें लावून अग्नीचा उपद्रव दिला ह्मणून लिहिलें होतें, व महागाई फार आहे. वैरण मिळत नाहीं. लोकांची अडचण खर्चाची फार आहे. त्यांवरून वडिलांस लिहिलें आहे. तर ऐवज लवकर रवाना करावा. व पूर्वीं तुह्मीं दोन लक्ष रुपये पाठविले, त्यांपैकीं आह्मांस एक लक्ष पावले, दोन लक्ष पावले नाहींत. तर राजश्री गणपतराव गद्रे यांस पत्र पाठवावें. याप्रकारें सुभेदारांचीं पत्रें आलीं. त्यावरून बाईनीं राजश्री गणपतराव गद्रे यांचे गुमास्ते राजश्री बाळाजी रावजी यांस बोलावून ताकीद केली कीं, दोन लक्ष रुपये त्यांपैकीं चिरंजीव तुकबास एक लक्ष रुपये पावले, बाकीचे पावले नाहींत; तर गणपतराव यांस लिहून उत्तर आणवणें. त्यावरून गुमास्ते यांनीं राजश्री गणपतराव गद्रे यांस पत्रें पाठविलीं आहेत. बाई मजला ह्मणत होती कीं, सरकारचें उत्तर दोन लक्ष रुपये पावल्याचें आलें; राजश्री सुभेदाराचें उत्तर आलें नाहीं. त्यावरून मीं त्यांस उत्तर दिलें कीं, तुह्मांकडून ऐवज समयास पोहोंचत नाहीं. सरदार मोहीमशीर, त्यामुळें सावकाराचा ऐवज मोबदला जाला असेल तर न कळे. येविषयीं सेवेसीं पत्रें कालच बाईनीं पाठविलीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.”

---

## लेखांक १३४.

पैवस्ती चंद्र १४ जिल्हेज सबा संमानीन.

श्री.

११ सप्टेंबर इ.स. १७८६.

“श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः– विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ माहे जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथून चंद्र १९ जिलकादीं विनंतिपत्रें लिहून सरकारची जोडी कासदाची सेवेसीं रवाना केली आहे. हुंड्या दोन लक्ष रुपयांच्या व पत्रें लिहून राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे बाईनीं पाठविलीं, हें वर्तमान जोडीसमागमें सेवेसीं लिहिलें आहे. सांप्रत राजश्री पांडुरंग राम चांभारगोंदेकर, राजश्री पाटीलबावांकडून राजश्री सुभेदार यांजकडेस वकिलीस होते, त्यांजला पत्र पाटीलबावांनीं पाठविलें कीं, तुह्मी तेथें आपले

तर्फेचा कारकून ठेऊन, आह्मांपाशीं येणें. त्यावरून राजश्री पांडुरंग राम यांनीं राजश्री सुभेदारांजवळ आपले निसबतीचा कारकून ठेऊन मशारनिल्हे येथें आले. बाईची भेट जाली. खलबत जालें. सालगुदस्तां स्वारी पुण्याहून निघून पुन्हां मुक्कामीं स्वारी येई तोंवर त्यास माहीतगिरी, व मोंगलांचा व सरकारचा तट पडला; पुढें आदवानी टिपूनें घेतली; यावर मोंगल शरण जाला; हें वर्तमान बाईजवळ निवेदन केलें. त्यास कच्चें वर्तमान ठाऊक कोठून? परंतु ऐकिल्या गोष्टी सांगत होते. त्यांजबरोबर राजश्री दादाजी गंगाधर यांनीं सांगून पाठविलें होतें कीं, रामपुऱ्याची मामलत राजश्री गणपतराव विष्णू यांजकडे सांगावी; त्यांचा कारकून हिशेबास पाठवावा; यांत श्रीमंताची मर्जी राहते. असा बाईस त्यांनीं निरोप सांगितला. त्यावरून बाईनीं त्यांस उत्तर केलें कीं, रामपुरा तीन वर्षें त्यांस करार करून दिला आहे, तो काढीत नाहीं. पाहिजे तर गद्यांनीं टोंकेची मामलत करावी. याप्रमाणें पाडुरंग राम यांनीं राजश्री दादाजी गंगाधर यांचे नांवें बाईचें पत्र घेऊन, काल चंद्र २५ जिलकादीं स्वार होऊन राजश्री पाटीलबावांकडे गेले. पत्र राजश्री दादाजीकडे त्यांनीं पाठविलें आहे. दुसरें वर्तमान, राजश्री पाटीलबावांनीं, आनंदीबाई निंबाळकरीण मृत्यु पावली, तिचे जहागिरीचे बंदोबस्ताविषयीं नबाबास लिहिलें व खिजमतगार पाठविले होते. त्याप्रमाणें नबाबांनीं जहागिरीचा बंदोबस्त करून देऊन, खिजमतगार रवाना केले. तेही याच मार्गें येऊन, बाईस भेटून हें वर्तमान सांगितलें. नबाबांनीं वस्त्रें व जवाहीर राजश्री पाटीलबावांस दिधलीं, तीं सांगितलीं; दाखविलीं नाहींत. जबानीं सांगत होते. खिजमतगार राजश्री पाटीलबावांकडे गेले. पूर्वीं सेवेसीं जुनागडकर दुलभजी मेहेता व गोविंदजी मेहेता यांचा मजकूर लिहिला होता. त्यांजकडील ब्राह्मण येथें आहे. त्याच्या उत्तराची प्रतीक्षा आहे. त्याचें बोलणें कीं, सरकारकिफायत करूं. त्याचप्रमाणें सावकारी निशा हुजूर येऊन करून देऊं, याप्रमाणें बोलतात. आज्ञा आल्यावर त्यास निरोप द्यावयाचा जाहला तर देऊं. तिकडील बंदोबस्ताचा व नवा मुलूख घेऊन द्यावा; करार प्रतिज्ञापुरस्कर करितात. यास मध्यस्त जामीन, सावकारी हमी देऊं ह्मणतात. बंदरें वगैरे सरकारांत घेऊन देऊं. गायकवाड मध्यें मारून खातात; सरकारची नुकसानी करितात; मुलखाची आबदानी करूं देत नाहींत. त्याचा जिमा करितात, असें बोलत आहेत. ह्मणून सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३५.

श्री. १४ आक्टोबर इ. स. १७८६.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ माहे जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र ६ जिल्हेजचीं विनंतीपत्रें लिहून रवाना केलीं, त्याचे जाब आले नाहींत. हुंड्या राजश्री दादाजी गंगाधर यांचे विद्यमानच्या पावल्या असतील, व पत्राचीं उत्तरें बाईनीं त्यांजकडेच पाठविलीं, तीं पावतील. पुढें ऐवजाविषयीं स्मरण देतच आहें. त्यांचें बोलणें कीं तीन लक्षांचा ऐवज पाठविला, तो पावून त्याचें उत्तर आल्यावर पुढें दुसरी रवानगी करूं. पूर्वीं हुंड्या पाठविल्या, त्यांत बंधी मुदत दिन ४१ दिवसांची आहे. हुंड्या सही करून सावकारापासून घ्याव्या. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३६.

पौ॥ चंद्र ३० मोहोरम सनसबा संमानीन मार्गशीर्ष मास.

श्री. ७ नोव्हेंबर इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ माहे मोहोरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–तीन जोड्या कासिदांच्या येथील तैनातीपैकीं हुजूर आहेत. येथें एक जोडी आहे. तेथील तीन जोड्या रोजमुऱ्याकरितां राहिल्या, ह्मणून फार दिवस लागले. आज्ञापत्र आलें नाहीं, हेही चिंता फार असे. येथील खर्चाविषयीं वारंवार विनंति लिहित गेलों ह्मणून आज्ञापत्र सादर जालें नाहीं. त्यास आमचे खर्चाची वोढ किती? येथें हर कोणाचें कर्ज घेऊं? परंतु व्याज चढतें. त्या अंदेशाकरितां वारंवार विनंति लिहितों. सारांश, सरकारचा बोलबाला व्हावा हीच इच्छा धरून, श्रीसन्निध निरंतर अभीष्टचिंतनींच आहे. सांप्रत कार्तिक मार्गशीर्ष दोन मास शत्रूंची दिवस कांहीं एक वृद्धि दिसून, पुन्हां पौष्यमासीं पराजय होऊन, उपर सरकारचा व्हावा असें आहे. येथें रेवातीरीं दुसरा उद्योग किमपि नाहीं. ज्याजपाशीं ठेविलें, तेथें एक वेळ त्रितीय प्रहरीं मात्र दोन घटका जावें; मग संपूर्ण दिवस श्रीजवळ अभीष्टचिंतनींच असतो. स्वल्प कालेंच शत्रूचें पारिपत्य घडेल, याविषयीं संशय नाहीं. राजश्री कृष्णाजी नाईक थत्ते यांचें देणें एकतीसशेंपावेतों, त्याचें व्याज शिवाय. येथेंही देणें जालें आहे. यास्तव लिहितों. नेमणुकीशिवाय खर्च जास्त नाहीं. येथील शाईरशिरस्त्याप्रमाणें खर्चास येत आहे. उपाय नाहीं? मुख्य गोष्ट, सरकारची फत्ते जालियास आमचें दरिद्र दूर करावयास महाराजास अगाध काय आहे? सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३७.

श्री. ७ नोव्हेंबर इ. स. १७८६.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ माहे मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथून विनंतिपत्रें सेवेसीं रवाना केलीं, चंद्र १९ जिलकादचीं, तीं पावलीं असतील. सांप्रत आज्ञापत्र सादर जालें नाहीं. त्यावरून चिंता प्राप्त जाली आहे. इकडे लष्करचीं पत्रें राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचीं आलीं, तीं आश्विन शु॥ १३ चीं होतीं. त्यां पत्रीं वर्तमान कीं, आश्विन शु॥ ८ शनिवारीं लढाई मातबर टिपूकडील फौजेशीं पांच प्रहर जाली. राजश्री बापूजी होळकर यांनीं शर्त फार केली. त्यामुळें सर्व निघून दोन कोस माघारे आले. त्याजकडील फौज स्वार १८ हजारपावेतों आहेत, व पायदळ साठ हजारपावेतों. शिवाय बाण व तोफा सरंजाम भारी. तीन सरदार करून, फौज तिघांबरोबर सारखी देऊन लढाईस आले आहेत व खांसा बराबर आहे. छापा आश्विन शुद्ध ७ मीस शुक्रवारचे रात्रींस येत होता. त्याची बातमी राजश्री तात्यांस कळल्यावर, सावधतेनें फौज सिद्ध करून सन्मुख गेले. तों दिवस उगवला. दुसरे दिवशीं शनिवारीं पांच प्रहरपावेतों युद्धप्रसंग जाला. उभयतां समतोल राहिले. याप्रमाणें इकडे वर्तमान आलें, तें सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३८.

श्री. २३ नोव्हेंबर इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १ माहे सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र १० मोहरमीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. त्याअलीकडील वर्तमानः— राजश्री पाटीलबावांनीं मथुरेपासून दोन कोसांचें कूच केलें. रामगडाकडे शह दिला आहे. राजश्री माधवराव गंगाधर यांची दिवाणगिरी दूर करून राजश्री राघो मल्हार यांस सांगावी असा इत्यर्थ ठरून, राजश्री पांडुरंग नाईक हमीदार जाले होते. त्यास पांडुरंग नाईक मृत्यु पावले ह्मणून तो जाबसाल तसाच राहून, राजश्री माधवराव गंगाधर यांस ऐवज मागूं लागले. त्यांनीं साफ उत्तर दिलें कीं, म्यां सेवा करावी. चार रुपये द्यावयास अनकूळ पडत नाहीं." त्यावरून तूर्त मोघमच आहे. पुढें कोणास काम सांगतील तें न कळे. इतकें ऐकिलें. वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. कलम १.

राजश्री त्रिंबक अनंत गोडबोले, श्रीमहायात्रेस जावयानिमित्य महेश्वरास कार्तिक वद्य १३ आले. ते दिवशींच बाईचा बंधू एक उरला होता, तो मृत्यु पावला. त्याजकरितां ते दिवशीं भेट जाली नाहीं. तीन दिवस गेल्यानंतर मार्गशीर्ष शु॥ १ भेट जाली. मीच दर्शनास घेऊन गेलों. एक पातळचोळी देऊन भेट केली. उभयतांचें भाषण उत्तम पारमार्थिक जालें. स्तव परस्परें होऊन बिऱ्हाडास गेले. ते तदनंतर ते दिवशींच, बाई त्यांस शिधा व सामान देऊं लागली, परंतु त्यांनीं घेतलें नाहीं. समागमें इतर लोक होते, त्यांचा शिधा सुमार वीस माणसें व घोडीं दोन परभारें त्यांचा दाणा चारा घेतला. कलम १.

राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांनीं, तोफेचे गोळे व दारू वगैरे सामान रामपुऱ्यास करविलें होतें, तें तयार होऊन छकडे भरून येथें आलें. येथून बाईनीं त्यांजकडे रवाना केलें, व पेंढारी यांनीं इकडे उपद्रव फार दिला, त्याजकरितां राजश्री सुभेदार यांनीं, पत्रें पेंढारी यांस व बापूजी होळकर यांस पाठविलीं कीं, देशीं लवकर येणें. ह्मणून मुजरद शरीफभाई आले, व पत्रें आलीं. राजश्री संताजी होळकर येथें आले आहेत. बाईचे भेटीस्तव आले. बाईचा बंधू वडील एक राहिला होता, तो येथें आणिला होता. तो मृत्यु पावला. दोन चार दिवस श्रमीच होती. आतां स्वस्थ आहेत. कलम १.

पादशाहा दिल्लीहून बाहेर निघून डेरेदाखल जाले. इरादा रामगड हा कालवर सरकारांत दिला नाहीं ह्मणून निघाले. त्यांचा शह रामगडावरच आहे. कलम १.

राजश्री त्रिंबक अनंत गोडबोले यांजसमागमें सरकारचीं पत्रें बाईचे नांवें होतीं, तीं बाईस दिधलीं. मशारनिल्हेस तों उज्जनीस कांहींएक दिवस रहावयाचें आहे. येथून जातील तेव्हां बरोबर स्वार प्यादे देऊन उज्जनीस पावते करवितों. मशानिल्हेनीं स्वामींचे नांवें पत्र दिलें, तें बजिन्नस पाठविलें आहे. कलम १.

सदरहू कलमें पांच सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १३९.

श्री. ३ दिसेंबर इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:-चंद्र २० मोहरमचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २ सफरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं,

'बाईस सांगून, पूर्वीं लिहिलें आहे त्याप्रमाणें ऐवजाचा भरणा लवकर व्हावा. मोहिमेचे दिवसांत बाकी राहिली कीं काय? ऐवज येणें किती व आला किती? सारांश, याउपर विलंब लावूं नये. याप्रमाणें तुह्मीं बाईशीं बोलून, ऐवजाची रवानगी लवकर करवावी' ह्मणून आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें बाईशीं बोलून तूर्त त्यांनीं दोन लक्ष रुपयांच्या हुंड्या तिलोकसी पदमसी सावकार यांचे दुकानच्या घेऊन, राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे रवाना केल्या आहेत. प्रविष्ट होतील. पुढें वरचेवर ऐवजाविषयीं बाईस स्मरण देतच आहें. परंतु यांचें मानस याहून अधिक पैका पाठवावा असें दिसत नाहीं. दादाजीस येविषयींचें यांनीं घराऊ काय लिहिलें असेल तें न कळे! कलम १.

वेदशास्त्रसंपन्न राजश्री अय्याशास्त्री श्रीकाशीस जावयाकरितां आले, ते येथें चंद्र ५ सफरीं दाखल जाले. बाईंची भेट जाली. सन्मान केला. शत रुपये रोख व दोन वस्त्रें संभावना केली. दोन माणसें देवाशापर्यंत बरोबर दिलीं. पुढेंही सागरपावेतों सुरक्षित पोंहचतशीं पत्रें देऊन रवाना केलें. १.

राजश्री संताजी होळकर येथें आले होते ह्मणून पूर्वीं लिहिलें होतें. त्यास पेंढारी यांचे ताकिदीसाठीं सेंदव्यास रवाना केलें कीं, झाडून पेंढारी, मार्गांत सरकारी महाल वगैरे सरदाराचे आहेत, त्यांस उपद्रव न होतां, पेंढारी यांस काढून द्यावें. राजश्री तुकोजीबावांकडे रवाना करणें ह्मणून. कलम १.

राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान पूर्वीं सेवेसीं लिहिलें होतें. त्याअलीकडे पादशाहा यांच्या व त्यांच्या भेटी जालया. रामगड किल्ला हस्तगत जाला. सरकारचें ठाणें बसलें. पुढें रोंख जयपुराकडे जावयाचा आहे. राघोगड अद्यापि हस्तगत जाला नाहीं. कलम १.

सयाजी व गिरमाजी हुजरे, जथे भिकाजीनाईक, हे उभयतां सरकारांतून पाटीलबावांकडे जावयास आले. ते मार्गीं सेंधव्याचे घांटांत पेंढाऱ्यांनीं लुटले. शुद्ध नग्न होऊन येथें आले. पत्रें मात्र राहिलीं. बाईस सांगून दोघांस दोन पागोटीं व दोन शेले व चार रुपये वाटखर्चास देवविले, व मीं आपलेपासून दोन रुपये भांडीं घ्यावयास देऊन, चंद्र ७ सफरीं पुढें रवाना केलें. १.

वेदशास्त्रसंपन्न राजश्री कुटुंबशास्त्री सकुटुंब वाराणशीस जावयानिमित्त आले. ते चंद्र ७ सफरीं येथें आले. बाईंनीं त्यांचाही सत्कार करून दोन शत रुपये रोख व दोन वस्त्रें संभावना करून पुढें मार्गस्थ केलें. १.

राजश्री गणपतराव विष्णु गद्रे यांजकडे बाईकडून रामपुरा वगैरे येथील मामलत होती....त्यास सालमजकुरीं बाईंनीं, गद्रे यांची तगीरी करून, त्यांचा

गुमास्ता नरहर सदाशिव कमाविसीचे कामावर होता, त्याजकडेच मामलत सांगितली. हें वृत्त पूर्वीं सेवेसीं लिहिलेंच आहे. परंतु गद्रे यांची मामलत गद्रे यांजकडेच सांगावी ह्मणून दादाजी गंगाधर यांजकडून कारकून येथें आला आहे. परंतु घडेलसें दिसत नाहीं. कलम १.

एकून कलमें सात, सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १४०.

श्री. २४ जानेवारी इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– बाईनीं श्रीसूर्यग्रहणास एक लक्ष रुपयांचा संकल्प करून हत्ती दान दिला. ३ः तुळा केल्या. एक तुळा मुख्य सुवर्ण व रुपये १६ हजार, आपण व नातवास घेऊन तुळा केली. याप्रमाणें दानधर्म केला. राजश्री रामराव त्रिंबक व राजश्री केसो गणेश कुंटे यात्रा घेऊन येथें पौष्य वद्य १२ आले. दीड हजार यात्रा आहे. बाईनीं सर्व यात्रेस मेजवानी रामकुंडावर सर्वांस भोजनास बोलाविलें. रामराव त्रिंबक वगैरे भोजनास बागांत गेले. बाईनीं तेथेंच भोजन केलें. हा कालवर रामराव व केसोपंत कुंटे आहेत. माघ शुद्ध ८ यात्रा उतरून देशीं जाणार. राजश्री महिपतराव साठे व राजश्री बाबुराव वैद्य मागाहून येणार. वरकड मोठी यात्रा घेऊन राजश्री मोरो बापूजी परभारें हुसंगाबादेवरून देशास गेले. याप्रमाणें वर्तमान. राजश्री पाटीलबावा व पादशाहा एकत्रच आहेत. डीग भरतपुरचे सुमारें आले आहेत ह्मणून ऐकिलें. सांप्रत बाईस अराणुक, यात्रेची रवानगी व दान-धर्माचा विनियोग या हर्षामुळें क्षणभर अवकाश नाहीं. रामराव त्रिंबक वगैरे पारनेरकर मंडळी यात्रेबराबर आहे. ती गेल्यावर आमचें बोलणें होईल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १४१.

पै॥ छ १४ जमादिलावल सन सबा. श्री. २१ फेब्रुवारी इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २ माहे जमादिलावल-पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांच्या पत्राचीं उत्तरें घेऊन छ १४ रबिलावलीं जोडीबराबर सेवेसीं

रवाना केलीं, तीं पत्रें पावलीं असतील. त्याउपर ऐवजाविषयीं वारंवार बाईस स्मरण करीत होतों. मध्यें बाईचे शरीरास समाधान नव्हतें. मासपक्ष श्रमीच फार जाली. त्यावर औषधउपाय करून आराम जाला. दरबारांत येऊं लागल्यानंतर मागतीं स्मरण केलें. त्यावरून सावकारासीं बोलोन, तूर्त एक लाख रुपयांची एक हुंडी, तिलोकसी पद्मसीचें दुकानची घेऊन, आपणास पत्र व दादाजीस पत्र लिहून, हुंडी करून लाखोटा छ १ जमादिलावलीं रवाना कासदजोडीबरावर जाला. मजला पत्र द्यावयास सांगितलें. त्यावरून बाईच्या जोडीबराबर मीं सेवेसीं पत्र लिहिलें. तें राजश्री दादाजी गंगाधर यांजकडोन प्रविष्ट होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १४२.

श्री. २१ फेब्रुवारी इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–राजश्री बापु वाघमोरे यांचे बुणगे लष्करांतून आले. त्याजकडील वर्तमान त्यांणीं सांगितलें कीं, लष्करांत मरीचा उपद्रव फार जाला आहे. लढाई तों तूर्त नाहीं. टिपूचे फौजेसीं दहा कोसांचें अंतर आहे. सारी फौज बुणगे माघारी जाऊन स्वामी कार्तिकाचें मुलखांत फौज गेली; व बाहादुरबिंडा सरकारांत किल्ला आला आहे, त्यास मोर्चे टिपूनें येऊन लाविले. दोन तीन हल्ला किल्लेदारांनीं मारून काढल्या. पुढें काय जालें तें कळलें नाहीं. याप्रमाणें सांगत होते. बाईनीं राजश्री सुभेदार यांस पत्र पाठविलें कीं, 'टिपूचें करणें कृत्रिम फार आहे. तुह्मांकडे कागदपत्र पाठवीत जाईल. त्यास तुह्मीं बहुत सावध राहावें. फंदफितूर कोणाचा ऐकत न जावा. तुह्मांस बदनाम करील असा जो असेल, त्यास दूर ठेवावें. पेंचांत पडाल अशी वर्तणूक न करावी.' याप्रमाणें पत्रें लिहिलीं. हें माझे समक्ष, याप्रमाणें कारकुनास पत्रें लिहावयास सांगितलीं, त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १४३.

श्री. २१ फेब्रुवारी इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तगाईत छ २ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असो. विशेषः–

नबाब निजामतदौला यांजकडील उंट नफर सुमारें ३५० साडेतीनशें, एक घोडा व मेवेजात जिन्नस दोन पल्ले मारवाड प्रांताहून इंदुरास आले. तेथून इंदुरपावेतों सुरक्षित आले. इंदुरीं अटकाव जाला. तेथें हशिलासाठीं अटकाविलें. नबाब यांजकडील जमातदार लालखां उमदा माणूस बराबर होता. त्यानें दीड महिना प्रयत्न केला. बाई परवानगी देईनात. त्यास, वर्तमान कळलें कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांकडून वकील येथें आहे. त्यावरून लालखां जमातदार भेटीस आले. त्यांणीं वर्तमान सांगितलें. सरकारचें दस्तक त्याजपासीं होतें, तें पाहिलें. मग बाईची त्याची भेट करवून ८।१५ दिवस जाबसालास लागले. परंतु बिनदिक्कत हंसील न घेतां, साडेतीनशें उंट व घोडा १ व जिन्नस पार करून दिधलीं. तें भागानगरास जाऊन पावतील. राजश्री पाटीलबावा दिल्लीनजीक गेले. पातशाहाची मुलाजमत जाली. पुढें शिकाचें पारिपत्य करून मेवातीयांचें पारिपत्य चांगलें केलें. त्यांची विहीण शाहाबाई [शामाबाई ?] सितोळी, त्यांजकडे जावयास येथें आली. एक दिवस मेजवानी बाईनीं केली. सांप्रत उज्जनीस आहेत. पाटीलबावांकडून स्वार आलीयावर जाणार. राजश्री रायाजी पाटील यांचे बंधु देशास गेले. येथें येऊन बाईस भेटून पुढें देशास आले. त्यांच्या जबानीचें वर्तमान कीं, मराठी फौज फारशी नाहीं. रांगडी फौज व पलटणें यांजवर कृपा फार. राजश्री जिवाजी बल्लाळ यांजवर इतराजी जाली आहे. चौकींत ठेविले. बक्षी दुसरा रांगडाच केला. याप्रमाणें बोलत होते. वरकड वर्तमान नवल विशेष आलें नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १४४.

श्री. १५ मार्च इ. स. १७८७.

''सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथून दोन जोड्या रवाना केल्या. एक चंद्र २४ माहे रविलावलीं व एक चंद्र १ माहे जमादिलावलीं. एकूण दोन्ही जाब आले नाहींत. येथें दोन जोड्या आहेत. सांप्रत राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांजकडील शरीफभाई यांजकडे पागा त्याचें पत्र आलें. त्या पत्रीं वर्तमान कीं सलूख जाला. पंचेचाळीस लक्ष रुपये नक्त खंडणी ठरली. चार किल्ले सरकारांत आले. ते करार जाले. बदामी व कितूर व गजेंद्रगड व नवलगुंद याप्रमाणें करार जाले. लवकरच फौजा माघारे येतील. असें पत्र आलें व सावकारी पत्रें अशींच आलीं. त्यावरून

सेवेसीं लिहिलें. वेदशास्त्रसंपन्न राजश्री अय्याशास्त्री श्रीयात्रेहून महेश्वरीं आले. बाईची भेट जाली. दोन तीन दिवस मुक्काम यात्रेचा जाला. बाईंनीं, बरोबर ब्राह्मण होते त्यांची संभावना करून, यांस शंभर रुपये व दोन वस्त्रें देऊन बिदा केलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र १९ जमादिलाखर **लेखांक १४५.**

सन सबा चैत्र मास. **श्री.** २४ मार्च इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान लिहून दोन जोड्या कासीदाच्या पत्रें देऊन सेवेसीं पाठविल्या. त्या जोड्या हा कालवर तेथेंच आहेत. सांप्रत राजश्री बाबुराव वैद्य व राजश्री केसोपंत तासगांवकर व पुणेकर, कांहीं यात्रा घेऊन चंद्र २ जमादिलाखरीं महेश्वरीं आले. गंगाजलनिर्मळ सगुणाबाई निंबाळकर यात्रा करून उज्जनीस आली. तेथें रामजयंतीचा उत्सव करून परभारें अथवा महेश्वरास येऊन देशीं जाणार. राजश्री बाबुराव वैद्य, काल तर राजश्री गोविंद रघुनाथ गानू यांजकडे मेजवानीस गेले. एक दिवस बाईकडे होऊन मग स्वार होतील. तें सेवेसीं लिहीन. विसाजी शामराज लांबहाते चंद्र ३ जमादिलाखरीं शनवारीं पंचत्व पावले. येथें माणूस तेव्हढाच होता. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र १८ सवाल सन **लेखांक १४६.**

समानीन अधिक श्रावण मास. **श्री.** २९ जून इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १३ माहे रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांनीं बाईस पत्रें पुण्याचे मुक्कामींहून पाठविलीं. पत्रीं मजकूर कीं, 'आह्मी फौजसुद्धां पुण्यास आलों. श्रीमंतांच्या भेटी जाल्या. याउपरी वाफगांवास जातों. त्यास फौजेचे समजाविशीस ऐवज पाहिजे. आपणाकडून सरबराई व्हावी. जरूर ऐवज पाठविला पाहिजे.' त्यावरून तूर्त तिलोकसी पदमसी याजकडून पुण्यांत ऐवज भरणा बाईंनीं करविला. एक लक्ष रुपये यांची हुंडी करून, सेवेसीं पत्रें व राजश्री दादाजी गंगाधर यांस पत्रें लिहून सावकारीचे दुकानीं दिधलीं. सदरहू पत्रें व हुंडी पावल्यावर राजश्री दादाजी गंगाधर आ-

पणाकडे प्रविष्ट करितील. संभुराम वकील राजश्री सुभेदार यांजकडून जयनगरीं असतात. त्यांचीं पत्रें येथें व सुभेदार यांस आलीं. पत्रीं मजकूर कीं, लढाई राजश्री पाटीलबावांचे फौजेसीं जाली. शें दोनशें लोक ठार व जाया जाले. कांहींचीं शें पन्नास घोडीं पाटीलबावांकडे आलीं. यांजकडील दोन हत्ती पाडाव करून घेऊन गेले. सारे रांगडे एक जाले. यांजकडील लोक उठून त्यांच्या फौजेंत जातात. प्रसंग तर लढाईचा. ह्मणून वकिलाचीं पत्रें आज आलीं. तेथील प्रसंग विलक्षण लिहिला आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १४७.

पैवस्ती चंद्र २० जिलकाद श्रावण. **श्री.** १८ आगस्ट इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—राजश्री पाटील-बावांची व जयपुरवाल्याची लढाई जाली. हें वर्तमान दों ठिकाणचें आलें. तपशीलः—

तिलोकसी पदमसी सावकार याचें दुकान येथें आहे. त्यास पत्र जयपूरचें दुकानाहून आलें. येथें चंद्र २७ सवालीं वर्तमान आलें कीं, अधिक शुद्ध १२ स जयपुरवाले यांनीं सांगोन पाठविलें कीं, आह्मी लढाईस येतों. तुह्मीं तयार असावें. ते दिवशीं इकडून तयारी जाली नाहीं. दुसरे दिवशीं त्रयोदशीस जयपुरवाले व मारवाडकर सरदार ५ हजार फौजेनिशीं व आमदनी ऐसे चालोन आले. पाटीलबावांनीं तोफा सुरू केल्या. तोफेंत गोळे व खुर्दा भरून मार दिला. त्यांचे माणूस हजार दीड हजार ठार जाले. मग त्यांनीं नेट धरून तोफखांना पिऊन यांचे फौजेंत मिळाले. सफेजंगी लढाई चांगली ४ घटकापावेतों जाली. बावांकडून शिवाजी विठ्ठल व खंडेराव हरी व अंबोजी इंगळे वगैरे पागा यांनीं तरवार चांगली केली. त्यांजकडील लोक ठार जाले. मारवाडचे फौजेंतील सोभाराम त्यास जखम लागली. तो पाडाव जाला. तो हस्तगत होऊन मागतीं त्यास निरोप दिला. आमदानी ठार जाला. त्याची फौज माघारें गेली. हेही आपले मकानावर आले. ते दिवशीं इकडील फत्ते जाली. ह्मणोन वर्तमान आलें, तें सेवेसीं लिहिलें.

कलम १.

दुसरें वर्तमान चंद्र ३ जिलकादीं बाईस जालमसिंग कोटेकर यांचें पत्र आलें. तें पत्र मीं पाहून वाचलें. त्या पत्रीं इतकेंच वर्तमान कीं, उभयतांकडील मजकूर तुह्मांकडील कमाविसदार यांनीं लिहिलें आहे, त्यावरून कळेल. दुसरें पत्र यांजकडून

कोट्यांत राजश्री आनंदराव नरहर, त्यांच्या पत्रीं वर्तमान कीं, लढाई दुसरी मातबर जाली. पाटीलबावांचा मोड जाला. पाटीलबावा डिगेस जावयाचा रूख घेऊन निघाले. पाठीस फौजा लागल्या. इतकें वर्तमान आलें. कलम १.

लोकवदंता कीं, राणेखांभाईस जखम व चिमणाजी खंडेराव निसबत शिवाजी विठ्ठल यांस जखम व आणीख लोक फार जाया जाले. लष्करांत महागाई फार. रस्त येत नाहीं. सर्वांसीं बदमामली केली, त्यामुळें कोणीकडून आसरा रस्तेचा नाहीं. एक करोलीकडून रस्त येते. चोर लष्करांत येऊन उपद्रव देतात. मेणे चोर यांस जयपूरवाल्यांनीं ताकीद केली कीं, लष्करांत चोरीचा उपसर्ग लावणें. त्यावरून तो उपद्रव भारी. चहूंकडून अडचणींत आहेत. परिणाम कसा होईल तो कळेना. वरचेवर तिकडील वर्तमान सेवेसीं श्रुत होत असेल. येथें कोणीकडून वर्तमान येतें. तेव्हां सेवेसीं लिहीत आहें. कलम १.

सावकारी वर्तमान कीं, पलटणें राजश्री पाटीलबावांजवळ होतीं, त्यांनीं तलबेचा तगादा केला. तलब देईनात. रोजमरेही वरचेवर न देत. पलटणें झाडून एका कायताचे हवालीं केलीं. त्या कायतानें जयपूरकरांशीं अंतस्त करारमदार करून, लढाईचे दिवशीं बमय तोफखाना घेऊन पलटणासुद्धां जयपूरकराकडे गेला. त्यामुळें पाटीलबावा तेथून टाळा देऊन डिगेस जातात. कलम १.

लष्करांत महागाई मोठी, रस्त येत नाहीं. त्यामुळें चार पांच शेर धान्य जालें. वैरण तर नाहींच मिळत. लष्कराबाहेर माणूस निघों पावत नाहीं. समागमीं आहेत ते कुल बेदिल आहेत. ह्मणोन विलग जालें. त्याउपरी वर्तमान होईल तें सेवेसीं लिहीत जाइन. कलम १.

एकूण पांच कलमें वर्तमान सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १४८.

पै॥ चंद्र २५ जिलकाद श्रावण. **श्री.** १८ आगष्ट इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:– विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ माहे जिलकाद-पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:– येथील वर्तमान, पूर्वीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. तीं जोडी माघारें जाब घेऊन न येतां, रिकामी डांकेचे चौकी बसावयास आली. त्याउपरी एक विनंतिपत्र लिहून सेवेसीं पाठविलें. त्याचा जाबसाल आला नाहीं. राजश्री आपाजी सदाशिव निसबत सबनीस डांक बसवीत येथें आले. बाईंच्या महालांत ताकीदपत्रें देऊन डांक

## २२. टिपूच्या लष्करची बातमी.

शिवाजी महादेव ह्या नांवाचा एक मराठा इसम ह्मैसूरच्या टिपूसुलतानाजवळ अंचीच्या कामावर होता. त्यानें चार वर्षें टिपूसुलतानाजवळ नौकरी केली. त्यानें टिपूच्या लष्करची पुढें लिहिल्याप्रमाणें माहिती दिली आहे. ती अत्यंत उपयुक्त आहे.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"जबानी–शिवाजी महादेव व॥ कसबे कलमेरी प्रांत कोपल नजीक तुंगभद्रा उत्तर तीर. विनंति ऐसीजे:– आह्मी टिपूकडे अंचीचे कामावर होतों. दरोबस्त अंचीचे लोक आमचे निसबतीस होते. अंचीसंबंधें दरोबस्त बातमी चोहोंकडील आह्मांजवळ येत होती. आह्मी टिपूजवळ पोहोंचावीत होतों. चार वर्षें त्याजकडे चाकर आहों. तेथील वर्तमान येणेंप्रमाणें:–

स्वार अजमासें.

७००० पागा घरची.
९००० शिलेदार.

१६०००

ता.
१४५०० स्वार.
१५०० बाणाचे घोडे.

१६०००

तोफा..............सुमारें.

८१ बरोबरील.
६ आदवानीपैकीं घेतल्या

८७

ता.
१२ थोर बारा तेरा शेरीं.
७५ लहान तीन, चार, पांच, सहा शेरीं

८७

हत्ती दरोबस्त पांचशेंपैकीं स्वारीबरोबर नग १००

ता.

२३ अंबारीचे र॥ चित्रदुर्ग.
१६ कुंपिनीस दरवाज्याकडे दोन व दरबारास एक हत्ती व सहा तोफा याप्रमाणें.

८ हातनाला. सदर हत्तीवर जंबुरे ४ चार प्रमाणें हत्तीबरोबर चालावे.
५३ नगारा निशाण व वेस वगैरे कामास.

१००

उंट नफर. दरोबस्त ६०० सहाशें, ते कुल स्वारीबरोबर आहेत. १

नगदी व गल्ला वगैरे जिनसांचीं दुकानें सरकारचीं, ज्यांस जें पाहिजे तें त्यांनीं या दुकानीं घ्यावें. दुसरीकडे घेऊं नये. याप्रमाणें एकंदर ताकीद आहे. १

करीमसाहेब, टिपूचा भाऊ, यांचे शरीरीं समाधान नव्हतें. तो चैत्रमासीं बेंगरुळांत अपकारानें मेला. १

कोपलास मोर्चे बसले, याजकरितां जलदी करून नदीअलीकडे उतरून आला. कोपलचा उपराळा करावा, तें न होतां किल्ला गेलाच. तरी, लढाई पडली घ्यावी व सावनुराकडे जावें व बुऱ्हाणउद्दीनास मिळावें; धारवाड प्रांत व बदामी, गजेंद्रगड वगैरे येथील बंदोबस्त करावा, या उद्देशें अलीकडे आला. सरकारच्या फौजा निकडीनें सन्निध येऊन पोंचल्यामुळें दोन्हीं नदींच्या तीरास बातेऱ्या बांधून बंदोबस्तानें राहिला. १

टिपू अदवानीस होता. तेव्हां महाबतजंग यांनीं अंतर्यामीं मुसा लाली यास चिठ्ठी लिहिली कीं, 'पेशजीं तूं आह्मांकडे चाकर होतास, त्यापेक्षां आतां तुझें अधिक चालवूं. तूं जमियत सुद्धां आह्मांकडे येणें.' ती चिठ्ठी चोरबातमीवर टिपूस सांपडली. त्याजवरून त्याजवर मर्जी खट्टी आहे. परंतु मसलतीमुळें तूर्त बोलत नाहीं. १

कर्नाटकी प्यादे यांचा कारभार गुलामअल्ली याजकडे आहे. १

येथून वकील गेले, त्यांशीं एक दोन वेळां बोलून, त्यास चौकींत बंदोबस्तानें ठेविलें आहे. १

खिजमतगार आदिकरून कोणी टिपूस राजी नाहीं. परंतु जातीचा बंदोबस्त चांगला आहे. याजमुळें मात्र लोक ठरले आहेत. त्यांची स्वारी निघाल्यापासून बारवाले वगैरे पांच सहा हजार माणूस पळोन गेले. नित्यानीं दहा, वीस, पंचवीस, पन्नास पळोन जात आहेत. १

चित्रदुर्ग व पट्टण वगैरे सहा जागा, नव्या बंदुका करावयास कारखाने लाविले आहेत. तेथें नव्या बंदुका तयार करवीत आहे. इंग्रजाकडील वगैरे बंदरी बंदुका घेत नाहीं. १

### बार वगैरे पायींचे लोक.

४०००० बारवाले.
८००० चेले.
३२००० बारवाले.

४००००
३०००० कर्नाटकी प्यादे.

७००००

२००० कामाठी.
१५०० खलासी.
४० मशालची.
८० चोपदार नकीब.
७०० भालेकरी रुप्याचे कटाचें.
५०० बर्ची व सांगवाले.

४८२०

७४८२०

**बुऱ्हाणउद्दीन यांजबरोबर सरंजाम आहे.**

६००० स्वार शिलेदार.
१४००० पायीचे लोक.
६००० बार.
८००० कर्नाटकी.

१४०००

२००००

२५ तोफा.

पंचवीस तीस शेरी तोफा दोन बेंगरूळाहून आणविल्या आहेत. १

**लष्करांत धारण दर रुपयास वजन पक्के.**

ऽऽ८ तांदूळ.
ऽ।६ कुलथी.
ऽऽ१। तूप.
ऽऽ२ तेल.
ऽऽ२ दाळतुरी.

आह्मांस जो जिन्नस लागे त्याचा मात्र दर ठाऊक आहे.

राघवेंद्र नाईक यांजकडे संस्थानचे खंडण्याबाबद वगैरे हवाल्याबाबद सात लाख होन येणें. यास्तव त्यांस पाहाऱ्यांत ठेविलें आहे. जाण्या येण्यास मोकळीक आहे. परंतु बंदोबस्तानें ठेविले आहेत. १

टिपूस पुत्र तिघे. पैकीं एक दहा वर्षांचा समागमें होता. तो पूर्णय्या कारभारी याजबरोबर हरीहरास बुणग्यासमागमें पाठविला. त्याबरोबर या बारांपैकीं दुखणेकरी वगैरे चार हजार बारवाले गेले आहेत. १

सातां दिवसांपलीकडे कृष्णराव तोफखाने यांचे कारभारी यांनीं मसलत दिली कीं, याप्रमाणें येथें राहिल्यास रसद येणार नाहीं. नदीचें पाणी उतरत चाललें. दाणा

वगैरे मिळणार नाहीं. याजकरितां जडी हनवटीकडे झाडींत नदी उतरून दक्षिण तीरानें जावें. याप्रमाणें सांगितलें. १

त्यावरून टिपूनें उत्तर केलें कीं, झाडीचें कारण नाहीं. एक वेळ लढाई घ्यावी. सावनुराकडे जावें. याप्रमाणें बोलोन त्याच दिवशीं रात्रौ छाप्यास आपण आला होता. १

मीराचा लेक कमरुद्दीन अली आपलें शहाणपण दाखवूं लागला. सबब त्यास सरदारी सांगितली होती, ती काढून त्याचा चुलत भाऊ मीर मोईनुद्दीन यास सरदारी सांगून त्यास घरीं बसविलें. १

महालचें मुलकी कामकाज मीर महंमद सादक व आणखी त्याचे हाताखालीं तिघे मनसूर दिल्हे आहेत. चौघांनीं एकमतें कारभार करून रुबरूं टिपूस समजावावा. १

फरासीसाचा वकील इंग्रजाची मसलत त्यास पडली आहे म्हणोन कुमक न्यावी, याजकरितां अदवनीचे मुक्कामीं आला होता. तो गडनाथपर्यंत समागमें होता. त्याचें यांचें बोलणें जालें कीं, आम्हांसही मसलत पडली आहे. याजकरितां बारा हजार बार व दोन हजार गोरा घेऊन येणें म्हणोन वकिलांस सांगितलें. त्याजवरून पाठवितों म्हणून बोलोन वकील गेला.



## २३. कलकत्त्याचें बातमीपत्र.

लाला सेवकराम ह्या नांवाचा पेशव्यांचा वकील कलकत्ता येथें इ. स. १७७७ पासून इ. स. १७९३ पर्यंत होता. ह्याची माहिती व पत्रव्यवहार "परराष्ट्रांच्या दरबारांतील मराठ्यांचे वकील" ह्या लेखामध्यें दिली आहे. (इतिहाससंग्रह पु० १–अंक ८ पहा). हा वकील, कलकत्त्याच्या गव्हरनरजनरलच्या दरबारची बातमी पुण्यास लिहून पाठवीत असे. ह्याचीं उपलब्ध झालेलीं बातमीपत्रें वर निर्दिष्ट केलेल्या लेखाच्या तिसऱ्या प्रकरणामध्यें छापून प्रसिद्ध केलीं आहेत. ह्याच लेखकाचें एक पत्र मागाहून सांपडलें आहे. तें मनोरंजक वाटल्यावरून येथें दाखल केलें आहे.

[ मेणवलीदप्तर ] **श्रीरामचंद्र प्रसन्न.**

पै॥ छ १२ जमादिलावल. ता. ८ मार्च इ. स. १७८०.

इहिदे संमानीन ह॥ अजुरदार कासीद.

" श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–

आज्ञांकित चरणरज सेवकराम साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल तागाईत फाल्गुन शुद्ध २ बुधवार छ १ रविलावल मुक्काम कलकत्ता जाणून स्वकुशल आनंदवैभव लेखकास आज्ञा करीत जावें. विशेषः– पूर्वीं विनंतिपत्र येथील सविस्तर वर्तमानाचें, कासीदजोडी अजुरदार बरोबर छ १७ माहे सव्वालेस पाठविलें, त्याजवरून सेवेसीं विदित जालें असेल. साद्यंत वर्त्तमान हेंच कीं, वडेसाहेबांनीं हैदरनाईक यांचे

जोर व प्रबलताई ही ऐकून, बहुत घाबरे होऊन, जरनेल कूट, आंग्रेजी फौजेचा बक्षी, जो पूर्वी नवाब वजीर जवळ लखनौ प्रांतीं पाठविले होते व त्यांनीं नवाबाचे मुलुखांत जकाती बसवून एक करोड ऐशी लक्ष रुपये नगद वसूल केले; नवाब वजिरांनीं पागोटा भूमीवर आपटून तीन उपास केले; शेवटीं कांहीं चालिलें नाहीं–त्या जरनेलास ताकीदपत्रें पाठवून सत्वर बोलाविलें. तो छ१९ शव्वाल कलकत्यास येऊन, बडेसाहेबांशीं भेटले. मग बडेसाहेब व जरनेल मजकूर व हुलयरसाहेब कौसली हे तिन्हीं मिळून, फरानसीससाहेब याची समजावीस करून, कौसल केली. बडेसाहेबांनीं बोललें कीं, "चार पांच करोड रुपये दक्षणची मोहिमेवर खर्च जाले; रुपयांची बहुत वोढ आहे. कौसलांत करार पावले कीं, कलकत्याचे बंगाली करोडपती आहेत. यापासून एक करोड रुपये सरकारांत घ्यावे." राजश्री राजवल्लभ कदीम दिवाण मजालस यांसीं सांगितलें, "तुह्मी कदीम कारभारी आहां. राजे हुजुरीमल, व राजे लबा किशोर, व दिवाण काशीनाथ व रामहरि मलिक, व रामरतन ठाकूर वगैरे मातबर लोक यांस कंपनीचे नांवें तमसूक देऊन, करोड रुपये वसूल करून, लवकर खजान्यांत दाखल करावे. छ २१ शव्वालेस बडेसाहेबांनीं बेनीरामपंतांचे धाकटे बंधू विश्वंभरपंत यांचे बरोबर एक लक्ष रुपयांचें जवाहर व दोन लक्ष रुपयांचें पागोटें, व शेले बनारशी, व आनीक तोफे विलायती ऐसे ११ संदूक व चार लक्ष रुपयेची मोहोरा, व पन्नास बेगारी व पन्नास शिपाई, व दहा जासूदजोडी, व सात हजार रुपये वाटखर्च व डेरे व कनाता वगैरे सरंजाम देऊन, आपले वकील मुक्रर करून, राजश्री चिमणाजी भोंसले सेनाबहादूर यांजवळ रवाना केले, व मामलेचेही कांहीं जाबसाल कौसलांत पक्कें करून, अलाहिदा कागद विश्वंभराचे हवाला केला आहे. आंग्रेजाचें वर्तमान मोठे तलाशानें कळतें. कोन्ही चाळीस, कोन्ही पन्नास लक्ष रुपये बडेसाहेबांनीं देऊं केले, ऐसें ह्मणतात. तहकीक कळलें नाहीं. मागून सेवेसीं निवेदन करूं. बडेसाहेबांसीं हैदरनाईकाचे चिंता बहुत लागली आहे. यास्तव हे सेनाबहादरांसी मामला देऊन, सलाह करितील. आपले मुलुखांत हंगामा होऊं देणार नाहींत. छ २२ शव्वालेस राजश्री बिजेरामपंत बेनीरामाचे संबंधीं नागपुराहून राजश्री मुधाजी भोंसले यांचे खलिता व देवाजीपंताचें पत्र घेऊन कलकत्यास आले. खलिता व पत्र आनीक कागद जाबसालाचे बेनीरामपंतांचे हवाला केले. खलित्याचे मजकूर हाच कीं, आह्मीं कित्येक साल जाब, श्रीमंत पेशवा साहेब यांची सरकारचे बिजेरामपंतांस सांगितले आहेत, त्यांचे जबानीं कळों येतील. बेनीरामपंतांनीं खलिता व कागद घेऊन बहुत उतकृश होऊन बोलले कीं, तुमची असामी बडेसाहेबांनीं दूर केली, घरास जावें. श्रीमंतांकडील सालजाब आणिले, यास्तव बहुत खपा होतील. दोन चार दिवसनंतर बेनीरामपंतांनीं खलिता बडेसाहेबांस दिधले. बडेसाहेबांनीं खलितेचे मतलब समजून बेनीरामास पुसलें कीं, "बिजेरामपंत कोठें आहेत ? जाब दिल्हे कीं, मशारनिल्हे श्रीकाशीस येऊन अजारी पडले. बेनीरामपंतांची व बडेसाहेबांची बहुत गोडी आहे. यास्तव बिजेरामपंत येथें दोन महिनेपावेतों खराबा होऊन नागपुरास गेले. बेनीराम

पुढें बडेसाहेबांजवळ कोणाचें कांहीं चालत नाहीं. छ २३ शव्वालेस बडेसाहेबांनीं जनरेल कूट याजबरोबर एक जहाजावर पन्नास लक्ष रुपये नगद, व एक जहाजावर अकरा हजार मण तांदूळ, व पांच हजार मण रोट्या वगैरे पोटाचे सरंजाम व एक जहाजावर बारुत व गोळे व तोफा, व दोन जहाजांवर गोरे आंग्रेज शिपाई पांचशें, व दोन जहाजांवर कलकत्त्याचे माणसें जवान जवान सातशें असामी बलात्कारें धरून बसविलीं. व कर्नेल तामसगीराम, श्रीकाशीचे सुभेदार, व कर्नेल वैनसाहेब जाहांगीरनगरचे सुभेदार वगैरे १८ असामी मातबर आंग्रेज ऐसे सात जहाज देऊन, मदराजबंदरचे मदतीकरितां रवाना केले. परंतु बडेसाहेबांचें, व फरानसीससाहेबांचें एकंदर चित्त शुद्ध नाहीं. मनाचे क्लेश रोज बरोज वाढत चालले. एक दिवस कौंसलांत फरानसीससाहेबांनीं बडेसाहेबांशीं बोललें कीं, "आह्मी विलायतेस जाऊं. कौसलांत रिकामें येऊन तुह्मांसारखे साल जाब करावे ! आमचें बोलणें कांहीं चालत नाहीं. याजमुळें बहुत लाज वाटती." बडेसाहेबांनीं बोलले, "विलायतेस न जावें." फरानसीससाहेबानें बहुत आग्रह केले. बडेसाहेबानें मान्य न करितां, परस्परें शब्दाशब्द बोलून शेवटीं बडेसाहेबांनीं कबूल करून, कौंसलचे कागदवर लिहून दिधलें. फरानसीससाहेबांनीं एक जहाज वलंदेजी पंचवीस हजार रुपये किरायाचें करून, करनेल जॉन आपटन् जो–स्वामींनीं आह्मांस त्याजबरोबर पाठविलें होतें–त्यास व सिकसपेरसाहेब पटन्याचे सुभेदार, व मिस्तर मारुटसाहेब पुरन्याचे सुभेदार, व मिस्तर मारटीनूसाहेब मकसुदाबादचे सुभेदार, ऐसे बत्तीस साहेब मातबर आपले बरोबर घेऊन छ ६ माहे जिल्हेज मार्गशीर्ष शुद्ध ७ स्वार होऊन विलायतेस गेले. जातेसमयीं बडेसाहेबांनीं एक लक्ष रुपये नगद फरान्सीससाहेबांस दिधले.

जनरेल कूट, जे मदराजास गेले होते त्यांचें पत्र बडेसाहेबांस आलें कीं, हैदरनाईक येथें बहुत जबरदस्त आहे. कोणी सरदारास मातबर फौज देऊन सत्वर पाठविणें. तर आह्मी हैदरनाईकासीं लढाई करूं. नाहीं तर आमची ताकद नाहीं. बडेसाहेबानें पत्रदर्शनीं कर्नेल पियास कलकत्त्याचे किल्लेदार यांस बोलावून सांगितलें कीं, तुह्मीं एक कंपू दहा हजार माणसांची फौज व शंभर तोफा घेऊन कटकाचे वाटेनें मदराजेस जावें. त्यांनीं छ १२ माहे जिलकादेस आपले डेरे किल्लापुढें मैदानांत दिधले. व तोफा व बारुत व गोळे यांचे छकडे श्रीगंगापार करूं लागले, परंतु फौज नाहीं. याजमुळें बडेसाहेबांनीं कर्नेल मजकुरास सांगितलें कीं, "तुह्मी जे माणसें मिळतील, त्यांस दहा दहा बारा बारा रुपये दरमाहा करून चारपांच पलटणें तयार करावीं." नवाब वजीर व राजे चेतसिंग या उभयतांस लिहिलें, कीं, "तुह्मीं दहा दहा पलटणें आपले जवळचीं सत्वर पाठवावे. राजेमजकुरांनीं साफ लिहिलें, आह्मांकडील माणसें कलकत्त्यास जाणें कबूल करीत नाहींत. नवाब वजीराजवळ जो आंग्रेज कारभारी आहे, त्यांनीं पांच पलटण पाठविले; ते बडेसाहेबांनीं छ १५ माहे जिल्हेजेस कलकत्त्याहून मेदिनीपुरास रवाना केले. चिमणाजी भोंसले आपले फौजेनिशीं कटक प्रांतीं आहेत व कर्नेल पियास याचें जाणें

तेच वाटेनें, याजमुळें बडेसाहेबांस बहुत चिंता जाली. बेनीरामपंतांनीं बडेसाहेबांस बहुत प्रकारें समजाविलें कीं, आपण कर्नेल पियास यांसीं रवाना करावें. चिमणाजी भोंसले आपल्याशीं बिघाड करणार नाहींत. याउपरी बडेसाहेबांनीं आपले खलिता व पत्र बेंनीरामपंतांचे कटकेस पाठवून खातरजमा करून, सात हजार रुपये नगद, व पालखी जरदोजी दोन हजार रुपयेची, व एक घोडे वहाल तीन हजार रुपयेची विलायती, व जवाहर, व दुशाले वगैरे एकूण वीस हजार रुपयेचे ऐवज बेनीरामपंतांस इनाम दिधले, व चार हजार मोहोर, व रुपये पांच लक्ष, रुपयेचा ऐवज राजश्री चिमणाजी भोंसले यास बेनीरामाचे मारफत कटकास पाठविले. छ ८ मोहोरमेस खबर आली कीं, चिमणाजी भोंसले कटकाहून कूच करून ढेकानालकडे पांच मजल गेले. त्याजवरून बडेसाहेबांनीं बेनीरामपंतांची मसलहत प्रमाणें छ १२ मोहोरमेस कर्नेल पियास किल्लेदार यासी पंचवीस हत्ती, व पांचशें खासबारदार वगैरे सरंजाम देऊन रवाना केलें. मशारनिल्हे मेदनीपुरास जाऊन फौजा सामील होऊन राहिले, पुढं गेले नाहीं. छ २३ मोहोरमेस अर्जुनजी नाथाजी सुरतकर साहुकार याचे दुकानीं लिहिलें आलें कीं, कर्नेल गाडर यांनीं मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमेस वसईचे किल्ला हस्तगत केले. बेनीरामपंतांनीं मूळचंद गुमास्ते सावकारमजकुराचे यास, बडेसाहेबांजवळ घेऊन गेले व वसईचें वर्तमान सांगून पांच मोहोर नजर दिधले. बडेसाहेबांनीं दोनशें रुपये नगद व एक दुशाला गुमास्त्यास इनाम दिले. बडेसाहेबांची सरकारांत ४५ पंचेचाळीस लक्ष रुपये दरमहा याद बयाद येतो. आपली दौलत व तोफखान्याची लढाई कोणास मानत नाहीं. बहुतकरून बडेसाहेबांस बेनीरामची मसलहत करितां श्रीमंताची सरकारचा द्वेष अतिशय लागले आहे. यांनीं आपली मगदूरप्रमाणें विरोध व हंगामा करावयास कमी केली नाहीं, व पुढेंही चुकणार नाहीं. याचे मुलूख, खराब व ताराज जाल्यानें वाटेवर येतील. हें वर्तमान पूर्वीं दोन चार बार तपशीलवार निवेदन केलें आहे. सेवेसीं विदित जालेंच असेल. सेवकाचें वर्तमान ऐसें कीं, दोन वर्षें जालीं, सरकारांतून खर्चास पाठविलें नाहीं. खर्चाची ओढ बहुत आहे. येथें रिकामें बसावें सार्थक नाहीं. स्वामीशिवाय खर्च पाठवून सांभाळ करणार दुसरे कोण आहे? आह्मांस आपले चरणाचा सर्व प्रकारें आसरा आहे. चिरंजीव चिमणलाल तेथेंच आहे. हेविशीं सविस्तर अर्ज करितील. त्याचीही परवर्ष करणार धनी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

## पुरवणी.

छ १६ सफरेस खबर आली कीं, विश्वंभरपंत व मिस्तर जानसेनसाहेब, जो बडेसाहेबांनीं चिमणाजी भोंसले जवळ पाठविले होते, या उभयतांनीं बडेसाहेबांची व चिमणाजी भोंसलेची दोस्ती पक्की व मामला फडचा करून, बालेसर बंदरास आले. राजश्री राजारामपंत, कटकचे सुभेदार यांचे धाकटे भाऊ, बालेसर बंदरचे कमाविसदार, यांनीं भोंसलेची आज्ञेप्रमाणें कर्नेल पियास–जो एक कंपू फौज घेऊन मेदनीपुरावर दीड

महिनेपावेतों होते—यास वाट देऊन बालेसरवर फौजासहित बोलावून मेजवानी केली, व बहुत स्नेह करून, पुढें कटकेचे वाटेनें जाऊं दिधलें. मग विश्वंभरपंत व जानसेन-साहेब छ २३ सफर फाल्गुन वद्य १० दशमीस कलकत्त्यास येऊन, पांच घोडे व जवाहीर व वस्त्रें बडेसाहेबांस भोंसल्याकडून दिधले. बडेसाहेब बहुत खूष होऊन, बेनीराम व विश्वंभर यांस दोन सिरपाव खासे, व सिरपेंच, जवाहर, व दहा हजार रुपये नगद इनाम दिल्हे. बाकी लष्करचा वर्तमान कृष्णाजी काळे सेवेसीं सविस्तर लिहितील. हे विज्ञापना.''



## २४. डबईची लढाई.

थोरले बाजीराव पेशवे व सेनापति त्रिंबकराव दाभाडे ह्यांच्यामध्यें डबई येथें इ. स. १७३१ सालीं युद्ध झालें, तें इतिहासांत प्रसिद्धच आहे. ह्या युद्धाचें वर्तमान पेशव्यांनीं पुढील पत्रांत रा. कृष्णाजी कदम ह्यांस लिहिलें आहे:—

[ नक्कल धावडशीदप्तर. ] श्री.

''राजश्री कृष्णाजी कदम गोसावी यांसः—

अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद सुरसन इहिदे सल्लासीन मया व अलफ. राजश्री त्रिंबकराव दाभाडे सेनापति व बांडे गायकवाड उदाजी पवार, व निजामनमुलकाची फौज ऐसी ढबईस आली. आह्मीही आपले फौजेनसीं डबईनजीक दों कोसांवरी दोन रोज मुक्काम केला. नित्य सेनापति कोसावरी येऊन युद्धास उभे राहात. तेथें युद्धास न बने, यास्तव छ ४ सवालीं कूच करून थवाई प्रांत डबई येथें आलों. सेनापति कुल फौजा जमा करून युद्धास आले. युद्ध जालें. सेनापति ठार पडले. मलोजी पवार पडले. जावजी दाभाडे पडले. पिलाजी गाईकवाडाचा लेक पडला. उदाजी पवार पाडाव आले. चिमाजीपंत धरून आणिले. पंधरा सतरा हत्ती व नगारे निशाणें पाडाव आलीं. बांडे गाईकवाड आनंदराव पळोन गेले. कुंवरबहाद्दर जखमी आहेत, पळाले, तुह्मांस कळावें यास्तव लिहिलें असे. तेथें मुस्तफाखान आहेत त्यास व पिलाजीचे फौजेस ताराज करणें आपले अंमल मुस्त करणें, पैका मेळवणें जाणीजे. छ ५ सवाल ता. ११ सवाल.''



# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ३ रें.] फेब्रुआरी, मार्च, एप्रिल १९११. [अंक ७।८।९.

विषयानुक्रम.

| विषय. | पृष्ठांक. |
| --- | --- |
| १ जुन्या ऐतिहासिक गोष्टी. ... ... ... ... | ७१–७६ |
| २ ऐतिहासिक स्फुट लेख. ... ... ... ... ... | १०७–११० |
| ३ ऐतिहासिक चरित्रें. ... ... ... ... ... ... | ८५–११० |
| ४ तंजावरचें राजघराणें. ... ... ... ... ... | ७३–८४ |
| ५ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें, भाग २ रा.... ... ... | १२१–२०० |
| ६ ऐतिहासिक टिपणें, भाग ३ रा. ... ... ... ... | ४१–५६ |

चित्रें—१ बेगम सुमरू. २ कर्नल स्किनर. ३ संभाजी राजे. ४ शहाजी राजे.
५ महमदअली. ६ सादतखान.

मुंबई येथें
तुकाराम जावजी ह्यांनीं
'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# काव्यसंग्रहग्रंथमाला.

## मोरोपंतकृत.

| | कि. रु. | ट. ख. आ. |
|---|---|---|
| १. महाभारत—१ आदिपर्व. ... ... ... ... ... ... | १। | ८≡ |
| २. महाभारत—२ सभापर्व. ... ... ... ... ... ... | ·॥= | ८- |
| ३. महाभारत—४ विराटपर्व. ... ... ... ... ... ... | ·॥।= | ८-॥ |
| ४. महाभारत—५ उद्योगपर्व. ... ... ... ... ... ... | १॥। | ८≡ |
| ५. महाभारत—६ भीष्मपर्व. ... ... ... ... ... ... | ·॥।· | ८- |
| ६. महाभारत—७ द्रोणपर्व. ... ... ... ... ... ... | १। | ८= |
| ७. महाभारत—८ कर्णपर्व. ... ... ... ... ... ... | २ | ·।· |
| ८. महाभारत—९ शल्यपर्व. ... ... ... ... ... ... | ·।= | ८- |
| ९. महाभारत—१० (गदापर्व) यांतच सौप्तिक आणि ऐषिक पर्वांचा अंतर्भाव झाला आहे. ... ... ... ... ... ... | १। | ८= |
| १०. महाभारत—११ स्त्रीपर्व. ... ... ... ... ... | ·।= | ८- |
| ११. महाभारत—१२ शांतिपर्व. ... ... ... ... ... ... | ·॥· | ८- |
| १२. महाभारत—१३ अनुशासनपर्व. ... ... ... ... | ·॥।· | ८= |
| १३. महाभारत—१४ अश्वमेधपर्व. ... ... ... ... | १ | ८= |
| १४. महाभारत—१५ आश्रमवासिकपर्व. ... ... ... ... | ·॥· | ८- |
| १५. महाभारत—१६ मौसलपर्व, १७ महाप्रस्थानिकपर्व, १८ स्वर्गारोहणपर्व. ... ... ... ... ... ... ... | ·॥· | ८- |
| १६. रामायणें—भाग पहिला. ... ... ... ... ... ... | १ | ८= |
| १७. रामायणें—भाग दुसरा. ... ... ... ... ... ... | २ | ·।· |
| १८. रामायणें—भाग तिसरा. ... ... ... ... ... ... | ·॥।· | ८-॥ |
| १९. रामायणें—भाग चौथा. ... ... ... ... ... ... | २॥ | ८≡ |
| २०. रामायणें—भाग पांचवा. ... ... ... ... ... ... | २। | ·।· |
| २१. कृष्णविजय—पूर्वार्ध. ... ... ... ... ... ... | ·॥।= | ८-॥ |
| २२. कृष्णविजय—उत्तरार्ध. ... ... ... ... ... ... | १॥। | ८≡ |
| २३. मंत्रभागवत—प्रथम माला.... ... ... ... ... | १। | ८= |
| २४. मंत्रभागवत—द्वितीय माला.... ... ... ... ... | ·॥= | ८- |
| २५. मंत्रभागवत—तृतीय माला.... ... ... ... ... | ·।= | ८- |
| २७. स्फुट काव्यें—भाग पहिला. ... ... ... ... ... | ३ | ·:· |
| २८. स्फुट काव्यें—(भाग दुसरा.) ... ... ... ... ... | १॥। | ·।. |
| २९. स्फुट काव्यें—(भाग तिसरा.) ... ... ... ... ... | १॥ | ८= |
| ३०. स्फुट काव्यें—(भाग चवथा.) ... ... ... ... ... | १। | ८= |
| ३१. केकावली—(आवृत्ती तिसरी.) ... ... ... ... ... | २ | ·।· |
| ३२. हरिवंश—पूर्वार्ध. ... ... ... ... ... ... ... | १॥ | ८≡ |
| ३३. हरिवंश—उत्तरार्ध. ... ... ... ... ... ... ... | १॥। | ·।· |



बेगम सुमरू.

# ४७. बेगम सुमरू.

हिंदुस्थानच्या इतिहासांत जीं अनेक स्थित्यंतरें घडून आलीं, व ज्या अनेक राज्यक्रांत्या झाल्या, त्यास कारणीभूत होणारे निरनिराळे प्रसंग व निरनिराळीं माणसें यांच्या कथा फार मनोरंजक व बोधपर अशा आहेत. अठराव्या शतकामध्यें हिंदुस्थानांतील एतद्देशीय राजेरजवाड्यांत कलह उत्पन्न होऊन जे अनेक तंटेबखेडे व रणकंदनें माजलीं, त्यांचा फायदा घेऊन पुष्कळ पाश्चात्य धाडसी लोकांनीं आपलें नशीब काढिलें. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं आपल्या शौर्यसाहसादि गुणांच्या जोरावर मोठमोठीं सैन्यें उभारलीं आणि राजकारणांत पडून स्वतःचें महत्त्व वाढविलें. यांपैकीं कित्येकांनीं एतद्देशीय संस्थानिकांच्या दरबारामध्यें आपलें वर्चस्व स्थापून, त्यांचीं राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतलीं; आणि एकदोघांनीं तर जहागिरी व मुलूख मिळवून स्वतःचीं संस्थानें स्थापिलीं. अशांपैकीं दिल्लीच्या राजकारणांत प्रसिद्धीस आलेला सारधान्याचा जहागिरदार जनरल सुमरू हा एक होय. ह्याची पत्नी इतिहासप्रसिद्ध रणशूर बेगम सुमरू ही होय. तिची अल्प माहिती येथें सादर करितों.

बेगम सुमरू हिच्या पतीचें मूळ नांव वॉल्टर रेनहार्ट हें असून, तो इ. स. १७५० चे सुमारास हिदुस्थानांत आला, व त्यानें प्रथम फ्रेंच सैन्यामध्यें नौकरी स्वीकारिली. तेथें त्यानें आपणांस 'समर' हें नांव घेतलें. तेव्हांपासून त्याचें नांव 'सोंबर' किंवा 'सुमरू' असें पडलें. पुढें तो बंगाल्यांत गेला, आणि तेथें त्यानें मीरकासीम याच्या सैन्यांत नौकरी पत्करिली. इ. स. १७६३ मध्यें बक्सार येथें झालेल्या लढाईत तो हजर होता. यानेंच मीरकासीम याच्या सांगण्यावरून इंग्लिश लोकांची पाटणा येथें कत्तल करून आपले नांवास कलंक लाविला. हा पुढें कांहीं दिवस लखनौचा नबाब सुजाउद्दवला व भरतपुरचा राजा जवाहिरसिंग जाट यांच्या पदरीं होता. तेथून पुढें तो दिल्लीस गेला, व तेथें त्यानें इ. स. १७७७ सालीं दिल्लीचा वजीर नजफखान याची नौकरी स्वीकारिली. नजफखानाचें दिल्लीदरबारांत विशेष प्राबल्य असल्यामुळें जनरल सुमरू याचें तेथें बरेंच प्रस्थ वाढलें, व त्यानें तेथें आपल्या नांवाचें स्वतंत्र पथक उभारिलें. त्याच्या खर्चासाठीं नजबखानानें त्यास मेरट प्रांतांत सारधाना येथें मोठी जहागीर दिली. तेथें त्यानें तटबंदी किल्ला बांधून आपलें संस्थान स्थापिलें.

दिल्लीस असतांना त्यानें एका मुसलमान उमरावाच्या सुस्वरूप मुलीबरोबर लग्न लाविलें. हीच बाई पुढें बेगम सुमरू या नांवानें फार प्रसिद्धीस आली. हिची

चरित्रकथा, राजकारणांत व शौर्यगुणांत प्रसिद्धीस आलेल्या चांदबिबी, नूरजहान या लोकोत्तर स्त्रियांच्या चरित्राप्रमाणें, मोठी मनोरम व वाचनीय आहे. कॅप्टन मुंडी नांवाच्या एका युरोपियन गृहस्थानें हिंदुस्थानांतील आपल्या प्रवासवृत्तामध्यें असें लिहिलें आहे कीं, या स्त्रीचें संपूर्ण चरित्र जर उपलब्ध झालें, तर तें फार चमत्कृतिप्रचुर असून, इतर स्त्रियांच्या चरित्रांपेक्षां अधिक मनोरंजक आहे असें दिसून येईल. असो.

जनरल सुमरू हा इ. स. १७७८ सालीं आग्रा येथें मृत्यु पावला, व त्याच्या मागें जहागिरीची व्यवस्था व फौजेचा अधिकार बेगम सुमरू इजकडे आला. बेगम सुमरू हिनें स्वतः सैन्याचें आधिपत्य घेऊन, आणि युद्धकलाकुशल व शूर अशा फ्रेंच लोकांस आपल्या लष्करांत मोठमोठ्या जागा देऊन, आपल्या सैन्याची चांगली सुधारणा केली. ह्या सैन्यानें दिल्ली येथील घडामोडींत चांगला पुढाकार घेऊन, आपली कर्तबगारी दाखविली. हें सैन्य म्हटलें म्हणजे, पांच पायदळ पलटणी, मोंगल घोडेस्वारांचा एक रिसाला, आणि चाळीस तोफा इतकें होतें. यामध्यें तीनशें युरोपियन लोक असून त्यांतील बरेचसे लोक तोफखान्यावरील गोलंदाज होते. बेगम सुमरू हिनें आपल्या सैन्यावर जॉर्ज टॉमस या नांवाचा एक मुख्य सेनापति नेमिला होता, तो पुढें फार प्रसिद्धीस आला. इ. स. १७८८ मध्यें इस्मायल बेग व गुलामकादर यांचें दिल्ली येथें मोठें बंड झालें. त्यांत त्यांनीं दिल्लीचा बादशाहा शहाअलम यास पळवून लाविलें. त्या प्रसंगीं बेगम सुमरू व तिचा सेनापति जॉर्ज टॉमस यांनीं बादशाहास फार मदत केली. गोकुळगड येथें गुलाम कादर याचा साथीदार नजबकुलीखान ह्यानें प्रमत्त होऊन बादशाहाच्या विरुद्ध पुंडावा माजविला. त्याजवर बादशाहानें आपलें मोंगल सैन्य बरोबर घेऊन स्वतः स्वारी केली. त्या प्रसंगीं नजबकुलीच्या लोकांनीं बादशाहाच्या सैन्यावर आकस्मिक छापा घालून खुद्द बादशाहाच्या तंबूपर्यंत चाल केली; आणि बादशाही निशाण हस्तगत करून, बादशाहास कैद करण्यापर्यंत मजल आणिली. परंतु बेगम सुमरू हिनें वेळेवर साहाय्य केल्यामुळें तो प्रसंग टळला. या वेळीं बेगम सुमरू स्वतः पालखींत बसून, तीन पलटणी बरोबर घेऊन बादशाहाच्या मदतीस आली; आणि तिनें शत्रूच्या घोडेस्वारांवर बंदुकांचा व तोफांचा भडिमार करून त्यांस पळवून लाविलें. या शौर्याबद्दल बादशाहानें बेगम सुमरू हिची भरदरबारांत वाहवा केली व तिला 'जेबुन्निसा' (स्त्रीजातीचा अलंकार) असा किताब दिला; आणि तिच्या सैन्याच्या खर्चासाठीं मिरत प्रांतामध्यें बरींच गांवें जहागीर करून दिलीं.

शहाआलम बादशाहा गोकुळगड येथून पुन्हां दिल्लीस गेला; व तेथें त्यानें पुन्हां आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. त्याच्या मदतीस बेगम सुमरूचें

एक पलटण सिद्ध होतें. परंतु गुलाम कादर व इस्मायल बेग यांच्या सैन्याचा जमाव मोठा असल्यामुळें त्यापुढें बादशाहाचें कांहीं चाललें नाहीं. शेवटीं त्यास त्यांच्या ताब्यांत जाऊन फार हालअपेष्टेंत दिवस काढावे लागले. इ. स. १७८९ सालीं महादजी शिंदे हे आपलें लढाऊ सैन्य बरोबर घेऊन दिल्लीवर चालून आले, आणि त्यांनीं गुलाम कादराचा पराभव करून बादशहास बंधमुक्त केलें व त्याची दिल्लीच्या सिंहासनावर पुन्हां स्थापना केली. ह्याप्रमाणें दिल्ली येथें मराठ्यांचा अंमल पूर्ण संस्थापित झाला. त्यानंतर दिल्ली येथील रोहिल्यांचें बंड समूळ नाहींसें झालें. या सर्व प्रसंगीं बेगम सुमरू व तिचें सैन्य हें मराठ्यांस सहाय होतें, एवढेंच नव्हे, तर दिल्ली येथील पेशव्यांच्या वकिलाच्या बातमीपत्रामध्यें बेगम सुमरू व तिचीं पलटणें यांचा उल्लेख अनेक वेळां दृष्टीस पडतो. हें सैन्य शिंद्यांचे वतीनें अनेक लढायांमध्यें हजर असल्याचें दिसून येतें. आसई येथील लढाईमध्यें सुमरूचें सैन्य शिंद्यांच्या मदतीसाठीं रणांगणावर आलें होतें. यावरून शिंद्यांच्या लष्करांतील फ्रेंच सेनापतीस, बेगम सुमरूच्या शिस्तवार व सुशिक्षित सैन्याची मदत विशेष उपयुक्त वाटत असावी, व त्यांनीं द्रव्यद्वारें त्यांस वश व अनुकूल केलें असावें, हें उघड आहे. बेगम सुमरू ही फार शूर व धाडसी बाई असून तिच्या ठिकाणीं धैर्य व प्रसंगावधान हे गुण अलौकिक होते. इ. स. १८०३ मध्यें इंग्रज सेनापति लॉर्ड लेक ह्यांनीं दिल्ली घेतल्यानंतर बेगम सुमरू ही इंग्रजांस मिळाली, व तेव्हांपासून मरेपर्यंत ती राजनिष्ठेनें राहिली. ती इ. स. १८३६ सालीं सारधाना येथें मृत्यु पावली. सारधाना येथील तिची जहागीर तिचे वंशज अद्यापि उपभोगीत आहेत.

बेगम सुमरू हिनें ख्रिस्ती धर्म स्वीकारिला होता. तिनें मीरत येथें एक कॅथोलिक चर्च बांधलें असून, कलकत्ता, मद्रास, आग्रा व मुंबई येथील कॅथोलिक देवालयांस मोठमोठ्या देणग्या दिल्या आहेत. यावरून ही बाई जशी शूर होती तशीच धार्मिक व उदार होती, असेंही दिसून येतें. हिच्या जहागिरीचें उत्पन्न सुमारें पांच सहा लाखांचें होतें. बेगम सुमरू हिचें नांव मीरत प्रांतांत फार प्रसिद्ध असून, तिचा राजवाडा सारधाना येथें अद्यापि अस्तित्वांत आहे. ह्या राजवाड्यामध्यें ऐतिहासिक चित्रांचा संग्रह फार मौल्यवान् होता. तो सांप्रत अलाहाबाद येथील 'गव्हर्मेंटहौस' मध्यें आहे असें ह्मणतात.

# ४८. कर्नल स्किनर.

अठराव्या शतकाच्या शेवटास महादजी शिंदे यांनीं प्रचंड सैन्य जमवून मराठ्यांच्या सत्तेचा सर्व उत्तर हिंदुस्थानभर प्रसार केला, आणि रजपूत, मोंगल, रोहिले या सर्वांस आपल्या कह्यांत आणिलें, हें इतिहासवाचकांस श्रुतच आहे. महादजी शिंदे यांस या कामीं यशःसिद्धि प्राप्त करून देण्यास अंबूजी इंगळे, जिऊबा दादा, लखबा दादा, आप्पा खंडेराव, गोपाळरावभाऊ वगैरे मराठी योद्धे जसे कारणीभूत झाले, त्याजप्रमाणें डि बायन्, जॉर्ज टॉमस्, पेरन इत्यादि अनेक युरोपियन् योद्धेही कारणीभूत झाले, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

महादजी शिंदे इ. स. १७९४ मध्यें मृत्यु पावले, व त्यांच्या मागून दौलतराव शिंदे गादीवर बसले. त्यांचे कारकीर्दींत तर हे धाडसी युरोपियन योद्धे मोठे सत्ताधारी बनून, त्यांनीं सर्व लष्करी सत्ता आपल्या मुठींत आणिली होती. हे युरोपियन लोक मूळचे बहुतेक दीन स्थितींतून उदय पावलेले असून, एतद्देशीय संस्थानिकांच्या पदरीं लष्करी पेशाची नोकरी स्वीकारून आपल्या कर्तबगारीच्या व शौर्याच्या जोरावर प्रसिद्धीस आले होते. त्यांनीं पुढें शिरजोर होऊन व स्वतंत्र सैन्य उभारून, एतद्देशीय राजेरजवाड्यांच्या आपआपसांतील कलहांत पुढाकार घेऊन अतिशय संपत्ति मिळविली, आणि तेच स्वतंत्र सत्ताधारी बनले. यामुळें अठराव्या शतकाच्या अगदीं शेवटीं, 'बळी तो कान पिळी' अशी स्थिति होऊन चोंहींकडे झोटिंगबादशाही माजली. त्या योगानें ब्रिटिश राजसत्तेस आपलें सार्वभौमत्व संस्थापित करून हिंदुस्थान पादाक्रांत करण्यास बरेंच सुलभ झालें. असो.

महादजी शिंदे यांच्या लष्करांत, वर सांगितलेले जे युरोपियन लोक प्रसिद्धीस आले, त्या सर्वांचीं चरित्रें मनोरंजक असून, तत्कालीन देशस्थितीचा त्यांपासून चांगला बोध होण्यासारखा आहे. त्यांत विशेषेंकरून, डि बायन् व पेरन या दोन फ्रेंच योद्ध्यांचीं चरित्रें फारच महत्त्वाचीं आहेत. त्याप्रमाणेंच पेरन ह्याच्या हाताखालीं प्रसिद्धीस आलेला लष्करी योद्धा कर्नल स्किनर याचेंही चरित्र फार महत्त्वाचें आहे. त्याची त्रोटक माहिती आह्मी येथें सादर करितों.

कर्नल स्किनर याचें नांव जेम्स् हें असून, त्याचा जन्म इ. स. १७७८ त झाला. याचा बाप जातीनें स्कॉच असून, तो ईस्ट इंडिया कंपनींत एक अंमलदार होता. त्याची बायको एका रजपुताची मुलगी होती. हिचा बाप मिरझापूर प्रांतांतील एक जमीदार होता. काशीचा राजा चेतसिंग याजबरोबर इंग्रजांची जी लढाई झाली, तींत ही मुलगी जेम्स् स्किनरच्या बापाच्या ताब्यांत आली.

ती सुस्वरूप असल्यामुळें त्यास तिची दया येऊन, त्यानें तिच्याशीं लग्न लाविलें. या रजपूत स्त्रीच्या पोटीं कर्नल स्किनर याचा जन्म झाला. या बाईस आणखी दोन मुलगे व तीन मुली झाल्या. हिचे दोन्ही मुलगे शिपाईगिरीच्या कामांत शिरले, व ते पुढें फार प्रसिद्धीस आले.

जेम्स स्किनर हा लहानपणापासून महाचपळ व धाडसी वृत्तीचा होता. त्यानें इ. स. १७९५ मध्यें शिंद्यांचा सुप्रसिद्ध सेनापति डि बायन् याच्या हाताखालीं नोकरी पत्करिली. त्यास प्रथम दीडशें रुपये पगारावर एका लहानशा तुकडीचे कॅप्टन नेमण्यांत आलें. या हुद्यावरून तो वाढत वाढत, पुढें स्वतंत्र सेनापति झाला. त्यानें डि बायन् याच्या हाताखालीं राहून आपलें शौर्य प्रगट करण्यास सुरुवात केली नाहीं तोंच, डि बायन् यानें आपल्या सेनापतीच्या जागेचा राजीनामा दिला, व त्याचे जागीं कर्नल सदरलंड व पेरन हे सेनापति झाले. यांचे हाताखालीं राहून स्किनर यानें अनेक शौर्याचीं कामें केलीं. बुंदेलखंडामध्यें लखबादादाच्या मदतीस जाऊन बुंदेले राजांस त्यानें शिंद्यांच्या अमलाखालीं आणिलें. स्किनर यानें मराठी सेनापतींच्या सहवासानें मराठ्यांची युद्धकला माहित करून घेतली, आणि त्यांत तो पूर्ण तरबेज झाला.

इ. स. १७९६ मध्यें पेरन हा शिंद्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतील सेनेचा मुख्य अधिपति झाला, व तो मथुरेस येऊन राहिला. या सुमारास महादजी शिंद्यांच्या स्त्रियांनीं ग्वालेर येथें बंड केलें, ह्मणून पुष्कळ सैन्य पाठविण्यांत आलें. त्यांत स्किनर याची पलटण तिकडे गेली. तिचें चांदखोरी येथें मोठें युद्ध झालें. त्यांत कॅप्टन बटरफिल्डनामक दुसऱ्या एका सेनापतीचा मोठा पराभव झाला. पण ह्या प्रसंगीं स्किनर यानें आपलें विलक्षण शौर्य दाखविलें ह्मणून त्याची फार प्रशंसा होऊन शिंद्यांचा मुख्य सेनापति पेरन यानें त्याची बढती केली. यापुढें महादजी शिंद्यांच्या बायकांचा स्वतंत्र पक्ष बनून, लखबादादा, अंबुजी इंगळे वगैरे सरदार त्यांना मिळाले व ते सर्व चितोरगड येथें गेले. त्यांचीं पुढें आपसाआपसांत अनेक रणकंदनें सुरू झालीं. त्याचा वृत्तांत देण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

कर्नल स्किनर यानें, या दुफळीच्या स्थितीमध्यें, जेथें जेथें शिंद्यांच्या बाजूनें लष्करी कामगिरी बजावण्याचा प्रसंग आला, तेथें तेथें आपलें शौर्य चांगल्या रीतीनें प्रगट केलें. जयपूर, मालपुरा, दिल्ली, आग्रा वगैरे ठिकाणच्या चकमकीं-मध्यें स्किनर यानें चांगलें नांव मिळविलें. यानंतर दौलतराव शिंद्यांच्या दरबारांत फारच बखेडा माजला व त्यांचे लष्करी अधिकारी जागोजाग स्वतंत्र होऊन ते दरबारास जुमानीनासे झाले. त्यामुळें त्यांच्यामध्यें एकोपा न राहून शिंद्यांची

सत्ता विस्कळित व निर्बळ झाली. तेव्हां इ. स. १८०३ मध्यें लार्ड लेक ह्यांनीं शिंद्यांच्या सैन्याबरोबर लढाया करून, त्यांच्या ताब्यांतून उत्तर हिंदुस्थान जिंकून घेतलें. शिंद्यांच्या लष्करी अधिकाऱ्यांमध्यें आपआपसांत वैमनस्यें असल्यामुळें त्यांचे पदरचे युरोपियन लोक तेव्हांच इंग्रजांस जाऊन मिळाले. त्यांमध्यें कर्नल स्किनर हाही एक होता. यानें इ. स. १८०३ नंतर लार्ड लेक यांच्या हाताखालीं मोठमोठीं शौर्याचीं कामें केलीं, व पुढें तो इंग्रजी सैन्यांत फार प्रख्यात झाला. कर्नल जेम्स स्किनर हा इ. स. १८४१ मध्यें हांसी येथें मृत्यु पावला. त्याचें प्रेत मोठ्या लष्करी थाटानें दिल्लीजवळ 'सितारामकी सराई' नांवाची जागा आहे, तेथें पुरण्यांत येऊन त्याजवर सुंदर थडगें बांधण्यांत आलें आहे.

जेम्स स्किनर यास इंग्रजी भाषेपेक्षां फारसी भाषा जास्त अवगत असून, तो त्या भाषेतच आपला पत्रव्यवहार करीत असे, व दिनचर्याही लिहून ठेवीत असे. त्याचें आत्मचरित्र मूळ फारसी भाषेंत असून, तें कर्नल बेली फ्रेजर यांनीं इंग्रजी भाषेंत भाषांतररूपानें प्रसिद्ध केलें आहे. या चरित्रामध्यें शिंद्यांच्या उत्तर हिंदुस्थानांतील राजसत्तेच्या अभ्युदयाचा व ऱ्हासाचा इत्थंभूत वृत्तांत आला आहे. तो इतिहासदृष्ट्या फारच महत्त्वाचा आहे.



## २०. शिवाजी व संभाजी राजे ह्यांच्या दोन सनदा.

श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज व संभाजी महाराज ह्यांच्या वेळचे अस्सल कागदपत्र प्रायः लुप्तप्राय झाले असल्यामुळें ते फार दुर्मिळ आहेत. ते जसजसे उपलब्ध होतील, तसतसा त्या काळांतील इतिहासावर अधिक अधिक प्रकाश पडेल ह्यांत शंका नाहीं. हे कागदपत्र ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे असल्यामुळें, ते अस्सलबरहुकूम 'इतिहाससंग्रहा'मध्यें प्रसिद्ध होणें इष्ट आहे असें जाणून, ते वेळोवेळीं प्रसिद्ध करण्याचा आह्मीं विचार केला आहे. प्रस्तुत अंकामध्यें, शिवाजी व संभाजी महाराज ह्यांच्या दोन जुन्या सनदा, आमचे मित्र श्री० शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी ह्यांस, रा. रा. काशीनाथ नारायण साने ह्यांचे मार्फत, महाबळेश्वर येथील वे. रा. मोर दीक्षित बिन नारायण दीक्षित ह्यांच्या कडून मिळालेल्या, आमचेकडे आल्या आहेत. त्या आह्मी येथें सादर करितों.

### लेखांक १.

ही सनद शिवाजी महाराज ह्यांनीं गोपाळ भट बिन श्रीधर भट वास्तव्य महाबळेश्वर ह्यांस इ. स. १६५३ मध्यें दिली आहे. सदरहू भटजी "भले थोर अनुष्ठाते, सूर्यउपासनी, पद्महस्ती" ऐसें जाणून, महाराजांनीं त्यांच्याकडून मंत्रोपदेश घेतला, आणि त्यांस सूर्याप्रीत्यर्थ प्रतिवर्षीं अनुष्ठान करावयास सांगून वर्षासन दिलें, त्या संबंधाची आहे.

**श्री.**

**"वेदमूर्ति गोपाळभट बिन श्रीधरभट वास्तव्य श्री माभलेश्वर.**

शिक्का.*

**स्वस्ति श्री शके १५७४ नंदन नाम संवत्सरे फाल्गुन सुध प्रतिपदा रविवासरे ते दिनीं गोसावी यांप्रति विद्यार्थि सिवाजी राजे दंडवत विनंति लिखेजीः– स्वामी भले थोर, अनुष्ठाते, सूर्यउपासनी,**

---

* ह्या शिक्क्यामध्यें पुढील मजकूर असावा असें दिसतें. शिक्क्यांतील अक्षरें जीर्णतेमुळें अगदीं अस्पष्ट झालीं आहेतः—

" प्रतिपच्चंद्ररेखेव
वर्धिष्णुर्विश्ववंदिता । शाह
सूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय
राजते ॥"

पद्महस्ती, येसे जाणोन, आपण, मातुश्री जिजाबाई आऊसाहेब व वेदमूर्ति प्रभाकरभट उपाधे यांच्या विद्यमानें, स्वामीपासून मंत्र-उपदेश संपादिला. स्वामी आपले गुरु, स्वामीस आपण आपले अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान सांगितलें. प्रतिवर्षी वर्शासन द्यावयाची मोईन केली असे. बि त॥:—

वर्शासन.

| | |
|---|---|
| नख्त होन १०० | प॥ गल्ला नवसेरी बारुले मापें खंडी. |
| वजन टकबंदी | ४ तांदूळ |
| ·१४ तूप | ४ नागली |
| ·१४ तेल | |
| ·॥३. | |

सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान प्रतिवर्षी करावें त्यास सामग्री व पूजाः—

| आरक्त वस्त्रें | वजन चंदन |
|---|---|
| २ | ८८५ शुभ्र |
| | ८८५ आरक्त |
| | ८।. |

अनुष्ठानसमई नेसावयास आसन.

१ पीतांबर
१ शाल
१ आसन
३

येणेप्रमाणें होन प॥ ऐकसे व गल्ला नवसेरी बारुले मापें खंडी आठ, वजन टकबंदी सवाआठरा मण, व आरक्तवस्त्रें दोनी व पीतांबर येक व शाल येक व आसन येक प्रमाणें वरशासन व पूजासामग्री मोईन, दानपत्र करून दिल्हें आसे. स्वामींनीं आमचे अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ प्रतिवरसीं अनुष्ठान उत्तरोत्तर करावें, व मंत्र उपदेसही स्वामीचे वंशपरंपरेनें आमचे वंशपरंपरेस करावा. आपण संकल्पपूर्वक प्रतिवरसीं वरशासन दानपत्र करून स्वामीस दिल्हें, हें आपले वंशपरंपरेनें उत्तरोत्तर चालवावें. यास अन्यथा करूं तरी श्री महादेव साक्ष. स्वामींनीं निरंतर देवापासीं आमचें कल्याण इच्छावें. लेखनालंकार. मोर्तब."

## लेखांक २.

ही सनद गोपाळभटाचे चिरंजीव रामभट ह्यांस, संभाजी राजे ह्यांनीं राजशक ८ ह्मणजे इ. स. १६८२ सालीं करून दिली आहे. ह्या सनदेवरून शिवाजी महाराजांचें दुसरें नांव 'आबासाहेब' असें होतें हें व्यक्त होतें. सदरहू भटजीस वर्षासनाची रक्कम पूर्वी शिवाजी महाराजांचे वेळीं हुजूर खजिन्यांतून मिळत असे, ती शिवाजी महाराज मृत्यु पावल्यानंतर बंद पडली; व ह्याच सुमारास गोपाळभट मृत्यु पावले, सबब त्यांचे चिरंजीवांनीं महाराजांस दुसरी सनद देण्या-

बद्दल विनंति केली. त्यावरून संभाजी महाराजांनीं आपल्या वडिलांचें 'संकलित आहे तें चालवावें हें अगत्य जाणोन' ही दुसरी सनद करून दिली आहे. ह्या सनदेमध्यें 'हुजूर ऐवज न पावे ह्मणवून नख्त जिन्नस सुभेमजकुरावरी देविले असे.' असा उल्लेख आहे, तो लक्षांत ठेवण्यासारखी आहे. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर अवघ्या वर्ष दोन वर्षांत राजकीय स्थितीमध्यें काय अंतर पडलें, त्याचें हें दर्शक आहे. तात्पर्य, हेंही पत्र अतिशय महत्त्वाचें आहे.

श्री.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ८ दुर्मतीनाम संवत्सरे कार्तिक सुध शस्टी रविवासरे क्षेत्रीय कुलावतंश सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपति स्वामी यांनीं राजश्री कासी रंगनाथ देशाधिकारी व लेखक प्रांत जाउली यांसी आज्ञा केली येसीजेः– वेदमूर्ति रामभट बिन गोपालभट अग्नहोत्री माभलेश्वरकर यांनीं हुजूर येऊन विदित केलें कीं, आपले पिते गोपाळभट बिन श्रीधरभट यांजपासून, माहाराज कैलासवासी यांनीं मंत्रउपदेश घेऊन, आपल्या अभ्योदयाकारणें सूर्येप्रीत्यर्थ अनुष्ठान सांगितलें. त्यास वर्षासन दानपत्र मोईन करून आमचे पिते यांसी दिल्ही; तेणेप्रमाणें चालत आलें आहे. सांप्रत महाराजें चालविलें पाहिजे, म्हणऊन विदित केलें. तेणेप्रमाणें दानपत्र दाखविलें व सुभाचें पत्र दाखविलें. त्यास, अस्सल पत्रामध्यें लिहिलें कीं, स्वामी भले, थोर, अनुष्ठाते, सूर्येउपासनी, पद्महस्ती येसें जाणोन आम्ही स्वामीपासून मंत्रउपदेश संपादिला; त्यावरून आपल्या अभ्योदयार्थ सूर्येप्रीत्यर्थ अनुष्ठान सांगितलें. त्यास वर्षासन प्रतिवरुसीं द्यावयाची मोईन केली असे. बितपशीलः—

श्रीशंभु
भजनोत्कंठ मोरे-
श्वरसुत नीलकंठ.

| वर्षासन | | सूर्येप्रीत्यर्थ अनुष्ठान प्रतीवरुसीं यास सामोग्री व पूजा. | |
|---|---|---|---|
| होन पातशाही | गल्ला नवसेर बारुल | | |
| १०० | मापें खंडी | आरक्तवस्त्रें | वजन टा॥ चंदन |
| वजन टा॥ | ४ तांदूळ | २ | ८८५ शुभ्र चंदन |
| १४ तूप | ४ नागली | अनुष्ठानसमयीं | ८८५ आरक्त चंदन |
| १४ तेल | ८ | नेसावयासी व | ८।. |
| ·॥।३ | | आसन | |
| | | १ पीतांबर | |
| | | १ शाल | |
| | | १ आसन | |
| | | ३ | |

ये॥ होन प॥ येकसे व गल्ला नवसेर बारुले मापें खंडी आठ व वजन सवाआठ मण व आरक्त वस्त्रें दोनी व पीतांबर येक व शाल येक व आसन येक येणेप्रमाणें दानपत्र करून दिल्हें. स्वामीनीं आमचे अभ्योदयार्थ सूर्येप्रीत्यर्थ अनुष्ठान प्रतिवरुसीं करावें व मंत्र उपदेशही स्वामींचे वौषपरंपरेनें आमचे वौषपरंपरेस करावा. आपण संकल्पपूर्वक वर्षासन दानपत्र प्रतिवरुसीं करून दिल्हें असे. आपले वौषपरंपरेनें स्वामींचे वौषपरंपरेस उत्तरोत्तर चालवावें. यासी अन्यथा करूं तरी श्री महादेव साक्ष. स्वामीनीं निरंतर देवापासीं आमचें कल्याण इच्छावें. यैसें दानपत्र माहाराज आबासाहेब कैलासवासी स्वामीनीं भट गोसावी यांस करून दिल्हें. तें मनास आणून व सुभाचे पत्र मनास आणून, त्यावरून राजश्री आबासाहेबांचें संकल्पित आहे तें चालवावें हें आम्हांस अगत्य जाणोन, हाली वेदमूर्ति रामभट बिन गोपाळभट यास वर्षासन सदरहू प्र॥ सनद करून दिल्ही असे. पूर्वीं नख्त होन पा॥ १०० येकसे हुजूर पोतापैकीं पावत होते व वरकड जिन्नस सुभा पावत होता; त्यास हुजूर यैवज न पावे म्हणऊन नख्त जिन्नस सदरहूप्रमाणें सुभेमजकुरावरी देविले असे. तेणें-प्रमाणें भट गोसावी यांस साल दरसाल पावीत जाणें. ताज्या पत्राचा उजूर न कणें. तालिक लेहून घेऊन असल पत्र भोगवटीयास परतोन भटगोसावी यांसी देणें. (मोर्तब)"



इ. स. १७४४ पासून इ. स. १७५० पर्यंत मुरारराव घोरपडे यांच्या हालचालींची विशेष माहिती उपलब्ध नाहीं. तथापि, या मुदतीमध्यें त्यानीं सोंडूर, गुत्ती व त्या सभोंवतालचा बराच प्रांत आपल्या ताब्यांत घेऊन, कर्नाटकामध्यें ते बरेच सत्ताधारी झाले होते, यांत शंका नाहीं. निजामउल्मुलुकानें इ. स. १७४४ मध्यें त्रिचनापल्ली घेतल्यानंतर अर्काटची सुभेदारी अनवरुद्दीनखान यास दिली व आपला नातू मुजफरजंग यास कर्नाटक प्रांताचा अधिपति नेमिलें. इ. स. १७४८ मध्यें निजामउल्मुलुक हा बऱ्हाणपूर येथें मृत्यु पावला, व त्या योगानें कर्नाटकामध्यें बरेच घोटाळे उत्पन्न झाले. निजामउल्मुलुकाचा थोरला पुत्र गाजीउद्दीन हा दिल्ली येथें असल्यामुळें त्याचा दुसरा पुत्र नासीरजंग हा दक्षिणचा सुभेदार झाला. परंतु त्यास दिल्लीच्या बादशाहाच्या निमंत्रणावरून उत्तरेकडे जाण्याचा प्रसंग आला. ही संधि साधून त्याचा पुतण्या मुजफरजंग यानें कर्नाटकांत बंड केलें, व आपणच दक्षिणच्या सुभेदारीवर हक्क सांगूं लागला. या प्रसंगीं कर्नाटकांतील राजकारणांत सुप्रसिद्ध असलेली दुसरी एक व्यक्ति पुन्हां रंगभूमीवर येऊन दाखल झाली. ही व्यक्ति ह्मणजे चंदासाहेब होय. ह्यानें इ. स. १७४८ पर्यंत साताऱ्च्या किल्ल्यावर कारागृहवास भोगून, फ्रेंच लोकांच्या साह्यानें मराठ्यांस बरीचशी खंडणी देऊन आपली मुक्तता करून घेतली. त्यानें पुनः कर्नाटकांत प्रवेश करितांच, मुजफरजंगाचा पक्ष स्वीकारून भांडणास सुरुवात केली. अर्थात् कर्नाटकामध्यें अशा प्रकारचे राजकीय कलह सुरू झाल्यामुळें, इंग्रज, फ्रेंच इत्यादि परराष्ट्रीय लोक; ह्मैसूर, तंजावर येथील राजे; आणि सभोंवतालचे पाळेगार व जमीनदार ह्यांस आपला स्वार्थ साधून घेण्यास चांगली संधि मिळाली.

मुरारराव घोरपडे ह्यांनींही ह्या कलहाचा फायदा घेऊन, आपल्या शौर्यबलानें इ. स. १७५० पासून १७५३ पर्यंत आपलें पुष्कळ हित साधून घेतलें. त्यांनीं कर्नाटकामध्यें दुसऱ्यास सहाय होऊन जीं शौर्याचीं कामें केलीं, त्यांचें सविस्तर वर्णन, कर्नाटकचा इतिहासकार 'आर्म्' यानें दिलें आहे. त्यावरून मुाररावाचें सैन्य– विशेषतः घोडेस्वार, हे युद्धकलेमध्यें अतिशय प्रवीण असून, ते प्रतिपक्षास अगदीं कर्दनकाळ असे वाटत असत, असें स्पष्ट दिसून येतें. युद्धकलेंत निष्णात असलेले त्या वेळचे फ्रेंच व इंग्रज सेनापति यांनींही मुराररावाच्या सैन्याची व युद्धकुशलतेची फार तारीफ केली आहे. त्यांच्या सैन्यावर इन्निसखान व भुजंगराव घोरपडे असे दोन शूर सरदार होते. त्यांनीं श्रीरंगम्, त्रिणोमाली, त्रिचनापल्ली वगैरे ठिकाणच्या लढायांमध्यें फार मर्दुमकीचीं कामें केलीं. मुरारराव

हे कोणत्याही एका पक्षास चिकटून राहिले होते असें दिसत नाहीं. ते कांहीं वेळ इंग्रजांच्या बाजूनें लढतांना दृष्टीस पडतात, तर कांहीं वेळ फ्रेंचांच्या बाजूनें लढतांना दिसतात. त्याचें बरोबर वर्णन, मेजर लॉरेन्स् यांनीं आपल्या एका लेखामध्यें केलें आहे. त्यावरून, जिकडून अर्थ अधिक साधेल तो त्यांचा पक्ष होता, असें दृष्टोत्पत्तीस येतें.* त्या वेळची कर्नाटकची परिस्थिति लक्ष्यांत घेतली तर मुराररावांच्या ह्या वर्तनाचें फारसें आश्चर्य वाटणार नाहीं.

कर्नाटकच्या ह्या उलाढालींत पेशव्यांचा बराच हितसंबंध होता. तथापि प्रत्यक्ष रीतीनें पेशव्यांच्या सैन्यानें ह्या लढायांमध्यें भाग घेतल्याचें दिसत नाहीं. मुरारराव घोरपडे यांचें सैन्य ठिकठिकाणीं युद्धास सिद्ध असे. परंतु तें पेशव्यांच्या वतीनें किंवा पेशव्यांच्या आज्ञेवरून जात असे, असें मात्र ह्मणतां येणार नाहीं. इ. स. १७५३ पर्यंत मुरारराव घोरपड्यांचा व पेशव्यांचा सेव्यसेवकसंबंध जडलेला दिसत नाहीं. उलट, मुराररावांच्या शौर्याची तारीफ व त्यांजवर मेहरबानी करण्याची शिफारस, फ्रेंच गव्हर्नर ड्युप्ले यानें ह्या वर्षी पेशव्यांच्या वकिलाजवळ केल्याचा दाखला सांपडतो.† ह्यावरून मुरारराव घोरपडे हे आतांपर्यंत केवळ स्वतंत्रपणानें व स्वेच्छेनें वागत असून, ते स्वतःच्या हिमतीवर व सामर्थ्याच्या जोरावर कर्नाटकांत प्रसिद्धीस आले होते हें उघड आहे.

* "Morarrow is a Mahratta, who by supporting the divisions in the country has made himself considerable from a small beginning. He sides with no party but as he finds his advantage in it, and as easily changes sides; he commands about 3,000 very good horse. When he is not employed or paid by any Prince, he scours the country for himself, and raises contributions where he can get most and with least work."

—*Memoirs of Captain Dalton P. 121.*

† रा० राजवाडेकृत मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें भाग पहिला, यांतील लेखांक १५ पहा. या पत्रामध्यें पेशव्यांच्या वकिलाजवळ मुसा बुस्सीनें असें बोलून दाखविलें कीं:—

"गोवरनदोर यांहीं आह्मांस लिहून पाठविलें आहे. साता रोजांनीं खत आलें. लिहिलें आहे कीं, मुरारराव घोरपडे यांहीं तिरचनापल्लीस आमचे फौजेबरोबर राहोन बहुत ज्यांफीशानी केली. सुभानराव, मुरारराव यांचा भाऊ कामास आला. याजकरितां तुह्मीं रावसाहेबांस लिहून पाठवावें कीं, मुरारराव आपले जाणोन यांजवर मेहेरबानी करावी, ह्मणोन लिहिलें आहे. तर तुह्मी हे गोष्ट रावसाहेबांस लेहून मुरारराव यांजवर नेकनजर धरीत तें करावें, व आमचे गोवरनदोरास रावसाहेबांचें खत आणवावें, कीं तुमचे लिहिलेप्रमाणें मुसा बुसी यांहीं मुरारराव याविषयीं आह्मांस सांगितलें; आह्मी त्याजवर खुष आहों; येखलासांत तफावत होणार नाहीं. ऐसें पत्र आलियानें आमचे खावंद आह्मांवर संतोषी होतील. ह्मणून बोलिले."

यानंतर मात्र त्यांचा व पेशव्यांचा प्रत्यक्ष संबंध घडून आला, व पुढें त्यांना 'सेनापति' हा किताब मिळून ते मराठ्यांच्या अग्रणी सरदारांपैकीं एक बनले.

मुरारराव घोरपड्यांचा व पेशव्यांचा संबंध केव्हांपासून घडला, हें नक्की सांगतां येत नाहीं. परंतु इ. स. १७५६ मध्यें सावनूरचे नवाबावर पेशव्यांची स्वारी झाली, त्या वेळेस बाळाजी बाजीराव पेशव्यांनीं ह्या युद्धकलाकुशल व रणशूर मराठे सरदारास आपल्या बाजूस सामील करून घेतलें असावें, असें दिसून येतें. या समयीं पेशव्यांच्या वतीनें महादाजी अंबाजी पुरंधरे यांनीं लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे. तें येणेंप्रमाणें:–

श्री.

"राजश्री मुरारराव घोरपडे वजारतमाब गोसावी यांसीं:–

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ महादाजी अंबाजी आशीर्वाद विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे. विशेषः—पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन संतोष जाहला. स्नेहाचा अर्थ लिहिला व राजश्री पंतप्रधान यांनीं आह्मांस बंधु ह्मणविलें आहे. जे गोष्ट लोकोत्तरांत उत्तम दिसे, तें करावयास आपण साभिमानी आहोंत. ह्मणोन कित्येक लिहिलें, व राजश्री नागोपंत यांनीं निवेदन केलें, त्याजवरून कळलें. ऐशास, आपला व राजश्री पंतप्रधान यांचा स्नेह आजिकालचा नाहीं. पूर्वापार आला, तो अभिवृद्धीस पावावा; सर्व प्रकारें श्रीमंतांचा तुह्मीं लोभ संपादून उमदे महत्कार्यास उपयोगीं व्हावें हेंच आह्मी इच्छितों. राजश्री श्रीनिवासराव यांस बोलाविलें असे. तेही एका दों रोजांत येतील. त्यांजशीं बोलोन आपणांकडे पाठवून देऊन. वरकड अर्थ राजश्री नागोपंत यांजशीं बोललों आहों. हे लिहितील त्याजवरून कळेल. राजश्री नरसिंगराव एक प्रकारचे मनुष्य; यांस निरोप देऊन पाठविलें ह्मणोन. तर आपण श्रीमंतांचे बंधु ह्मणवितात. श्रीमंत उमदे अमीराची तोर व रीतभात राखतात. अनेक देशांतरींचे वकील सहवासीं राहून घेतात. तोच प्रकार आपणाजवळ असावा, व आपण इच्छा धरितात त्यास मुख्यत्वें हींच कारणें आहेत. प्रस्तुत राजश्री गोविंदराव शामराव यांस पाठविले असत. हे सर्वही सांगतील, त्याजवरून कळेल. यांस आपणांजवळ राहूं द्यावें. र॥ छ १ रजब बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनंति."

या पत्रामध्यें ज्या 'उमद्या महत्कार्याचा' उल्लेख केला आहे, तेंच सावनूरचें राजकारण असावें असें वाटतें. या वेळीं मुरारराव घोरपडे हे सलाबतजंग व बुसी यांच्या धोरणानें वागत असल्यामुळें, व ते उभयतां पेशव्यांस अनुकूल

असल्यामुळें, मुराररावांचें साहाय्य सावनूरचे नवाबास झालें नाहीं. त्यामुळें तो हताश होऊन, त्यानें पेशव्यांस आपलें अर्धें राज्य व बरीचशी खंडणी देऊन तह केला. नंतर मुरारराव घोरपडे हे सावनूरचें राजकारण संपतांच गुत्तीस निघून गेले.

या समयास पेशव्यांचीं कर्नाटकांत अनेक राजकारणें चालू होतीं. आणि ह्या प्रसंगीं त्यांना मुरारराव घोरपडे यांच्या लष्करी साहाय्याची अत्यंत आवश्यकता होती. ह्मणून त्यांनीं, त्यांच्या बरोबर, बळवंतराव मेहेंदळे व मल्हारराव होळकर यांच्या मार्फत राजकारणाचा संदर्भ लावून, व ते मागतील तो प्रांत देण्याचें मान्य करून, त्यांना अनुकूल करून घेतलें. या प्रसंगीं बाळाजी बाजीराव पंतप्रधान, बळवंतराव मेहेंदळे आणि मुरारराव घोरपडे यांचा जो पत्रव्यवहार झाला आहे, तो फार महत्त्वाचा आहे. त्यामध्यें पेशव्यांनीं मुराररावांबरोबर आपल्या घराण्याचा पूर्वापार असलेला संबंध व्यक्त करून, त्यांशीं बंधुत्वाचें नातें कसें जोडिलें आहे व त्यांस किती बहुमान देऊन संबोधिलें आहे, हें लक्ष्यांत घेण्यासारखें आहे. त्यांस मुरारराव घोरपडे यांनींही तशींच आदरपूर्वक उत्तरें दिलीं आहेत. पेशव्यांनीं मुराररावांस "रायचूरप्रांतीं आपलें आगमन होऊन उमदे मनसुबे रुबकार व्हावें" ह्मणून भेटीस बोलाविलें. त्यास मुराररावांनीं असें उत्तर लिहिलें कीं, "आपल्या स्नेहापेक्षां आह्मांस दुसरें अधिकोत्तर नाहीं. आपण भेटीस यावें ह्मणून ममतायुक्त विस्तारेंसीं लिहिल्यावरून बहुत संतोष जाला. अशास आपला स्नेहच मुख्य जाणून, भेटीचा हेतु धरून, आपण पूर्वीं लिहिल्याप्रमाणें रायचूर प्रांतीं मुक्काम करून आपणांस पत्र लिहिलें........आपण आह्मांस बंधु ह्मणविलें, आह्मीं आपणांस वडील मानलें, याचें निदर्शन आमच्या मनोदयाप्रमाणें समर्पक करून भेटीचा योग घडवाल, हा चित्ताचा निशा जाणून, सांगणें तें राजश्री विठ्ठल अनंत यांस सांगून व राजश्री केशवराव यांस लिहून, पाठविले आहेत. आह्मी आपणांशिवाय नाहीं. आमच्या मनोदयाप्रमाणें समर्पक करून उभयपक्षीं भेटीचा योग घडे, तो अर्थ केला पाहिजे. आह्मीं आपले वडीलपणास विहित तें करवावें, आणि साजर करणेस वडील आपण." ह्याप्रमाणें पेशव्यांची व मुराररावाची भेट होण्याची वाटाघाट चालू असतांच, दरम्यान बळवंतराव मेहेंदळे यांची व कडपेकर नवाब याची हातघाईची लढाई झाली. ह्या लढाईंत मेहेंदळ्यांस अद्वितीय यश प्राप्त झालें व कडप्याचा नवाब धारातीर्थीं पतन पावला. हें वर्तमान ऐकून मुरारराव घोरपडे यांनीं बळवंतराव यांस जें पत्र लिहिलें आहे, तें उपलब्ध झालें आहे. तें येणेंप्रमाणें:—

## श्रीसुबराज.

"राजश्री बळवंतराव गोसावी यांसः—

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ मुरारजी हिंदूराव घोरपडे ममलकतमदार दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असिलें पाहिजे. यानंतरः—कडपेकर निजामअली याचे, आपले पत्रावरून प्रत्युत्तर हरकारे व बाणदार जोडी याबरोबर पत्र पाठविलें होतें, तें पावून वर्तमान कळलें असेलच. राजश्री पंतप्रधान यांच्या आगमनानंतर व्हावयाचें कार्य श्रीदयेनें होऊन, आपणांस यश आलें, हा संतोष आह्मांस बहुत प्रकारें जाला. राजश्रीच्या आगमनानंतर या प्रांतींचा सर्व येख्तियार आपणांसच व्हावा; इकडील कितेक बंदोबस्त आपल्या आमच्या विचारें व्हावे; आमचे मनोरथ आपलेकडूनच होऊन यावे; हें श्रीसन्निध इच्छितों. तदनुरूप घडोन येईल. कडपेचा व उर्वरीतहत शेपीचा बंदोबस्त होऊन, पुढें कर्तव्यार्थ काय योजिला आहे हें लिहिणें. गुत्तीलगतीं ठाणीं घेऊन देतों ह्मणून आपण वचन दिल्हें आहे. त्याप्रमाणें घेऊन द्यावयाचा समय हाच आहे. याकरितां आपणांस पूर्वीं लिहिलेंच आहे. अद्यापि लिहिल्याप्रमाणें रवाना केलें नाहीं. यास्तव लिहिलें जातें जे, राजश्री विसाजी बाबूराव यांजबराबर पांचशें स्वार, पांचशें गाडदी व चार तोफा व आह्मांकडील राजश्री गोपाळराव सबनीस, कांहीं फौज, येणेंप्रमाणें पाठवून द्यावे. हे ठाणीयांकडे रवाना केले, फौज व तोफखाना आह्मांजवळ आहे तो पाठवून देणें, ठाणीं हस्तगत करून मुलुखास कोलबोल देऊन बंदोबस्त करणें, ऐसें आपलें पत्र आलीया, येथें फौज व तोफखाना आहे तो इन्नसखानाबराबर देऊन, पाठवून, ठाणीं घेऊन, तेथील बंदोबस्तही केला जाईल..........राजश्री पंतप्रधान यांचें आगमन होईल ते समयीं, आमचा व दौलतीचा भार व मध्यस्ती आपणांस सोंपिली आहे. चित्तानुरूप करून अधिक स्नेहाभिवृद्धि होय, आपणांस यश ये, तो अर्थ करावा...........गुत्तीलगते ठाणीयांस लिहिल्याप्रमाणें फौज व तोफखाना विसाजी बाबूराव व गोपाळराव यांबराबर रवाना केला. आपला तोफखाना व फौज रवाना करणें ह्मणून पत्र येतांच, फौज तोफखाना रवाना करून किल्ले गुत्तीलगतीं ठाणीं हस्तगत करून, रयतीस कोलबोल देऊन, तेथील बंदोबस्त केला जाईल. सकलविशीं आमचा भार आपणांवर आहे. ठाणीयांचा कार्यभाग समर्पक करून हस्तगत होय व पुणियाहून खर्चवेंच व इकडून लिहिल्याप्रमाणें होऊन येई व राजश्री पंतप्रधान यांचें आगमनानंतर चित्तानुरूप द्यावयाचा सकलभार व मध्यस्ती आपणांस सोंपिली आहे. उचित तें करावें. वरकड अर्थ त्रिवर्ग व मल्हार रघुनाथ यांस

लिहिलें आहे. हे सांगतील त्यावरून कळेल. छ २५ मोहोरम. पंतप्रधानांनीं वचन दिल्हें, आपले हातीं आह्मांस दिलें, याचा भार आपणां उचित तें करावें हे विनंति."

ह्या पत्रावरून मुरारराव घोरपडे व बळवंतराव मेहेंदळे हे ह्या वेळीं एकविचारानें वागत असून, त्यांचें सैन्य व आपलें सैन्य एकत्र करून गुत्तीजवळचा प्रांत घेण्याच्या योजनेंत होते, असें स्पष्ट दिसून येतें. परंतु मराठ्यांचे इतिहासकार ग्रांटडफसाहेब हे, पेशव्यांनीं कबूल केल्याप्रमाणें जिंकून घेतलेल्या किल्ल्यापैकीं एक किल्ला दिला नाहीं ह्मणून मुरारराव घोरपडे हे रुष्ट होऊन गुत्तीस राहिले व प्रतिपक्षास अनुकूल होऊन कडप्याच्या युद्धामध्यें हजर राहिले नाहींत, अशा अर्थाचा मजकूर लिहितात.* ह्यावरून ह्या संशययुक्त प्रश्नाचा खुलासा होण्यास मुराररावांच्या ह्या वेळच्या हालचालींची साधार व सविस्तर माहिती प्रसिद्ध होणें अत्यंत अवश्य आहे. आह्मांस उपलब्ध झालेल्या अस्सल पत्रांवरून, मुरारराव घोरपडे ह्या वेळीं प्रतिपक्षास बिलकूल सामील नसून, उलट पेशव्यांशीं पूर्वीचा घरोबा व स्नेहभाव जोडून, गुत्तीलगतचा प्रांत घेण्याचा प्रयत्न करीत होते, व त्यामुळें त्यांस कडप्याच्या युद्धामध्यें हजर राहण्यास अवधि मिळाली नाहीं, असें दिसून येतें.†

*"Moorar Rao Ghorepuray had retired to Gooty in consequence of not being put in possession of one of the captured forts, which appears to have been promised; the Peishwa had authorised Bulwant Rao to comply with his wish, provided he was certain he could be depended upon; but Moorar Rao had joined a confideracy against his country-men, by uniting with the Nabobs of Kurpa, Savanoor, Kurnool, and others,... It is not ascertained whether Bulwant Rao complied with the latitude allowed in favour of Ghorepuray,but Moorar Rao is not mentioned as having acted on either side in a battle fought by the Mahrattas on the 24th September near Kaddapah, against the Nabobs of Kurpa and Kurnool, in which Bulwant Rao Mehendle was victorious."—*Grant Duff's History, Pages 297-98.*

† बळवंतराव मेहेंदळे कडप्याच्या नवाबावर स्वारी करून निघाले त्या समयास मुरारराव घोरपडे यांनीं बळवंतरावांस लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यावरून मुरारराव गुत्तीलगतचीं ठाणीं घेण्याचा प्रयत्न करीत होते, हें स्पष्ट होत आहे. या पत्रावरून बळवंतराव मेहेंदळ्यांचा असा करारमदार झाल्याचें दिसत आहे कीं, बळवंतरावांनीं कडप्यावर स्वारी करावी व मुराररावांनीं गुत्तीलगतचा प्रांत घ्यावा; म्हणजे कडप्याच्या नवाबास तंवी पोहोंचून तो तेव्हांच शरण येईल. ह्या पत्रामध्यें मुरारराव स्पष्ट लिहितातः-"आपलें आगमन कडपियास होऊन तेथील बंदोबस्त कर्तव्यार्थ करणें तोही घडोन येईल. आपण चित्तीं धरिलेवरी कोणतें अगाध आहे? लगते ठाणीयांचा करारमदार जालियाप्रमाणें आपणही घेऊन द्यावयाचें वचन दिलें आहे. त्यास, फौज न पाठविल्या मुलूख खराब होईल. यास्तव

मुरारराव घोरपडे यांचा व पेशव्यांचा कायमचा सलोखा केव्हां झाला, हें नक्की समजत नाहीं. ते थोरले माधवरावांच्या कारकीर्दींत झालेल्या कर्नाटकांतील मराठ्यांच्या सर्व चळवळींचे साहाय्यकर्ते असून, त्यांनीं हैदराच्या विरुद्ध अनेक लढायांत स्वसैन्यानिशीं हजर राहून आपल्या पराक्रमाची शर्थ करून दाखविली, असें अस्सल कागदपत्रांवरून दिसून येतें. इ. स. १७६३।६४ मध्यें, ते हैदरावरील स्वारींत, आपल्या निवडक सैन्यानिशीं पेशव्यांच्या मदतीस आले होते, व अनवडीच्या झुंजामध्यें त्यांनीं चांगली अंगेजणी करून दाखविली होती. थोरले माधवरावसाहेब पेशवे यांनीं मुरारराव घोरपडे यांस 'सेनापति असा जो किताब दिला तो याच प्रसंगीं दिला, असें ग्रांटडफ साहेब लिहितात. या वेळीं हैदराशीं जो तह झाला, त्यांत मुराररावांकडील प्रांत हैदरानें सोडून द्यावा असें एक कलम होतें. ह्यावरून पेशव्यांनीं मुराररावांच्या साह्याचें महत्त्व व उपयोग जाणून, त्यांस अशा रीतीनें अंकित करण्याचा प्रयत्न केला हें स्पष्ट आहे.

इ. स. १७६७ मध्यें हैदरावर थोरले माधवराव पेशवे यांची मोहीम झाली. या मोहिमेमध्येंही मुरारराव घोरपडे हे पेशव्यांच्या मदतीस तत्पर होते. या प्रसंगीं थोरले माधवराव पेशवे यांनीं मुरारराव घोरपडे यांस लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें अतिशय महत्त्वाचें असून, त्यावरून थोरले माधवराव साहेब पेशवे यांस त्यांच्या मदतीची किती आवश्यकता वाटत होती, हें दिसून येतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

---

आपल्याकडील फौज कांहीं, व आम्हांकडील कांहीं, व बार, तोफा पाठवून, देऊन विसाजी बाबूराव यांस रवाना करून गुत्तीलगतीं ठाणीं घेऊन द्यावीं. आपलें वचन सत्य करावें......आपले पत्राचा मार्ग पहात आहों. फौज पाठविणें म्हणून आपलें पत्र शीघ्र पाठवून देणें. ते क्षणीं फौज रवाना करून पाठवीत आहों. आमचा व दौलतीचा भार व मध्यस्ती आपणांवर आहे. उचित तें करावें. पेस्तर मनसबा व कर्तव्य काय, तें वरचेवरी लिहून पाठवावें. लढाईमध्यें लोक व घोडीं जखमी व जायां आहेत, त्यांचा व रोजमरीयाचा परामर्ष करून व हलीं फौज पाठवूं त्याचा परामर्ष करून चालवावें. हा भार आपणांवर आहे." या हकीकतीवरून मुरारराव पेशव्यांच्या सैन्यांशीं तुटून नसून, उलट त्यांच्या मदतीनें गुत्तीच्या सभोंवतालचा प्रांत घेण्याचा ह्या वेळीं प्रयत्न करीत होते असें सिद्ध होतें. ही हकीकत खरी असावी असें मानण्यास दुसरा एक आधार सांपडतो. "Gazetteer of South India" ह्या पुस्तकामध्यें असें लिहिलें आहे कीं, "गुत्ती व त्याभोंवतालचा प्रांत हा पूर्वीं कडप्याचा नबाब रङ्डीखान याच्या ताब्यांत होता, व त्यावर ह्या वेळीं मीर अबीदखान नांवाचा किल्लेदार होता. त्याजकडून इ. स. १७५८ मध्यें गुत्तीचा किल्ला मुराररावानें युक्तीनें काबीज केला."

श्री.

"राजश्री मुराराव हिंदुराव घोरपडे ममलकतमदार गोसावी यांसः—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंति ............... असिलें पाहिजे. विशेषः– प्रस्तुत आमची स्वारी तुंगभद्रातीरीं आली. कितेक जमीदारांनीं मोंगलाच्या हंगाम्यामुळें लबाडी केली होती, त्याचें पारपत्य यथास्थित जाहलें. सांप्रत हैदरनाईकासीं व आपल्यासीं विरोध विशेष ह्मणून प्रस्तुत श्रवण जाहालें. कहीवर त्याजकडील लोकांचें उत्तम पारपत्य जाहलें. ही गोष्ट फार उत्तमच जाहली. आमचे येणें येथपावेतों जालें. हें हैदरनाईकांनीं ऐकिल्यावर बाळापुरास कदापि त्यांच्यानें दम धरवणार नाहीं. त्यांनीं तेथून कूच केलें, निकाल पाडला, ह्मणजे आपण मातबर तोफखाना, फौज, गारदी घेऊन शिऱ्यास क्षणाचा विलंब न लावितां यावें. आपण तेथून निघाले असें वर्तमान येतांच, येथूनही मातबर फौज तोफा रवाना होतील. आपण ते मिळोन शिरें सहजांत घेतील. श्रीकृपें मातबर यश, विना विशेष श्रम, आपल्यास येईल. उपरांतिक आपले आमचे भेटीचा योग घडल्यास लौकिकांत फार उत्तम आहे. सविस्तर एतद्विषयींचा व कितेक मातबर मनसब्याचा अर्थ राजश्री मल्हार चिंतामण व नागोराव श्रीनिवास यांसीं बोलिलों आहों; सांगतील. तें मनन करून तदनुसार घडून ये, तें करावें. मागें तीर्थरूप वडिलांहीं भरंवसा मानून कितेक प्रकारें देणें घेणें तें दिलें अगर देऊं केलें, त्या समयीं वडिलासीं भाऊपणियाचे रीतीनें कितेक भरंवशाच्या गोष्टी गोसावी यांकडून भाषणांत आल्या होत्या. त्याविसींचा भरंवसा यंदाचे प्रसंगीं तीर्थरूप सर्वदां बोलत असत. परंतु विस्मरणादिक सुचविणें हेंही तुह्मांकडे वडीलपणच ह्मणून आह्मांस उचित नाहीं. कर्नाटकप्रांतीं सर्व प्रकारें सरकारचीं ठाणीं पाळेगारांहीं घेतलीं, त्यांचा उपराळा होऊन, राहिलीं तीं सोडविल्याखेरीज, पूर्ववत्प्रमाणें सरकारचा अंमल ज्यारी होऊन लौकिकांत उत्तम प्रकारें दिसूं लागलिया, आपले कार्यापेक्षां आह्मांस वडिलांजवळ विशेष विनंति कर्तव्य आणखी कांहीं आहे असें नाहीं. येविसीं सर्व प्रकारें निशा असों द्यावी. पत्र पावल्यानंतर तेच क्षणीं मातबर फौज सरंजामसुद्धां शिरेंयाचें कार्य करणें. हेंच आमचें येणें जालें असतां या समयीं तुह्मांस उचित आहे. तुह्मी सर्वदां उचित क्रिया करीत असतां उचित समयीं कदापि चुकाल, उशीर कराल, हें होणेंच नाहीं. रा. मल्हार चिंतामण व नागोराव श्रीनिवास उभयतां सविस्तर सांगतील. त्याजवरून कळेल. उत्तर सत्वर पाठवावें व वर्तमान प्रतिदिनीं सांडणीस्वाराबरोबर ल्याहावें, हेच स्नेहवृद्धीविसीं उचित असे."

या पत्रावरून असेंही दिसून येतें कीं, मुरारराव घोरपडे यांस पेशव्यांनीं पूर्वी ज्या गोष्टी देण्याचें मान्य केलें होतें, त्याप्रमाणें पूर्णपणें घडून आलें नव्हतें. यापुढें मात्र, पेशव्यांनीं मुराररावांच्या अंगमेहनतीचें व शौर्याचें चांगलें चीज केलें, व कर्नाटकापैकीं नवीन मिळालेला बराच प्रांत त्यांजकडे ठेविला. मुरारराव घोरपडे यांचा व हैदरनाईक यांचा हर्षामर्ष एकसारखा चालू होता. मुरारराव घोरपडे यांचें कर्नाटकांतील प्राबल्य व त्यांची गुत्ती येथील जहागीर ही हैदराच्या सत्तेच्या प्रसारास फार आड येत असे, ह्मणून ती त्याच्या डोळ्यांत एकसारखी सलत असे. मुराररावांचें व हैदराचें दिवसेंदिवस अधिकच वैमनस्य वाढलें, व हैदरानें त्यांचा दीर्घद्वेष मनांत धरून त्यांचा समूळ नाश करण्याचा संकल्प केला. त्यानें इ.स.१७६९ मध्यें मुराररावांच्या प्रांतावर वेगळें वेगळें सैन्य पाठवून, त्यांचीं गुत्तीशिवाय सर्व ठाणीं काबीज केलीं. मुराररावांस दूरांतरामुळें पेशव्यांचें किंवा दुसऱ्या प्रबल सत्तेचें वेळेवर साहाय्य झालें नाहीं; त्यामुळें हैदर डोईजड होऊन तो गुत्तीवर चढाई करून गेला. मुराररावांचें सैन्य युद्धकलेंत कसलेलें असून तें हैदराबरोबर टक्कर देण्यास समर्थ होतें. परंतु गुत्तीच्या किल्ल्यांत पाण्याचा पुरवठा कमी होता. त्यामुळें हैदराशीं झुंज करण्याचा नाद सोडून देऊन, मुरार-रावांनीं त्याशीं वरकरणी सलोखा करण्याचा घाट घालून हें अरिष्ट टाळण्याचा विचार योजिला. हैदरास मुराररावांसारखा बलिष्ठ सरदार आपल्या कह्यांत यावा ही इच्छा होतीच; ह्मणून त्यानें त्यांस भेटीस बोलाविलें. मुरारराव हैदराच्या भेटीस जाणार ही बातमी बाहेर पसरतांच, गोपाळराव पटवर्धनादि मराठे सरदारांस त्यांच्या सुरक्षितपणाबद्दल फार काळजी उत्पन्न झाली. गोपाळराव पटवर्धन एका पत्रांत लिहितातः—"मुरारराव भेटीस गेल्यावर हैदरखान त्यास कैद करितो, अगर तूर्त न कैद करी, तरी बराबर घेऊन जातो, यांत संदेह नाहीं. लक्ष वांव्यांनीं कैद करील आणि त्याचीं ठाणींठुणीं घेईल. कैद न करी, तरी हैदराएवढा प्रामाणिक व मूर्ख कोणीच नाहीं. राजश्री मुरारराव यांस आह्मीं चार पांच पत्रीं लिहिलें कीं, गुत्तीस न राहणें. राहिले! आणि आतां भेटीस जातात! याएवढा मूर्ख त्रैलोक्यांत नाहीं! भेटीस जाऊन परत आले, तरी यासारखा अदृष्टवान् कोणी नाहीं."* असा बिकट प्रसंग होता. तरी, मुराररावांनीं मोठ्या धैर्यानें हैदराच्या भेटीस जाऊन, त्यास आपल्या मधुर वक्तृत्वानें इतकें खुलवून सोडिलें कीं, हैदरा-सारखा धूर्त मुत्सद्दी देखील त्यांस भाळून जाऊन, त्यानें त्यांस कैद करण्याऐवजीं त्यांचा मोठा सन्मान केला; आणि त्यांस पंचवीस हजार रुपये, तीन हत्ती, शिरपेंच,

* ऐतिहासिक लेखसंग्रह भाग ३ रा.

मोत्यांची कंठी व बहुमानाचीं वस्त्रें देऊन त्यांचा स्नेह संपादन केला. मुराररावांनीं हैदरास दरसाल पन्नास हजार रुपये खंडणी देण्याचें कबूल करून, तूर्त आलेल्या संकटांतून आपली मुक्तता करून घेतली. ह्या भेटीमुळें मुरारराव, पेशव्यांचा शत्रू जो हैदर त्यास वश झाले, असा पुणेंदरबारांत गैरसमज उत्पन्न झाला. परंतु पुढें हैदरावर झालेल्या मोहिमीमध्यें मुराररावांनीं, पेशव्यांचे सेनापति त्रिंबकराव विश्वनाथ पेठे यांस सामील होऊन जें साहाय्य केलें, त्यावरून तो गैरसमज दूर झाला.*

---

* श्रीमंत थोरले माधवराव पेशवे ह्यांनीं इ. स. १७७० मध्यें लिहिलेलें पुढील पत्र वाचलें असतां, मुरारराव घोरपडे ह्यांच्याविषयीं त्यांचा काय भाव होता हें कळून येतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"राजश्री मुरारराव हिंदूराव घोरपडे ममालकतमदार सेनापति गोसावी यांसीं:— सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे. विशेष:—पत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. हैदरअल्लीखान याचा मजकूर विस्तारें लिहिला, त्यांत मुख्यार्थ हाच कीं "हैदरनाइकाचें पुरतें पारिपत्य करावें ऐसा विचार होऊन इकडे फौजा छावणीस ठेविल्या. फौज छावणीस राहिली येणेंकरून शत्रूस जरब बसली, व पुढेंही जरब बसविल्यास कशी बसेल ह्या गोष्टीची मसलत येथें आह्मी चौघे मातबर आहों त्यांस पुसोन राजश्री त्रिंबकराव यांणीं आपणांस लिहावी, या भावें आपलीं पत्रें त्यांस आलीं. त्याजवरून त्यांनीं आह्मां सर्वांस पुसोन आपणांस लिहिणें तें लिहिलें असे. मुख्य गोष्टी हैदरखानास जरब बसली. मनुष्यमात्र त्यास राजी नाहीं यास्तव तह करावयास वकील आपणांकडे पाठविले आहेत. तहही करणें तो जरबेनें करावा. नफा करून घ्यावा. मीर रेजा आदिकरून सर्व त्यास कंटाळले आहेत. हैदरखानाची प्रकृत अविवेकी. उद्दाम, घडीची गोष्ट. घडीस फेर! दाब मात्र आपले सेवकजनांवर भारी. यास्तव लहानापासून मोठ्यापर्यंत त्यास बेजार. मात्र आपण जलद भारी सरंजामानें यावें. उपरांतिक कर्तव्य तें करावें." ह्मणून कित्येक उल्लेखपुरस्सर लिहिलें, त्यावरून कळलें. ऐशास, आपण व त्रिंबकराव विश्वनाथ यांणीं लिहिला विचार यथार्थ आहे, व करण्याचाही क्रम आपणाशीं बोलोन आलों त्याप्रमाणें कर्तव्यांत आणिला. मुहूर्तेंकरून डेरेदाखल जालों. तोफा व गाडदी मातबर सामान व फौजही भारी याप्रमाणें तरतूद केली. चारी विचार ध्यानांत असावे, यास्तव सहज प्रकारें सुचल्यावरून मशारनिल्हेस लिहिलें होतें. केवळ तिकडे न यावें, पुण्यांतच हैदरखानाचा तह करावा, या भावें लिहिलें नव्हतें. तात्पर्य, यवनास जरबेंत आणून पुरतें पारिपत्य करून देवब्राह्मणांची स्थापना करावी, संस्थानें सोडवावीं, हाच भाव आहे. दुसरा प्रकार सर्वथैव नाहीं. येविशीं त्रिंबकराव विश्वनाथ यांस लिहिणें तें लिहिलें आहे. मिराचा अर्थ

मुराररावांनीं हैदरास वेळोवेळीं आपल्या शौर्यप्रतापानें नामोहरम करून त्याचा पगडा आपल्यावर बसूं दिला नाहीं. परंतु दैवदुर्विपाकानें ह्या रणशूर मराठ्यास हैदराच्या बंदिवासांत जाऊन तेथेंच कालवश होण्याचा प्रसंग आला. या प्रसंगाची हकीकत अत्यंत हृदयद्रावक व करुणरसपूरित असून तिच्यामध्यें वीर्यतेजाची दिव्य छटा चमकत आहे. हैदरानें इ. स. १७७० पासून इ. स. १७७५ पर्यंत गुत्तीजवळचीं बल्लारी, रत्नगिरी वगैरे संस्थानें पादाक्रांत करून, मुरारराव घोरपड्यांस नतीजा देण्याचा आपला दृढनिश्चय बराच सिद्धीस नेला; आणि इ. स. १७७६ मध्यें तुंगभद्रा ओलांडून तो आपल्या प्रचंड सैन्यानिशीं गुत्तीच्या किल्ल्यासमोर येऊन उभा राहिला. त्यानें प्रथम मुराररावांस असा खुबीचा निरोप पाठविला कीं, 'तुह्मी आह्मी जुने दोस्त असून, तुमचें घर तें आमचें घर आहे. ह्मणून तुह्मी माझ्या सैन्याच्या सरबराईसाठीं एक लाख रुपयांची तजवीज करा.' मुराररावांनीं त्यास असें बाणेदार उत्तर पाठविलें कीं, 'मी मराठ्यांचा सेनापति आहें. मला दुसऱ्या संस्थानिकांकडून घांसदाणा घेण्याची संवय आहे, देण्याची नाहीं.' हें उत्तर ऐकतांच हैदर संतप्त झाला, आणि त्यानें गुत्तीच्या किल्ल्यास मोर्चे लावून तो जिंकून घेण्याचा पण केला.

गुत्तीचा किल्ला हा लहान लहान वर्तुलाकार टेंकड्यांच्या माथ्यावर तटबंदी करून बांधलेला आहे. ह्यामध्येंही बालेकिल्ला व मुख्य किल्ला असे दोन किल्ले असून, त्याची नैसर्गिक रचना शत्रूस अभेद्य अशी असल्यामुळें हा किल्ला फार अजिंक्य झाला आहे. येथें मुरारराव घोरपडे यांनीं तटबंदीचें काम उत्कृष्ट करून ही आपली संरक्षणाची मुख्य जागा केली होती. येथें त्यांनीं मोठमोठ्या लढाऊ तोफा, दारुगोळा आणि आपलें नित्रडक सैन्य ठेविलें होतें. हैदरानें खालच्या किल्ल्यास [त्यास 'मारगुत्ती' असें ह्मणत] व शहरास वेढा घालून व त्यांवर निकराचे हल्ले करून सुमारें पांच आठवड्यांत तें हस्तगत केलें, आणि तो मुख्य किल्ल्यास वेढा देऊन बसला. मुराररावांनीं मोठ्या हिंमतीनें गुत्तीचा वेढा उठ-

लिहिला तर, त्यांनीं दोन चार वेळां करार केला असतां आला नाहीं. त्यानें बोलण्याचें कारण काय? (आमचें) येणें न जालें तों गुरमकोंड्याचें कार्य आपण उरकावें, हें उत्तम असे. छ १५ जमादिलाखर बहुत काय लिहिणें. [स्वदस्तुर] हैदरखान प्रस्तुत कोठें आहे, त्याचें मानस प्रस्तुत काय आहे, आंत काय आहे, बाहेर दाखविण्यांत काय आहे, गुदस्तां (त्यांजवळ) फौज गाडदी होते त्यांजहून जास्ती आहेत किंवा कमी आहेत, हें कळवावें. यंदा त्या प्रांतीं लौकर यावें यास्तव लौकर निघणें जालें. त्यास त्या प्रांतीं येतांच आधीं कोणतें काम करावें, मग कोणतें करावें, आपल्यास सोय आधीं कोणत्या कामांत, याचा प्रकार व माहीतगारी सविस्तर त्या प्रांतची आपल्यास विशेष, यास्तव खोलून लिहावें. हे विनंति.''–ऐ. ले. संग्रह.

विण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या लोकांनीं किल्ल्यावरून तोफांची अचुक मारगिरी चालवून झुंजण्याची शर्थ केली. परंतु किल्ल्यांतील पाण्याचा व सर्पणाचा पुरवठा संपल्यामुळें त्यांचा निरुपाय होऊन, त्यांस दुसरीकडील सैन्य येईपर्यंत हैदराशीं तहाचें बोलणें लावणें भाग पडलें. कसेंही करून आठ पंधरा दिवस टाळावे, ह्मणजे दुसरीकडून कुमक येऊन हैदराचा वेढा उठेल, असा त्यांस भरंवसा होता. ह्मणून त्यांनीं हैदराकडे संदेश पाठवून त्याचे वकिलास किल्ल्यावर बोलाविलें. हैदरानें बारा लक्ष रुपयांची मागणी करून, आपला मेहुणा मीर रेझाखान यास किल्ल्यावर पाठविलें. तेथें त्यास मुराररावांनीं ठेवून घेऊन त्याच्या आदरसत्कारांत एक दिवस घालविला, आणि तेवढ्या अवकाशांत सर्पणाचा पुरवठा किल्ल्यावर करून घेतला; आणि हैदराच्या वकिलाबरोबर सात लक्ष रुपये किंमतीच्या जवाहिराचे पेटारे मोहोरबंद करून पाठविण्याची युक्ति योजिली. मुराररावांजवळ अगणित द्रव्य आहे, अशी हैदराची समजूत असल्यामुळें त्याच्या तोंडास पाणी सुटलें, व त्यानें मुराररावांचे जवाहिराचे पेटारे आपले गोटांत येऊं दिले. मुरार-रावांनीं मोहरबंद पेटारे पाठवून, हैदराचे वकिलाबरोबर असा निरोप कळविला कीं, जवाहीर फार मूल्यवान् आहे, सबब दोन चार दिवसांत आमचा वकील येऊन, तो स्वतः कुलपें काढून जवाहीर आपले स्वाधीन करील. परंतु हैदर हा महा-वस्ताद असल्यामुळें त्यानें दोन दिवस वाट पाहून पेटारे फोडून पाहिले. तों त्यांत गारगोट्या, खापरें, आणि कळवंतणीच्या जुन्या पादरक्षा असल्याचें दिसून आलें! त्यामुळें तो क्रोधायमान होऊन युद्धास सिद्ध झाला. मुरारराव घोरपडे ह्यांस स्वतःच्या शौर्याची फार घमेंड होती, व हैदराचा आपण पराभव करणार अशी पूर्ण खात्री होती, ह्मणून त्यांनीं त्याची अशी अप्रतिष्ठा केली कीं काय, न कळे! ही पेटाऱ्यांची हकीकत एका जुन्या बातमीपत्रांत आढळून येते.*

कर्नल विल्क्स यांनीं या प्रसंगाची हकीकत अगदीं वेगळी दिली आहे. तिच्यावरून असें दिसून येतें कीं, किल्ल्यावरील पाण्याचा पुरवठा कमी झाला असें पाहून, मुराररावांनीं हैदराबरोबर तह करण्यासाठीं आपलेकडील वकील व कांहीं जवाहीर पाठविलें. हैदरानें या वकिलाचा आदर करून त्यास मेजवानीस बोलाविलें, आणि त्या प्रसंगीं त्याची खुशामत करून मुराररावांच्या शौर्याची बरीच तारीफ केली. त्या वेळीं मुराररावांच्या वकिलानें, हैदराच्या वाग्जाळांत गुरफटून जाऊन, आपल्या गोटांतील कित्येक अंतस्थ गोष्टी बोलून दाखविल्या,

* ऐतिहासिक लेखसंग्रह. भा. ५, पृ. २५३० पहा.

आणि त्यामध्यें गुत्तीच्या किल्ल्यामध्यें तीन दिवस पुरण्याइतकेंच पाणी शिल्लक आहे, ही महत्त्वाची गोष्ट तो बोलून चुकला. हैदर महाधूर्त असल्यामुळें त्यानें ही प्रतिपक्षाची उणी बाजू चटकन् ध्यानांत घेऊन, मुराररावांकडून आलेल्या जवाहिरांची किंमत फार कमी असल्याचा बहाणा करून तहाचें बोलणें अमान्य केलें, व लढाईचा हुकूम फर्माविला. मुराररावांच्या दुर्दैवानें, त्यांच्याच वकिलाकडून न कळत असा दगा झाल्यामुळें, पुन्हां हातघाईचे युद्धास सुरवात झाली. या वेळीं मुराररावांनीं निकराचें युद्ध करून आपल्या शौर्याची सीमा करून दाखविली. परंतु हैदरास किल्ल्यांतील भेद समजल्यामुळें, त्यानें पाणी नेण्याच्या वाटा बंद करून, मुराररावांच्या सैन्यास 'पाणी' 'पाणी' करून मरावयास लाविलें. तेव्हां मुराररावांस हा हृदयद्रावक देखावा सहन न होऊन, त्यांना निरुपायास्तव शत्रूस शरण जाणें भाग पडलें.* ज्या पाणीदार मराठे वीरानें हैदरास अनेक

* जुन्या ऐतिहासिक कागदपत्रांतही ह्याच हकीकतीस पुष्टि देणारी माहिती आढळते. मुराररावांचा दिवाण नारोपंत ह्यांस नरसो मल्हार ह्यानें ह्या प्रसंगाची हकीकत पुढें लिहिल्याप्रमाणें कळविली आहे:—

"हैदरखान खासा स्वारीस येऊन सारा मुलख तुंगभद्रेपलीकडे घेऊन गुत्तीस मोर्चे दिले. राजश्री राव सेनापति यांणीं गुत्ती बळावून आपण खुद्द व सात आठशें बारगीर व दोन तीन हजार प्यादे, दारूगोळी, दाणा सर्व सामान भरून आपण खुद्द गडावर राहिले. कांहीं फौज राजश्री शिवराम घोरपडे याजबरोबर देऊन मडकशिरें प्रांतीं ठेविलें होतें. राव सेनापति यांची मसलत महिना दोन महिने लढाई करावी, इतवयांत श्रीमंतांकडून कुमक आणावी, कर्नोळकर व अद्वानीकर सर्व जमा करून मोर्चे उठवावे, जाहलिया हैदरखानाचें पारिपत्य करावें, या उमेदीनें गुत्तीवर राहिले. तीन महिनेपर्यंत झुंजले. फार शर्त केली. परंतु श्रीमंतांकडून कुमक जाली नाहीं. त्यामुळें कर्नोळकर व अद्वानीकर हेही आले नाहींत. गुत्तीवर दारू व दाणा होता, लांकूड व पाणी सरलें. दोन दिवसपर्यंत चिखल व हिरवे तांदूळ खाऊन राहिले. हैदरखानाजवळ मागें पासून दोन तीन वेळां तहाची बोली जाहलीच होती, त्याप्रमाणें ठरलें नाहीं. त्याजवर पाणी व लांकूड नाहींसें जालें, तेव्हां सेनापतींनीं तह करावा ह्मणून बोली लाविली. हैदरखान यांसी लांकूड व पाणी नाहीं ह्मणून बातमी लागली त्याजवरून तह करीनासा जाला. तेव्हां सेनापतीस महासंकट प्राप्त जालें. लोकांनींही अवसान सोडलें. तेव्हां दुर्गचे राजास सांगून राव खालते उतरले. दुर्गकराचे गोटाजवळ डेरे देऊन राहिले. किल्ला हैदरखानाचे हातां गेला. रायाचे डेऱ्याभोंवतीं पांच हजार गारदी ठेऊन बंदोबस्त केला आहे. दुर्गकर रदबदली करितो. परंतु हैदर त्याचें कांहीं ऐकत नाहीं. सारे रायाचे मुत्सद्दी व सरदार चौकींत ठेविले आहेत. त्यांजवळ हिशेब मागतो. 'पैका कोठें आहे तो दाखवावा' ह्मणून तगादा केला आहे. गुत्तीस ठाणें पडून वीस बेवीस दिवस जाले."

—ऐ. ले. संग्रह भाग ५.

वर्षें आपल्या समशेरीचें अलौकिक पाणी दाखवून, त्राहि त्राहि करून सोडिलें, त्यास पिण्याचें पाणी मिळालें नाहीं ह्मणून आपल्या राज्यवैभवावर पाणी सोडून शत्रूस शरण जावें लागलें ! ही अत्यंत दुःखद वार्ता ऐकून त्या वेळीं अखिल महाराष्ट्राच्या नेत्रास पाणी आलें असेल यांत संशय नाहीं ! !

हैदरानें इ. स. १७७६ च्या मार्च महिन्याचे ८ वे तारखेस गुत्तीचा किल्ला हस्तगत केला, आणि मुरारराव घोरपडे व त्यांचा पुत्र व मुख्य सरदार ह्यांस कैद करून आपल्या लष्करांत नेलें, व त्यांची रवानगी श्रीरंगपट्टणाकडे केली. गुत्ती येथें हैदरानें सर्व लोकांचे झाडे घेऊन, सांपडेल तितकी लूट जमा केली, आणि तेथें नवीन अंमलदार नेमून आपल्या नांवाची द्वाही फिरविली. तात्पर्य, मुरारराव घोरपड्यांस पादाक्रांत करून गुत्तीचें संस्थान हस्तगत करण्याची हैदराची महत्त्वाकांक्षा अल्पकालांत परिपूर्ण होऊन, कर्नाटकामध्यें अर्ध शतकपर्यंत आपल्या लोकोत्तर शौर्यगुणांमुळें अत्यंत प्रसिद्धीस आलेला हा मराठा वीर, दुर्दैवानें शत्रूच्या बंदीवासांत पडून तेथेंच अंत पावला.

हैदरानें या विजयानंदामुळें फुगून जाऊन मुरारराव घोरपडे व त्यांचीं बायकामुलें ह्यांस कपाळदुर्ग येथील किल्ल्यावर कैदेंत टाकिलें, आणि आपल्या राजवैभवाची प्रौढी दाखविण्याकरितां, त्यानें मुद्दाम एक रौप्यशृंखला तयार करवून, ती या स्वातंत्र्यप्रिय व स्वाभिमानी शूर पुरुषाच्या पायांत अडकविली. परंतु तिच्या शुभ्र तेजानें मुराररावांचें पारतंत्र्यदुःख कमी न होतां, उलट ते सहस्रपटीनें प्रक्षुब्ध होऊन ते तेथें लवकर मृत्यु पावले. त्यांचीं बायकामुलें पुढें बरींच वर्षें त्याच किल्ल्यावर कैदेंत होतीं. त्यांची इ. स. १७९१ मध्यें हैदरचा पुत्र टिपू यानें कत्तल केली ! अशा शोचनीय रीतीनें ह्या घराण्याचा नाश झाला.

मुरारराव घोरपडे यांच्याकडे किती प्रांत होता, त्याची एक जुनी यादी आह्मांस उपलब्ध झाली आहे. तिच्यावरून मुराररावांच्या जहागिरीचा विस्तार केवढा होता व त्यांस खंडण्या किती येत होत्या, त्याची बरोबर अटकळ करितां येईल. ती यादी येणेंप्रमाणेः–

श्री.

"यादी राजश्री मुरारराव हिंदुराव घोरपडे ममलकतमदार सेनापति यांचा मुलूख महाल व गड व किल्ले सु॥ तिस्सा सबैन मया व अलफ.

अजमासें बेरीज रुपये.

८०००० गुत्ती हवेली

१५०००० पो ताडपत्री

१२०००० पो माडकी
९०००० पो येकनूर
८०००० पो सिगनमल्ले
८०००० पो पामडी
१५०००० पो वडत्र केरूर व होतूर व उहरी पकोग व हावलगी
१००००० पो कुडतनी
१६०००० पो ताडमरी व सेऊदुर्ग
३५०००० पिन्नगोंड व मडकसिरे
२५०००० संमता ८
१००००० मडकसिरे, व उमामहेश्वरदुर्ग, व सिवगिरी, व सक्करगल
३५००००
४०००० पो कोन कडले, व गुंतगल
४०००० व्यंकटगिरी व विजेदुर्ग, व घाटमाथा किल्ला
४०००० पो बुदीकोट व कोप
५०००० लतूर, व मालूर व सिवनापूर, व नडगिनहल्ली, व यशवंतपूर, व कटगीहल्ली, व कचगारपल्ली, व कोलदासपूर जाहागिर हिरदेराम जमातदार
७५००० सोंडूर, व हिरहाल किल्ला, व येतीनहट्टी.
४०००० प्यापल्ली
२०००० मुनीमड्ड पेठ गुजराती
३०००० यरदम रायचेरू
२५००० गोर बिदनूर
२०००० उदयभानगिरी ऊर्फ इट्टगीदुर्ग, व मार्गानकुटे वगैरे
२५००० नकुदोडी
३०००० सरंजमायत भारामाग
१०००० महाराजगड तळघाटचा किल्ला
१२००० पदटूर, रामेश्वर, जहागीर–इनसखान
१०००० आडगल गवनपल्ली सरंजाम–मल्हार कृष्ण
६००० दावनगिरी, तालुके चित्रदुर्ग
५००० जहागीर नागोराव श्रीनिवासराव तालुके बाळापूर संमत गोर बिदनूर पैकीं देहे १

२०००० उलतकल व बेमनहाल, व नेमकल तालुके रायदुर्ग
४०००० पेरवल्ली हवेली
२५००० चेनपली किल्ला
१५००० तुपगेरे
२५००० निठूर भोग समुद्र तो आऊक (?)
१०००० कृष्णपाड
७००० कलजनहल्ली व मसकल वगैरे तो चित्रदुर्ग
४००० चापन हाल तो आदवानी
४००० नंदीबेऊर व बेलमुलदरी व बासापूर व टिगाडे, तो हारपनहल्ली
५००० आसुडी तो बल्लारी
५००० मोलमामड खुर्द
५००० पेठ मजीदपूर, व रायर हुबळी, सरंजाम नागोराव श्रीनिवास
१५०० फत्तेवंडा तो अनंतपूर
१५०० जकायत हवेली
५००० फुटगांव तो कोल्हार व मुलबगल, व तायलूर पैकीं खेडीं सरंजाम मल्हार कृष्ण
२००० कालापूर तो चिटणीस
३२००० अमरापूर
९००० जुगडहल्ली व विभूतहल्ली, व नरसीपूर, व श्रीनिवासपूर तो चिक् बाळापूर देवस्थान व धर्मादाय अग्रहार

२०५४०००

पेशकसी रुजू सनद सरकार—रुपये
४०००० रायदुर्ग संस्थान
२०००० बिडगल व रत्नगिरी व पावगड व होसकोट संस्थानें ४
२५००० मदगिरी पाले, तालुके अदवानी

८५०००

नेहमीं सालाबादाप्रमाणें वसूल रुपये
६०००० अदवानी
३५००० मोकास बाबखेडीं
२५००० नख्त

६००००

| | |
|---|---|
| ४०००० | श्रीरंगपट्टण |
| १२००० | कोटकोडा, व कपटराल वगैरे पंचाळी |
| ३००० | मद्केर पाली |
| २००० | आऊमपाली |
| २०००० | रायदुर्ग संस्थान |
| १८००० | हरपनहल्ली संस्थान |
| ५००० | नडगल, व होसकोटे, व रत्नगिरी, व पावगड |
| ६०००० | आनेगुंदी |
| ४००० | केंचनगुड |
| ५००० | वल्लारी |
| ५००० | अनंतपूर |
| ६००० | कर्नोल |
| ६००० | गलवाल |
| १००० | च्याश्रष्टीबद्दल चित्रदुर्ग |
| ६००० | |
| १९३००० | |

तेरीज एकंदर रुपये.

| | |
|---|---|
| २०५४००० | कमाविसी पाा महाल व गड किल्ले वगैरे फुटगांव देखील |
| ८५००० | पेशकसी सरकारबद्दल. |
| १९३००० | नेहमीं सालाबादप्रमाणें. |
| २३३२०००" | |

मुराराव घोरपडे यांचा चरित्रवृत्तांत एकंदरींत अतिशय महत्त्वाचा व वीररसानें ओतप्रत भरलेला असून, तो मराठी भाषेमध्यें अद्यापि प्रसिद्ध झालेला नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. मुराररावांची थोडीशी माहिती कर्नाटकचे इतिहासकार मि. ऑर्म व ह्मैसूरचे इतिहासकार कर्नल विल्क्स ह्यांनीं दिली आहे; तिच्यावरून मुराराव हे अतिशय उच्चप्रतीचे योद्धे असून, त्यांचें सैन्य फारच तारीफ करण्यासारखें होतें, असें दिसून येतें.* अशा प्रकारचा

* कर्नाटकाचा इतिहासकार ऑर्म ह्यानें मुराररावांची व त्यांच्या सैन्याची किती तारीफ केली आहे तें पहा:—

"Morari-row, after he surrendered Trichinopoly to Nizam-al-muluck in 1746, was permitted to erect a principality, dependent indeed on the Soubah of the Deccan, but independent of his own nation; as all new states

लष्करी योद्धा युरोपखंडामध्यें निपजला असता, तर त्याच्या चरित्रकथांचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले असते, ह्यांत शंका नाहीं. ह्या पुरुषाच्या जुना कागदपत्रांचा शोध लावून ते प्रसिद्ध करण्याची प्रेरणा व्हावी, ह्या हेतूनें आह्मीं ही अल्प माहिती एकत्र करून येथें सादर केली आहे. तिचा इतिहाससंशोधकांस अल्पसा तरी उपयोग होईल अशी आह्मांस आशा आहे.



are conducted with more vigour and attention than such as have been long established, he soon made himself admired and respected by his neighbours enlisting none of his countrymen but such as were of approved valour, and treating them so well, that they never entertained any thoughts of quitting him ; on the contrary the whole army seemed as one family ; the spirit of exploit which he contrived to keep up amongst them by equitable partitions of plunder, rendered them fond of their fatigues, and they never complained but when they had nothing to do. The choice he made of his officers still more discovered his capacity: for there was not a commander of 100 horse who was not fit to command the whole ; notwithstanding which every one was contented in his particular station, and they all lived in perfect harmony with each other, and in perfect obedience to their general. So that this body of troops were, without exception, the best soldiers of native Indians at this time in Hindustan. Besides the qualities common to the rest of the Maratta nation, such as activity, stratagem, great dexterity in the management of their horses and sabres, they had by their conflicts against Europeans surmounted in a great degree the terror of fire-arms, although opposed to them with the steadiest discipline; and what is more extraordinary, were even capable of standing against the vivacity of a cannonade from field pieces: although this terrible annoyance, never made use of in India before the war we are commemorating, continued to strike all other Indian troops with as much terror as their ancestors felt when regular musketry was first employed against them."

*—Orme's History of Indostan Vol. I P. 363.*



**शहाजीराजे भोंसले.**

(छत्रपति शिवाजी महाराज ह्यांचे वडील.)

# ९. नारायण त्रिमल हणमंते
# व
# रघुनाथ नारायण हणमंते.

श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज व त्यांचे वडील शहाजी महाराज ह्यांच्या पदरीं जे अत्यंत स्वामिनिष्ठ, राजकारणचतुर, निस्पृह आणि सत्यप्रिय असे मुत्सद्दी उदयास आले, व ज्यांनीं वंशपरंपरेनें मराठ्यांच्या गादीची ईमानें इतबारें सेवा बजाविली, त्यांमध्यें नारायण त्रिमल हणमंते व त्यांचे पुत्र रघुनाथ नारायण हणमंते ह्यांची गणना फार उच्चस्थानीं केली पाहिजे. हे दोघेही पितापुत्र भोंसल्यांचे पिढीजाद नौकर असून, दोघांचीं नांवें इतिहासांत फार प्रसिद्ध आहेत. शिवाजी महाराजांचे वडील शहाजी राजे ह्यांचे जवळ नारायण त्रिमल हणमंते यांनीं एकनिष्ठेनें नौकरी केली, व त्यांची पूर्ण कृपा व विश्वास हीं संपादन केलीं. शहाजी राजे विजापुरच्या दरबारीं राहिले, त्या वेळीं त्यांनीं पुणें येथें दादोजी कोंडदेव यांस ठेविलें, व नारायण त्रिमल हणमंते ह्यांस कर्नाटकांतील जहागिरीचा कारभार सांगितला. ग्रांटडफ साहेबांनीं 'नारोपंत हनुवंते' ( Naropunt Hunuwantay ) ह्मणून ज्यांचा नामोल्लेख आपल्या इतिहासांत केला आहे, तेच हे नारोपंत हणमंते होत. ते मलिक अंबराच्या हाताखालीं राज्यव्यवस्थेमध्यें शिक्षण घेतलेल्या निजामशाही ब्राह्मण मुत्सद्द्यांपैकीं एक असून, त्यांच्यावर शहाजीचा पूर्ण विश्वास होता, असेंही त्यांनीं लिहिलें आहे.

नारायण त्रिमल हणमंते ह्यांस शहाजी महाराजांनीं इ. स. १६४९।५० मध्यें दिलेली एक सनद उपलब्ध झाली आहे. त्यावरून शहाजी महाराजांकडे पुणें प्रांत जहागीर असून, त्यांनीं आपल्या ह्या इमानी नौकरांस बाणेरें गांव इनाम करून दिलें होतें असें दिसतें. नारायण त्रिमल हे शहाजी महाराजांबरोबर इ. स. १६३७ मध्यें कर्नाटक प्रांतीं गेले होते व ते बंगळूर येथें राहत असत. ते इ. स. १६५३ मध्यें वारले. त्यांच्या मृत्यूनें शहाजी राजे ह्यांस फार दुःख झालें.

नारायण त्रिमल ह्यांस किती पुत्र होते तें समजत नाहीं. परंतु रघुनाथ नारायण व जनार्दन नारायण ह्या दोघांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. हे दोघेही पुत्र आपल्या बापाप्रमाणेंच मोठे राजकारणी व धूर्त मुत्सद्दी निपजले. रघुनाथ नारायण ह्यांची बुद्धिमत्ता, शहाणपण आणि स्वामिभक्ति लक्ष्यांत घेऊन, शहाजी राजांनीं त्यांस आपल्या कर्नाटकांतील जहागिरीचे इ. स. १६५३ मध्यें दिवाण नेमिलें. त्याप्रमाणें तें काम त्यांनीं मरेपर्यंत केलें. नारायण त्रिमल ह्यांचे एक

नातेवाईक बाळकृष्णपंत हणमंते ह्मणून होते, त्यांस शिवाजी महाराजांनीं फडणिशीचें काम सांगितलें असाही उल्लेख आढळतो.

रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचें चरित्र फारच महत्त्वाचें आहे. त्यांनीं मराठ्यांची राजसत्ता कर्नाटकांत संस्थापित करण्याचे कामीं शिवाजी महाराजांस अप्रतिम साह्य केलें. शहाजी राजांस कर्नाटकामध्यें तंजावर प्रांत जहागीर मिळाला व तेथें त्यांचे पश्चात् व्यंकोजी राजे ह्यांनीं स्वतंत्र राज्य संस्थापित केलें. त्या सर्व राजकारणांमध्यें रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचें प्रधान अंग असून, त्यांची त्यांत उच्च प्रतीची मुत्सद्देगिरी दिसून येते. व्यंकोजी राजे ह्यांनीं शिवाजी महाराजांस साह्य करून मराठी साम्राज्याचा प्रसार अखिल दक्षिण हिंदुस्थानांत करावा, अशी अहर्निश कळकळ व महत्त्वाकांक्षा, रघुनाथ नारायण हणमंते ह्यांच्या ठिकाणीं होती, व त्याप्रमाणें त्यांनीं अंतःकरणपूर्वक प्रयत्नही केले. शिवाजी महाराजांचे उच्च विचार व त्यांच्या महत्त्वाकांक्षा व्यंकोजीसारख्या गर्विष्ठ व डामडौली पुरुषाच्या लक्ष्यांत येईनात, ह्मणून त्यांनीं त्याची स्पष्ट शब्दांनीं कानउघाडणी करून, ते शिवाजी महाराजांकडे इ. स. १६७७ मध्यें गोवळकोंड्यास गेले. तेथें त्यांनीं त्यांचें मन वेधून, त्यांस कर्नाटकावर स्वारी करून येण्याबद्दल प्रोत्साहन दिलें. शिवाजी महाराजांनीं त्यांच्या शहाणपणाच्या व राजकारणाच्या सल्ल्यास योग्य मान देऊन ते कर्नाटकावर चालून गेले, व त्यांनीं चंदीचंदावर, अरणी, वगैरे प्रांत काबीज केला. ह्या स्वारीमध्यें रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचें महाराजांस अप्रतिम साह्य झालें, ह्मणून त्यांनीं त्यांसच, नवीन जिंकलेल्या सर्व प्रांतावर, आपल्या वतीनें मुख्य कारभारी नेमिलें; आणि त्यांचे बंधु जनार्दनपंत हणमंते ह्यांस 'पंत सुमंत' हा अधिकार देऊन त्यांची आपल्या अष्टप्रधानांमध्यें योजना केली.

'शिवदिग्विजय' आदि करून मराठी बखरींमध्यें व खुद्द शिवाजी महाराजांनीं आपले सापत्न बंधु व्यंकोजी राजे ह्यांस लिहिलेल्या पत्रांमध्यें रघुनाथपंतांबद्दल आपलें उत्तम मत प्रदर्शित केलें आहे. व्यंकोजी व शिवाजी ह्यांचे मधील विग्रह ह्याच चतुर मुत्सद्याच्या शहाणपणानें नाहींसा होऊन, त्याच्याच मध्यस्तीनें दोघांचा सलोखा झाला, ही गोष्ट येथें नमूद करणें अवश्य आहे.* शिवाजी महाराजांनीं

* तंजावरचे व्यंकोजीराजास रघुनाथपंतांनीं ह्या वेळीं जो उपदेश केला आहे, तो फारच महत्त्वाचा आहे. तो येणेंप्रमाणें:—

"तुह्मी राजे, राजवंशीं जन्मास आलां. तुमचें चालणें कसें असावें कीं सर्वमान्य. तुह्मी ब्राह्मणासारिखें स्नानसंध्या, आत्मानात्मविचार करूं लागल्यावरी, इतरांनीं कसें करावें?

आपल्या एका उपदेशपर पत्रामध्यें व्यंकोजी राजास रघुनाथपंतांबद्दल असें लिहिलें होतें कीं, "रा. रघुनाथपंडित त्या प्रांतें आहेती. ते कांहीं इतर नव्हेती. आपले पुरातन. तुह्मांसीं कोणे रीतीनें वर्तावें हें निपुण जाणतात. आह्मांस मानितात तैसें तुह्मांस मानितात. आह्मीं यांचे ठायीं विश्वास ठेविला आहे, तैसा

---

हा तुमचा धर्म नाहीं. शिवाजी महाराजही उदासवृत्ति धरून, आत्मसाधन करूं ह्मणून इच्छिते जहाले; परंतु जवळचे चार कामदारांनीं बोध केला, समजले. तुह्मीही सुज्ञच आहां. समजलांत, वागाल; चिंता नाहीं. परंतु तुमची इच्छा जाली, ऐशास राज्य करून आत्मविचार करणें घडत नाहीं, असा अर्थ नाहीं. राज्य करूनच जनकराजांनीं परमार्थ संपादिला कीं नाहीं? तद्वत् तुह्मीही देशकालानुरूप वर्तन करणें तें विहित करावें. तें कोणतें ह्मणाल तरी, सर्वभूतीं दया ठेवून रागद्वेष सोडून, मोहांत न गुंततां, परमार्थबुद्धींनीं ईश्वर-भजन अंतःकरणीं दृढतर वागवून, आल्यागेल्याचा सत्कार करून, लोकांत चांगलेपणा मिळवून, गोड बोलोन मनोधारण ठेवावें. शत्रुपराभवाचे ठायीं दक्ष असावें. प्रजापालनीं निरालस्य असावें. विवेकबुद्धींनीं न्याय करावा. आपपर समान ठेवावे. अविचारी लोभ न धरावा. कृतघ्न, मद्यपी, यांशीं स्नेह न धरावा. ज्या समयीं जें कार्य करणें, तें त्या समयीं करावें. ज्यास जे योग्य तें त्यांस द्यावें. लहान थोर बुद्धि पहावी. गुण असेल तो ग्रहण करावा. अवगुण त्यागावा. दुर्भाषणीं मन घालों नये. विचाराशिवाय वागूं नये. संपत्तीनें भुलूं नये. संतमहंतां हेळूं नये. उगेंच श्रम घेऊं नये. पंडितांशीं विवाद करूं नये. पुत्रद्वेषी होऊं नये. कुपात्रीं रमूं नये. खल दंडिता राहूं नये. वाउगा शब्द बोलूं नये. मंत्र कोण्हा सांगूं नये. गर्व कदापि करूं नये. स्नानसंध्या सोडूं नये. मूर्खपणा घेऊं नये. कौशल्य करितां राहूं नये. दुसरीयास दूषण ठेवूं नये. पाठीशीं आलें, देऊं नये. प्रयत्न करितां राहूं नये. अतीत अभ्यागत करावा. हिशेब किशेब घ्यावा. शत्रुमित्र ओळखावा. विचारप्रसंग जाणावा. उपयोगानुरूप योग पहावा. कुलीनपणा न सोडावा. परंपरेचा सांप्रदाय चालवावा. आपपर ओळखावा. हात चालल्या चालवावें. यज्ञक्रियेशीं करवावें. नेमधर्मानीं राखावें. कुमार्गीं जातां आडवावें. दीनजनासीं तारावें. परस्त्रीशीं लाजावें. परद्रव्याशीं अंध व्हावें. फंदफित-व्यासीं मारावें. शरणागतां सांभाळावें. सदा सुप्रसन्न असावें. मायिक बुद्धीसी सोडावें. ऐसे कित्येक प्रकार आहेत. किती ह्मणून सांगावे? आपण सद्वंशीं जन्मास आलां. कार्य करितां उमजलांत. आतां मोहांत पडून, आह्मांपासोन बोलवितां, हें उचित नाहीं. महाराज ज्या चालींनीं चालले, त्या चालीनें आपणही चालावें. सर्वांचें मनोधारण रक्षावें. प्रजेचे आशी-र्वाद घ्यावे. कल्याणप्रद असेल तेंच करावें. हें आमचें ह्मणणें लक्षांत आणून चालल्यास धणी आहांत. जवळ माणूस नाहीं, असा दोष न आणावा. ह्मणून प्रार्थना करणें. समयोचित बोलणें, याचा राग मनांत आणून, विपर्यास केल्यास, लाचार आहों. आज्ञा दिल्यास महा-यात्रेस जाऊं. तीर्थवास करूं. आमचा धर्मच आहे. तुह्मी चाललां असतां, अधर्म ह्मणा-वयाचा. याजकरितां इतकें बोलणें प्राप्त जालें. ही नीति मनांत आणोन चालेल, त्यास इहपर उभय लोकीं उद्धारकारक आहे. हे विनंति."

विश्वास तुह्मींही ठेवून, कार्यप्रयोजनास परस्परें अनुकूल व साह्य होऊन वर्तत जाणें. पुरुषार्थ व कीर्ति आर्जणें."* अर्थात् खुद्द शिवाजी महाराजांनीं ज्यांच्याबद्दल असे प्रशंसापर उद्गार काढून, ज्यांच्या राजकारणनैपुण्याची तारीफ केली आहे, त्यांची योग्यता अधिक वर्णन काय करावी ?

'शिवदिग्विजय' बखरकार लिहितातः– 'रघुनाथपंत आधींच पंडित, त्यांत कारभारी, विशेष विद्वज्जनांचा समागम, न्यायनीतिपरनिष्ठ, ज्ञाते,' असून, त्यांनीं व्यंकोजी राजांचा कारभार करून, महाराजांचे मुलखांचें व फौजेचें काम, बोभाट न पडे असें चालविलें.' प्रत्यक्ष शिवाजीमहाराजांनीं रघुनाथपंताबद्दल असे उद्गार काढिले कीं, 'वरकड मनुष्यें आमचे संपादिल्याचीं; परंतु तुह्मी वडिलोपार्जित सेवक. आह्मी चुकलों असतां शासन करून सन्मार्गास लावणार. अशी योग्यता व उपमा दुसरियास येणें नाहीं. आपण आह्मांस महाराजांचे ( शहाजी राजे ) ठायीं, ह्मणोन कल्याणाची इच्छा ठेवितां. वरकडास हे इच्छा ठेवणें कारण काय ? आपणासारिखे आपण एक!' अशा स्तुतिगौरवास पात्र असणाऱ्या महाजनाची योग्यता वर्णन करण्यास कोणाची लेखणी समर्थ आहे ?

रघुनाथपंतांनीं, शिवाजी महाराज कर्नाटकांतून महाराष्ट्रांत परत आल्यानंतर, इ. स. १६७७ पासून इ. स. १६८१ पर्यंत, तिकडील राज्यकारभार व मुलकी वसुलाची व्यवस्था फार दक्षपणानें केली. शिवाजी महाराज इ. स. १६८० मध्यें मृत्यु पावल्याचें वर्तमान रघुनाथपंतांस समजलें, तेव्हां त्यांस अत्यंत दुःख झालें. तथापि त्यांनीं तें दुःख बाजूस ठेवून आपलें कर्तव्य उत्तम रीतीनें बजाविलें. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सर्वत्र अव्यवस्था व गोंधळ झाला. त्या वेळीं रघुनाथपंतासारखा शहाणा व अनुभवी मुत्सद्दी कर्नाटकांत नसता, तर मराठ्यांचा अंमल तेव्हांच नाहींसा झाला असता. परंतु रघुनाथपंतांनीं आपल्या वजनानें व दराऱ्यानें, संभाजीच्या कारकीर्दींत देखील तिकडील राज्यव्यवस्थेंत अंतर पडूं दिलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांनीं तिकडील प्रांतांचा उत्तम बंदोबस्त करून व सुरळीत रीतीनें वसूल करून, पुष्कळ द्रव्य खजिन्यांत शिल्लक ठेविलें.

शिवाजी महाराजांचे पश्चात् संभाजी महाराजांनीं स्वैर वर्तन सुरू केलें; व अविचारानें, राज्यांतील जुन्या, अनुभवी व स्वामिभक्त मंत्रिमंडळास कैद केलें, आणि महाराजांच्या वेळच्या राज्यव्यवस्थेची शिस्त अगदीं नाहींशी केली. ही बातमी रघुनाथपंतांच्या कानावर गेली. तेव्हां त्यांस इतकें वाईट वाटलें कीं, त्यांनीं

* हें अस्सल पत्र तंजावरचें राजघराणें ह्या इतिहासांत छापिलें आहे. पृष्ठ ४३ पहा.

संभाजी महाराजांस समक्ष भेटून त्यांच्या नेत्रामध्यें सुविचाराचें अंजन घालण्यासाठीं स्वतः महाराष्ट्रांत येण्याचा निश्चय केला. त्याप्रमाणें ते इ. स. १६८१ मध्यें रायगडास आले, आणि त्यांनीं संभाजी महाराजांस कर्नाटकांतून आणलेला नजरनजराणा व विपुल द्रव्य सादर करून, भरदरबारांत त्यांची कानउघाडणी केली; आणि त्यांच्या अविचारी वर्तनाचा स्पष्टपणानें निषेध करून त्यांस सदुपदेश केला. रघुनाथपंतांचे बंधु जनार्दनपंत व मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे ह्यांस संभाजी राजांनीं प्रतिबंधांत ठेविलें होतें, आणि खुद्द रघुनाथपंतांवरही अप्रिय बोलण्याबद्दल तोच प्रसंग गुदरला असता. परंतु त्यांच्या कळकळीच्या झणझणित उपदेशाचा संभाजी राजांवर क्षणभर तरी अनुकूल परिणाम होऊन, त्यांनीं त्यांस जुन्या प्रधानमंडळास बंधमुक्त करण्याचें वचन दिलें व त्यांचा बहुमान करून त्यांस कर्नाटकामध्यें जाण्याची परवानगी दिली. निस्पृह व सत्यवादी महात्म्यांच्या वाणीमध्यें केवढा अद्वितीय प्रभाव व केवढी अलौकिक शक्ति असते त्याचें हें उत्कृष्ट उदाहरण आहे. संभाजीसारख्या दुष्ट जनाच्या मनावरही तिचा कांहीं काल तरी इष्ट परिणाम झाला, यांत शंका नाहीं. संभाजी राजांनीं रघुनाथपंत कर्नाटकामध्यें गेल्यानंतर, त्यांचे बंधु जनार्दनपंत हणमंते व पेशवे मोरोपंत पिंगळे ह्यांस लगेच सोडून दिलें; एवढेंच नव्हे, तर, त्यांनीं जनार्दनपंतांस पुनः 'आमात्य पद' अर्पण केलें व मोरोपंतांचे चिरंजीव निळोपंत ह्यांस चंदी प्रांताचे मुतालिक नेमिलें.* असो.

रघुनाथ नारायण हणमंते हे संभाजीराजांचा निरोप घेऊन कर्नाटकामध्यें परत येण्यास निघाले. परंतु ते चंदी मुक्कामीं पोंचण्यापूर्वींच त्यांचा प्रवासामध्येंच शेवट झाला. ही गोष्ट इ. स. १६८२ च्या प्रारंभीं घडून आली असावी, असें दिसून येतें. रघुनाथ नारायण हणमंते ह्यांच्या शहाणपणाचा लौकिक कर्नाटक प्रांतीं अद्यापि देखील ऐकूं येतो. त्यांचे सारखे मराठी राज्याचे खरे हितचिंतक, निस्सीम स्वामिभक्त, महाराजकारस्थानी, आणि परम चतुर मुत्सद्दी त्या काळीं पैदा झाले, ह्मणून मराठ्यांच्या राजसत्तेचा कर्नाटकामध्यें प्रसार झाला, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं.

---

* रघुनाथ नारायण ह्यांच्या भेटीची हकीकत ग्रांटडफ ह्यांनीं समग्र दिली आहे, ती वाचण्यासारखी आहे. ती येणेंप्रमाणें:—

"About the same time Ragonath Narain Hunwantay undertook a journey from the Carnatic, having left Hurjee Raja Mahareek in charge of the government during his absence. On his arrival at Raigurh, as he brought with him considerable treasure, the balance saved from the revenues of the district, he was well received, and, as was due to one of the Purdhans, and



रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचे बंधु जनार्दन नारायण व पुत्र त्रिमल रघुनाथ ऊर्फ तिमाजी रघुनाथ हे राजाराम महाराजांबरोबर चंदीस गेले, व पुढें ते त्यांचे दरबारांत तिकडेच राहिले, असें दिसतें. ह्या त्रिमल रघुनाथाचे चिरंजीव, गंगाधर त्रिमल व रघुनाथ त्रिमल ह्यांनीं सातारा मुक्कामीं येऊन, राजशक ६२ ह्मणजे ता. २९ आक्टोबर इ. स. १७३५ रोजीं, श्रीमंत छत्रपति शाहू महाराज ह्यांच्याकडून बाणेरें गांवाबद्दल नवीन सनद करून घेतली आहे. तिची नक्कल आह्मांस उपलब्ध झाली आहे. तिच्या पोटीं शहाजी महाराजांची जुनी सनदही दाखल केलेली आहे. ह्या दोनी सनदांवरून हणमंतेघराण्याची बरीच माहिती मिळते. ही संयुक्त सनद फार महत्त्वाची आहे.

श्री.

"स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ६२ राक्षसनाम संवत्सरे अश्विन बहुल नवमी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं:–






राजश्री गंगाधर त्रिमल व रघुनाथ त्रिमल उपनाम हणमंते, गोत्र मुद्गल, सूत्र अश्वलायन यांसी दिल्हें इनामपत्र ऐसीजेः– तुह्मीं साताराचे मुक्कामीं स्वामीसन्निध विनंति केली जे, आपले पणजे रा. नारायण त्रिमल दीक्षित यांस, महाराज राजश्री शाहाजी महाराज यांणीं मौजे बाणेरें ता० हवेली प्रांत पुणें हा गांव धारादत्त इनाम कुलबाब दरोबस्त वंशपरंपरेनें करून दिल्हा. त्याप्रमाणें महाराज राजश्री थोरले कैलासवासी स्वामी व राजश्री संभाजी महाराज

---

so distinguished an officer, a full durbar was assembled on the occasion. Rugonath Narain took this unusual opportunity of entering on public affairs and represented all the evils likely to result from the disregard shown to experienced servants and to the forms of Government instituted by Sivajee; he pointed out what ought to be done, and, whilst maintaining his argument, boldly censured Sumbhajee's proceedings and predicted his fall.

It would seem difficult to account for the temerity of Rugonath Narain, especially as his brother, Janardin Punt, was still in confinement; but Sumbhajee was probably sensible that any violence towards Ragonath Narain might at once place the Carnatic at his under disposal; and it is remarkable that language from a man whom he respects generally overawes the most ungovernable Maratha. Sumbhaji promised to release Moro Punt and Jenardin Punt. Raghonath Punt himself was civilly dismissed to his government. He died, however, before he reached Ginjee, and Sumbhaji not only fulfilled his promise of releasing Moro Punt and Jenardin Punt, but advanced the latter to the rank of Amat, vacant by his brother's death &c."

व राजश्री राजाराम साहेब यांचे कारकीर्दीपरयंत इनाम चालिला. अलीकडे राजारामसाहेब चंदीस गेले. त्यासमागमें आपले बाप रा० तिमाजी रघुनाथ चंदीस गेले. जातेसमयीं मौजे मजकूर, श्री नारायणदेव चिंचवडकर यांचे स्वाधीन कमाविसीस केला. ते गांवचा ऐवज आह्मांकडे पाठवीत होते. त्याउपरी महाराज साहेब मोंगलाईतून स्वराज्यास आले. ते समयीं देवांनीं, कमाविसीमुळें वहिवटा चालत होता त्यामुळें मौजेमजकूर आपणाकडे इनाम करून घेतला, परंतु गांवचा ऐवज आह्मांकडेच वसूल देत होते, व नारायणदेवांनीं महाराजांस पत्रही दिल्हें आहे जे, मौजे मजकूरचा वडिलांस पुरातन इनाम आहे, त्याप्रमाणें पत्रें करून देऊन चालविला पाहिजे ह्मणोन पत्र आहे. तेंही मनास आणून आपला गांव आपणांस इनाम करार करून द्यावा ह्मणोन विनंति केली. व नारायण देवांचें पत्र व पूर्वील पत्र, राजश्री महाराज शाहाजीराजे व थोरले कैलासवासी महाराज यांचीं पत्रें आणून दाखविलीं. त्याचा मजकूरः—

[शहाजी राजे ह्यांचें पत्र]

"अजरख्तखानें महाराज राजश्री शहाजी राजे दाइम दौलत हूं बजानेब हूं कारकुनानी हाल व इस्तकबल व देशमुखांनीं प्रांत पुणें बिदानद सु॥ खमसैन अलफ. दरवजे बाबत इनाम रा. नारायण त्रिमल दीक्षित यांस इनाम मौजे बाणेरें ता॥ हवेली प्रांत पुणें, देहे एक, देखील नख्तयाती व महसूल व बाजे उजबती देखील तालुका ठाणें व तालुका देहाय व ठाणें बाब व सैल बैल, व मोईन व सादीलवार व खर्चपट्टी व पायपोसी व दसरापट्टी व ठाणेंभेट व हजूर भेट व मोहीमपट्टी व हेलकटी व तमाखू व बागाईत व अहीस्थान व विराहीस्थान व मोहतर्फा व थळजकाती, निकाळ व पैसाळ, व अश्वजकाती व ठाणबंदी व गाडा व घोडा व बंदी व बरदा व मेढी स्थळ व वेसीपेढी व पालभारा व बेगारी व राबता व आडपाली व कानू व गैरकानू व कमाविस हाल व पेस्तर, वेठबेगार, फरमासी व सरद रसत व बार नगजग, अंबराई कुलबाब कुलकानू बाब महसुलेखी मौजे मजकूर देह १ एक अजरामऱ्हामत करून इनाम दिघला असे. दुमालें करणें. अवलाद अफलाद चालविणें. यास मुसलमान होऊन जो कोणी इस्कील करील, त्यास मकेमध्यें सूर मारल्याची सोगंध असे; व हिंदु होऊन जो कोणी इस्कील करील, त्यास कासीमध्यें गाई मारल्याचें पाप असे. हर दरसाल ताजे खुर्दखताचा उजूर न करणें. तालीक लिहोन घेऊन अस्सल दीक्षितमजकुरापासीं परतोन देणें. छ १० जिल्हेज."

येणेंप्रमाणें पत्र तुह्मीं आणून दाखविलें, व कैलासवासी राजश्री थोरले महाराज तीर्थरूप आबासाहेब व तीर्थरूप काकासाहेब यांचीं पत्रें आणून दाखविलीं. तीं मनास आणून, मौजेमजकूर तुमचा पुरातन इनाम, चिंचवडकर देव यांचे कमाविसीचे वहिवटियामुळें आपणाकडे इनाम करून घेतला असें जाणून, स्वामी कृपाळू होऊन, मौजेमजकूर देवांकडून दूर करून, हल्लीं तुह्मांस स्वराज्य व मोंगलाई अंमल येकून दुतर्फा कुलबाब कुलकानू, देखील इनाम तिजाई व सरदेशमुखी व साहोत्रा व सरपाटीलकी व सरगौंडकी व हल्लीपट्टी व पेस्तरपट्टी, जलतरु पाषाण निधिनिक्षेपसहित, खेरीज हक्कदार व इनामदार, तुह्मांस व तुमचे वंशपरंपरेनें इमान करार करून दिला असे. तरी तुह्मीं मौजे मजकूर चतुःसीमापूर्वक मर्यादेप्रमाणें आपले दुमाल करून घेऊन, मौजेमजकूर सदरहूप्रमाणें तुह्मीं व तुमचें वंशपरंपरेनें इनाम अनुभवून सुखरूप राहाणें."

रघुनाथ नारायण हणमंते ह्यांच्या घराण्याची साधार माहिती प्रसिद्ध होणें अवश्य आहे. सांप्रत प्रसिद्ध असलेल्या जुन्या बखरीमध्यें 'हणमंते' ह्या नांवाचा उल्लेख कोठें कोठें आढळून येतो, परंतु त्यांत अनेक चुका दृष्टीस पडतात. रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचें नांव कोठें कोठें 'रघुनाथ त्रिमल' असें लिहिलेलें आहे, तर जनार्दन नारायण ह्यांचें नांव 'जनार्दन त्रिमल' असें लिहिलेलें आहे, असा सर्व घोटाळा झालेला आहे. तरी ह्या घराण्याची अस्सल वंशावळ कोणी शोधून काढील तर फार बरें होईल. रघुनाथ नारायण हणमंते ह्यांचे बंधु जनार्दनपंत ह्यांस शिवाजी महाराजांनीं प्रथम मुजमूचा अधिकार सांगितला व नंतर राज्याभिषेकसमयीं त्यांस 'पंत सुमंत' असें पद दिलें. तें त्यांच्याकडे संभाजी महाराजांच्या कारकीर्दींत कांहीं दिवस चालू होतें; पुढें तें बंद झालें. जनार्दनपंत ह्यांनीं राजाराम महाराजांस चंदी येथें चांगलें साह्य केलें, ह्मणून त्यांनीं इ. स. १६९२ मध्यें त्यांस पुनः 'आमात्य' पदाचा अधिकार दिला. तो त्यांच्याकडे इ. स. १६९७ पर्यंत होता. जनार्दनपंत केव्हां वारले तें समजत नाहीं. ह्यांच्या वंशजांची माहिती बरोबर मिळत नाहीं. तथापि त्यांचे कांहीं वंशज तंजावराकडे आहेत असें समजतें. त्यांचा शोध लावून तिकडील कागदपत्रांचा कोणी तपास करील तर त्याचे महाराष्ट्राच्या इतिहासावर फार उपकार होतील.

---



अर्काटचा नवाब महंमद अली.

# भाग आठवा.

## राजे प्रतापसिंह यांचे कारकीर्दीचा उत्तरार्ध.

इ. स. १७४१ मध्यें कर्नाटकांतील राजकारणांचा मुख्य सूत्रचालक जो चंदासाहेब, तो मराठ्यांच्या कैदेंत गेल्यानंतर कर्नाटकांत बरीच स्वस्थता झाली, व इ. स. १७४९ पर्यंत– ह्मणजे चंदासाहेब सातारच्या किल्ल्यांतून सुटून येईपर्यंत, तंजावरच्या प्रतापसिंह राजास बराच स्वस्थपणानें राज्यकारभार करितां आला, असा मागील भागांत उल्लेख केला आहे. त्याप्रमाणें इ. स. १७४४ पर्यंत विशेष ह्मणण्यासारखी धामधूम झाली नाहीं. इ. स. १७४४ मध्यें त्रिचनापल्लीचा किल्ला निजामउल्मुलुखानें मुरारराव घोरपडे यांजकडून हस्तगत करून घेतला, व तो अनवरुद्दीनखान याचे ताब्यांत देऊन, त्यास अर्काटच्या सुभ्याचीं वस्त्रें दिलीं. त्यानें कर्नाटकांतील हिंदू राजे, संस्थानिक व पाळेगार यांच्यावर आपली सार्वभौमसत्ता प्रस्थापित करण्याची हाव धरून, त्यांच्याकडून पेषकश अथवा खंडणी मागण्यास सुरवात केली. तंजावरचे प्रतापसिंह राजे हे मोठे वैभवसंपन्न आणि स्वाभिमानी होते, ह्मणून त्यांना आपल्या सत्तेखालीं आणण्यासाठीं, अनवरुद्दीनखानानें त्यांस बादशाही खंडणी मान्य करा किंवा युद्धास सिद्ध व्हा, असा निरोप पाठविला. प्रतापसिंह राजांनीं खंडणी देण्याचें मान्य न करून त्यास युद्धास पाचारण केलें. तेव्हां अनवरुद्दीनखानाचा पुत्र माफूजखान हा तंजावरावर चालून गेला. त्याचें व तंजावरच्या सैन्याचें इ. स. १७४४ चे जून महिन्यांत तंजावरच्या किल्ल्याच्या उत्तरेस एक कोसावर हातघाईचें युद्ध झालें. ह्या युद्धामध्यें माफूजखानाचा पराजय झाला, आणि तो परत त्रिचनापल्लीस गेला. तेव्हां अनवरुद्दीनखानानें भारी फौज जमवून इ. स. १७४५ मध्यें तंजावरावर पुन्हां स्वारी केली. या स्वारीमध्यें कालाहस्ती, व्यंकटगिरी वगैरे ठिकाणचे जमीनदार त्यास सहाय झाले होते. या प्रचंड सैन्याचें युद्ध, तंजावरच्या ईशान्येस तीन कोसांवर, पशुपतिगुडी ह्मणून एक गांव आहे, तेथें मोठ्या निकरानें झालें. ह्या प्रसंगीं तंजावरच्या सैन्याचे अधिपति गोविंदराव शेडगे व मानाजीराव जगताप हे असून, त्यांच्या बरोबर तीन हजार निवडक स्वार व कांहीं तोफा होत्या. 'श्रीमत् भोंसलवंशचरित्र' या शिलालेखामध्यें ह्या युद्धाचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें दिलें आहेः–"उभय सेनांहीं जमून प्रातःकालसमयीं युद्ध जाहल्यांत, तंजावरची फौज समग्र आंत शिरून, त्यांच्या तोफखान्यासही मागें टाकून, अनवरद्दीखानाची फौज तमाम ढवळून जाऊन, तंजावरचे फौजेकडून बहुत फौज मारली गेली. बहुतजण नामांकित देखील,

पुढें टिकवेनासें होऊन पळून गेले. शेवटीं तंजावरचे फौजेच्या लोकांनीं अनवरद्दीखानाचा खास स्वारीचा हत्ती, भाल्या बर्चीच्या मारानें खिळून उभा करून, उड्या टाकून, हत्तीवरी चढून अंबारीच्या काहाडण्या कापूं लागले. तेव्हां अनवरद्दीखान सांपडला जाऊन, चार घटकांपावेतों आपल्या तोंडानें तंजावरचे फौजेचे लोकांस दुराई देऊन रहातें केलें. इतक्यांत किल्ला समीप जाहला; करितां महाराजांस हें वर्तमान कळून, महाराजांनीं बादशाही सुभेदार (ह्मणून) अनवरद्दीखानास सोडून येणें ह्मणून निरोप पाठविला. तदनंतर खानमजकुरांनीं महाराजांस वस्त्र पत्र पाठवून, महाराजांकडूनही आपण वस्त्र पत्र पावून समेट केला."*

ह्या युद्धामध्यें तंजावरच्या राजास किंवा अनवरुद्दीनखानास यश आलें, हें खात्रीनें सांगतां येत नाहीं. तथापि, ह्या वेळीं तंजावरच्या राजानें, अनवरुद्दीनखानास ७ लक्ष रुपये खंडणी देण्याबद्दल दस्तऐवज लिहून दिला व कांहीं रोकड रक्कमही दिली, असें इंग्रजी कागदपत्रांवरून दिसून येतें.

इ. स. १७४६ पासून इ. स. १७४९ पर्यंत तंजावरच्या इतिहासांत विशेष महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्याचें आढळत नाहीं. इ. स. १७४९ पासून तंजावर येथें पुन्हां राजकीय तंटे उपस्थित झाले व फिरून युद्धास प्रारंभ झाला. इ. स. १७४९ चे प्रारंभीं पूर्वीं पदच्युत केलेला सयाजी ऊर्फ शहाजी हा तंजावरच्या गादीवर आपला हक्क सांगण्यास सिद्ध होऊन, त्यानें मद्रासच्या ईस्ट इंडिया कंपनीकडे संधान बांधिलें, आणि त्यांस देविकोटा किल्ला देण्याचें अभिवचन देऊन, त्यांच्याकडून सैन्य घेऊन तंजावरावर स्वारी करण्याचा घाट घातला. या शहाजीनें, आपण तंजावरच्या गादीचे खरे वारस आहोंत व आपला हक्क तंजावरच्या प्रमुख सरदारांनीं व लोकांनीं मान्य केला आहे, अशी मद्रासच्या गव्हर्नरास खोटी थाप दिली. ती त्यांस खरी वाटून, त्यानें कंपनीच्या हितावर दृष्टि देऊन, त्यास मदत देण्याचें मान्य केलें. त्याप्रमाणें कॅपटन् कोप याच्या हाताखालीं ४३० गोरे लोक व १००० एतद्देशीय फौज देऊन, त्यास शहाजीच्या बरोबर तंजावरच्या स्वारीवर रवाना केले.

* ह्याच दोन युद्धांची हकीकत, अनवरुद्दीनखानानें ता. २३ जून इ० स० १७४४ व ता. २१ अक्टोबर इ० स० १७४५ या दिवशीं मद्रासेंतील गव्हर्नरास लिहिलेल्या पत्रांत अगदींच भिन्न दिली असून, त्यांमध्यें तंजावरच्या फौजेचा आपण अगदीं पराभव करून मोठा विजय संपादन केला, अशी फुशारकी मारली आहे. (व्यंकास्वामीरावकृत 'Manual of The Tanjore District' पहा.) ही हकीकत खरी मानावी किंवा तंजावरच्या शिलालेखांतील हकीकत खरी मानावी, ह्याचा निर्णय करण्याचें काम चाणाक्ष वाचकांकडे सोंपविणें बरें!

इकडे प्रतापसिंह महाराजांस, आपला प्रतिस्पर्धी शहाजी हा इंग्रजांची मदत घेऊन तंजावरावर येत आहे, अशी बातमी कळतांच, त्यांनीं आपला सरदार मानाजी जगताप याचे बरोबर इंग्रजांशीं बोलणें लावून त्यांस खरी वस्तुस्थिति विदित केली; आणि शहाजीचा तंजावरच्या गादीवर कोणताही हक्क नसून तो केवळ ढोंगी आहे, असें त्यांस कळविलें. परंतु इंग्रजांनीं शहाजीचा पक्ष घेतल्या-मुळें त्यांनीं देविकोट्याच्या किल्ल्यावर खुष्कीच्या मार्गानें स्वारी केली. त्यांचें व तंजावरच्या लोकांचें हातघाईचें युद्ध झालें, पण त्यांत त्यांस विशेष यश आलें नाहीं. तेव्हां त्यांनीं समुद्राच्या मार्गानें मेजर लारेन्स यांचे हाताखालीं आणखी नवीन सैन्य देऊन पाठविलें. नंतर पुन्हां उभयपक्षांचे देविकोटा येथें निकराचें युद्ध झालें. ह्या युद्धामध्यें पुढें प्रसिद्धीस आलेला, इंग्रजांचा नामांकित योद्धा 'लॉर्ड क्लाईव्ह' यानें आपल्या रणशौर्याचें पहिलें प्रदर्शन केलें, आणि देविकोटा किल्ला जिंकून घेतला. ह्या वेळीं तंजावरच्या मराठी सैन्यानेंही आपलें चांगलें शौर्य दाखविलें. ह्या युद्धांत उभयपक्षांकडील बरेच लोक धारातीर्थीं पतन पावले; परंतु शेवटीं इंग्रज सैन्याची सरशी झाली. तेव्हां प्रतापसिंह राजानें त्यांच्याशीं तहाचें बोलणें लावून सलोखा केला. हा तह मेजर लारेन्स् यांच्या बरोबर ता २५ जून इ. स. १७४९ रोजीं झाला. ह्यामध्यें तंजावरच्या राजानें देविकोटाचा किल्ला व त्या सभोंवतालचा ३१५०० रुपये उत्पन्नाचा मुलूख, व लढाईच्या खर्चाबद्दल एक लक्ष रुपये देण्याचें मान्य केलें; आणि शहाजीनें चार हजार रुपये नेमणूक घेऊन तंजावरच्या गादीस केव्हांही त्रास न देतां इंग्रजांचे ताब्यांत राहावें असें ठरविलें. त्याप्रमाणें इंग्रजांनीं शहाजीस मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज किल्ल्यामध्यें प्रतिबंधामध्यें ठेविलें. तेथून तो पुढें पळून गेला व त्याचा पुनः पत्ता लागला नाहीं. असो.

मध्यंतरीं उपस्थित झालेलें हें शहाजीचें विघ्न टळल्यानंतर तंजावरच्या प्रताप-सिंह राजास कांहीं शांतता मिळेल असें वाटलें होतें, परंतु त्याचा शत्रु चंदासा-हेब हा मराठ्यांच्या कैदेंतून मुक्त होऊन ह्याच वेळीं कर्नाटकांत येऊन दाखल झाला, व त्यानें निजामउल्मुलुखाचा नातू हिदायत् मोहिद्दीनखान यास 'मुज-फरजंग' असा किताब देऊन, त्याच्या नांवानें 'दक्षिणचा सुभेदार' अशी द्वाही फिरविली; आणि मोठें सैन्य जमवून अर्काटचा नबाब अनवरुद्दीनखान ह्याजवर चाल केली. ह्या उभयतांची अंबूर येथें निकराची लढाई झाली. ह्या लढाईंत अनवरुद्दीनखान हा मारला गेला. तेव्हां चंदासाहेबानें आपणांस 'अर्काटचा नबाब' असें पद धारण करून, मोठ्या विजयानंदानें त्रिचनापल्लीवर स्वारी

करण्याचा बेत केला. अर्थात् अशा रीतीनें चंदासाहेबाची धामधूम कर्नाटकांत चालू झाल्यामुळें, तंजावरचें स्वास्थ्य कमी व्हावें व तेथील राजास आपलें संस्थान सुरक्षित ठेवण्याबद्दल काळजी उत्पन्न व्हावी, हें अगदीं साहजिक आहे.

या संबंधाची सविस्तर हकीकत 'तंजावरचें गॅझेटीयर' व 'ऑर्म्‌चा कर्नाटकचा इतिहास' या ग्रंथांत दिली आहे. तिचें पुनरुच्चारण न करितां आह्मी फक्त तंजावरासंबंधाच्या महत्त्वाच्या गोष्टी संक्षेपेंकरून येथें सादर करितों.

चंदासाहेब याची साताराच्या किल्ल्यावरून जेव्हां सुटका झाली, त्या वेळीं त्यानें मराठ्यांशीं असा करार केला होता कीं, मी तंजावरच्या राजास बिलकुल त्रास देणार नाहीं. परंतु अनवरुद्दीनखानाच्या युद्धामध्यें त्यास जें यश आलें, त्या योगानें तो मदांध होऊन आपला करार विसरला, आणि स्वसैन्याच्या खर्चासाठीं विपुल द्रव्य प्राप्त करून घेण्याकरितां तंजावरावर चालून आला. त्यानें प्रथम फौजेच्या खर्चास पाठवून द्यावें ह्मणून प्रतापसिंह राजांकडे मागणी केली. परंतु त्यानें, अनवरुद्दीनखानाचा मुलगा महंमदअल्लीखान हा अर्काटच्या गादीचा खरा वारस असून तो आपला स्नेही आहे, तेव्हां त्याच्या शत्रूस मी कुमक करूं इच्छित नाहीं, असें उत्तर पाठविलें. अर्थातच तें उत्तर चंदासाहेबास न रुचून त्यानें तंजावरच्या किल्ल्यास मोर्चे लाविले. प्रतापसिंह राजानें चंदासाहेबाचा प्रतिस्पर्धी जो अर्काटचा नबाब महमदअल्ली त्याजकडे सूत्र बांधून, त्याचे मार्फत नासिरजंगास मदतीस बोलाविलें, व तो येईपर्यंत चंदासाहेबास सत्तर लक्ष रुपये व त्याचे पुरस्कर्ते जे फ्रेंच लोक त्यांस दोन लक्ष रुपये देण्याचें अभिवचन दिलें. या वेळीं चंदासाहेबास मुख्य सैन्यबळ काय तें, फ्रेंच लोकांचेंच होतें. त्यामुळें त्यांना अनुकूल करून घेण्यासाठीं प्रतापसिंह राजानें त्यांस कारिकल बंदर आणि कांहीं मुलूख देण्याचें याच वेळीं कबूल केलें. चंदासाहेबानें प्रतापसिंह राजाकडून छपन्न लक्ष रुपयांचा कागद लिहून घेतला व बाकीच्या रकमेबद्दल जडजवाहीर व सोनेंनाणें देण्याचें बोलणें लाविलें. इतक्यांत नासीरजंगाची फौज तंजावरच्या कुमकेस आल्याची बातमी आली. तेव्हां चंदासाहेब पांडेचरीस पळून गेला व तंजावरावरील हें अरिष्ट कांहीं वेळ तरी दूर झालें.

यानंतर अर्काटचा नबाब महंमदअल्ली आणि चंदासाहेब यांचें इतिहासांत गाजून राहिलेलें युद्ध चालू झालें. मद्रासकर इंग्रजांनीं महंमदअल्लीचा पक्ष स्वीकारिला, व फ्रेंचांनीं चंदासाहेबाची बाजू धरिली. आणि इतर संस्थानिक व पाळेगार यांनीं, जिकडून स्वार्थ साधेल तो पक्ष पत्करिला. ह्या युद्धामध्यें तंजावरच्या राजानें आपल्या मानाजीरावनामक मुख्य सेनापतीस, महंमद-

अलीच्या मदतीस पाठविलें. ह्या मानाजीरावाचा ऑर्म इतिहासकारानें 'माणकजी' [ Monacjee ] या विशेष नांवानें जागोजाग उल्लेख केला आहे. हा मराठा सरदार फार शूर असून, त्यानें तीन हजार स्वार व दोन हजार पायदळ इतकें निवडक सैन्य घेऊन, चंदासाहेब व फ्रेंच लोक यांच्याशीं अनेक ठिकाणीं निकराचे सामने केले व त्यांस अगदीं जेरीस आणिलें. अखेर श्रीरंगम्‌जवळील लढाईंत चंदासाहेब अगदीं हताश होऊन तो मानाजीराव यांच्या हातीं सांपडला. त्यानें त्याचा शिरच्छेद करून, त्याचें शीर त्रिचनापल्लीचे किल्ल्यांत महंमदअलीकडे नजर पाठविलें. चंदासाहेबासारखा बलवान् शत्रू आपल्या हातीं जिवंत सांपडावा अशी महंमदअली, इंग्रज, मुरारराव घोरपडे इत्यादिकांची उत्कट इच्छा होती. परंतु तंजावरच्या सेनापतीनें त्या सर्वांचें ह्मणणें अमान्य करून, चंदासाहेबास तारीख ३ जून इ. स. १७५२ रोजीं मोक्षाची वाट दाखविली. याप्रमाणें चंदासाहेबाचा असा दुःखद रीतीनें अंत झाला.

यानंतर श्रीरंगम् व त्रिचनापल्ली हीं दोन्हीं स्थळें महंमदअलीखानाचे हातीं आलीं. महंमदअलीखानानें, या युद्धामध्यें तंजावरच्या राजानें आपणास साहाय्य केलें ह्मणून, त्यांस बक्षिसादाखल दहा वर्षांची खंडणी माफ केली; आणि कोई-लाडी व यलंगाडू हे दोन तालुके जहागीर दिले. याप्रमाणें तंजावरच्या फौजेच्या पराक्रमाबद्दल महंमदअलीकडून मोबदला मिळाला. परंतु तंजावरच्या राजास त्यायोगानें कांहीं सुख न होतां, उलट त्रास व भीति मात्र उत्पन्न झाली. त्रिच-नापल्लीच्या युद्धामध्यें महंमदअलीस साहाय्य करण्यासाठीं, ह्मैसूरचा नंदराज दळवाई, गुत्तीचा मुरारराव घोरपडे आणि इंग्रज, इतके आपआपल्या सैन्यांनिशीं येऊन त्यांनीं आपआपल्या परीनें समरांगणावर चांगली कामगिरी बजाविली होती. त्यामुळें त्रिचनापल्ली हस्तगत होतांच, तिचा वांटा आपणांस मिळावा अशी त्यांस लालसा उत्पन्न झाली. ह्मैसूरचा नंदराज दळवाई आणि मुरारराव घोरपडे हे एकत्र होऊन, त्यांनीं त्रिचनापल्लीचें शहर व श्रीरंगम् येथील देवालय आमच्या ताब्यांत द्यावें ह्मणून महंमदअलीशीं बोलणें लाविलें. या संबंधानें जीं कारस्थानें घडून आलीं, तीं निवेदन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. प्रस्तुत प्रसंगीं एवढेंच कळविणें इष्ट आहे कीं, महंमदअलीनें दळवाई नंदराज व मुरारराव घोरपडे यांच्या मागणीची टाळाटाळ केली. त्यामुळें ते दोघेही आपल्या सैन्याचा त्रिच-नापल्लीच्या पश्चिमेस तळ देऊन तेथेंच राहिले; आणि गुप्त रीतीनें फ्रेंचांशीं कारस्थानें करून, महंमदअली व त्याचे साथीदार यांच्याशीं युद्ध करून त्रिचना-पल्लीवर आपली सत्ता संस्थापित करण्याचा प्रयत्न करूं लागले. त्यांनीं ड्युप्लीच्या

संमतीनें तंजावरच्या प्रतापसिंह राजास अनुकूल करून घेण्यासाठीं, धाकदपटशा व लांचलुचपत या दोन्ही साधनांचे प्रयोग केले. त्यांनीं प्रतापसिंह राजास असें सांगून पाठविलें कीं, "तुझ्या सेनापतीनें चंदासाहेबाचा वध केला आहे, त्याचा सूड घेतल्यावांचून आह्मी रहाणार नाहीं. तूं आमच्या शत्रूस याउपर मदत केलीस, तर आह्मी तुझा मुलूख उध्वस्त करून टाकूं." अशा प्रकारें राजाच्या मनांत अत्यंत भीति उत्पन्न केली. एवढेंच नव्हे तर त्यांनीं, त्याचा दिवाण सखोजी नाईक यांस अंतस्थ रीतीनें लांच देऊन, आपल्या बाजूस अनुकूल करून घेतलें. सखोजीचा व मानाजीराव यांचा खाजगी द्वेष असल्यामुळें त्यानें योग्य संधि साधून मानाजीराव यास बडतर्फ करण्याबद्दल राजाचें मन वळविलें. अर्थात् प्रतापसिंह राजास अशा प्रकारें चोहींकडून संकट उत्पन्न झाल्यामुळें त्यानें कांहीं दिवस मानाजीरावास सरखेलपदावरून दूर केलें, आणि फ्रेंच लोकांशीं आत्मरक्षणासाठीं तह करण्याची वाटाघाटही चालविली. परंतु त्रिचनापल्ली येथें फ्रेंचांचा लवकरच पराजय झाल्यामुळें हा तह अमलांत आला नाहीं.

अशा प्रकारें कर्नाटकामध्यें बहुनायकी उत्पन्न होऊन, स्वार्थासाठीं 'बळी तो कान पिळी' असा प्रकार झाल्यामुळें, तंजावरच्या राजास आपलें संस्थान कसें सुरक्षित राहील ही मोठी काळजी उत्पन्न झाली. ह्मणून त्यानें श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांच्याकडे, कर्नाटक प्रांत हस्तगत करून तंजावरच्या मराठी राज्याचें संरक्षण करावें, असें सूत्र लाविलें. ह्या वेळीं बाळाजी बाजीराव पेशवे हे ह्मैसूरच्या स्वारीवर निघाले असून, त्यांचा विचार, श्रीरंगपट्टणास शह देऊन ह्मैसुरकरांस जेरीस आणावें, ह्मणजे आपोआप तंजावरच्या राजावरील संकट दूर होईल असा होता असें वाटतें. ह्या वेळीं बाळाजी बाजीराव पेशव्यांकडून तंजावरच्या राजाकडे कृष्णाजी रघुनाथ या नांवाचा वकील राजकारणाचें अनुसंधान लावण्यासाठीं गेला होता. त्यानें लिहिलेलीं एक दोन पत्रें आह्मांस उपलब्ध झालीं आहेत. त्यांवरून त्या वेळच्या कर्नाटकांतील राजकारणांचा चांगला खुलासा होत असून, तंजावरची परिस्थिति अगदीं हुबेहूब व्यक्त होते. हीं पत्रें येणेंप्रमाणें:—

## लेखांक १.

श्री. १० मार्च इ. स. १७५३.

"श्रीमंत राजश्री नानासाहेबांचे सेवेसीं:—

सेवक कृष्णाजी रघुनाथ साष्टांग नमस्कार विनंति उपरीः– स्वामींची आज्ञा घेऊन स्वार जहालों. वाटेची धामधूम, करितां चंदावरास पावावयास बहुत दिवस लागले. माघ वाा २ सोमवारीं चंदावर दाखल जहालों. राजश्रीची भेटी

जहाली. स्वामींचे आज्ञाप्रमाणें सविस्तर वर्तमान सांगितलें. त्याजवरून माघ वा ५ गुरुवारीं शहराबाहेर दोन कोसांवरी डेरे केले. राजश्री मल्हारजी गाढेराऊ यांस फौजेसमागमें देऊन पाठवीत आहेत. द्रव्याविषयीं बहुत रदबदली केली. द्रव्यही देतों व फौजही देतों ह्मणत आहेत. यांनीं स्वामींच्या पत्रामध्यें लिहिलें आहे, परंतु स्वामींचें आगमन श्रीरंगपट्टणास जाहलीयानें द्रव्यही देतील, व फौजही पाठवितील. यांनीं चंदाखानास मारल्यानिमित्य आपल्या चित्तीं बहुत दहशती खादली आहे. आपण येऊन या संस्थानाची स्थापना केलियावांचून होत नाहीं. तोंडेंकडून बोलतात कीं, हें स्थळ व द्रव्य सर्वही त्यांचेंच आहे. आगमनावांचून विशेष द्रव्य देत नाहींत. थोडी बहुत फौज या प्रांतें आली ह्मणजे विशेष द्रव्य द्यावें. नाहीं तरी, कांहीं हत्ती, घोडे, वस्त्रें, जवाहीर, थोडें बहुत द्रव्य देऊन रवाना करावें. बहुत प्रकारेंकडून यांसीं रदबदल करितों. परंतु स्वामींच्या सेवेसीं जे दिवशीं पत्र पावेल, तेच दिवशीं यांस जबाब द्रव्याविषयीं व फौजेविषयीं बहुत ताकीद लिहून पाठविलें पाहिजे. सेवकाचे पत्रींही बहुत ताकीद लिहून पाठवावी. चंदावरचे लोक, तोंडेंकडून बहुत कांहीं बोलावें, समय पाहून वर्तणूक करावी, हें सर्वही स्वामींस विदित्यच आहे. येथील प्रसंग पहातां स्वामीवेगळी यांस गति नाहीं. याकरितां वरचेवरी पत्रें ताकिदीचीं लिहून पाठवीत जावें. पूर्वीं सर्वप्रकारें मानाजी जगताप कारभार करीत होता. हल्लीं मल्हारजी गाढेराऊ व सखोबा नाईक या उभयतांचा प्रसंग आहे. परंतु राजश्री आपल्या रुबरू सर्व रदबदल करिताती. स्वामीयां उभयतांचे नांवें ताकीद लिहून पाठविली पाहिजे. महंमदअल्लीखान त्रिवादी देवणापट्टणाजवळ गढीच्या आसरेनें यथाप्रकार आहे. मुरारजी घोरपडे व पुदचेरीचे फरंगी हे दों कोसांचे तफावतीनें घेरा देऊन उतरले आहेत. आठा दहा दिवसांपासून लढाईचा प्रसंग होत नाहीं. महमदअल्लीखानही स्वामींचा मार्ग रक्षीत आपल्या हिंमतीनें बसला आहे. मुराररराऊ घोरपडे यांनीं हत्ती वगैरे सरंजाम श्रीरंगपट्टणाचे मुलुखांत ठेविला होता. आपल्या फौजेचे शाहन (?) तेथून सर्व सरंजाम आणून चंदीचे किल्यांत ठेविलें. किल्यांत जकिराही भरिताती. वेलूरकर मुर्तुजा अल्लीखानाचे नांवें, कर्नाटक त्रिचनापल्ली आदिकरून सुभेदारीच्या सनदा सलाबतजंगानें पुदचेरीवालेच्या अनुमतें पाठविल्या. त्यावरून तोही फौज ठेऊन अर्काटचे आसपास धामधूम करितो. अबदुल वाहबखान, मा अल्लीखानाचा भाऊ, अर्काटाजवळीं लालापेठचे सरहद्देत होता. त्याशीं व मुर्तुजाअल्लीखानाच्या फौजेशीं लढाई जहाली. वेलूरकरांनीं शिकस्त खाल्ली. पाळेगार वगैरे जमीदार आपल्या

आपल्या स्थळीं आहेत. श्रीरंगपट्टणवाल्याचा दलवाई नंदराज पांच हजार फौज, पंधरा हजार प्यादांनिशीं यथाप्रकार मोर्चे देऊन श्रीरंगीं बसला आहे. लटकी खबर उडवितात जे, श्रीमंतांशीं आपला सलूख जाहला, श्रीरंगपट्टणची व त्रिचनापल्ली या दोन्ही संस्थानांची खंडणी चुकविली, पैका दिल्हा, ह्मणून बोलत आहेत. त्रिचनापल्लीचे पाळेगार सेतुपती, व तोंडमान व नारगोटी वगैरे जमीदार एकत्र होऊन मधुरा वगैरे तिनवेली प्रांत जप्त करून, 'काटराजा' ह्मणणारास स्थापना करून आहेत. त्रिचनापल्लीचें संस्थान काटराजास स्थापना करून स्वामींची सेवा करावी. राजश्री गाढेराऊ हे उभयतां स्वामींचें आगमन या प्रांतेस जाहलीया बहुत पैका मिळवून देऊं, ऐसें बहुत कांहीं बोलत आहेत. त्रिचनापल्लीचें संस्थान श्रीरंगपट्टणवालेच्या हातास लागल्यानें यांसही बहुत उपद्रव. महमदअल्लीखानाची कुमक करणें ह्मणून स्वामींचीं पत्रें येताती. याजवरून यांस मीस (मीष?) होत आहे. स्वामींनीं पत्र लिहून पाठविणें कीं, फौज व मातबर द्रव्य घेऊन सत्वर येत. आणि नारगोटी व सेतुपती व तोंडमान वगैरे पाळेगार त्रिचनापल्ली चंदावरसमीप आहेत. यांचें चंदावरवाल्याचें सूत्र एक आहे. ऐसियास तिघे पाळेगारांचे नांवें कागद व राजश्रीच्या नांवें कागदीं लिहिणें कीं, तिघे पाळेगार याच अनुसंधानेंकडून, त्यांची फौज व मातबर यख्तियारी भला माणूस घेऊन हजूर येत, ऐसें पत्रीं लिहून पाठविलें पाहिजे. छ २ जमादिलावलीं खबर ऐकिली जाते कीं, स्वामींची फौज श्रीरंगपट्टणाचे मुलुखांत आली. हें वर्तमान ऐकून नंदराज दलवाई फौजेसहित त्रिचनापल्लीचा मोर्चा उठवून श्रीरंगपट्टणास जाणार. हें वर्तमान राजश्री लिहिलें आल्यावरी राजश्रीचा मनसबा ऐसा जे, दलवाई त्रिचनापल्लीहून कूच करून जाईना. अगोदर स्वामींची फौज दहा हजार घाट उतरून त्रिचनापल्लीच्या रोंखें आल्यानें, राजश्रीची फौज व महंमदअल्लीखानाची फौज व पाळेगार वगैरे जमीदार सामील होऊन, दलवाईस अटकाविल्यानें श्रीरंगपट्टणची खंडणी स्वामींच्या चित्तानुसार पैका घेतला जाईल. आणि राजश्रींनीं स्वामीकारणें हत्ती व घोडा, वस्त्र वगैरे जवाहिर निवडून ठेविलें आहे. आह्मी द्रव्याविषयीं रदबदल करितों, त्याचे तजविजेमध्यें आहेत. राजश्री आपाजी जिवाजी छ १ जमादिलावलीं चंदावर दाखल जहाले. मातुश्री आऊसाहेबांचीं पत्रें वस्त्रें व स्वामींचीं पत्रें वस्त्रें राजश्रींस दिलीं. राजश्री प्रतापसिंग राजे, कमलालय महाक्षेत्र येथून चवदा कोसांवरी पूर्वेकडे आहे तेथें, यात्रेस जाऊन आठ दहा दिवसांनीं फिरून चंदावरास येणार. राजश्रींच्या चित्तांत कीं, स्वामींचें आगमन या प्रांतेस जहालियानें भेटी होईल. संस्थानची स्थापना सर्व कार्यें स्वामीच आहे. ऐसें बहुत कांहीं भेटीची अपेक्षा करीत

आहेत. सेवेसीं श्रुत होय. या प्रांतींचे धान्याचा निरख दर रुपये वजनी शेर पक्काः—

तांदूळ शेर १५. दाळ शेर ११. कुळथी शेर १५. उडीद १२. तूप २॥. तेल तिळेल ३. राघी शेर २५. गहूं शेर २.

येणेंप्रमाणें आजीचा भाव आहे. सेवेसीं श्रुत होय. फाल्गुन शु॥ ५ भृगुवार बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

ताजाकलम.—राणोजी हरकारा नवा चाकर ठेऊन पाठविला आहे. यास खर्चास चार पांच रुपये देवावे. सरकारची जोडी यासमागमें देऊन त्वरेकडून पाठविलें पाहिजे, हे विज्ञापना."

## लेखांक २.

श्री. ता. ८ एप्रील इ. स. १७५३.

"श्रीमंत राजश्री नानासाहेबांचे सेवेसीं:—

सेवक कृष्णाजी रघुनाथ साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान ता॥० चैत्र शुद्ध ५ मु॥ चंदावर जाणोन स्वामींनीं वैभव लेखनाज्ञा केली पाहिजे. यानंतर चंदावरास पावलियावरी, चारी पांच पत्रीं सविस्तर येथील वर्तमानें लिहून सेवेसीं पाठविलीं, त्यावरून विदित जाहलें असेल. विशेषः— राजश्री राजांनीं फौज व डेरे येथून दोनी कोसांवरी केले आहेत. हत्ती, घोडे, जवाहीर, वस्त्रें सिद्ध करून आम्हांस दाखवून ठेविलीं आहेत. आम्हीं जबाब सव्वाल केला जे, हत्ती व घोडे करितां आम्ही आलों नाहीं; द्रव्य व फौजेकरितां आम्हांस पाठविलें आहे. त्यास प्रतिउत्तर दिधलें जे, द्रव्यही सिद्ध आहे व फौजही सिद्ध आहे. येथें नित्य श्रीरंगाहून श्रीरंगपट्टणवालेची बातमी येते कीं, नानासाहेबांचा व श्रीरंगपट्टणवालेचा सलूख जाहाला. मोकदमा फैसल करून फौज देशास गेली. ह्मणून प्रतिदिनीं लिहितात. त्यावरून चंदावरवालेचे चित्तांत चित्त नाहीं. राजे बोलतात कीं, नानासाहेबांचे भरंवसियावरी आह्मी येथें आहों. एकदा येऊन आमचा व मुलुकाचा बंदोबस्त करून देत, ह्मणजे त्यांसही उदंड द्रव्य मिळेल. आह्मांस तों येथें चहूंकडून फिरंगी व पाळेगार व श्रीरंगपट्टणवाले या सर्वांचा उपद्रव नित्य आहे. नानासाहेबांचे नांवावरी आजीपर्यंत हिंमत धरून बसलों आहों. त्यांनीं येऊन सर्व बंदोबस्त करावा. ऐसें बोलत आहेत. सेवकास तों लष्करचें वर्तमान कांहीं कळत नाहीं. येसियास स्वामींनीं दया करून सविस्तर वर्तमान आज्ञा केली पाहिजे. नंदराज दळवाई श्रीरंगपट्टणचा, पांच हजार स्वार व पंधरा हजार प्यादे (यांसह) त्रिचनापल्लीस वेढा देऊन श्रीरंगीं बसला आहे.

किल्लेस रस्ता (रसदा?) जाऊं देत नाहीं. किल्ला जेर जाहला आहे. महमदअल्लीखान यथाप्रकारें देवणापट्टणाजवळ त्रिवादीस आहे. देवणापट्टणाहून रस्त आणीत असतां, राजश्री मुरारजी घोरपडे व पुंदचरीचे फिरंगी मिळून वाटेस मुजाहिम जाहले. लढाई चोखट जाहली. लोक बहुत हरदो तर्फेचे जायां जाहले. महमदअल्लीखान सरंजामानिसीं येऊन डेरेदाखल जाहला. दोनी तोफा पुंदचरीवाल्याकडील घेतल्या. मुरारजीचा भाऊ भुजंगराव लढाईत कामास आला. ह्मणोन वकिलानें व महमदअल्लीखानांनीं राजास लिहिलें आहे. खरें किंवा लटकें हें न कळे! या प्रांतीं दहा हजार फौज येती तरी, स्वामी ज्याची स्थापना करिते त्याची होती, व सरकारचा अंमल बसता. ऐसा येथील प्रसंग पडिला आहे. उभयतांतही दम राहिला नाहीं. या समयीं थोडी बहुत फौज आलियानें सर्व होऊं येतें."

या पत्राप्रमाणें पेशव्यांचें सैन्य तंजावरच्या राजाच्या मदतीस येऊन, मराठ्यांचा अम्मल तंजावर प्रांतापर्यंत येऊन पोंहचल्याचें दिसत नाहीं. फ्रेंच, गुत्तीकर मुरारराव घोरपडे आणि ह्मैसूरचा दळवाई नंदराज यांनीं तंजावरच्या राजाविरुद्ध कट करून स्वार्थबुद्धीनें तंजावरावर स्वारी केली. मुराररावाचे बाराशें घोडेस्वार तंजावर प्रांतांत शिरून गांवोगांव फार उपसर्ग देऊं लागले. त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं तंजावरच्या प्रतापसिंहराजानें निवडक सैन्य तयार केलें, आणि सेनापतीच्या अधिकारावरून पदच्युत केलेला जुना व अनुभवी सरदार मानाजीराव जगताप यांस पुनः सरखेलपदाचा अधिकार देऊन त्याची योजना सेनापतीच्या जागीं केली. मानाजीराव हा अतिशय शूर योद्धा असून, त्यानें अनेक वेळां परशत्रूशीं लढाया मारून आपला शौर्यप्रभाव व्यक्त केला होता, आणि तंजावरचें नांव कायम ठेविलें होतें. ह्या वेळीं मुराररावाच्या घोडेस्वारांबरोबर टक्कर देण्यास तोच एक समर्थ होता. त्यानें तीन हजार घोडेस्वार घेऊन शत्रूबरोबर सामना केला, आणि त्याचा अगदीं पराभव करून त्यास तंजावर प्रांतांतून पळवून लाविलें. मानाजीराव जगताप याच्या या उत्कृष्ट कामगिरीचा मोबदला राजाकडून योग्य प्रकारें मिळाला तर नाहींच, पण उलट त्याच्या शौर्याची कीर्ति या वेळीं विशेष प्रसिद्ध झाल्यामुळें तंजावरच्या राजाचा मुख्य दिवाण सखूजी नाईक याची मत्सरबुद्धि अधिक खवळून गेली व त्यानें राजाकडून मानाजीरावास पुनः कामावरून दूर केलें.

मानाजीराव हे तंजावरच्या सेनापतीपदावरून दूर झाले नाहींत, तोंच पुनः फ्रेंच सेनापति मॉंसे मेसिन ( M. Maissin )हा इ. स. १७५४ च्या मे महिन्यांत

३००० पायदळ व २००० घोडेस्वार यांसह तंजावर प्रांतांत शिरला, आणि त्यानें कोइलाडी हें गांव घेऊन फार लूटमार केली. एवढेंच नव्हे, तर तंजावर प्रांताच्या सुपीकतेचें मुख्य साधन जें कावेरी नदीचें धरण, तें उध्वस्त करून मोठा अनर्थ मांडिला. तेव्हां तंजावरचा राजा प्रतापसिंह यानें पंधराशें स्वार जमा करून, आपले नातेवाईक मल्हारजी गाडेराव यांच्या हाताखालीं देऊन त्यास फ्रेंचांवर रवाना केलें. इतक्यांत मुरारराव घोरपडे यास, तंजावरावर हल्ला करण्यास ही उत्कृष्ट संधि आहे असें वाटून, त्यानें पुनः ३००० घोडेस्वार घेऊन तंजावरावर चाल केली आणि तंजावरच्या सैन्याची धूळधाण उडविली. हें दुसरें अरिष्ट येतांच तंजावरचा राजा अगदीं गोंधळून गेला व त्यानें इंग्रजांशीं स्नेहभावाचें बोलणें लावून त्यांच्याकडून कुमक मागितली. इंग्रज सेनापति मेजर लॉरेन्स यानें कॅप्टन कॉलियड यास राजाच्या भेटीस पाठवून दिलें, आणि हें संकट दूर करण्याबद्दल कोणते उपाय योजावेत, तें सांगून पाठविलें. या वेळीं कॅप्टन् कॉलियड व तंजावरचा राजा यांची मुलाखत होऊन जी वाटाघाट झाली, त्यामध्यें तंजावरचा दिवाण सखूजी नाईक यास कामावरून दूर करून सहकुटुंब हद्दपार करावें, असें एक कलम ठरलें. सखूजी नाईक हा इंग्रजांस प्रतिकूल असून अंतस्थ रीतीनें फ्रेंचांस अनुकूल होता. तेव्हां त्याचा उच्छेद केल्यावांचून तंजावरच्या राजाशीं खरें सख्य होणार नाहीं, अशी मेजर लॉरेन्स यांची समजूत होती. त्याप्रमाणें प्रतापसिंह राजानें सखूजीस हद्दपार केलें, आणि मानाजीराव यांस दिवाणगिरीचें व सेनापतीचें अशीं दोन्हीं कामें सांगितलीं. यानंतर तंजावर येथें अनेक राजकारणें घडून आलीं. त्या सर्वांचा उल्लेख करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. त्यांत शेवटीं अर्काटचा नबाब महम्मदअली हा मध्यस्थी पडून, त्यानें तंजावरच्या राजाकडून मुरारराव घोरपडे यांस तीन लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल करून, त्याचें सैन्य परत फिरविलें. या तीन लक्षांपैकीं अर्धा लक्ष रुपये तंजावरच्या राजानें रोख दिले. याप्रमाणें पुनः कांहीं दिवस तंजावर येथें स्वस्थता झाली.

यानंतर तंजावरच्या प्रतापसिंह राजानें, कावेरी व कोलेरून या दोन नद्यांमधील जें धरण फ्रेंच सैन्यानें उध्वस्त करून टाकिलें होतें, तें दुरुस्त केलें. हें काम चालू असतां, तंजावरचें सैन्य व कांहीं इंग्रजी सैन्य, त्याच्या संरक्षणार्थ एकसारखें सज्ज ठेवावें लागलें होतें. असो.

इ. स. १७५८ पर्यंत तंजावर येथें कांहींशी स्वस्थता होती; परंतु याच सालीं फ्रेंच गव्हर्नर लॉली यानें तंजावरावर स्वारी करून तेथील राजास फार त्रास दिला. या वेळीं

फ्रेंच व इंग्रज यांच्यामध्यें पुनः वैमनस्य उत्पन्न होऊन दोघांच्याही मनांत स्वतःच्या उत्कर्षासाठीं मोठी चुरस लागून राहिली होती. तंजावरचा राजा प्रतापसिंह हा इंग्रजांशीं स्नेहभावानें वागत असल्यामुळें फ्रेंच लोकांनीं त्याच्यावर करडी नजर ठेवून त्यास त्रास देण्यास सुरुवात केली. फ्रेंच गव्हर्नर लॅली यानें, तंजावरच्या राजानें इ. स. १७४९ मध्यें चंदासाहेबास दिलेला एक जुना दस्ताऐवज काढून, त्याच्या आधारें ४६ लक्ष रुपयांची मागणी केली; आणि कारिकल बंदरावर सैन्य उतरवून तो तंजावरावर चालून आला. त्यानें रस्त्यामध्यें नागूर व किवलूर हीं दोन गांवें लुटलीं व तंजावरच्या प्रजेस फार उपद्रव दिला. तंजावरच्या सैन्यानें त्याशीं मोठ्या निकरानें युद्ध केलें. त्याचप्रमाणें, इंग्रज सैन्यानें तंजावरास येऊन राजास मदत केली व कांहीं इंग्रजी आरमार कारिकल बंदरावर चालून गेलें, त्यामुळें लॅलीस तंजावरचा वेढा उठवून कारिकलास पळून जाणें भाग पडलें. अशा रीतीनें हें संकट दूर झालें. या वेढ्यामध्यें तंजावरचा सेनापति मानाजीराव यानें उत्कृष्ट कामगिरी केली व आपल्या शौर्यानें फ्रेंच सेनापतीस आश्चर्यचकित करून टाकिलें, हें येथें नमूद करणें अवश्य आहे. यापुढें कर्नाटकांतील फ्रेंचसत्ता कमजोर होत जाऊन, इ. स. १७६१ मध्यें ती बहुतेक विलय पावली, असें म्हटलें तरी चालेल. अर्थात् या प्रतिस्पर्धी सत्तेचा जोर कमी झाल्यामुळें कर्नाटकाचा नबाब महम्मदअल्ली व त्याचे पुरस्कर्ते इंग्रज लोक हे प्रबळ झाले, आणि ते तंजावरच्या राजास आपला अंकित करून घेण्याची इच्छा करूं लागले. ह्याच वेळीं नबाब महम्मदअल्ली हा कर्नाटकांतील युद्धामुळें इंग्रजाचा देणेदार होऊन कर्जाच्या पेंचांत सांपडला होता. त्यानें तंजावरचा राजा धनसंपन्न आहे असें पाहून, त्याच्याकडून द्रव्य मिळविण्याचा संकल्प केला, आणि जुन्या खंडणीची बाकी काढून तंजावरावर स्वारी करण्याचा घाट घातला. या वेळीं मद्रास येथील गव्हर्नर मिस्टर जॉर्ज (हे पुढें लॉर्ड पिगॉट या नांवें प्रसिद्धीस आले) हे मध्यस्ती पडून, त्यांनीं महम्मदअल्ली व तंजावरचा राजा प्रतापसिंग यांचे मधील खंडणीबद्दलचा तंटा मिटविण्याचें काम आपल्या अंगावर घेतलें. त्यांनीं मिस्टर ड्युप्रे या नांवाचे मद्रासकौन्सिलचे एक सभासद या कामासाठीं मुद्दाम पाठवून खंडणीच्या बाकीबद्दलची चौकशी करविली, आणि कर्नाटकाच्या युद्धामध्यें तंजावरच्या राजानें नबाबास व इंग्रजांस बरेंच साहाय्य केलें असल्यामुळें, सर्वांचा सलोखा होऊन देशांत शांतता नांदावी या हेतूनें, दोस्तीचा तह करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें तारीख १२ आक्टोबर इ. स. १७६२ रोजीं, इंग्रजांच्या मध्यस्तीनें, कर्नाटकचा नबाब व तंजावरचा राजा प्रतापसिंह यांच्या मध्यें दोस्तीचा तह ठरला.

बसविली. आपाजी सदाशिव उज्जनीस गेले. येथें एक मुक्काम त्यांचा होता. चंद्र १९ सवालीं येथवर डांक बसविली आणि उज्जनीस गेले. आमचे तैनातीस चार जोड्या होत्या. त्यांपैकीं एक जोडी मयत जाली. तीन जोड्या सबनिसाकडील कारकून घेऊन गेले. येथें एक जोडी ठेवावयाची आज्ञा करणार धनी समर्थ. डांकेस पत्रें पावतीं जालीं पाहिजेत. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान आलादा पत्रीं विनंति लिहिली आहे. येथून हुंडी एक लक्षाची बाईनीं रवाना केली. स्वामींस व राजश्री दादाजी गंगाधर यांस पत्रें लिहून चंद्र १३ रमजानीं रवाना केलीं. त्यांचें उत्तर आलें नाहीं. एक पत्र विनंति लिहून सावकाराचे दुकानीं दिलें, तें सेवेसीं पावलें असेल. त्यांत हुंडीचा मजकूर लिहिला होता. राजश्री पाटीलबावांनीं बाईस पत्र लिहिलें होतें कीं, हजार स्वार व त्यांजबरोबर पेंढारी १० हजार पाठवून देणें. त्याचें उत्तर बाईनीं लिहिलें कीं, पेंढारी व हजार स्वार तुह्मीं बोलाविले, त्यास तुह्मी....................पणा पूर्वींपासून कैलासवासी सुभेदार यांजपावेतों कसा चालत आला, हें जाणत असतां, पेंढारी हजार स्वार बोलाविले हें काय? फौज दहा पांच हजार ह्मणाल तर पाठवून देऊं. पूर्वींप्रमाणें यथाविभागें चालावें. अशीं उत्तरें पाठविलीं ह्मणून बाईनीं वर्तमान समक्ष मजपाशीं सांगितलें. तें सेवेसीं लिहिलें असे. उत्तर पाटीलबावांचें येईल कीं न येईल, असें बाई बोलली. उत्तर आलें तर विचारून लिहून पाठवीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र १५ जिलकाद सन समान **लेखांक १४९.**

समानीन श्रावण शिंद्यांचे डांकेबरोबर. **श्री.** २३ आगस्ट इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ जिलकाद गुरुवारपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:–चंद्र २६ सवालचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ८ मिनहूस काल बुधवारीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, हुंडी एक लक्षाची राजश्री दादाजी गंगाधर यांनीं आणोन दिली, ती राजश्री सुभेदार यांजकडे दिली; व उत्तरेकडील राजश्री पाटीलबावांचें व जयपूरवाल्याचें वर्तमान लिहिलें तें कळलें. पुढें होत जाईल तें वरचेवर लिहित जाणें ह्मणोन आज्ञा. ऐसीयास, सांप्रत कमाविसदार निसबत होळकर यांचीं पत्रें पाटणचीं व बुंदीचे मामलेदारांचीं आलीं. त्या पत्रांचे अर्थ सविस्तर राजश्री सुभेदार यांस व स्वामींस मातुश्रीबाईनीं लिहिले आहेत, व पूर्वीं वर्तमान आलें तेंही सविस्तर सेवेसीं

बाईनीं लिहिलें. काल पत्रें कमाविसदार यांचीं आलीं. त्यांतील अर्थ कीं रंगूनीं फारशी धूम केली. गभीरा गांव राजश्री दादाजी गंगाधर यांजकडील, तेथें रांगड्याची फौज येऊन गांवचा कट करून, मालीयत अनाज दाणा घेऊन गेले. पुढें करवरखोंदीस फौजा येणार. ती जागा मजबूत. लढवई ठाणें पाटीलबावांचें, परंतु बेहिंमत जाहलें. ठाणें राहणार नाहीं. तें घेतल्यावर गणोरी लाखेरीचे मार्गें पाटणास रांगड्याच्या फौजा येतील. याप्रमाणें कमाविसदार यांचीं पत्रें आलीं. बुंदीकरांनीं ब्राह्मणगांवचें ठाणें घेतलें. ती जागा राजश्री सुभेदार यांची. ती बुंदीकरांनीं घेतली. हें साद्यंत वर्तमान बाईनीं सेवेसीं व सुभेदार यांस लिहिलें आहे. पलटणें अकरा व तोफा ११५ राजश्री पाटीलबावांकडून जयपुरवाल्याकडे गेल्या. मामलेदार यांनीं लिहिलें आहे. तलबेचा दंगा करून गेले. राजश्री शिवाजी विठ्ठल यांस दरम्यान घातलें होतें, पलटणाची समजुती करावी. परंतु रांगड्यांनीं रुपये देऊन त्यांस अटकाविलें. असें कमाविसदार यांचे पत्रीं वर्तमान लिहिलें आलें. राजापूरकर राजश्री नरहर सदाशिव यांचें पत्र आलें. त्यांत वर्तमान, राजश्री पाटीलबावा, मागें पाठलाग रांगड्यांनीं केला, करोलीनजीक खुशालगड तेथें लढाई जाहली, त्या लढाईत मोड फार जाला ह्मणोन ग्वालेरीस गेले. हें वर्तमान त्यांणी लिहिलें. दुसरे ठिकाणीं आलें नाहीं. बिजेशिंग मारवाडकर राजा त्याचा पुत्र फौज १५ हजार नवी घेऊन जयपुरवाल्यास सामील जाहला, हें वर्तमान आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १५०.

पै॥ छ १५ जिल्काद १७८७. **श्री.** २९ आगस्ट इ. स. १७८७.

"श्रीमंत राजेश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ माहे जिल्काद-पावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असो विशेषः– छ ५ मिनहूचें व छ ९ मिनहूचें एकूण दोन पत्रें सेवेसीं डांकेसमागमें रवाना केलीं आहेत. प्रविष्ट होऊन उत्तराची आज्ञा जाली पाहिजे. सांप्रत राजश्री पाटीलबावांचीं पत्रें पयदरपय दोन बाईचे नांवें आलीं. एक छ २१ सव्वालींचें व दुसरें छ २६ चें. दोन्हीं पत्रें एक चंद्र ११ पावलें व एक छ १४ जिल्कादीस पावलें. दोन्ही पत्रांत मजकूर लढाईचा. अधिक वद्य १४ लढाई जाली. राठोडे व जयपूरवाले यांचें पारिपत्य चांगलें श्रीकृपेंकरून जालें. त्यांचे गोटापावेतों मारीत जावें तों पाऊस आला, व त्यांचे गोटाचे आसपास खड्या व नाला आड, आमचे फौजेस पाणी दूर. पखाली वसके यांजकडून पाणी

पोहोंचावीत होतों. अस्तमानामुळें माघारें येणें प्राप्त. फौज मोंगली व पलटणें शत्रूकडे भेदांत. ते चार प्रहर रात्र बंदोवस्तानें उभी राहिली. तलबेचा बाहणा केला. तलब द्यावीसें ठरलें. परंतु अर्ध रात्रीं राजश्री शिवाजी विठ्ठल यांणीं येऊन सल्ला दिधली कीं, फौजेंत फितूर फार जाला. पलटणें फितुरांत व मोंगली फौज फितुरींत. आज त्याचें पारिपत्य करावें तर शत्रूजवळ दिडा कोसाचें अंतर. उभयतां एक जालें तर ठीक पडणार नाहीं. या समयास येथें .........................
.............................................. तें सेवेसीं लिहिलें. छ १ सवालींचें पत्र बावांचें आलें. त्याचें उत्तर बाईनीं पाठविलें कीं, पूर्वीं फौजेचा व पेंढारी यांचा आपण मजकूर लिहिला, त्याचें उत्तर आह्मीं पाठविलें आहे. तें पत्र तुह्मांस पावलीयावर तुमचें उत्तर येईल त्यासारखें केलें जाईल. त्या पत्रींचा मजकूर कीं, पेंढारी व फौज दोन अडीच हजार तुह्मीं आणविली, परंतु सुभेदार कैलासवासी असतां ज्या रीतीनें चालत आलें, त्याप्रमाणें चाललें पाहिजे. भाऊपणा पूर्वींचा कसा आहे, तो जाणत असतां पेंढारी बोलावितां हें काय? अशीं पत्रें गेलीं. हें वर्तमान सेवेसीं अगोदर लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १५१.

**श्री.** २ सपटेंबर इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ माहे जिलकादपावेतों वर्तमान सेवकाचें यथास्थित असे. विशेषः—श्रीमंत राजश्री रावसाहेब यांस देणें करावयासी मुहूर्त श्रावणमासीं केला, हें वर्तमान येथें ऐकिल्यानंतर संतोष बहुत जाला. स्वामींच्या श्रमाची सार्थकता परिपूर्ण जाली. विश्वतोमुखीं स्वामींच्या कीर्तीचा घोष जाला. येथें श्रीदेवास व ब्राह्मणांस साकरपेढे वाटले. हें संतोषाचें वर्तमान बाईस सांगितलें. त्यांनीं ऐकून फार समाधान पावले. मजला ते दिवशीं जालनापुरीं शेलापागोटें व शालजोडीसाठीं नक्त रुपये १०० दिले. स्वामींच्या चरणाचा वियोग फार दिवस जाला आहे. येथें काम तों कांहीं नाहीं. बराबर खर्च सालीना दोन अडीच हजारपावेतों. त्याप्रमाणें येथें आदा नाहीं. येथील रीत अगत्यवादाची नाहीं. कोणी गोष्ट सरकारकामाची अथवा जाबसाल केल्याची सोईस पडत नाहीं. लोकांचें देणें फार जालें आहे. पुढें खर्चाची दिक्कत पडते. आज्ञा जाली, त्याप्रमाणें वर्तणूक करीत आहें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ छ ७ जिल्हेज सन समान समानीन भाद्रपदमास.

## लेखांक १५२.

श्री.

७ सपटेंबर इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ जिलकाद शुक्रवारपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान चंद्र ५ व चंद्र ९ व चंद्र १५ मिनहूचीं पत्रें लिहून सविस्तर लिहिलें आहे. सांप्रत चंद्र १ जिलकादचें पत्र राजश्री पाटीलबावांचें व राणेखाभाईचें मातोश्रीबाईचे नांवें पत्रें दोन आलीं. राणेखाभाईनीं लिहिलें होतें कीं, राजश्री पाटीलबावा, वारंवार फौज व पेंढारी यांचे रवानगीविषयीं आपणास लिहितात. परंतु आपणाकडून हा कालवर फौजेची व पेंढारी यांची रवानगी होत नाहीं. तेव्हां हिंदुस्थानची सुबत्ता कशी? व सर्वांचें कारण हेंच कीं, लिहिलेप्रमाणें लौकर तरतूद घडावी. राजश्री पाटीलबावांनीं पत्रीं लिहिलें कीं, 'गोहदचे मसलतीमुळें पेंचांत येऊन कर्जदार जाहलों. पुढें पातशाहाची मसलत पडली. इंग्रेज पातशाहास आपलेकडे घेत असतां, चमेल उतरोन जाऊन, अमदानीचें पारपत्य करोन पातशाहाचा बंदोबस्त केला. सारे दवलतीचा खर्च त्याचा चालून, आपले फौजेसही सांभाळून, राजेरजवाडे त्यांचीं पारपत्यें केलीं. यामुळें इंग्रज वगैरे सर्वांस असह्य जाहलें. पुढें जयपूरचे मसलतीस दोन वर्षें लागलीं. त्यांत घरचे फितुरामुळें लढाई फत्ते केलेली विलग जाहलें. याजकरितां माघारें येऊन कुटुंब ग्वालेरीस पाठवून दिलें. पुढें जमाव करून रांगड्यांचें पारपत्य करावें हाच इरादा. परंतु फौजेखेरीज होत नाहीं. याविषयीं देशाहून फौज आणविली, त्यास ऐवज रवाना करावा तर ओढीचा प्रसंग. दोन वर्षें या मुलखांत आपत पर्जन्याची जाहली. त्याकरितां मुलखाचा पैसा आला नाहीं. सावकारांस ऐवजाकरितां ह्मणावें, तर सावकार इतबार या समयास करीत नाहींत. पादशाहींत आमचा पाय शिरकला याजकरितां वजीर वगैरे रांगडे व इंग्रेज सारे एकच जाहले आहेत. तुह्मांकडून ऐवजाची सरबरा व फौज व पेंढारी यांची तरतूद लौकर व्हावी. पूर्वापार वडिलावडिलांस मसलती पडल्या, तेव्हां परस्परें साहित्य जाहलें आहे. फौजेविषयीं व ऐवजाकरितां देशीं कारभारी यांस लिहिलें आहे. त्यांजकडून साहित्य होणें येणें तें होईल. परंतु तूर्त तुह्मीं ऐवजाची व फौजेची रवानगी लौकर करावी.' याप्रमाणें पत्रें काल चंद्र २३ जिलकाद गुरुवारीं सहा घटका दिवस राहतां आलीं. त्यावरून बाई बोलली कीं, तीन जोड्या पत्रें लिहून रवाना केल्या. हा कालवर एका पत्राचें उत्तर येत नाहीं. मीं उत्तर दिलें कीं, आपण पत्र लिहून देतील, तर डाकेबरोबर लिहून पाठवितों. त्याचें उत्तर बाईनीं दिलें कीं, आणखी जोडी रवाना करूं. मग

करितात किंवा नाहीं? सेवेसीं पत्रें बाईनीं लिहिलीं तीं पावलीं तों असतील. त्यांचे जाब रवाना केले असतीलच. आतां जोडी पाठविणार आहेत. बाईनीं राजश्री पाटीलबावांचे पत्राचें उत्तर दिलें. त्यांतील अर्थ समजला, तो आलादा पत्रीं लिहिला असे. राजश्री पाटिलबावांचीं पत्रें येतात. जें पत्र येतें तें कळूं देत नाहींत. मी बातमी राखून वर्तमान घेत राहतों. तर याविषयीं बाईस पत्र आपण लिहावयाचें असेल तर लिहावें. ह्मणजे आह्मांस वर्तमान सांगतील तें वरचेवर सेवेसीं लिहीत जाईन. आह्मी बातमी ऐकली लिहितों. त्यांत कमपेष पडत असेल ह्मणोन विनंति लिहिली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १५३.

पै॥ चंद्र ७ जिल्हेज भाद्रपद मास. **श्री.** ८ सपटेंबर इ. स. १७८७.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ जिलकाद शनिवारपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र २३ जिलकादीस राजश्री पाटीलबावांचीं व राणेखानभाई यांचीं पत्रें आलीं. त्यांतील अर्थ अलादा लिहिला. त्याचीं उत्तरें मातुश्रीबाईनीं त्यांस लिहिलीं कीं, तुह्मीं फौजेविषयीं व पेंढाऱ्यांविषयीं दोन तीन वेळां लिहिलें, त्यास समय हाच आहे. ये समयीं साहित्य घडावें. हें लक्ष आमचे मसलती ...................... नये. परंतु दोन तीन जोड्या कासिदाच्या मुजरद देशीं रवाना केल्या. चिरंजीव राजश्री तुकबास पत्रें व सरकारांत पत्रें लिहिलीं आहेत. तिकडून मातबर फौज आणविली आहे. त्यांचीं उत्तरें हा कालवर येत नाहींत. तिकडील जाबसाल काय येतो, त्यासारखी तजवीज केली जाईल. तूर्त दोन हजार पेंढारी व सरंजामी फौज हजार दोन हजार पाठविल्यानें तिकडे दाब पडतो असें नाहीं. ईश्वर सत्य, देशींहून फौज मातबर येईल तोंवर आपण आपले फौजेनिशीं डिगेचे आसपास असावें. तुह्मीं लिहिलें कीं, पादशाहा व इंग्रज वगैरे रांगडे एक जाले तर त्याचें कारण काय? तुह्मांकडून तेथें बंदोबस्त आहेच. पादशाहाची मसलत जयपुरकराशीं किंवा इंग्रजाशीं हें संधान वरचेवर राखीत जावें. रांगड्याशीं मसलत ते करणार नाहीं. याप्रमाणें त्यांस जाब लिहून दिले. आणि चंद्र २३ जिलकादीस पाटीलबावांचीं पत्रें आलीं. त्यांतील मजकूर लिहून पत्रें तीन रवाना केलीं. एक राजश्री सुभेदार यांस, व राजश्री दादाजी गंगाधर यांस, व राजश्री नारो गणेश यांस, एकून तीन पत्रें आज चंद्र २५ शनिवारीं रवाना केलीं आहेत. सेवेसीं पत्रें लिहिलीं नाहींत. पूर्वींचे पत्रांचीं उत्तरें आलीं नाहींत. येविषयीं राजश्री दादाजीस मजकूर लिहिला ह्मणून ऐकिलें. सावकारी वर्तमान ऐकिलें कीं, जोधपूरकर बिजे-

सिंग यांनीं, आपले फौजेंत सरदार त्यास पत्र लिहिलें कीं, शिंदे जयपूरनजीक अडचणींत असतां, आसपास पहाड असें असून, आपलें माणूस दोन तीन हजार जायां केलें. त्यांजकडील माणूस जायां न होतां ते निघून मैदानांत गेले. आतां त्यांचे पाठीलाग न करणें. तुह्मी फौजसमेत तेथेंच रहाणें. पुढें लिहून पाठवूं त्याप्रमाणें वर्तणूक करावी. यामुळें पाठलाग केला नाहीं. देशीं महर्गता फार जाली. औरंगाबादेस माहागाई फार. कुटुंबाचा परामर्श करणार स्वामी कृपाळू होऊन करावा. बहुत दिवस जाले, येथील देणें वारत नाहीं. पुढें ज्याचें घेतलें तो कांहीं देत नाहीं. सर्वस्वें चिंता! याचें निवारण खावंदाखेरीज कोण करितो? सेवेसीं श्रुत असावें हे विज्ञापना."

---

## लेखांक १५४.

**श्री.** १ आक्टोबर सन १७८७.

"* * * * ऐकूण पत्रें रवाना केलीं तीं पावलींच असतील. उत्तराविषयीं आज्ञा करणार धणी समर्थ (आहेत). सांप्रत राजश्री पाटीलबावांचीं पत्रें येथें बाईस आलीं नाहींत. एक दोन पत्रें राणेखानभाई यांचीं बाईस आलीं. एका पत्राचें उत्तर दिल्हें. मागाहून छ १२ जिल्हेजेस पत्र राणेखानभाईचें आलें. त्याचें उत्तर दिल्हें नाहीं. कासद डाकेचा होता, त्यास उत्तर दिल्हें कीं, सांप्रत पत्राचें उत्तर देत नाहीं. ८।१५ दिवसां उत्तर डांकेस पावतें करूं. त्या पत्रांतील अर्थ कांहीं समजला नाहीं. परंतु राजश्री सुभेदार यांजकडे त्या पत्राचे भाव लिहून पाठविले आहेत. पत्र एकांतींच वाचून पत्रार्थ प्रगट केला नाहीं. ज्यांनीं पत्र वाचून दाखविलें, त्यास मीं विचारिलें कीं, पत्राचा अर्थ विशेष काय? त्यांनीं सांगितलें कीं, फौज पाठवावी व कांहीं खर्चाची मदत करावी; इतकें सांगितलें. राजश्री पाटीलबावा आतां पत्रें लिहित नाहींत. पयदरपय पांच सात पत्रें बाईस आलीं. त्याउपरी पत्र येत नाहीं. दोन पत्रें राणेखान भाई यांचीं मात्र आलीं. अजमेरचे किल्ल्यांत ठाणें मारवाडकरांनीं घातलें. किल्लेदार कुटुंबसुद्धां मृत्यु पावला. मासपक्ष किल्ला लढविला नाहीं. गुलाम कादर फौजसुद्धां दिल्लीस दाखल जाले. दोन पुरे लुटले. पातशहास नजरबंद केलें. पुढें इरादा जयपूर-प्रांतीं येणार. उज्जनीस पाटीलबावांकडून कारकून ऐवज जमा करावयास आले आहेत. पाटीलबावांनीं घरींहून उज्जनीचे हवेलींतून रुपें काढून सिक्का पाडावयास लाविलें. साता लक्षांचें रुपें निघालें. कांहीं सावकार मंडळीस कर्ज मागतात. मामलेदार यांजपासून दुसाला रसद घेऊन ऐवज लष्करांत रवाना

करावा, असें वर्तमान येथें आलें. बाईकडून दोन चारशें स्वार चंद्रावताचे पारपत्यास रामपूर परगण्यांत जातात. तयारी होत आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १५५.

श्री.                                   १९ आक्टोबर इ. स. १७८७.

" श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ माहे मोहरमपावेतों सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- चंद्र ९ जिल्हेजचें तारखेचें आज्ञापत्र सादर जाहलें, तें चंद्र २३ मिनहूस पावलें. चंद्र ४ व चंद्र ९ व चंद्र १५ जिलकादचीं पत्रें पाठविलीं, त्यांचीं उत्तरें लिहिलीं तीं पावलीं. सांप्रत राजश्री पाटीलबावांकडून पत्रें येत नाहींत. राणेखानभाई यांचीं पत्रें येत होतीं, तींही आतां येत नाहींत. तिकडील वर्तमानः- रांगड्याचा जोर आहे. आग्र्याचे किल्ल्यास फौज रांगड्याची व आमदनीचा पुतण्या हे लागले आहेत. त्याचें पारपत्य राजश्री खंडेराव हरी वगैरे फौज ढवलपुरानजीक घांट धरून आहेत. पुढें जावयाची हिमत नाहीं. असें वर्तमान आलें. धरमदास निसबत हरकूबाई होळकर यांनीं खोटाई करून, राजश्री पाटीलबावांजवळून निघोन, जयपुरकरांस भेटोन, त्यांचे तरफेनें टोकेंत अंमल कांहींएक दिवस केला. तेथें ठाणा वराता जयपुरकरांनीं केल्या. त्यास ऐवज न पावला. त्यांनीं तगीर करून हजूर नेला आहे. टोंकेचा अंमल त्यांनीं खगारघतास दिला. राजश्री पाटीलबावांपासोन खंगार येथें येवोन देशीं गेला. त्याची जबानी कीं, देशींहून फौज आणविली आहे. त्याजकरितां राजश्री बाळाजीपंत जामगांवकर त्यांजकडे जातो. राजश्री शिवाजीपंत बापू यांचे मेहुणे जालनापूरकर तेही येथें येऊन देशीं गेले. त्यांनीं जबानीं वर्तमान सांगितलें कीं, तमाम अंमल उठला आहे. रांगडे जोरदार जाहले. इकडील फौजेनें दहशत घेतली. त्यामुळें कांहीं होत नाहीं. मातबर फौज देशींहून येईल, तर इकडे अंमल चैन होऊन नक्ष राहील. येथून चारशें स्वार व पागा राजश्री अबाजी रणछोड नि॥ पागा यांजकडील कारकून घेऊन पुढें बाईनीं त्यास रवाना केलें. बरोबर जंबुरे व बाण व लहान तोफा देऊन रामपुरा येथें पाठविलें. मागाहून आणिला सरंजाम रवानगी करणार. देशीं पत्रें फौजेकरितां गेलीं आहेत. राजश्री यशवंतराव फणसे यांची पागा सातशें घरची आहे. ते लोक बोलावून त्यांची हजीरी आज घेऊन, करारमदार जाहल्यावर राजश्री पाटीलबावांकडे रवाना करणार.

देशींहून मातबर फौज आल्यावांचून परिणाम नाहीं. आग्र्याचा किल्लेदार हा कालवर लढाई करीत आहे. त्याची मदत होत नाहीं. धवळपुरापुढें राजश्री खंडेराव हरी जाऊं पावत नाहींत. येथें तथ्य वर्तमान येत नाहीं. अलीकडून यांस कमाविसदार लिहितात. यांची बातमी तेथें कोणी नाहीं व सांप्रत त्यांचीं पत्रें यांस येत नाहींत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १५६.

पै॥ छ १ रविलावल सन समान **श्री.** ४ डिसेंबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीः—

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २३ माहे सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–आज्ञापत्र चंद्र २१ मोहरमचें सादर जाहलें. तें चंद्र १ सफरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री यशवंतराव फणशे यांस पागासुद्धां राजश्री पाटीलबावांकडे रवाना करणार, किंवा पागाच पाठविणार ह्मणून त्याबराबर दुसरी फौज देणार, हें लिहून पाठवावें. त्यास आश्विन मासीं पागा यशवंतराव फणसे यांची बाईनीं आणविली. रामपुऱ्यास रवाना करावी, सरंजाम चांगला, घोडें माणूस चांगलें ह्मणून मीं लिहिलें होतें. राजश्री पाटीलबावांकडे पाठवितात असें लिहिलें नसेल. कदाचित् चूक पडली असली तर न कळे. जीं पत्रें सेवेसीं लिहितों, त्यांच्या नकला ठेवीत असतों. सांप्रत कांहींएक दिवस कारकून येथें नाहीं, घरास गेला. चंद्र ७ मोहरमींचे पत्रीं रामपुऱ्यास पागा यशवंतराव यांची रवाना करणार असें लिहिलें होतें. माझे हातचीं पत्रें रवाना केलीं, त्यांची नक्कल येथें राहत नाहीं. यास्तव मजला संशय जाहला ह्मणून विनंति लिहिली. बाईनीं आवाया मात्र घातल्या. लोक शिलेदार बोलावून आणले, हजीरी घेतली, शेरा १०, १२, १५ पंधरा देऊं लागले. लोकांनीं कबूल न केलें. यशवंतराव यांचे पागेचें बनलें नाहीं. पागा माघारे पाठविली. रामपुऱ्याकडे रांगड्यांचा दंगा जाला. ह्मणोन घरपागा व शिलेदार कदीम सुद्धां, सहाशें सातशें लोक, बरोबर राघो रणछोड पागे यांजकडील कारकून राजश्री अंबाजी गंगाधर दिले होते, ते आश्विनमासीं पाठविले. रामपुऱ्याचा दंगा होता. मध्यें मेवाड प्रांतीं होळकराचे महाल आहेत, तेथील बोभाट कमाविसदारांचे आले. त्यावरून तो सरंजाम मेवाड प्रांतीं पाठविला. उदेपूरकराची फौज दोन हजार मेवाडांत होती, त्यांची यांची लढाई कार्तिक शुद्ध १५ जाहली. त्याचा जोर अधिक जाला. हे थोडे. त्यांनीं चालून घेतलें. यांजकडील अंबाजी गंगाधर जखमी

जाहले. एक दोन कारकून त्यांनीं पाडाव करून नेले. वेताळजी होळकर यांस जखमा लागल्या. त्याजकरितां यांचा मोड जाला. हे माघारें निंबहेडा ठाणें यांचे तेथें आले. हें वर्तमान येथें आल्यावर, फिरोन शिलेदार व पागा यशवंतराव यांची आणविली आहे. यांजला मसलत मेवाडची प्राप्त जाली आहे. मदत पाठवितात. परंतु आठ पंधरा दिवस पाहिजेत. राजश्री पाटीलबावांनीं पांच सात पत्रें वरचेवर यांस फौजेकरितां पाठविलीं. यांनीं उत्तरें पाठवीत गेलीं, परंतु शें दोनशें लोक अथवा पेंढारी कांहींच रवाना केले नाहींत. त्यांणीं यांस पत्रें लिहिणें टाकलें. ते लिहीत नाहींत. दोन हजार फौज व पेंढारी दोन हजार त्यांनीं आणविलें, तितकें यांनीं पाठवावयाचें तें न केलें. तिकडे नक्ष अथवा बदनक्ष जाला, ही चिंता यांस काय? दुसरें, पदरीं माणूस शहाणा कोणी नाहीं. प्रसंगास सुचवून समय राखी असे कोणी नाहींत. जे आहेत, ते स्वस्थ तीन प्रहर घरीं असतात. प्रहर दिवस उरला ह्मणजे दरबार करितात. तितक्यांत काय जाबसाल होतील ते होत आहेत. असें प्रतिदिवशीं. दोन प्रहरपावेतों यजमानांची गांठ पडत नाहीं. भोजनोत्तर जमा होतात. त्यांजला फिकीर नाहीं. पैसा मिळतो. कारभार कोणाचे ध्यानीं नाहीं. जें करावें तें बाईनीं करावें. यामुळें समय चुकतात. आमचा प्रपंच, त्यास आह्मी दरबारांत जावें, रात्रीं अथवा समय पाहून गेले, तर त्यांचे नेत्र मिळत नाहींत. यामुळें जात नाहीं. एक वेळ जातों. पेंढारी यांनीं खानदेश प्रांतीं मोठा अनर्थ केला. ब्राह्मण स्त्रिया त्यांजवर बलात्कार करून भ्रष्टविल्या. बोभाट येथें आले. येथून भारमल होळकर वगैरे शेंपन्नास लोक पाठविले. त्यांनीं मानलें नाहीं. लोक लुटले. त्यांची वस्तभाव देत नाहीं. हें वर्तमान तेथें हुजुरांत आलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १५७.

श्री. २० डिसेंबर इ. स. १७८७.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ९ माहे रबिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ७ सफरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्या अलीकडील वर्तमानः–

उदेपुरकर राणाजीशीं व चितोडकर भींमसिंगाशीं लढाई मातबर जाली. उदेपुरकरांस कोटेकर सामील होते, त्यामुळें चितोडकराचा मोड जाला. सारी फौज लुटून जातिनिशीं भीमसिंग चितोडास गेला. ह्मणून वर्तमान आलें. कलम १.

राजश्री यशवंतराव फणशे यांचे चिरंजिवास समाधान नव्हतें ह्मणून पेशजीं लिहिलें होतें. हल्लीं कार्तिक शुद्ध ७ स दानें, हत्ती वगैरे केलीं. दहा सहस्र रुपये धर्म केला. शेवटीं कार्तिक शुद्ध ९ सोमवारीं तृतीय प्रहरीं देवआज्ञा जाली. उभयतां स्त्रिया लहान होत्या. त्यांत एक, वर्षे अठरांची व एक वर्षे दहांची; त्यांनीं धैर्य मोठें करून सहगमन केलें. संपूर्ण अलंकार अंगावर घालून, आंबारींत बसून, बहुत समारंभेंकरून सती गेल्या. समागमें बाईही पायउतारा चरणचाली स्मशानास गेली. अवघा विधि करून, सहा घटका रात्रीस माघारें आली. त्यानंतर दो घटकांनीं प्रहर रात्रीचे समयीं, सौभाग्यवती आनंदीबाई, राजश्री काशीराव होळकर यांची स्त्री, तिजला समाधान नव्हतें, तिचा काल प्रहर रात्रीस जाला. तेव्हां मागतीं तिचा सरंजाम करून, दोन प्रहर रात्रीं दहन केलें. दोहीं दुःखांचा परिहार मासपक्ष होत नाहीं. समाधान बहुत करितात. आह्मीं समयास समाधानाच्या गोष्टी सांगितल्या. परंतु बाईची चित्तवृत्ति दुःखार्णवींच आहे. फार श्रमी होतात. येणेंप्रमाणें वर्तमान जालें. कलम १.

जोतपूरकर बिजेसिंग यांजकडून वकील राजश्री पाटीलबावांकडे येऊन सलुख्याचा जाबसाल ठरला, ह्मणून कोटेकर सावकाराचीं पत्रें आलीं. त्याचा तपशील, नऊ लक्ष रुपयेपैकीं नक्त रुपये सहा लक्ष व भरणा तीन लक्षांचा व अजमेरसुद्धां महाल चार; याप्रमाणें लिहिलें सावकारी आहे. कलम १.

रिखबदास जोहरी याच्या स्त्रीविषयीं सरकारचीं पत्रें आलीं. त्याचें उत्तर पेशजीं लिहिलें होतें. जोहरी मुदई इंदुरास गेला होता. तो आश्विन शुद्ध ११ स आला. द्वादशीस सरकारचें पत्र बाईस देऊन, त्यांचा जासूद बरोबर घेऊन, जोहरी याची स्त्री व कन्या दोही हस्तगत करून, त्यांच्या घरांतील वस्तभावाचा शोध करून जिनसा काढल्या. त्या घेऊन बाईस दाखविल्या. त्याची याद करून गटवट केली. आमच्या स्वाधीन करावी तों इतक्यांत, गांवचे सावकार वगैरे रयत शें दोनशें माणूस वाड्यांत आलें. येऊन फिर्यादी केली कीं, ह्या दोघी स्त्रिया रांडमुंडा आहेत; त्यांजकडे कजिया काय? त्याचें उत्तर बाईनीं केलें कीं, श्रीमंतांची आज्ञा आली आहे. सरकारचा जाबसाल यांजकडे आहे ह्मणून वस्तभाव आणली. त्यावर रिखबदासाच्या स्त्रीनें उत्तर केलें कीं, मजकडे कजिया सरकार कांहीं राहिला नाहीं. मी जामीन देतें. यावरून बाईनीं तिचा जामीन घेऊन त्यांची मुक्तता केली, व वस्तभाव आणिली ते याद करून, अनामत मोहोर करून त्यांनीं आपले मारफतीनें ठेविली. आह्मीं उत्तरें मागितलीं. आज उद्यां करितां हा प्रसंग जाला! लहानमोठे दागिने मिळून

दिडा हजारापावेतों किंमत होईल. मुदई बाईचे रुबरू येत नाहीं व त्याचें नांवही सांगतां येत नाहीं. पुढें वर्तमान होईल तें विनंतिपत्रीं लिहीन. कलम १.
एकून कलमें चार असेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १५८.

**श्रीगजानन.** २१ जानेवारी इ. स. १७८८.

"सेवेसीं केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री तुकोजी होळकर यांचीं पत्रें व राजश्री नारो गणेश यांचीं पत्रें बाईस काल छ १० रविलाखरीं आलीं. पौष शु॥ प्रतिपदेचे मितीचीं पत्रें होतीं. पत्रीं वर्तमान उभयतांनीं लिहिलें होतें कीं, आह्मी मार्गशीर्ष वद्य ११ मुहूर्तेंकरून डेऱ्यास दाखल झालों. सरकारचा निरोप घेऊन लौकरच येतों. सिद्धता असावी. निरोपाचा गुंता राहिला नाहीं. राजश्री पाराशरपंत जाऊन ठराव करून आले आहेत. आह्मीं निरोप घेऊन यावें इतका गुंता आहे. त्यास लौकर येतों. जबानी कासदाचें कीं, वस्त्रें देखील निरोपाचीं व जवाहीर आलें. पुण्यास जावयाचा अटकाव नाहीं. चांदवडास येऊन येथें येतात. असें ऐकिलें तें सेवेसीं विनंति लिहिली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १५९.

**श्री.** २१ जानेवारी इ. स. १७८८.

पै॥ छ २५ रविलाखर सन समान समानीन पौष.

श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामीजींचे सेवेसीं.

"विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ १८ रविलावलचीं विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं. त्याउपरी इकडील वर्तमानः– राजश्री राघो रणसोड व पेंढारी व शरीफभाई असे उदेपूरप्रांतीं रवाना जाले त्यांणीं जातांच रतलामकर रांगडे यांचा परगणा मारून लुटला. रतलामकर लढाईस आले. पेंढारी यांची व त्यांची लढाई जाली. रांगडे १०।५ माणूस चांगलें ठार जालें. पेंढारी शेंपन्नास मारले. तेथून कूच करून पुढें गेले. राजश्री पाटीलबावांचा मुकाम ग्वाल्हेरीजवळ आहे. त्यांचे कबिले उज्जनीस पूर्वींच दाखल जाले. त्यांजबराबर लोक चाकरीस होते, त्यांतून चारशेंपरीयंत लोक चाकरीचे उठोन

देशास गेले. कबिल्याजवळ फौज दोन हजारपावेतों आहे. गुलाम कादर व पातशाहा दिल्लीहून छ २७ रविलावलीं निघाले. इरादा पुढें आग्र्यास यावयाचा. राजश्री सुभेदार यांजकडून वकील दिल्लीस आहेत. त्यांचीं पत्रें येथें येऊन वाफगांवास गेलीं. त्या पत्रीं बहुतच निकड पातशाहाची लिहिली होती कीं, माळवेप्रांतीं यावें. दक्षणीचा अंमल जेथवर आहे, तेथवर उठऊन द्यावा. त्याप्रमाणें राजेरजवाडे यांस ताकीद. याप्रमाणें वकिलांनीं लिहिलीं. तींच पत्रें बाईनीं वाफगांवास रवाना केलीं. येथें राजश्री जीवनराव पागनीस निसबत राजश्री सुभेदार यांजकडून छ ९ रविलाखरीं आले. बाईस भेटून वर्तमान सांगत होते कीं, मजला सुभेदार यांणीं आपणांकडे पाठविलें आहे. आह्मी लौकरच येतों. मुहुर्तें-करून बाहेर निघालों. त्यास, खर्चाची वगैरे सिद्धता असावी, असें सांगत होते. प्रगटांत हें वर्तमान ऐकिलें. उभयतांचा एकांत जाला, तें वर्तमान समजलें नाहीं. समजल्यावर सेवेसीं लिहीन. वरकड वर्तमान यथास्थित असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १६०.

श्री. २१ जानेवारी इ. स. १७८८.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ रविलाखरपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेषः– पापडसाहेब इंग्रज यांजकडे संधान राजश्री पाटीलबावांनीं केलें कीं, तुमची मदत यावी. त्यावरून इंग्रजांनीं उत्तर केलें कीं, जो मुलूख तुह्मीं घेतला, त्यांत सा आणे हिस्सा आह्मांस द्यावा. पुढें सुटेल त्यांत सा आणे हिस्सा, आग्र्यांत कोठी व शहरपन्हाचा अंमल, व दिल्लींत कोठी, याप्रमाणें करार होत असला, तर आह्मी मदतीस येऊन हरोळी करूं. त्यावरून राजश्री पाटीलबावांनीं करारांत येणेंप्रमाणें लिहून पाठविलें कीं, सा आणे हिस्सा कबूल, आग्र्यांत अंमल देत नाहीं; कोठी मात्र करावी; असें लिहिलें. त्यांजकडून पलटणें दो कंपूचीं येणार असें ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें. श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १६१.

श्री. २१ जानेवारी इ. स. १७८८.

"सेवेसीं केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राघोगडवा-

त्याचा पुत्र भेलशांत कैदेंत होता, तो पळून सोंध्याचे मुलुखांत जाऊन, पांच हजार फौज जमा करून, खिचीवाड्यांत व माळवेप्रांतीं उपद्रव देऊं लागला. हें वर्तमान राजश्री बावांस कळलीयावर राणेखान व रायाजी पाटील व आंबोजी इंगळे यांजसमागमें सात हजार फौज देऊन, त्याच्या पारपत्यास पाठविले. ते येऊन घुगरछेबड्यास पोंहचले. खिचीवाड्यांत जाऊन त्यास तंबी पोंहचाऊन मेवाडांत जाणार ह्मणोन ऐकिलें. तें सेवेसीं विनंति लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती छ ११ जमादिलावल

## लेखांक १६२.

सन खमस संमानीन. अधिक चैत्र. **श्री.** ९ फेब्रुवारी इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—छ २१ रबिलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलें आहे. त्या अलीकडील वर्तमानः—बाईनीं रामपुऱ्यास वाफगांवींहून उंट व बैल खरेदी करावयाकरितां जासूदजोडी वराता घेऊन आले होते, त्यांजला येथें आणविलें आहे, हें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें होतें. त्यास हल्लीं रामपुऱ्याहून कमाविसदारांनीं वराताच्या नकलाच बजिन्नस करून पाठविल्या. जासूद व अस्सल वराता मागाहून पाठवून देतों ह्मणोन कमाविसदारांनीं बाईस लिहिलें आहे. वराता बाईनीं पाहून, आह्मांस बोलावून सांगितलें कीं, वराता तेथून आल्या आहेत, या तुह्मीं पाहून पुण्यास रवाना कराव्या ह्मणजे जाबसाल समजेल. आह्मीं उत्तर केलें, आपण पंचवीस हजार रुपये वाफगांवचे खरेदीबद्दल तकूब ठेविले हें वर्तमान श्रीमंतांस लिहिलें, परंतु तेथें शोध करितांना खरेदी करविली नाहीं ऐसें बोलण्यांत. त्यावरून पंचवीस हजारांकरितां आपणांस पत्र आलें. त्यापक्षीं पंचवीस हजारांची हुंडी व अस्सल वराता सरकारांत रवाना कराव्या हेंच उत्तम. ऐकोन बोलली कीं, नकला तूर्त पुढें पाठवाव्या. ऐवजाची तजवीज करून, लौकरच हुंडी करून राजश्री यशवंत गंगाधर यांजकडे रवाना करूं व तुह्मांपाशीं पत्राचें उत्तर देऊं. त्याजवरून नकला सेवेसीं पाठविल्या आहेत. ऐवजाविषयीं वरचेवर सूचना करून सत्वरच रवाना करवितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १६३.

पैवस्ती चंद्र १४ रजब समान संमानीन चैत्र **श्री.** ७ एप्रील इ. स. १७८८.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २९ जमादिलाखर मुक्काम नजीक शहर बराणपूर वर्तमान यथास्थित असे. विशेषः–आज येथून कूच करून पुढें जाणार. सात आठ दिवसांत महेश्वरीं जाऊन पोहोंचावें असा बेत आहे. राजश्री तुकोजी होळकर यांचें मालेगांवचे मुक्कामचें पत्र चंद्र २५ जमादिलाखरीं आलें होतें कीं, आह्मी महेश्वरास दरकूच जातों, आपण लवकर यावें. याप्रमाणें सरदारांस लिहिलें होतें. राजश्री महादजी शिंदे यांजकडील रामजी पाटील चंद्र २५ जमादिलाखरीं सरदाराचे भेटीस आले होते. दोन दिवस लष्करचे जवळच मुक्काम करून राहिले होते, तेही त्वरेनें पुण्यास गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १६४.

**श्री.** १५ आगस्ट इ. स. १७८८.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १२ माहे जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र ७ सवालचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २७ माहे सवालीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, वर्तमान वरचेवर होईल तें लिहित जाणें; व राजश्री आनंदराव गंगाधर यांचीं पत्रें पावलीं, त्याचें जाब उत्तरें लिहून पाठविलीं तीं त्यांजकडे पाठवून देणें ह्मणून आज्ञा. त्यावरून आज्ञेप्रमाणें चंद्र २८ सवालीं त्यांच्या नांवाचीं दोन पत्रें खुलीं होतीं तीं, आपले पत्रांत लावून लखोटा करून त्यांजकडे पाठविला. व त्यांजकडून लखोटे २ आले ते बजिन्नस सेवेसीं पाठविले आहेत. इकडील वर्तमानः–राजश्री सुभेदार यांजकडून निकडीचीं पत्रें, सालमजकुरच्या रसदा घेऊन ऐवज पांच सात लाखपावेतों आह्मांस पाठवून द्यावा, खर्चाची ओढ फार आहे ह्मणून, बाई यांस पत्रें येतात. त्यावरून त्यांनीं महालोमहालीं जासूद व पत्रें बलावून पाठविलीं. परंतु कोणी हा कालवर आले नाहींत. मामलेदारांचीं उत्तरें आलीं कीं, लवकर लावणीचा बंदोबस्त करून येतों. चांदवड व नंदुरबार व सुलतानपूर व थालनेर येथील जमीदार रयत फिर्याद आहेत. कोणाची दाद लागत नाहीं. महालीं मामलेदार आहेत, त्यांच्या रुजवाती करून देऊन फाजिलास बराबर करून देतों. नवे कमाविसदार करून द्या ह्मणत आहेत. तेथें कोणी मनावर घेऊन छान करीत नाहीं. अंधेर! दोन प्रहर मुख्यासुद्धां व कारभारी सहमंडळी कारभार

होतच नाहीं. त्यानंतर निद्रा ! तृतीय प्रहरांनंतर चार घटका दरबार ! त्यांत दादी फिर्यादी, आले गेले ! याप्रमाणें नित्य अभ्यास आहे. दौलतींत उणें अधिक पाहणारा कोणी नाहीं. अवघे सांगकामे आहेत. नेकीबंदीस बाईच आहेत. लष्करांत वोढ भारी आहे. मामलत जयपुरची जाली नाहीं. रांगडे लांबणीवर घालितात. जसा यांचा नाजुक कारभार, तसा तेही चालढाळ करितात. राजश्री संताजी वाघ व लक्ष्मणराव भोईटे राजश्री अलीबहादूरबाबाकडून येऊन देशीं गेले. त्यांनीं सांगितलें कीं, बहादूर यांची सोय कांहीं नाहीं. कर्ज फार जालें. उपाशी लोक मरतात. धरणीं पारणीं होत आहेत. ठिकाण नाहीं. खर्चास सुभेदारांनीं देऊन ठेविलें आहे, तेंही पुरतें देत नाहींत ! अशी अवस्था सांगितली. वरकड काय सांगावें ? ह्मणून सांगत होते. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १६५.

**श्री.** १९ आगस्ट इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:–

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १६ जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष:–चंद्र २९ सवालीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमान:–गुलाम कादर व इस्माईल बेग उभयतां दिल्लीस येऊन, बादशाहाचा बंदोबस्त करून आपले स्वाधीन शहर करून घेतलें. राजश्री अलीबहादर पाटीलबावांकडे जात होते. त्यास राजश्री सुभेदारांनीं राजश्री पाराशर दादाजीस पाठवून, त्यांची खातरदारी करून त्यांस घेऊन आले. उभयतां सरदार मेवाड व कोट्याचे संधान धरून आहेत. राजश्री जालमसिंग कोटेकर सुभेदारांस येऊन भेटले. पुढें मसलत मेवाडची आहे. बाईनीं सेवेसीं पत्रें चंद्र १२ जिलकादीस लिहून पाठविलीं आहेत. अलीबहादर यांचा मजकूर व सुभेदार येथें येऊन पुढें गेल्याचा मजकूर वगैरे लिहिला आहे. तीं पत्रें राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे रवाना केलीं आहेत. तीं सेवेसीं प्रविष्ट होतील. राजश्री काशीराव होळकर पाटीलबावांकडे बाईनीं रवाना केले. परंतु राजश्री नारो गणेश यांनीं त्यांस माघारें आणिलें. ते येऊन सुभेदारांस सामील जाले. राजश्री चिमाजी बुळे व नारायणजी बारगळ उभयतां येथेंच आहेत. त्यांस न्यावयास सुभेदारांनीं हुजरे पाठविले आहेत. हे जात नाहींत. कर्जपट्टीसाठीं आडून बसले आहेत. बाईस ह्मणतात कीं, आह्मांस कर्जपट्टी माफ करावी. बाईनीं उत्तर दिलें कीं, जी जाली पट्टी ती माफ

होत नाहीं. पुढें निभावून घेऊं. इकडे पर्जन्य अतिशय जाला. राजश्री गबाजी सदाशिव श्रावण शुद्ध ५ स येथें येऊन, बाईची भेट घेऊन मंडळेश्वरीं गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १६६.

पैवस्ती चंद्र १५ मोहरम. श्री. २८ सप्टंबर इ. स. १७८८.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २७ जिल्हेज मुक्काम कसबें अकोल परगणे मजकूर नजीक उदेपूर वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान तर राजश्री सरदारांनीं लिहिलें आहे, त्याजवरून कळेल. वरकड मजकूर तर, राजश्री अपाजीपंत दामले आल्यापासून राजश्री तुकोजीबावांस महेश्वराहून लौकर निघण्याचा बेत यांनींच केला. ते व हे येथपर्यंत जलदीनेंच आले. त्यानंतर पर्जन्य बहुत लागला. याजमुळें मुक्काम जाले, व राजेराजवाडे यांचे वकीलांशीं बोलावयासी पुर्तेपणें झडीमुळें बनलें नाहीं. घोडीं व उंटें बहुत खराब जालीं. कूच करण्याविषयीं तुकोजीबावांपाशीं दोन तीन वेळां आपाजीपंत यांनीं निकडीचा जाबसाल करून, अश्विन शुद्ध प्रतिपदेस कूच करून, राजश्री पाटीलबावांकडे उभयतांनीं निकडीनें जाऊन पोहोंचावें असा पक्का निश्चय जाला आहे. आपाजीपंतास सरदार पालखी देत होते, परंतु त्यांनीं स्वामींचें आज्ञापत्र आल्याशिवाय घ्यावयाची नाहीं, याप्रमाणें बोलले. वरकड कामकाजाचा डौल येथें मशारनिल्हेंनीं चांगला घातला आहे. त्यांस पालखी असावी, यास्तव सेवेसीं विनंति लिहिली आहे. तरी कृपा करून पालखी द्यावयासी सरदारास आज्ञा करणार स्वामी आहेत. सेवेसीं समर्थ श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १६७.

पैवस्ती चंद्र १५ मोहरम. श्री. २८ सप्टेंबर इ. स. सन १७८८.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ जिल्हेज मुक्काम कसबें अकोल परगणे मजकूर नजीक उदेपूर वर्तमान यथास्थित असे विशेषः—स्वामींकडून चंद्र २ जिल्हेजचें पत्र आलें तें पावलें. इकडील वर्तमान तर राणाजी याजकडील वकील राजश्री सुभेदार यांचे विद्यमानें बोलण्याकरितां येण्याविषयीं पुढें कारकून पाठवून कबूल केलें. नंतर आठ पंधरा दिवस अधिक त्यांचे येण्यास लागले. आल्यानंतर बोलण्यांत जीव कांहींच पडला नाहीं. चार सहा महिने येथें राहिले असतां मग त्यांचा बंदोबस्त होतो, असा

अन्वय दिसोन आल्यानंतर, सरदारांनीं सुभेदारास निघण्याची निकड फार करून अश्विन शुद्ध प्रतिपदेस कूच ठरविलें. सरदारांनीं आठा दिवसां पाठीमागें सुभेदारास सोडून कूच करावें, याप्रमाणें निश्चय करून त्यांजकडे रात्रीस चिटी पाठविली कीं, आमचें प्रातःकाळीं कूच आहे. नंतर मध्यरात्रीस सुभेदार व नारोपंत व पाराशरपंत डेऱ्यास येऊन राहण्याविषयीं बहुतच आग्रह केला. तेव्हां प्रतिपदेचा कूच निश्चयांत आणून, दरमजल राजश्री पाटीलबावांकडे जाऊन पोहोंचावें; याप्रमाणें यांचें त्यांचें पक्केपणें बोलणें ठरलें. स्वामींचीं पत्रें वारंवार यांस पाटीलबावांकडे जावयाविषयीं येत गेलीं. त्यांजवरून आह्मीं दोन चार वेळां सांगितलें कीं, सुभेदारास सोडून पाटीलबावांकडे पुण्याचे पत्राचे अन्वयें जाऊन पोहोंचावें. परंतु यांचे चित्तांतील अंदेशा कीं, सुभेदारास व राजेरजवाडे यांचीं अनुसंधानें आलीं आहेत, हीं घेऊन पाटीलबावांकडे जावें, ह्मणजे मोठा डौल पडेल. यास्तव इतके दिवस जाण्यास लागले. राजेरजवाडे यांजकडील बोलण्यांतही कांहीं जीव दिसत नाहीं. त्यांचीं बोलणीं आपले मतलबाचीं पडतात व त्यांचें संधान पुर्तेपणें इकडे लागेल असें नाहीं. गुलाम कादर याजकडेही त्यांचीं बोलणीं आहेत. असा त्यांचा दामोष विचार आहे. इस्माईल बेग याचें संधान पाटीलबावांकडेस यावें याप्रमाणें बोलवा आहे, परंतु यासही भरंवसा पोहोंचत नाहीं. याचाही अंदेशा समजत नाहीं. पुढें काय होईल तें सेवेसीं लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १६८.

पै॥ छ २ सफर कार्तिक **श्री.** २० आक्टोबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १९ माहे मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— आज्ञापत्र छ १७ जिल्हेजचें सादर जालें, तें छ १९ माहे मोहरमीं आजच पावलें. एक महिना दोन दिवस जाले, इतके दिवस पत्र तेथें कसें राहिलें? पत्रीं आज्ञा कीं, अलीबहादर यांची रवानगी मातबर फौज देऊन होत आहे. होळकराचे पूर्वीं ................चालत आले आहेत, त्याप्रमाणें चालावें. यास हिंदुस्थानास बोलवावें येविशीं पाटीलबावांस लिहिलें आहे; उत्तरें आलीं नाहींत ह्मणोन आज्ञा. त्यास सांप्रत रांगड्याचा गवगवा भारीच आहे. देशींहून मातबर फौज आलीयावांचून इकडील बंदोबस्त होत नाहीं. उज्जनीचें वर्तमान येथें ऐकिल्यांत आलें कीं, गुलाम कादर

दिल्लीस होते, ते यमुना उतरोन गेले. अंतरवेदींत अंमल गोसावी याचा जाला होता. त्यास फिरंगी यांणीं लिहून तोही अंमल सोडोन यमुनापार जाला, असें शुभ वर्तमान तर आलें. ठिकाणचें वर्तमान सरकारांत येईल तें खरें. अलाहिदा विनंतिपत्र लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १६९.

श्री. २१ आक्टोबर इ. स. १७८८.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २० मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—राजश्री पाटीलबावांकडून उज्जनीस ऐवजाकरितां राजश्री भवानी शंकर पोतनीस वगैरे कारकून आले. त्यांजकडून येथें राजश्री पाडुरंग राम चांभारगोंदेकर यांस बाईकडे पाठविलें कीं, तुह्मांकडून ऐवजाची सोय व्हावी. तुह्मीं पेशजीं पाटीलबावांस लिहिलें होतें कीं, कांहीं तरतूद समयास आह्मांकडून होईल. त्यावरून आह्मांस आपल्याकडे पाठविलें आहे. आह्मी येथें सावकारांस व मामलेदारांस ऐवजाची निकड करितों. तुह्मांकडे पांडुरंग राम पाठविले आहेत. तर ऐवजाचा भरणा करावा. ह्मणून कारकून येथें छ १५ मोहरमीस आला. त्यासही मजकूर केला. बाई व मुत्सद्दी एकत्र बसून खलबत जालें. नाहीं कसें ह्मणावें? त्यास, चार सावकार बोलावून त्यांस सांगितलें, तुह्मीं ऐवज द्या, परंतु महाल ऐवजाचे पोटीं लावून घ्यावे. कारकुनाशीं तुह्मीं बोलावें. असें सांगून पांडुरंग राम व सावकार एकत्र बसविले. उभयतांचीं बोलणीं जालीं. पांडुरंग राम यांनीं उभयतांस साफ सांगितलें कीं, तुह्मांस महाल लावून द्यावे आणि आह्मीं ऐवज घ्यावा, यास्तव तुह्मांकडे आह्मी आलों नाहींत. जर बाई तुह्मांस सांगून ऐवज देवीत असली, तर तुह्मी द्या. नाहीं तर ही भानगड करूं नये. याप्रमाणें उत्तर होऊन सावकार गेले. बाईंस त्यानें साफ विचारिलें, "आपण काम करीत असलेंत तर करावें, नाहीं तर उत्तर द्यावें." त्यावरून त्यास सांगितलें कीं "तुह्मी तूर्त उज्जनीस मास पक्ष आहांच. मागाहून याचा विचार करून तुह्मांस लिहून पाठवूं." असें सांगोन त्यांस छ १८ मोहरमीं उज्जनीस रवाना केलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १७०.

पौ छ १ सफर सन तिसा समानीन कार्तिकमास.

श्री. २२ आक्टोबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

"विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत

छ २१ मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ १० माहे मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत, ते सेवेसीं प्रविष्ट जालीं असतील. त्याउपरी येथील वर्तमानः– काल छ २० मिनहूस राजश्री सदाशिव दिनकर उज्जनीहून येथें आले. आज छ २१ मिनहूस बाईची भेट जाली. पुढें देशीं जावयास एका दो दिवसांनीं निरोप घेऊन कूच करतील, ह्मणजे मागाहून वर्तमान सविस्तर लिहीन. सांप्रत लष्करचीं पत्रें डांकेसमागमें येथेंच आलीं, ते सेवेसीं सदाशिवपंतीं रवाना केलीं आहेत. त्यांतील मुख्यार्थ, गुलाम कादर पळून गोहसगडास गेला. तपशील पत्रावरून श्रुत होईल. सरकारचें ठाणें दिल्लींत कायम जालें. दुष्टाचरणाचें फळ गुलाम कादर यास जालें पाहिजे. तेंही सत्वरच श्रीमंतांचे प्रतापेंकरोन घडेल. फौजा पाठीलाग गेल्या आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७१.

**श्री.** ४ नोव्हेंबर इ. स. १७८८.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक सां। नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र ३ सफरीं राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं. त्यांतील अर्थः–राजश्री अलीबहाद्दर भिलाड्याचे मुक्कामाहून चंद्र ११ मोहरमीं कूच करून, आठ कोस गेले. तेथें गेल्यावर, मागतीं अंबोजी इंगळे जाऊन त्यास आठ दिवस राहविले कीं, तुकोजीबावांस घेऊन येतों; ते तुह्मीं बरोबरच असावें, ह्मणून आठ मुक्काम करून राहिले. तथापि तुकोजी होळकर यांचें जाणें जालें नाहीं. मग बहाद्दर कूच करून राजश्री पाटीलबावांकडे गेले. उदेपूरकर राणाजी यांनीं दोन लक्ष रुपये करार केले, त्याच्या वसुलास कोणास ठेऊन गेलों वरून तेही पाटीलबावांकडे जाणार. मारवाडकराचे वकील आले. त्यांनीं सुभेदाराकडे पैगाम लाविला कीं, आमचें व पाटीलबावांचें वांकडें आहे. त्यास, तुमचा आमचा बेलभंडार, आणशपथ जाली पाहिजे. तुह्मीं आह्मांस सामील असावें. ह्मणून वकिलाचें बोलणें आहे. त्यास सुभेदाराचे व पाराशरपंतांचे विचारें मान्य करावें, परंतु राजश्री नारोपंत या मसलतीस रुकार देत नाहींत. एक वेळ पाऊल चुकलें, त्याची सफाई करायास सात आठ वर्षें लागलीं. याउपर मसलत करणें ते विचारून करावी. सरकारचा शब्द न लागे आणि तुमचें कल्याण होय ऐसें करणें. त्यावरून येथें बाईस पत्रें लिहिलीं आहेत. यांच्या उत्तरानुरूप तेथें वर्तणूक होईल.

बाईही त्या मसलतीस रुकार देणार नाहींत, याप्रमाणें पत्रें तेथील आलीं. इकडील उत्तरें गेलीयावर वर्तमान कळेल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७२.

श्री. १४ नोव्हेंबर इ. स १७८८.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ माहे सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील लखोटा व विनंतिपत्रें, चंद्र ४ व चंद्र ५ सफरचीं, सेवेसीं इकडील वर्तमान लिहून रवाना केलीं. त्याउपरी, सांप्रत राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडून लखोटा एक आला, तो बजिन्नस पाठविला असे. इकडील वर्तमानः-राजश्री काशीराव होळकर यांनीं दसऱ्याचे मुहूर्तें डेरे बाहेर दिले. आपण घरींच आहेत. फौजेची व खर्चाची तजवीज करून, कार्तिकमासीं स्वार होऊन राजश्री सुभेदार यांजकडे जाणार. राजश्री पाटीलबावा चितोडानजीक तीन कोसांवर येऊन मुक्काम केला. राजश्री भीमसिंग यांस तगादा, किल्ला खालीं करून द्यावा ह्मणून, लाविला आहे. भीमसिंगाचे कारभारी सिताराम कोठारी व सरदारसिंग यांचे कबिले, होळकराचे जहागिरींत निंबहेड्यास, राजश्री मल्हार सोयराजी कमाविसदार यांजपाशीं होते. राजश्री पाटीलबावांनीं मल्हार सोयराजीस बोलावून लष्करांत नेलें. त्यांस सांगितलें कीं, उभयतांचे कबिले आणवून आमचे हवालीं करावे. त्यांनीं अनमान केला. तेव्हां दोन हजार फौज व गाडद हजार पाठवून निंबहेड्याहून कबिले उभयतांचे घेऊन गेले. हें वर्तमान बाईस कळल्यावर आपले ठिकाणीं रोष करून, "कमावीसदार नाकारा, कबिले कसे नेऊं दिले?" इतकें मात्र एक दिवस वर्तमान ऐकिलें, ते दिवशींचें भाषण. पुन्हां कांहीं वार्ता नाहीं. उदेपुरची खंडणी साठ लक्ष रुपये करार. पैकीं दहा लक्ष रुपये सूट दिधली. बाकी पन्नास लक्ष रुपये करार केले. पैकीं मेवाडांत वसूल घेतला बावांनीं रुपये सव्वीस लक्ष. ते मजरा देऊन, बाकी २४ चोवीस लक्ष घेणें. त्यांपैकीं भीमसिंगाचे कारभारी यांचे कबिले धरिले. त्याजपासून १०।१५ लक्ष रुपये घ्यावे ह्मणून राणाजीचें बोलणें. बाकी नऊ दहा लक्ष राहिले ते भीमसिंग हस्तगत जाल्यावर त्याजकडून घ्यावे. चितोड घेऊन द्यावा. याप्रमाणें राणाजींनीं मुद्दा घालून समागमें आहेत. तीन कोसांवर चितोडापासून उभयतां, पाटीलबावा व राणाजी आहेत. इस्माईल बेग मारोठास आला आहे. नजीबकुलीखान मृत्यु पावला. त्याचे जहागिरीचा बंदोबस्त राजश्री खंडेराव हरीकडे सांगितला ह्मणून वर्तमान आलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७३.

**श्री.** ता. १९ जानेवारी इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– गुलाम कादर व त्याचे कारभारी असामी १०, एकूण असामी अकरा, राजश्री अलीबहादर यांणीं मथुरेस राजश्री पाटीलबावांकडे पाठविल्या, त्या खाशासुद्धां मथुरेस येऊन पोहोंचल्या ह्मणोन वर्तमान आलें. राजश्री पाटीलबावांनीं राजश्री सुभेदार यांस पत्र लिहिलें कीं, तुह्मीं तिकडील कामें टाकून जलदीनें येणें. हरामखोर मथुरेस आणिला. रावराजा माचेडीकर याणें जयपूरकराची कामापाहाडी घेतली. तर तुह्मीं लवकर निघोन येणें. यांजला आंदेशे बहुत. पुढें कोणी गृहस्थ पाठवून, तेथील मर्जीचा प्रकार व इकडील मर्जीचा प्रकार त्यांस सांगोन, तेथील विचारानुरूप जावें ऐसे यांचा मानस आहे, ह्मणोन वर्तमान ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७४.

**श्री.** ता. १९ जानेवारी इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ५ रविलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत, पावलीं असतील. सांप्रत चंद्र १३ शनिवार मिनहूस राजश्री सुभेदार व राजश्री नारो गणेश या उभयतांचीं पत्रें बाईस आलीं. उभयतांचे पत्रीं परस्परें गिल्लाच लिहिला होता. सुभेदारांनीं बाईस लिहिलें कीं, नारोबा कामाकाजांत मन घालीत नाहीं. शरिरास समाधान नाहीं ह्मणून औषधसेवनासाठीं नंदुरबार खानदेशांत येणार, याप्रमाणें लिहितात. राजश्री नारोपंत, बाईचे पत्रीं लिहितात कीं, सुभेदार माझें ऐकत नाहींत. काय करावें? माझ्याही शरीरास समाधान नाहीं. मीही देशीं येतों. याप्रमाणें पत्रें आलीं. त्यांचीं उत्तरें यांनीं रवाना केलीं नाहींत. रवाना केल्यावर वर्तमान कळेल तें सेवेसी लिहीन. चितोडकराचे वकील सुभेदारांकडे आले. बलिभद्र पचोली व मंजी पुरोहित त्यांनीं घांसदाण्याचा करार करून तूर्त पन्नास हजार रुपये दिले. कूच करून काकडाबाहेर गेल्यावर पन्नास हजार द्यावे; दोन लक्ष वायद्यांनीं द्यावे; भीमासिंग व राणाजी यांचीही भेट करावी; असें ऐकिलें. पाटीलबावांचीं पत्रें सुभेदारांस बोलावणीं येतात व येथून

बाईचीं पत्रें पाटीलबावांकडे जावयाविषयींही जातात. परंतु हे जात नाहींत. ज्या दिवसापासून कोटें प्रांतीं गेले आहेत, त्या दिवसापासून प्रथम दिवसच आहे. पागेकरी एक दिवस जमा होऊन तीन दिवस डेऱ्यांत बसले होते. लाचार होऊन तूर्त नऊ हजार रुपये दिले. उदेपूरचे ऐवजीं लाख रुपये देऊं, असा करार करून उठविले. शिलेदाराच्या रोजमुऱ्यास ठिकाण नाहीं! याप्रमाणें ऐकिलें वर्तमान तें सेवेसीं लिहिलें असे. भोजराज मिनेगार जयपुरीहून येथें आले. बराबर पुत्र व सून होती. त्यांस येथून रवाना चंद्र १७ राखर बुधवारीं केलें. सत्वरच येऊन पोहोंचतील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक १७५.

श्री. ता. १५ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—आज्ञापत्रें दोन सादर जालीं. एक चंद्र १० रविलाखरचें, तें चंद्र २७ मिनहूस पावलें; व एक चंद्र २४ रविलाखरचें, तें चंद्र १ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, वरचेवर वर्तमान होईल तें लिहीत जाणें. त्यास आज्ञेप्रमाणें येथील वर्तमान बितपशीलः—

राजश्री मल्हारराव होळकर यांचें लग्न माघ वद्य ४ शुक्रवारीं सायंकाळचें लागलें. वधू अहल्याबाई यांचे बंधू, महादजी शिंदे यांच्या लेकीची लेक, तिशीं लग्न लागलें. पिढीचा उच्चार येणेंप्रमाणें केलाः—

१ मल्हारजी होळकर
१ खंडेराव होळकर
१ मालराव होळकर यांचे पुत्र मल्हारराव
३

येणेंप्रमाणें ब्राह्मणांकडून बोलविलें आहे. कलम १.

राजश्री संताजी होळकर व बापूजी होळकर यांच्या मातोश्रीस व बंधूस वगैरे यांस कारकून पाठविला. त्यास बापू, होळकर याचीं मुलें माणसें आलीं. संताजी होळकर आले नाहींत. त्यांचे कबिले वगैरे आले. कलम १.

राजश्री अलीबहाद्दर कुंजपुरानजीक आहेत ह्मणोन वर्तमान ऐकलें. रामरतन मोदी धरून बावांकडे पाठविला व कुंजपुऱ्याचा अधिकारी धरून पाटीलबावांकडे रवाना केला ह्मणोन वदंता. कलम १.

राजश्री खंडोजी लांभाते–पूर्वींचे सासरे–ते येथेंच आहेत. लग्नसमयीं होतेच.
CT 5/89 कलम १.

लग्नाचे दिवशीं सर्वांबरोबर आहेर करणें त्यावरून आहेर केला. बाई यांजकडे चोळी व पातळ, व मल्हारराव यांजकडे पागोटें व शेला व लुगडें चोळी याप्रमाणें सहा सात सनगें आहेरास लागलीं. सेवेसीं कळावें. कलम १.

सौभाग्यवती रखमाबाई होळकर यांजकडे पुंडोजीपंत कारकून बाईनीं पाठविला. पत्र लिहून देऊन रवाना केला होता कीं, तुह्मीं लग्नास यावें. अगत्यवाद करून लिहिलें होतें. परंतु ते कांहीं आले नाहींत. उत्तर पाठविलें कीं, चिरंजिवाचें लग्न करणें जरूर तर नव्हती, तत्रापि एक वेळ मानपान आमचा जालाच आहे. सर्व प्रकारें वडील आपणच आहेत; तेथें मी आहें. असें सांगून पत्र पाठविलें. कलम १.

राजश्री पाटीलबावा श्रीभागीरथीस्नानास जाणार ह्मणून कबिले उज्जनीहून जातात. माघ वद्य १३ मुहूर्त कबिल्याचा उज्जनीहून जावयाचा आहे ह्मणोन वर्तमान ऐकिलें. कलम १.

राजश्री सुभेदार भिलाड्यासच आहेत. हा कालवर कोव्याचा निर्गम जाला नाहीं. यंदां सरकारचाकरी जाली न जाली, हें बाईस एक दोन वेळां दर्शविलें आहे. सहज बोलण्यांत समय पाहून आज्ञा नसतां बोललों आहें. सेवेसीं कळावें ह्मणून लिहिलें असे. कलम १.

चंद्र १९ जमादिलावलीं सुभेदाराकडील वर्तमान आलें कीं, चौ कोसांचें कूच जालें. एक स्थळीं सहा महिने होते. त्यामुळें माघारे आले. लष्करांत चोरांचा उपद्रव फार जाला आहे. मेणेचोर जयपूर प्रांतींचे, त्यांचा रात्रीं हंगामा. छापे येऊं लागले, येथपावेतों गलाटा जाला आहे. मारवाडकर व जयपूरकर वकील आहेत, परंतु राजकारण एकही घडलें नाहीं. असें वर्तमान आलें. कलम १.

एकूण कलमबंदी कलमें नऊ सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७६.

**श्री.** १९ मार्च इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २१ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ २१ जमादिलावलीं विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं आहेत. त्याअलिकडे वर्तमानः– राजश्री मल्हारराव होळकर यांस घेऊन जावें ह्मणोन आनंदराव होळकर

हुताशनीपावेतों राहिले होते, परंतु मल्हारराव समजले नाहींत. येथेंच राहतों असा आग्रह. त्यावरून बाईंनीं त्यांच्या खर्चाचा बंदोबस्त करून आनंदराव होळकर यांस निरोप दिल्हा. राजश्री सुभेदार मेवाड प्रांतीं आहेत. कारभारी यांणीं दुखणें काढून राहुटीस आहेत, दरबारास जात नाहींत; व सरदार त्यांस बोलावीत नाहींत, असें आहे. राजश्री पाटीलबावांकडे जावयाविशीं कारभारी अनमान करितात. येथून बाईंनीं नारो विश्वनाथ दि॥ मकाजी गीते यासमागमें पत्रें, उभयतांस एकविचारें वर्तणूक करावयाकरितां पाठविलीं होतीं; परंतु ते उभयतां आपले चालीप्रमाणें चालतात. राजश्री अलीबहादर मथुरेस आले होते. कांहींएक दिवस राहून आग्र्याचा किल्ला पाहावयाकरितां गेले आहेत. बाई-कडील वकील दिल्लीस आहेत. त्यांचें पत्र छ १९ जमादिलाखरीं आलें. तेथील वर्तमानः– गुलाम कादर याची मातुश्री, कनिष्ठ बंधु ऐसे लाहोरास गेले आहेत. तैमूरशा पातशा हा येणार. हिंमतबाहादुर गोसावी यांस पुन्हा चार हजार फौजेनशीं राणेखानभाईनीं ठेविलें. फिरंगी यांजकडून वकील दिल्लीस आला. पातशाहाची मुलाजमत केली, खलबत केलें, परंतु त्यांतील अर्थ समजण्यांत आला नाहीं. ह्मणोन बाईच्या वकिलानें लिहिलें होतें. गुलाम कादर याचें दस्ताऐवजीं पत्र सांपडलें. तें पत्र त्यास दाखवून, त्याचें आंग छिन्न भिन्न करून, राजश्री पाटील-बावांनीं त्याचा शिरच्छेद करविला ह्मणोन वर्तमान येथें आलें. मौजे मुलगन येथील शिवेकरितां सरकारांतून माझे नांवें पत्र आलें, त्यावरून बाईपाशीं बोललों. परंतु त्यांचें बोलणें कीं, पंचाईतच करावी. ह्मणोन सरकारांत विनंतिपत्र लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७७.

श्री. १२ एप्रिल इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ २२ जमादिलाखरीं विनंतिपत्रें सेवेसीं लिहिलीं आहेत. तीं प्रविष्ट जालीं असतील. सांप्रतचें वर्तमान राजश्री मल्हारराव होळकर येथें बाईनें ठेवून घेतले. त्यांचें लग्न केलें. नेमणूक करून राहावयास स्थल चांगलें करून देऊन ठेविलें. सौभाग्यवती रखमाबाईचीं पत्रें वारंवार येतात कीं, ठेवून घेतले, परंतु त्यांचे गुण तुह्मांस माहित नाहींत. योग्यतेचे माणूस नाहींत; परिणामीं कळेल; असें लिहितात. परंतु यांचे चित्तांत ठसलें नाहीं. चैत्र शुद्ध ६ बुधवारीं त्यांचे स्त्रीस

पदर काढला, ते दिवशीं आहेर जाले. तेव्हां सरकारचा आहेर तेथीलच सणगें घेऊन केला. पंचवीस रुपये रोख दिल्हे. वरकड मुत्सद्दी वगैरे होते. समारंभ जाला ते दिवशीं रात्रीं, कथा, हरिभक्त राजश्री विठोबा गोसावी आवणेकर यांची जाली. उत्साह रामनवमीचा. कथा समाप्त बारावे घटकेस जाली. लोक बसलेच होते. इतक्यांत मल्हारराव यांणीं चार खास बारदार पाठवून, राजश्री लक्ष्मण नरसिंह यांस बाईचे समक्ष धरून घेऊन गेले. मारूं लागले. त्यानें शंखध्वनी केला, जानवें तोडलें, धोतरें फाडून अवाक्षरच बोलत गेला! तो आतित्याईस ब्राह्मण आला. वेडेंवांकडें बोलत असतां बाईनीं सोडविला नाहीं. त्यास घेऊन किल्ल्याच्या दरवाजाजवळ नेलें. बाहेर नेत होते. दरवाजाचे माणसांनीं आटकावून ठेविलें. इकडे विठोबा गोसावी वगैरे कथेचे लोक होते त्यांस निरोप दिल्हा. मग मुत्सद्दी व बाई व मीही होतों. मग बाईस कारभारी यांणीं बहुतां प्रकारें निषेध केला. तेव्हां त्यांस त्रास येऊन लक्ष्मण नरसी यास सोडून आणलें. या गोष्टीवरून बाईस फारच भय जालें कीं, रखमाबाई सांगत होती व लिहित होती, तें खरें. पोराचा भरंवसा नाहीं. एखादे दिवशीं घात करील. अशी फिकीर उत्पन्न जाली. मल्हारराव यांचे गुण विचित्र आहेत. केवळ कनिष्ठ चाल धरली. यामुळें अमर्याद वर्तणूक करितात. लक्ष्मण नरसी यांणीं चिमाजी बुळे यांचा कारभार कर्नाटकचे स्वारींत केला, तेव्हां अंतस्त राजश्री सुभेदार यांस कबूल केलें. त्यापैकीं बाकी येणें दोन हजार होते. त्याजकरितां सुभेदारांनीं मल्हारराव यांस लिहिलें कीं, लक्ष्मण नरसी यास धरून दोन हजार रुपये घेऊन पाठवून देणें. याजकरितां कथेंतून धरून नेलें होतें. येथें मल्हारराव राहिले आहेत. परंतु एखादे वेळेस दगा फटका दौलतीस करावयाचे विचारांत असतात. सावधानी बाईची फारशी नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १७८.

**श्री.** २५ मे इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २९ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री गणेश नारायण कारकून येथून कापड देऊन बाईनीं राजश्री सुभेदारांकडे पेशजीं पाठविला होता, हें वर्तमान पूर्वीं लिहिलें होतें. तोच कारकून माघारा आला. त्याजबरोबर खिजमतगार सुभेदारांनीं मुजरद बाईकडे पाठविला, सबब आह्मी मोहीमसीर. चिरंजीव मल्हारराव याचा बखेडा महालीं

होतो, मनास येईल तशी वर्तणूक करितो; त्यास आम्हांकडे पाठवून देणें. दुसरें, बारा लक्ष रुपयांची तजवीज करून आम्हांस पाठवावी, आम्हांकडील महाल व देशांतील महाल आहेत तेथून ऐवज अथवा सावकारी करून, कसें करून खर्चास पाठविणें. दौलतीचा बंदोबस्त आपण करावा. आम्ही दूर देशीं, यास्तव सारे महालाचा जाबसाल वडिलीं करून आम्हांस रुपये अविलंबें पाठवावे. दिवाण दरबारास येत नाहींत. त्यांजला निक्षून पत्र लिहावें कीं, मोहिमेचा प्रकार आहे; चाकरीस जपत जावें, हेंही त्यांस लिहावें. याप्रमाणें जबानीं खिजमतगार सांगत होता व पत्रेंही याच अन्वयें होतीं. त्यावरून बाईनीं येथून राजश्री नारो विश्वनाथ कारकून सुभेदारांकडे मुजरद रवाना केला. त्यासमागमें राजश्री नारो गणेश यांस पत्रें निक्षून लिहिलीं आहेत कीं, तुम्हीं एकविचारें राहून कामकाज करीत जाणें. स्वारीखर्चास बारा लक्ष रुपये आणविले, त्यास महालचा प्रकार तुमचे ध्यानांत आहे. देशीं महाल आहेत, त्यांचा कारभार तुम्हीं दहा वर्षें केला. इकडील महालांचा कारभार मी करीत होतें, त्याचा झाडा साल दरसाल पाठवीत होतें. देशीं महाल यांची माहीतगिरी मजला नाहीं. इ॥ पासून मागील हिशेब पाहीन. नाहीं तर तुमचे तुम्हीं कमाविसदारास लिहून ऐवज घ्यावा. मजकडील महालांचा ऐवज देणें तो मास पक्षांत पाठवून देईन. जर तुम्ही म्हणतां, तर देशीं महाल आहेत त्यांची घालमेल करीन; हिशेब मागील पाहीन. हें कबूल असेल तर लिहून पाठवावें. त्याप्रमाणें बारा लक्षांची सरबरा करून पाठवीन. खिजमतगार आला तो व कारकून बरोबर रवाना केले. [ते] राजश्री पाराशर दादाजी व पारनेरकर खंडोपंत असे उभयतां कारभार करितात. राजश्री नारोपंत यामुळें रुसोन बसले आहेत. दरबार करित नाहींत; घरीं असतात. याविषयींही बाईनीं त्यांस पत्र लिहिलें कीं, तुम्ही दुही न दाखवितां कामकाज एकविचारें करीत जावें म्हणून लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पै॥ चंद्र २२ रमजान सन ज्येष्ठमास रुजु तिसेन.

## लेखांक १७९.

श्री.

३१ मे इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान लिहून सेवेसीं विनंतिपत्रें चंद्र १५ रजब व चंद्र १५ साबानीं रवाना केलीं आहेत, प्रविष्ट जालीं असतील. सांप्रतचें वर्तमानः— राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाई यांस चंद्र १४ साबानचीं, बनास नदी उत्तरतीर नजीक

भगवंतगड येथील आलीं. त्यांत वर्तमान कीं, इंद्रगडचे मुक्कामींहून राजश्री वासुदेव गोविंद मुनशी व राजाराम गोधा जयपुरकर यांस संस्थानास रवाना केलें. त्यांची प्रतीक्षा करित होतों तों, तेथील वर्तमान आलें कीं, राजाराम गोधा प्रतापसिंग राजे यांचे दर्शनास गेला. तों राजांनीं दवलतराम हळद्या व राजाराम गोधा या उभयतांस कैद केलें. कारण, सुभेदार परमुलुखांतून जातील, आपले मुलुखांतून येऊं देत नाहीं, असें राजांस समजावीत होते, तें न घडलें. सुभेदार जयपुरचे मुलुखांत आले. पेंढारी यांनीं मुलुखाची तसनस केली. त्यावरून त्यांस कैद केलें. सुभेदार यांजकडील वासुदेव गोविंद यांची भेट होणें ते, छिबिलराम वकील होळकराचे तेथें आहेत, त्यांनीं राजाची भेट करवून बोलणें करविलें. राजांनीं साफ सांगितलें कीं, तुमचे वडिलांनीं आमचे वडिलांचा पक्ष धरून गादीवर बसविलें आहे. त्याप्रमाणें तुह्मीं आमचा पक्ष धरून पाटीलबावांचा दारमदार करून द्यावा. जोधपुरकर व आह्मां उभयतांस टाकून दिल्लीचा बंदोबस्त करूं ह्मणाल, तर घडणार नाहीं. याप्रमाणें वासुदेव गोविंद मुनशी यांस बोलून मेजवानी देऊन सुभेदाराकडे बिदा केलें. रामपुऱ्याचें ठाणें पाडून द्यावें असें राजांनीं सोडचिट्टी दिघली, ती मुनशी घेऊन आले. परंतु ती सोडचिट्टी सुभेदारांनीं घेतली नाहीं. याप्रमाणें संस्थानिकाकडील जाबसाल जाला. राजश्री पाटीलबावांकडून भुजंगराव अनंत कारकून आले, व सरकारचीं पत्रें निकडीचीं जात होतीं, त्यावरून इंद्रगडचे मुक्कामींहून लालसोटचे मुक्कामास जाणार होते. कागदपत्रीं खातरजमा सुभेदाराची केली आहे, व मुजरद कारकून आला, तत्रापि यांस वसवसा! त्यावरून राजश्री आबाजी चिटणीस येणार होते. ते आल्यावर यांची खातरजमा करून देतील, तेव्हां हे पुढें जाणार. याप्रमाणें वर्तमान आलें. दुसरें, बाई यांस खर्चाची सोय व दारूगोळीविषयीं लिहिलें होतें कीं, दोन्हीं गोष्टींचा पुरावा करावा. देशीं महाल आहेत व माळव्यांतील त्या महालऐवजीं खर्चाची सरबरा करून लवकर पाठवावी. आह्मी सरकारआज्ञेप्रमाणें व वडिलांचीं पत्रें येत गेलीं त्याप्रमाणें पाटीलबावांकडे जातों. याउपर दिवसगत लावीत नाहीं. ऐशीं पत्रें आलीं. त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. चंद्र मजकुरीं सावकारी पत्रें सुभेदाराच्या लष्करचीं साता दिवसांचीं आलीं कीं, सुभेदार मथुरेस गेले; भेटी जाल्या असतील. याप्रमाणें वर्तमान आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८०.

पै॥ छ ८ सवाल सन तिसैन आषाढ **श्री.** २२ जून इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री सुभेदार यांचीं पत्रें ब्राह्मणवासाहून कूच जालीयाचीं आलीं. पत्रीं वर्तमान कीं, आह्मीं येथून कूच केलें. चाळीस कोसांचा तफावत मथुरेचा आहे, लवकर जाऊन पोहोंचतों. राजश्री पाटीलबावांची भेट जाल्यावर सविस्तर लेखन करूं. तूर्त खर्चाची ओढ आहे, तर ऐवजाची तरतुद करून, व दारूगोळी यांचा सरंजाम करून पाठवावा, याप्रमाणें पत्रें आलीं ह्मणोन ऐकिलें. राजश्री मल्हारराव होळकर यांनीं पांच असामी बारगीर ठेविले. त्यास दरमहा भारी केला होता. तो बाईस विदित नाहीं. बाईनीं माणसें नेमून दिधलीं आहेत. त्यांचे रोजमुरे बाई देतात. बारगीर असामी पांचांचे रोजमुरे कराराप्रमाणें पावला नाहीं, त्यावरून त्यांहीं ज्येष्ठ वद्य एकादशीस धरणें बसलें, ते दोन प्रहर रात्रपावेतों मल्हारराव उपवासी होते. त्यानंतर वर्तमान बाईस समजलें. मग लोकांस उठवून त्यांस खाऊं घातलें. दुसरे दिवशीं मागतीं धरणें बसलें, ते दिवशीं शेंपन्नास लोक बाईनीं आपल्या चौकीजवळ ठेविले. सायंकाळीं राजश्री शेटीबा होळकर त्यांस मध्यस्थ घालून बारगिरांचा फडशा केला. राजश्री बळवंतराव वांकडे यांजकडील गुमास्ते राजश्री सुभेदारांकडे गेले. कापड पन्नास हजारांचें व कांहीं नक्त ऐवज घेऊन, येथें येऊन बाईची भेट घेऊन गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८१.

पै॥ छ १५ मोहरम. **श्री.** ३० सप्टेंबर इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १० मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ जिलकाद व छ २ जिल्हेजचीं आज्ञापत्रें दोन सादर जालीं. तीं छ १९ व छ २२ जिल्हेजीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, वरचेवर बातमी येत जाईल ते लिहित जाणें ह्मणोन आज्ञा. त्यास येथून विनंतिपत्रें छ १८ जिलकादीं रवाना केलीं आहेत; तीं प्रविष्ट जालीं असतील. सांप्रत वर्तमान, राजश्री अलीबहादर व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार उभयतां नाथद्वारापासोन दों कोसांवर आमोदेस आहेत.

उदेपुरकर यांचे वकील येऊन भेटले. उदेपुरच्या पटाइताचा बंदोबस्त करावा ह्मणोन मनसुब्यांत आहेत. हा कालवर ठरलें नाहीं. कोटेकरांनीं लांबणीवर घातलें. त्या कारभारांत राजेश्री आंबोजी इंगळे व जालमसिंग आहेत. कोटे-करांनीं आजपर्यंत एक पैसा दिल्हा नाहीं. येथें रोजमुरा बाईनीं फौजेस देऊन बिदा केलें. त्याउपर एक पैसा फौजेस मिळाला नाहीं. फौज सात आठ हजार पागेसुद्धां आहे. पेंढारी माघारे येऊन इंदुरीं होते. त्यांस रवाना सुभेदारांकडे करावे, ह्मणोन लालूभाई व भागूजी गवरे, बाईनीं पेंढाऱ्याकडे पाठविले. पेंढारी पौर्णिमा जाल्यावर सुभेदाराकडे जातील. राजश्री चिमाजी बुळे व नारायणजी बारगळ येथेंच आहेत. त्यांचा बंदोबस्त हा कालवर जाला नाहीं. राजश्री भिकाजी होळकर व सरदारसिंग उभयतांस पागेसुद्धां विजयादशमीस रवाना केलें. कुसाजी वाघ व बापु वाघमारे हे उभयतां पूर्वीं सुभेदारांकडे गेले आहेत. राजश्री अलीबहादर पाटीलबावांकडे निकड करून जात होते, परंतु राजश्री सुभेदार व नारोपंत उभयतां त्यांच्या डेऱ्यास जाऊन आठ दिवस ठेऊन घेतलें; जाऊं देत नाहींत ऐसें ऐकिलें. सौभाग्यवती रखमाबाई यांची रवानगी माघारी करणार. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान तर, राजश्री राणेखांभाई व रवळोजी शिंदे उभयतां फरिदाबादेस सा सात हजार फौजेनिशीं आहेत. इस्मालबेग मोगलसुद्धां पाटीलबावांकडे येणार, हें संधान लागलें आहे. इस्मालबेगास गोहजगड देऊं केला आहे. सनद करून द्यावी हें बोलणें, राणेखांभाईच्या मारफतींच आहे. परंतु तो प्रामाणिक नाहीं. येऊन भेटेल तेव्हां खरें. दिल्लीस बातमीस कारकून सुभेदारांकडून आहे, त्याचें पत्र बाईस आलें. त्यांतील मजकूरः— गुलाम कादर यांनीं पृथ्वीपतीची अमर्यादा फार केली. छातीवर बसोन दोन्ही डोळ्यांत खंजीर घालोन पातशाहास मारिलें, व खाशा बेगमांस बेसतर केलें. झाडून मालमवेसी घेतली. मलका जमानी इचें घर लुटलें. कोट रुपयांचें वित्त नक्त व जवाहीरसुद्धां सांपडलें. जमाव करून लढाईस येणार. इस्माल-बेगाशीं व गुलाम कादराशीं पातशाहाच्या अमर्यादेसाठीं बिघाड जाला होता. पुन्हां एकत्र जाले. याप्रमाणें बातमीचें वर्तमान लिहिलें होतें. मिर्झा अमानी व फिरंगी, उभयतां अकरा पलटणें घेऊन, राजश्री पाटीलबावांकडे येतात. त्यांचें बोलणें कीं, रोहिल्याचें पारिपत्य करावें. रोहिल्यांनीं शिखांस सामील केले. कांहीं शीख आले आहेत. याप्रमाणें तेथील बातमीचीं पत्रें बाईकडे आलीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८२.

**श्री.** १३ आक्टोबर इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक सा।। नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १३ मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र १९ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलीं आहेत. राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील बातमीचा लाखोटा तो रवाना केला आहे. सरकारांतून डांकेविषयीं पत्र गंगाजलनिर्मळ अहल्याबाई होळकर यांस आलें. दस्तक सरकारचें आलें. त्यांत डांकेच्या कासदास पाणी व दोन दोन शेर दळून व रातबिरात वाटाड्या देत जाणें ह्मणोन. त्यावरून पत्र सरकारचें दिल्हें. पत्र ऐकून, डांकेचें प्रयोजन काय? कोठवर बेगारी गांववाल्यांनीं कराव्या? चार डांका बसल्या, या डांकेचें कारण काय? जागा मात्र देऊं. रातचाल बेगारी देऊं. वरकड सरपण, पाणी व दळण देत नाहीं! साफ उत्तर दिलें. जाबसाल रीतीभातीनें केला असतांही न ऐकत. कारकून व फडनाईकासही बोलल्याप्रमाणें देईन, अधिक देत नाहीं, अशी बोलली. उपरांत त्यास बिदा केलें. मग कारभारी यास सांगितलें, हे रीत काय? तुह्मीं प्रसंगीं असोन सरकारचे आज्ञेस उजूर हें काय? आह्मीं बाईशीं बोलावें तर ऐकत नाहींत, आणि तुह्मीही बोलत नाहींत! पत्र माघारें जाईल, मग आह्मांकडे दोष नाहीं. असें बाजीजवळ व गोविंद रघुनाथ यांजजवळ सांगितलें. त्यांच्यानें निक्षून सांगवेना. मग हरकूबाई होळकर यांस वर्तमान सांगितलें. त्यांनीं निषेध केला, हें चांगलें नाहीं. मग सरकारचे दस्तकाप्रमाणें त्यांचे तालुक्यांत गांव बगांव डांक आहेत तेथील कमाविसदारांस पत्रें घेऊन मागाहून सरकारचे कारकुनाकडे रवाना केलीं; ते उज्जनीस गेले. डांकेचा बंदोबस्त जाला. त्यांनीं वर्तमान लिहिलें असेल. सप्ता श्रवण चालत आहे. राजश्री सुभेदारांकडून पत्रें फौजेचे खर्चाविषयीं येतात, तीं येतच आहेत. येथून तजवीज होणें ती कालानुरूप आजची उद्यांवर आहे. राजश्री बापुजी होळकराचा व राजश्री जिवाजी बल्लाळ व गोपाळराव रघुनाथ नि।। राजश्री पाटीलबावा यांचा मुकाबला बारा कोसांचा आहे. त्यांची जमीयत भारी आहे. हे थोडके आहेत. लढाईचा प्रसंग, जाबसाल होतात. जयपूरकर यांची जमीयत फारशी नाहीं, व उपराळाही होळकराचा करीत नाहींत, असें वर्तमान आलें ते ऐकिलें. त्यावरून सेवेसीं लिहिलें आहे. पूर्वीं धोतरजोड्याविषयीं आज्ञा जाली कीं, पंधरा धोतरजोडे करून पाठवावे. त्यास अकरा जोडे करून पाठविले, बाकी धोतरजोडे तयार आहेत. आज्ञा आल्यास पाठवीन. नारो गणेश यांची स्त्री येथें येऊन राजश्री मुकुंदराव हरी

यांचे घरीं राहिली. नारोपंतांचे चिरंजीव सरदाराजवळ राहिले आहेत. राजश्री शिवाजी गोपाळ ऊर्फ बाजी हे दरबारास येतात, कधीं येत नाहींत. यांचें सांगणें रुचतही नाहीं. हे आपलेकडून सरदाराकडे पाठवावयाविषयीं, खर्चाविषयीं, फौजेविषयीं, बोलतच आहेत. घडेल तें खरें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८३.

श्री. ११ नोवेंबर इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ माहे सफरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ ६ सफरचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ १८ मिनहू स पावलें. पत्रीं आज्ञा कीं, धोतरजोडे तुह्मीं चार पाठविले, त्याचे रुपये १२९ एकशें एकोणतीसाचे ते पावले. बाकी सहा तयार करवून माफजतीनें पाठवावे ह्मणोन आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें सहा पैों चार तूर्त धोतरजोडे करविले आहेत. रेशीम चांगलें घेऊन करविले, सिद्ध जालीयावर रवाना करितों. राजश्री दिनकर केशव दिवेकर राजश्री अलीबहादूर यांजकडून येथें आले. शरीरास समाधान नाहीं. चार मुकाम करून, बाईची भेट घेऊन, छ २० सफरीं येथून रेवापार जाले. बाईनीं वस्त्रें शेलापागोटें दोन दिधलीं. छ १७ सफरीं राजश्री दादाजी गंगाधर यांजकडील पत्र आलें. त्या पत्रासमागमें राजश्री पाटीलबावांचें पत्र व राजश्री आबा चिटणीस व राजाराम विठ्ठल यांचें, एकून तीन पत्रें राजश्री सुभेदारांकडे बाईनीं पाठविलीं. त्यांतील मजकूर सारा समजला नाहीं. परंतु बाई यांस लिहिलें कीं, ज्याप्रमाणें सुभेदार आपणांस, त्याप्रमाणें मजला जाणावें. मागें जी गोष्ट जाली, ती जाली. पुढें उभय पक्षीं एक विचारें चालावें. याप्रमाणें बावांनीं बाईस लिहिलें, ह्मणून ऐकिलें. राजश्री रामराव आपाजी पळसीकर यांजकडे दौलतीची दिवाणगिरी सांगावी असा विचार करून, राजश्री नागोपंत नीा तोफखान्याकडील, त्यांस मशारनिल्हेकडे पाठविलें. सरदारास हें वर्तमान सांगून रामराव यांस घेऊन यावें ह्मणोन ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८४.

श्री. २३ नोवेंबर इ. स. १७८९.

"विज्ञापना ऐसीजेः— चंद्र ५ माहे रविलावलपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेषः—गुलाम कादर यांनीं पत्र राजश्री सुभेदार यांस मोहरमचे महिन्यांत लिहिलें होतें. त्याच्या नकला येथें बाईस पाहवयास पाठविल्या. त्यांतील मज-

कूर कीं, राजश्री महादजी शिंदे यांचा आमचा कलह लागला आहे, आह्मी फौज सुद्धां मुकाबलीयास आहोंत. तुह्मी येणार व अलीबहादूर येतात. त्यास, तुमचा व आमचा पूर्वीपासोन एखलास चालत आला, त्याप्रमाणें पुढेंही चालेल. खातरजमा असों द्यावी; यांचे मदतीस तुह्मीं न यावें; ह्मणोन कित्येक प्रकारें भेदबुद्धीनें पत्रें लिहिलीं होतीं. हें वर्तमान ऐकिलें तें सेवेसीं लिहिलें. बाईनीं वर्तमान सांगितलें नाहीं. परस्परें ऐकिलें. गुलाम कादर गोहसगडास गेला. मलका जमानी व साहेब जमाल व शहाजादे व खजिना घेऊन पंचवीस कोस एके दिवसांत गेला, ह्मणोन वर्तमान आलें. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं. त्याच जासुदाबरोबर राजश्री आनंदराव गंगाधर यांनीं लाखोटा पाठविला. तो बजिन्नस सेवेसीं पाठविला असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८५.

**श्री.** २३ नोवेंबर इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे रविलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-चंद्र १० सफरचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र २० मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, बातमीचें वर्तमान वरचेवर होत जाईल तें लिहित जाणें, व खर्चाविषयीं लिहिलें, त्याचें उत्तर मागाहून लिहिलें जाईल ह्मणून आज्ञा. त्यास येथून चंद्र ५ माहे सफरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. सांप्रतचें वर्तमान- राजश्री अलीबहादर व राजश्री पाटीलबावा यांची भेट कार्तिक शुद्ध ६ स जाली. तीन कोसपावेतों पुढें येऊन, समारंभेंकरून भेटी होऊन मथुरेस गेले. मोत्यांची कंठी, शिरपेंच व हत्ती नग एक इतकें दिलें. रोजमुरेकरितां ऐवज दिला. याप्रमाणें येथें वर्तमान आलें, तें सेवेसीं लिहिलें. तिकडील बातमीही आली असेल ती खरी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८६.

**श्री.** २५ नोवेंबर इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ७ रावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-आज्ञापत्र छ ४

सफरचें सादर जालें. तें छ २३ मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, आढळलें वर्तमान वरचेवर लिहित जावें. त्यास आज्ञेप्रमाणें ऐकिलें व पाहिलें वर्तमान लिहित असतों. बाईनीं सौ॥ रखमाबाईस पत्र लिहिलें होतें कीं, चिरंजिवास घेऊन जाणें, वर्तणूक सुधी नाहीं. त्यास पत्र पावतांच घेऊन जाणें. त्यावरून रखमाबाईनीं उत्तर पाठविलें कीं, ज्या समयीं आह्मी लिहित होतों, तेव्हां तर आपले मर्जीस आलें नाहीं. आतां घेऊन जा ह्मणतां, तर आपले जवळच असों द्यावे. पुत्राचे गुण पूर्वींच आह्मी सांगत असतां, त्या वेळेस आह्मी वाईट वाटत होतों. आतां त्याची वृत्ति पुरती बहकली, तो कसा आह्मांपाशीं येईल? जमाव केला आहे. आपण तेथेंच ठेवून सावधानी करावी, असें उत्तर पाठविलें. राजश्री मल्हारराव पोंवार यांणीं राजश्री माधवराव कृष्ण भुसकुटे यांसी कजिया करून परस्परें यांची त्यांची तरवार चालली. दाहा पांच माणसें कामास आलीं. त्याउपर मागतीं बऱ्हाणपुरीं जाऊन, वस्तभाव आपली भुसकुटे यांजपासून घेऊन, सांप्रत महेश्वरीं रेवा दक्षिणतीरीं येऊन उतरले आहेत. इकडे यावयास बाईस सांगून पाठवितात, परंतु येऊं देत नाहींत. आठ दहा दिवस जाले, पारच आहेत. राजश्री आबाजी रघुनाथ, चिटणीस नि॥ राजश्री पाटीलबावा, त्यांची सून देसीहून येऊन येथून छ ८ रावलीं पुढें उज्जनीस गेली. समागमें जामगांवची पागा व उंट नफर बारा कापड भरून गेले. बाईची भेट न घेतां पुढें गेली. देसीं प्रसूत व्हावयाकरितां गेली होती. प्रसूत होऊन सपुत्र इकडे येऊन पुढें गेली. उज्जनीस जाऊन पुढें लष्करास जाणार ह्मणोन ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८७.

श्री. २५ नोवेंबर इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ रविलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथून चंद्र ५ सफरीं विनंतिपत्रें व धोतरजोडे ५ पांच पाठविले, ते पावले असतील. त्याअलीकडील वर्तमानः— राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं. त्यांतील अन्वय कीं, राजश्री पाटीलबावांनीं वतनी व इनामीसुद्धां नऊ लक्ष एकवीस हजार रुपयांचा मुलूख ठरावून दिला. त्यांपैकीं तूर्त दोन लक्ष दहा हजारांचे महाल गडमुक्तेश्वर व हपाड (?) दोन्हीं महालच्या सनदा करून दिल्या. तेथें राजश्री बाबाजी निंबाजी कारकून शंभर स्वार बराबर देऊन पाठविले आहेत. तूर्त जप्ती करविली.

सनदा करून पाठविल्या. त्यांत सायेर व इनामी गांव वजा करून पाठविले. त्यावरून आह्मीं उत्तर दिलें कीं, आमचे अमलांत दुसरा अम्मल कसा चालेल? त्यास सायेरसुद्धां महाल लावून द्यावे, नाहींतर सनदा नकोत. ह्मणून सनदा माघारी पाठवून दिल्या. याप्रमाणें पत्रें आलीं. त्यांचे उत्तर बाईनीं पाठविलें कीं, आधींच वांटणी वाजवीचे रुईनें केली नाहीं. त्यामध्येंही मामलतींत दुसरा अम्मल राहून, नित्य उठून कज्याच राहील. त्यास निस्तुक महाल लावून घेणें. याप्रमाणें उत्तरें पाठविलीं आहेत. येथील वर्तमान तर, राजश्री मल्हारराव यांचें राहणें वाड्यांतच बाईजवळ होतें. परंतु मल्हारराव यांनीं जमाव केला; शें दीडशें बारगीर ठेविले. त्यामुळें बाईनीं आपले पागेचे लोक चौकीस वाड्यांत ठेवूं लागली. त्यावरून मल्हारराव यांनीं बाईस विचारिलें कीं, आजपावेतों चौकीस लोक नव्हते, आतां चौकी ठेवितां, याचें कारण काय? त्यांनीं उत्तर दिलें कीं, समजाविसीचे दिवस आहेत, यास्तव लोक चौकीस ठेविले. तुह्मीं नवे बारगीर ठेविले ते दूर करणें. त्यावरून मल्हारराव वाड्यांतून निघून गांवाबाहेर पागा आहे तेथें जाऊन राहिले. नगरसूल व येवलें येथें पागा पाठवून तेथें मोकाशी यांशीं कज्जा लाविला आहे. येथेंही जमाव करितात. शें पन्नास घोडीं खरेदी केलीं आहेत. बाईचे शिक्षेचें भय त्यांचें गेलें आहे. मनस्वी कारभार करितात. गांवांतील असामी दादी फिर्यादी त्यांजकडेच गेली, तर त्यांचे हातून यांस सोडवत नाहीं. याप्रमाणें त्यांनीं वर्तणूक केली आहे. आनंदराव पोंवार देवासियांत होते. त्यांचे तरफेनें देवासियाची मामलत राजश्री खंडेराव हरीकडे होती. त्यांचें फाजील, त्यामुळें त्यांचा जमाव जाला व यांचाही जमाव जाला. परस्परें कलह लागला. लढाई न होतां एकाएकींच आनंदराव पवार यांचा रात्रींतून काल जाला. मार्गशीर्ष शुद्ध २ द्वितीयेस मृत्यु पावले, ह्मणून वर्तमान येथें ऐकिलें, त्यावरून लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८८.

श्री. ३ डिसेंबर इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ माहे रबिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री पाटीलबावा चितोडाहून कूच केलें ह्मणून चंद्र १४ रबिलावलचें पत्रीं विनंति लिहिली. त्याच दिवस मागतीं बातमी, मल्हार सोयराजी कमाविसदार निसबत होळकर यांचें पत्र बाईच्या नांवें निंबहेडा नजीक चितोड, त्या

मुक्कामचें आलें. त्या पत्रीं वर्तमान कीं, राणाजीचा व भिमसिंग यांचा तह जाला होता. जालमसिंगानें आमचे घरचे कारभारांत नसावें. त्यास निरोप दिला. भीमसिंगाकडून सरदारसिंग व सीताराम कोठारी जाबसालास आले होते. इतका तह होऊन मागतीं बावांच्या मनांत किंतु आला कीं, जालमसिंगास यांचे सांगितल्यावरून निरोप दिला. आह्मांस कूच करा ह्मणून सांगतात, तेव्हां हे बदमामली करितील; जाणून सरदारसिंग व सीताराम कोठारी या उभयतांस चौकींत ठेविलें. पुन्हां गोळे सुरू केले. असें पत्र साता दिवसांचें आलें. रा आनंदराव गंगाधर यांजकडून पत्र बहुत दिवस येत नाहीं. एक लाखोटा वाटमार्गीं जासुदासमागमें आला, तो बजिन्नस पाठविला आहे. होळकराचे डांकेस पत्रें येतात, परंतु एक मास जाला, त्यांचें पत्र आलें नाहीं. राजश्री सुभेदारांचें वर्तमान तरी लोकांचा गवगवा जाला आहे, घरणीं पारणीं होतात. त्यावरून निकडीचीं पत्रें आलीं आहेत. बाईकडून ऐवजाची सरबरा होत नाहीं. रांगड्यांनीं पेंचांत घातलें. जाबसाल लवकर करून ऐवज पदरीं घालीत नाहींत. दौलत मोठी, कोणी आवल्या नाहीं, त्यामुळें पेंच पडला आहे. ह्मणून वर्तमान आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १८९.

**श्री.** १२ डिसेंबर इ. स. १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता।गाईत छ २४ रावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ ९ रावलीं विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री मल्हारराव होळकर यांचे प्रथम स्त्रीस ऋतु प्राप्त जाला ह्मणोन सौभाग्यवती रखमाबाईचें पत्र बाईस आलें. त्यावरून बाईनीं सौभाग्यवती रखमाबाई व मल्हारराव यांची स्त्री व काशीराव होळकर यांची स्त्री व कन्या काशीराव होळकराची, यांस मंडळीसह आणावयाकरितां राजश्री राघो रणसोड नि॥ पागा यांस इंदुरास पाठविलें. तेथें हे जाऊन बुद्धिवादाच्या चार गोष्टी सांगोन घेऊन आले. ते छ २२ मिनहूस गुरुवारीं प्रथम दहा घटकांत येऊन पोहोंचली. रहावयास स्थल वाड्यांत दिल्हें. उभयतां बाईच्या भेटी जाल्या. राजश्री मल्हारराव हे बाहेर पागेंतच आहेत. ऋतुशांतीचा मुहूर्त मार्गशीर्ष वद्य त्रयोदशी सोमवारचा पाहिला आहे. परंतु मल्हारराव ह्मणतात कीं, रखमाबाईचें दर्शन घेणें नाहीं. असा आग्रह त्यांचा आहे. त्यास बाई नित्य बोध करीत आहे कीं, रखमाबाईचें

दर्शन घ्यावें, समारंभ आह्मी ऋतुशांतीचा पाहूं. तूं आग्रह धरूं नको. याप्रमाणें नित्य बोध करिताहेत. कारभारीही याप्रमाणें शिकवितात, परंतु घडेल तें खरें. ऋतुशांति जाली तर आहेर केला पाहिजे. राजश्री आबाजी नाईक वानवळे यांचे चिरंजीव रा रामचंद्र नाईक व देवता जोशी वगैरे मंडळी देशींहून येऊन उज्जनीस गेले. पुढें लष्करास जाणार. राजश्री मल्हारराव पवार पार रेवेचे होते. त्यांचा आग्रह, एक वेळ भेटीस बाईनीं बोलावून माझें वर्तमान ऐकावें. त्यावरून त्यांचे कारभारी येऊन परवानगी घेऊन गेले. मल्हारराव यांस घेऊन इकडे आले, भेट जाली. बाईस ह्मणाले कीं, मी सरकारांत जातों, मजविशीं दोन पत्रें लिहून द्यावीं. त्यावरून बाईनीं पत्रें त्यांस देववून, पैठणी वस्त्रें व खर्चास रुपये पन्नास देऊन त्याच क्षणीं निरोप दिल्हा. याउपर पुण्यास जाणार आहेत. सांप्रत पारच आजचे घडीपावेतों आहेत. मथुरेकडील वर्तमान कीं, इस्मालबेग नजबकुलीखानाकडे पूर्वीं राजश्री पाटीलबावांनीं पाठविला होता. त्यास तो व नजबअल्ली एकत्र होऊन राठोडकराचें संधान व जैपूरकराचें संधान पक्कें करून, त्यांची फौज घेऊन लढाईस येणार. याप्रमाणें येथें वर्तमान आलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक १९०.

श्री. १२ दिसेंबर इ. स. १७८९.

''सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक सा। नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ रविलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— सौभाग्यवती रखमाबाई चंद्र २२ गुरुवारीं आली, ते दिवशीं चिरंजीव दर्शनास आले नाहींत. प्रातःकालापासून त्यांजकडे पांच चार भले लोक पाठविले कीं, तुह्मीं येऊन आईची भेट घेणें. त्यांनीं न ऐकतां, सायंकाळ सहा घटका दिवस असतां घोड्यावर बसोन निघाले, ते रात्रीं रानांतच होते. शुक्रवारीं प्रातःकालापासून त्यांचे शोधास बाईनीं भारमल लेकवळा व नारोजी चोडके खिजमतगार हे त्यांजकडे पाठविले. परंतु त्यांनीं यांचें न ऐकतां, सायंकालचा दिवस राहतां पागेंत आले; ते महेश्वरीं नदी आहे तेथें येऊन उभे राहिले. तों रखमाबाईचा पाग्या, बाहेर त्याचा लेक महेश्वरीं नदीवर स्वारावानें व उभा होता, त्याजला धरून मुसक्या बांधून मारलें. हें वर्तमान रखमाबाईस कळलें व त्यांनीं पागा तयार करून गांवांत नाकें ठाई ठाई बांधिलें. चिरंजीव बाहेर आहेत. बाई व रखमाबाई किल्ल्यांत. शहरांत जमाव उभा केला. सायंकाळीं चिरंजीवाचा खासबारदार बातमीस किल्ल्यांत

आला. बाई व चौघे पांचजण कारभारी वोटीवर बसले होते, तेथें खासबारदार उभा राहिला. इतर जवळ चार लोक होते, यांनीं बाईस श्रवण केलें कीं, हा खासबारदार बातमीस चिरंजिवाकडील आला आहे. असें ऐकतांच त्याजला जासुदाकडून काठ्याखालीं मारिलें. त्याचा हात मोडला. तो नेऊन त्याचें हत्यार त्यास देऊन कैदेंत ठेविला. हें वर्तमान शुक्रवारीं जालें. आज शनिवारीं प्रातःकालापासून वर्तमान होईल तें लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १९१.

श्री. ता० १३ दिसेंबर १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ रबिलावल शनिवारपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–शुक्रवारचें वर्तमान राजश्री मल्हारराव होळकर यांजकडील लिहिलें. शनिवारीं राजश्री नारायणराव बारगळ यांजला चिरंजिवाकडे बाईनीं पाठविलें कीं, सोमवारचा मुहूर्त आहे, तुह्मीं येऊन वाड्यांत रहावें; आणि लेकवळा धरला तो सोडून द्यावा; नाहीं तर कामास येणार नाहीं. त्यावरून चिरंजिवांनीं उत्तर दिलें कीं, मातुश्री गेल्यावर वाड्यांत येऊं. त्यांनीं इंदुरास जावें; तेव्हां लेकवळा सोडूं, वाड्यांत येऊं. सोमवारचा मुहूर्त जवळ आहे, त्यास रखमाबाईस निरोप द्यावा. असें उत्तर नारायणराव बारगळ घेऊन आले. आज रविवार आहे. येथून पुढें जें होईल तें लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १९२.

श्री. २९ दिसेंबर १७८९.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र २५ रविलावलीं विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत. त्यानंतर ऋतुप्राप्तीचा मजकूर, ऋतुशांतीचा मुहूर्त सोमवार त्रयोदशीचा निश्चय जाहला होता ह्मणून पेशजीं लिहिलें होतें, त्यास सोमवारचे मुहूर्तास राजश्री मल्हारराव आले नाहींत. राजश्री नारायणराव बारगळ मध्यस्त गेले होते. त्यांनीं एकच उत्तर केलें कीं, सौभाग्यवती रखमाबाईनीं इंदुरास जावें. राजश्री शेटीबा होळकर यास माझे हातीं द्यावें. मग मी येऊन वाड्यांत राहीन, ऐसें साफ उत्तर केलें. त्या दिवसापासोन चौक्या आसपास बसविल्या आहेत.

मल्हारराव पागेंत जमाव करून आहेत. चंदी व पोटगी बाईंनीं मना केली. बंदोबस्त चांगला करून रात्रंदिवस चौकी पहारा करीत आहेत. मल्हारराव चंदी विकत घेतात; बारगिरास पेटीया देतात. निग्रह मोठा आहे कीं रखमाबाईचें मुखावलोकन करणें नाहीं. सौभाग्यवती रखमाबाई निरोप बाईस मागतात कीं, मी इंदुरास जातें. बाई निरोप देत नाहीं. चिरंजिवाची समजुती करितें. दोन दिवस दम धरून असावें असें समाधान करितात. परस्परें आंतील विचार पाहतां विपरीतच आहे. राजश्री सुभेदारांचीं पत्रें चिरंजिवास आलीं कीं, तुह्मीं आह्मांकडे येणें. बाईस पत्रें आलीं कीं, चिरंजिवाचा पक्का बंदोबस्त करून ठेवणें. हें वर्तमान चिरंजिवास समजलें, त्यामुळें ते वारा पडूं देत नाहींत. पुढें कसें घडेल तें सेवेसीं लिहीन. राजश्री पाटीलबावांची बहीण जानकीबाई भोइटीण श्रीकाशीस गेली होती. तेथून येऊन पाटीलबावांनीं देशीं रवाना केली. ती चंद्र ६ रविलाखरीं येथें आली. बाईचे भेटीस आली होती. बाईस काशीचा पितांबर एक व चोळखण एक एकून दोन सणगें दिलीं. बाईंनीं मेजवानी केली. जानकीबाईस सफेत शालजोडी व पितांबर पैठणी व खण दिला. समागमें मराठे दोन तीन होते, त्यांस वस्त्रें दिधलीं. खिजमतगार पाटीलबावांचा बरोबर होता, त्यास वस्त्रें देऊन बिदा केलें. देशाकडे गेली. दोन हंडे थोर तांब्याचे मथुरेहून पाटीलबावांनीं पाठविले. वजन दोन्ही ·॥२ बारा मण होते. ते हंडे बिडास पाठविले. येथून बाईंनीं रेवापार करून दिले. शिरोंज व रामपुरा येथें गिराशांनीं फार हंगामा मांडिला आहे. गांव लुटतात, जाळितात. जमीयत याजकडून तेथें आहे. आणखी येथून जमीयत रवाना करणार आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

पैवस्ती चंद्र २० रविलाखर तिसेन पौष. **लेखांक १९३.** ४ जानेवारी इ. स. १७९०.

**श्री.**

" सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र १० मिनहूस प्रातःकालीं येथील वर्तमान लिहून विनंतिपत्रें रवाना केलीं आहेत. त्यानंतर राजश्री नारायणजी बारगळ व राजश्री लक्ष्मण मल्हार पारनेरकर होळकरांचे पदरचे आहेत. ऐसे उभयतां राजश्री मल्हारराव होळकर यांचे मध्यस्त जात येत होते. त्यांसी उत्तर केलें कीं, तुह्मी उभयतां ओलीस रहाल, तर विध करावयास वाड्यांत येईन. सौ रखमाबाईची भेट घेणार नाहीं, हें कबूल होत

असेल तर येतों, असें बोलणें लाविलें. बाईस संकट कीं, रखमाबाईस घेऊन आले. कसें करून विध संपादावा ऐसें जाणून, ओलीस नारायणजी बारगळ यांचा ज्येष्ठ पुत्र व लक्ष्मण मल्हार पारनेरकर ऐसे पागेंत ठेऊन, मल्हारराव यांनीं आपले बारगीर व खासे लोक, करनाटकी प्यादे चौकीस ठेऊन, आपण मल्हारराव जातीनिशीं घोड्यावर बसून, चार खिजमतगार व खासबारदार चार असे हातीं तरवार घेऊन, इतक्यानिशीं वाड्यांत आले. पौष शुद्ध १५ पौर्णिमा शुक्रवार अकरावे घटकेस वाड्यांत आले. येतांच बाईचें दर्शन घेऊन पायांवर डोई ठेऊन अभ्यंग स्नानास नेलें. स्नान जाल्यावर सौभाग्यवती रखमाबाईकडे सौभाग्यवती मुक्ताबाई फणशी इजला, बरोबर उभयतां स्त्रीपुरुषांची पदरांच्या गांठी देऊन रखमाबाईकडे पाठविलें. ते जाऊन उभयतांनीं उभाउभीं मान लववून बाहेर येऊन पुण्याहवाचन जालें. अक्षत टाकावयास रखमाबाईस मागतीं मुक्ताबाईनीं आग्रह करून बाहेर आणून अक्षवण करविलें. तदनंतर आहेर जाहले. सरकारचा आहेर, त्यांनीं स्मरण करावा तर विशेषेंकरून करावा. परंतु विध केला पाहिजे. त्यावरून आह्मीं आहेर केला. त्याची याद मागाहून सेवेसीं पाठवीन. सौ रखमाबाईही उदास जाली आहेत. आज उद्यां निरोप घेऊन इंदुरास जाणार. मल्हारराव पौर्णिमेचे दिवशीं विधी संपादून, एक रात्र वाड्यांत राहून प्रातःकाळीं पागेंत शनिवारीं गेले; ते पुन्हां आले नाहींत. सौ रखमाबाई इंदुरास गेलीयावर वाडयांत यावें ऐसा करार करून, ओलीस शनिवारीं प्रातःकाळीं सोडून दिला. याप्रमाणें फलशोभन जालें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १९४.

**श्री.** २२ जानेवारी इ. स. १७९०.

"विज्ञापना ऐसीजेः—माघ शुद्ध ७ सप्तमीस सौ॥ रखमाबाई होळकर स्वार होऊन रामकुंडास रहावयास गेली. तेथें मुक्काम केला. ते दिवशीं झाडून लहान मोठे लोक त्यांचे भेटीस गेले. मी गेलों नाहीं. त्यावरून त्यांनीं चिठी दुसरे दिवशीं मजकडे पाठविली कीं, तुह्मीं येऊन भेटून जाणें. त्या चिठीची नक्कल करून पाठविली आहे. त्यावरून माघ शुद्ध ८ प्रातःकाळीं रामकुंडास गेलों. भेटी जाली. एकांतीं घेऊन गेली. सर्व वर्तमान सांगितलें. त्यांतील अर्थ कीं, चिरंजीव आह्मांपाशीं होता. आह्मांपासोन बाईजवळ येऊन राहिले. ते समयीं आह्मीं व सुभेदारांनीं पत्रें पाठविलीं कीं, चिरंजीवास ठेऊन न घेणें. आमचे आह्मांकडे पाठवून देणें. तें न करितां त्याचें लग्न केलें. त्याजपाशीं दोन माणसें आमचीं ठेऊन दिलीं. तीं

दूर करून आपल्यापासून नवीं माणसें ठेऊन दिधलीं. त्याची जमीयत वाढवून तीनशें रुपये रोजमुरा करून देऊन, पुढें दों महिन्यांत सातशें रोजमुरा त्यानें करून घेऊन मजबूत रहात गेले. बाईचे ध्यानांत न ये. ऐसें करितां १५०० चा रोजमुरा दरमहा करून घेतला. तो करून जमत गेले. त्यामुळें येवल्यास पागा पाठवून तेथें नाना प्रकारें खेळ केलें. आडगांव जनस्थानाजवळ पाटीलकीचा गांव आहे, तेथें उपद्रव देऊन तसनस केली. गांवांत मन माने तसा उपद्रव देतात. तरी बाईचे चित्तीं त्याचे बंदोबस्ताचें येत नाहीं. खानदेशांत पाटीलकीचा गांव देहर परगणीयाचा, तेथें गुमास्ता खिजमतगार सुभेदारांनीं ठेविला. त्याजला धरून आणून तेथें दुसरा गुमास्ता पाठविला. हजार रुपये त्याजपासून घेतले. असे छंद मनास येतात ते करितात. बाईचें भय नाहीं. आमचें भय त्यास. त्याचा बंदोबस्त आह्मीं करावा, तर आह्मांसही त्याचा बंदोबस्त बाई करूं देत नाहीं. बखेडा करून त्याजला देशीं जेजूरीस पाठवितात. तेव्हां जमीयत घेऊन तिकडे येईल, उपद्रव गांव खेड्यांस होईल. जेजूरीस गेल्यावर श्रीमंतांकडे येतील, तेव्हां त्याजला तेथें ठेऊं नये. याविषयीं आपणांस विनंति लिहावी ह्मणोन मजला बोलावून इतकें वर्तमान सांगितलें. त्यास विनंति कीं, राजश्री मल्हारराव तेथें आले, तर सरकारांतून त्यांजला ताकीद होऊन, राजश्री सुभेदारांकडे जावयास सांगावें. ते न ऐकत तर जाबता देऊन आह्मांपाशीं इंदुरास पावते करावे. याविषयीं अनमान नसावा ह्मणून बहुत बहुत हात जोडून सांगितलें आहे. याविषयींचें पत्र सौभाग्यवती रखमाबाईस आपलें पाठवावें. त्यांत मजकूर कीं, तुह्मीं वर्तमान लिहावयास सांगितलें, त्यावरून केसोपंत वकील यांनीं सविस्तर लिहिलें. त्यास, राजश्री मल्हारराव इकडे आल्यावर त्यास बुद्धिवादाच्या विचारें सांगून सुभेदाराकडे पाठवून देऊं. याप्रमाणें रखमाबाईस पत्र मजकडे पाठवावें. मी त्यास प्रविष्ट युक्तीनें करून देईन. अथवा जशी आज्ञा होईल तसें त्यांस लिहून पाठवीन. या पत्राचे जाब सत्वर आले पाहिजेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १९५.

श्री. २९ जानेवारी इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १३ जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र २२ रविलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र ११ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री पाटीलबावांकडील वगैरे बातमीचें व राजश्री मल्हारराव

होळकर यांजकडील वर्तमान लिहिलें तें कळलें. पुढें होत जाईल तें लिहित जाणें ह्मणून आज्ञा. त्यास, पूर्वीं चंद्र १७ रविलाखरचें विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत. फलशोभन जालें हें वर्तमान लिहिलें होतें. पौष शुद्ध १५ स विधि जाल्यानंतर राजश्री मल्हारराव पागेंत जाऊन राहिले. सौभाग्यवती रखमाबाई होळकरीण यांनीं निकड केली कीं, मी इंदुरास जातें. बाईंनीं सांगितलें कीं, जाऊं नये. चिरंजीवाचा सलुख करून देतें, असें बोलून ठेवून घेतलें. बाईंनीं मल्हारराव यांजकडे पैगाम केला. मध्यस्त नारायणजी बारगळ घातले. पंधरा दिवस रदबदली जाली, परंतु मल्हारराव यांची समजूत न जाली. त्यांचा एकच निश्चय कीं, मातोश्रीचें मुखावलोकन करणें नाहीं. असा साफ जाब वारंवार देत गेला. हें रखमाबाईस पुरतें समजलें. तेव्हां इंदुरास जावें, बाईंनीं सांगितलें. त्यावरून माघ शुद्ध ७ स निरोप घेऊन गेली. समागमें मल्हारराव यांचे स्त्रीस घेऊन गेली. काशीराव होळकर यांच्या स्त्रीचे हातापायांस वाताचा उपद्रव आहे. त्यामुळें तिजला ठेऊन घेतलें. वरकडास निरोप दिला. हें वर्तमान राजश्री सुभेदारांकडे गेलें आहे. तेथून उत्तरें काय येतील तीं कळल्यावर सेवेसीं लिहीन. मल्हारराव उतावीळ, देशीं देवदर्शनास जावयाची करितात. बाई निरोप देऊं ह्मणतात. याप्रमाणें वर्तमान जालें आहे. तें सेवेसीं लिहिलें असे. राजश्री पाटीलबावा फौजेची रवानगी दिल्लीस करितात. विशेष वर्तमान आलें नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १९६.

**श्री.** ४ फेब्रुवारी इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान, चंद्र २२ माहे रविलाखरीं विनंतिपत्रें लिहून व राजश्री आनंदराव गंगाधर यांचा लखोटा, एकूण दोन लखोटे सेवेसीं रवाना केले आहेत; पावले असतील. सांप्रत चंद्र १ रविलाखरचें आज्ञापत्र सादर जालें, तें चंद्र १३ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, वरचेवर वर्तमान होईल तें लिहित जावें. ऐसीयास इकडील वर्तमान, राजश्री सुभेदार यांच्या व जयपूरकरांच्या भेटी पौष शु॥ १० दशमीस जाल्या ह्मणून पत्रें राजश्री सुभेदार यांचीं बाईचे नांवें आलीं. पत्रीं लिहिलें कीं, आह्मी येथील निर्गम करून लवकरच येतों. राजश्री काशीराव होळकर यांची रवानगी करून द्यावी. महेश्वरीं पागा

आहेत त्यासुद्धां काशीराव यांस कोट्याचे सुमारें लवकर बिदा करणें, व सौभाग्यवती रखमाबाई यांजपाशीं पागा व हत्ती नग पांच आहेत त्यांसुद्धां आह्मांकडे रवाना करणें. येविषयीं शरीफभाई इंदुरीं आहेत त्यांजला ताकीद कीं, रखमाबाईपासून सरंजाम झाडून घेऊन महेश्वरीं बाईजवळ पोंहचावणें, ती आह्मांकडे पाठवितील. ह्मणून शरीफभाई तेथें येऊन राहिले. रखमाबाई सरंजाम देत नाहींत. कज्जा पडला आहे. राजश्री चिमणाजी जयराम पारनेरकर लष्करांतून निरोप घेऊन इंदुरास आले. त्यांनीं रखमाबाईस बहुत सांगितलें कीं, तुह्मांपाशीं सरंजाम कांहीं नसावा अशी आज्ञा आहे, तर आग्रह करूं नये. त्यांचें सांगितलें मान्य जालें नाहीं. सौभाग्यवती रखमाबाई यांजकडे आरोप कीं, तुह्मी सरकारांत पत्रें लिहिलीं कीं, राजश्री नारो गणेश यांस दिवाणगिरी सांगावी. महेश्वरीहून पत्रें व लष्करांतून पत्रें सरकारांत गेलीं कीं, राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे दिवाणगिरी सांगावी, असें असतां रखमाबाई खूळ करितात हें निमित्य त्यांजवर ठेऊन, त्यांजपाशींचा सरंजाम काढावा ह्मणून आग्रह राजश्री सुभेदार यांचा व येथीलही मानस असें आहे. हलीं लखोटा एक, राजश्री आनंदराव गंगाधर यांचा आला, तो बजिन्नस पाठविला आहे, पावेल. राजश्री पाटीलबावा उज्जनीस येतात असें वर्तमान आलें. राजश्री राणाजीचा बंदोबस्त जाला. राजश्री अंबोजी इंगळे व दोन पलटणें, कांहीं फौज, मेवाडांत ठेऊन उज्जनीस येतात. राणेखानभाई मृत्यु पावले. त्यांची वस्तभाव व सावकारीयांत ठेवी होती ती घेतली. त्यांचा ताबूद देशीं देपूर येथें पाठविणार ह्मणून वर्तमान आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक १९७.

श्री. ६ फेब्रुवारी इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २१ जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान चंद्र १४ जमादिलावलीं विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत. त्यानंतर बाईनीं मल्हारराव यांची रवानगी माघ वद्य ५ पंचमी गुरुवारीं केली. ते दिवशींच रेवापार जाऊन उतरले. जेजुरीस जातात. समागमें राजश्री सोमाजी लांबहाते वगैरे पागा दिधली. चाळसा दिवसांचा करार करून पायांवर हात ठेऊन, क्रिया घेऊन, बाईनीं रवाना केलें कीं उभ्या मार्गें जावें; तसेंच यावें. वांकडें कोठें जाऊं नये. पुण्यास जाऊं नये. चांदवड वगैरे महालीं कोठें उपद्रव देऊं नये. असा करार करून राजश्री मल्हारराव निघाले. पुण्यास जाऊं नये असा करार

करून घेतला तेव्हां त्यांस वांटे लाविलें. पुढें त्यांचे मर्जीस येईल तशी वर्तणूक करितील. तो भरंवसा बाईस नाहीं. हें वर्तमान सौभाग्यवती रखमाबाईस कळल्यावर त्यांनीं दोन चिठ्या मजकडे पाठविल्या. त्यांच्या नकला करून पाठविल्या आहेत. त्यांचें बोलणें कीं, बाईस चिरंजीवाची प्रकृत कळून, सरंजाम देऊन वांटे लाविलें, तेव्हां दौलतीस अपायच केला आहे. चिरंजीव जातांना सुधां जाणार नाहीं. मार्गांत चांदवड वगैरे महाल व खेड्यास उपद्रव देतील, नुकसानी होईल. सरदार मोहिमशीर. घरचा बखेडा मातुश्रींनीं आरंभिला, यांत परिणाम नाहीं. ह्मणून मुजरद कारकून राजश्री निळो परशराम यांजला राजश्री केसो गणेश कुंटे यांस पत्रें लिहून त्यांजकडे पाठविलें आहे. राजश्री केसो गणेश यांनीं विनंति सरकारांत करून चिरंजीवाचा पक्का बंदोबस्त करावा ह्मणून सौभाग्यवती रखमाबाईनीं पत्रें लिहून पाठविलीं आहेत. तेही विनंति करितील. सौभाग्यवती रखमाबाईच्या लिहिल्यावरून सेवेसीं विनंति लिहिली आहे. त्यांचे मनांतील अर्थ कीं चिरंजीवास मध्येंच पागा चांदवडास सरकारच्या पाठवून माघारें फिरवावा असें आहे. सौभाग्यवती रखमाबाई यांच्या नांवें खातरजमेचें पत्र पाठविलें पाहिजे. राजश्री सुभेदारांनीं बाईस पत्रें लिहिलीं होतीं कीं, मल्हारराव यांस आह्मांकडे पाठवून देणें. त्यांस आजच उत्तर लिहून दिधलें कीं, चिरंजीवाचा नवस होता. व्रतें धरलीं होतीं. विडा घेत नाहीं, व जोडा पायांत घालीत नाहीं. पलंगावर निजत नाहीं. शरीरास समाधान पडत नाहीं. देवाचा नवस फेडावयाकरितां पाठविलें आहे. तेथून लवकरच येईल ह्मणजे तुह्मांकडे रवाना करून देईन. याप्रमाणें पत्रें लिहून पाठविलीं. मल्हारराव यांजबराबर जमियत पागा बाईनीं दिधली. पागेचे राऊत पन्नास. खाजगत जमियत शंभर स्वार आहेत. पुढें जमियत आणखी करणार. येथून कसें करून निघाले आहेत. मनस्वी वर्तणूक करितील, यास्तव सौभाग्यवती रखमाबाईनीं विनंति करावयाविषयीं समक्ष सांगितलें आणि वरचेवर चिठ्या येतात, त्यावरून सेवेसीं लिहिलें आहे. त्याविषयीं आज्ञा जाली पाहिजे. एक पत्र सौभाग्यवती रखमाबाई यांस पाठविलें पाहिजे. सेवेसीं श्रुत हे विज्ञापना.''

---

## लेखांक १९८.

श्री. ९ फेब्रुआरी इ. स. १७९०.

''राजश्री केसो भिकाजी गोसावी यांसीः—

स्नेहांकित सौ॥ रखमाबाई होळकर दंडवत सुमा तिसैन मया व आलफ. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें कीं, लिहिल्याप्रमाणें श्रीमंतांस विनंतिपत्रें

लिहिलीं आहेत. चांदवडास पागा आल्यावर गांठ पडून चिरंजीवांनीं ऐकिलें तर बरें. कदाचित् कलह वाढल्यास, एखादी गोष्ट विपरीत जालीयास लौकिकीं जघन्य ! यास्तव श्रीमंत पागा पाठविणार नाहींत. चिरंजीव जेजुरीस गेल्यावर श्रीमंतांचे दर्शनासही जातील. तेव्हां त्यांस युक्तिद्वारा सांगून मार्गावर आल्यास तुह्मांकडे अथवा लष्करांत रवाना करावयास येईल. ह्मणोन तुह्मीं विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसीयास जेजुरीस जाऊन सरळतेनें माघारे येतो हा विचार सर्वांस समजून चुकला. याजकरितां चांदवडास पावला नाहीं तों तिकडून पागा याव्या. चार भोंवताले जवळील आहेत त्यांजला व त्यांचे घरींदारीं ताण बसल्यावर सहजांत जड पडावयाचें नाहीं. तेव्हां जमीयत काय करिती ? श्रीचे दर्शनास कदाचित् गेला आणि श्रीमंतांचे भेटीस आला, चार वाईट फट गोष्टी सांगितल्यानें त्याचे गुणदोष दोन घटकां कचेरीस येऊन गेल्यानें दृष्टीस येतात कीं काय ? तेव्हां शब्द आह्मांस ठेवतील. याजकरितां विना अनुभवाखेरीज मनुष्याचा लगटवास असल्याव्यतिरिक्त दृष्टि येते, हें सर्वथा होत नाहीं. आतांही जे जवळ बसतात, ते चार गोष्टी ऐकून शब्द त्यास ठेवितात कीं काय ? त्यांतील माहीतगारी असल्याविना नजर पुरते असें नाहीं. मातोश्रीचे मनांतून खेळ करावा तो अर्थ तुह्मांसी लोपला नाहीं. जे गोष्ट बहकली ते सुधारणें कठीण ! यजमान मोहीमशीर. तिकडून एखादा बंदोबस्त घडावा, तर लांबचा पल्ला पडला. ते मातोश्रीस लिहितां कसर ठेविली नाहीं. तो इतिहास अद्योपांत तुह्मांस माहीत आणि वडिलांस करणें नाहीं. तेव्हां नाश होऊं द्यावा कीं काय ? श्रीमंत धनी आहेत. नसली गोष्ट त्यांनीं सुधरून मार्गावर आणावी, हा त्यांजला अधिकार असोन, उभयतांनीं अंदेशांत पडावयाचें कारण नाहीं. याकरितां तुह्मीं उभयतांस खचितपणें लिहून, हा तेथें जाऊं पावला नाहीं तों चांदवडीं पागा याव्या, आणि चार जवळ लोक आहेत त्यांचें पारपत्य, त्यांचे घरीं चौक्या बसविल्या ह्मणजे सहजांत बेजार होईल. कलह होणार नाहीं. विलगही पडत नाहीं. चार रुपये खर्च पडला तर चिंता नाहीं. असें जालें ह्मणजे आह्मांकडे पाठवावा. जमीयत लुटल्यावर करितो तें काय ? तिकडून दाब बसल्यावर कोणतेंही विलग पडावयाचें नाहीं. येविषयींचें बोलणें तुह्मांसीं जालें आहे. तुमची पुन्हां भेट व्हावी. यास कारण शिवरात्रीचें निमित्य करून अवंतिकेस जातो ह्मणोन निरोप मागावयांत भेटही घडोन यात्राही घडेल. दोन्ही साधतात. जाणोन चंद्र २५ जमादिलावल बहुत काय लिहिणें. मोर्तब सुद.”

---

पौ चंद्र २ रजब तिसेन चैत्र. **लेखांक १९९.** ता. १७ फेब्रुवारी इ. स. १७९०.

श्री.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २ जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान चंद्र २१ जमादिलावलीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्याउपरी इकडील वर्तमानः— राजश्री मल्हारराव कसरावद परगण्यांत तीन मुक्काम करून होते. गेले तेव्हां एक नाटकशाळा घरचे गुलामाची स्त्री, तिजला बाईनीं अलंकार भूषणें देऊन गायन नृत्य शिकवून देवापाशीं कृष्णमंदिरीं दुवस्तां हजिरी देत होती, तिजला घेऊन गेले. ह्मणून बाई रागें भरल्या. बराबर पागा व सोमाजी लांभाते दिले होते व ढाल करून दिधली, ती माघारें आणवून घेतली. जातेसमयीं दोन हजार रुपये रोख त्यास खर्चास दिले. गांवांत उचापत त्यांनीं घेतली; ते लोक समयास आडवे ज़ाले. त्यांजला कांहीं न देतां कसरावदचे परगण्यांत राहिले. तेथें उपद्रव देऊं लागले. मग मीं आपली चिट्टी व खिजमतगार त्यांजकडे पाठविला. त्यांनीं उत्तर लिहिलें कीं, सरकारचा महाल तो माझा आहे, उपसर्ग लागणार नाहीं. ह्मणून मजला चिट्टीचें उत्तर पाठविलें. आणि त्याप्रमाणें वर्तणूक न केली. राजश्री माधवराव भुसकुटे यांचा इनामी गांव धाकटी कसरावद, त्याजपासून पन्नास रुपये रोख व चार बैल घेऊन पुढें मुलतानचा मुक्काम केला. तेथें पंधरा मण चणे आणि रोख रुपये ७५ पाऊणशें घेतले. तो गांव सरकारचा. दुसरे दिवशीं खरगोण परगण्यांत गेले. दो चौ गांवचीं घोडीं पंधरा जमा केलीं. दोन चारशें रुपये गांवापासून घेऊन खरगोणास गेले. तेथें मामलेदार यांनीं दरवाजे लावून गोळी चालविली. तेव्हां कसबा सोडून बाहेर आठ कोसांवर राहिले. प्रातःकाळीं खरगोण परगण्यांत राऊत पाठवून मनस्वी मारहाण करूं लागले. एका खेड्याशीं कज्जा केला. पाटलास मार दिला. त्यामुळें त्याचे भाऊबंद येऊन तरवार चालविली. एक घोडा मल्हारराव यांजकडील ठार जाला. दोन बारगीर पडले. गांवचें माणूस जखमी व ठार मिळून दहा जालें. शेवटीं गांवास आग लावून दिधली. बंद धरून घेतला. याप्रमाणें रयतेवर जुलूम केला आहे. बाईस हें वर्तमान क्षणक्षणा कळत आहे. लोक व पागा पाठवून त्यास घांटाखाले करून द्यावें ह्मणून नारोजी खिजमतगार व राऊत व कारकून पाठविले. ते त्याजकडे जाऊन, खरगोण परगण्यांतून काढून भिलाण गांवापुढें पोंहचवून दिले. बऱ्हाणपुरचे मार्गें गेले, आणि खिसमतगार वगैरे परतून आले. मल्हारराव गुदस्तां आले, त्यांचीं लक्षणें माझे ध्यानांत विपरीत आलीं. यावर मीं

बाईस एक वेळ एकांतीं सूचना केली कीं, मल्हारराव यांचें लक्षण ठीक नाहीं. तुह्मीं याचा चांगला बंदोबस्त करावा. इतकें सांगून राजश्री गोविंदपंत गानूस साक्ष ठेविलें. पुन्हां त्यांनीं तसें न करितां त्याजला वाढवीत गेली. त्याचें फळ आतां पावतात. नित्य उठून लोकांच्या फिर्यादी येतात. गांवांत पांच हजारांस लोकांस त्यांनीं बुडविलें, तें ठावकें असून त्यांची उपेक्षाच करीत गेली. आतां जड पडलें आहे. राजश्री दादाजी गंगाधर व केसोपंत कुंटे यांस बाईनीं पत्रें लिहिलीं आहेत कीं, सरकारांत विनंति करून चिरंजीवाचा बंदोबस्त करणें, ह्मणून ऐकितों. सौभाग्यवती रखमाबाईचें पत्र चंद्र २४ जमादिलावलचें आलें. त्याची नक्कल करून पाठविली आहे. पावल्यावर ध्यानास येईल. खावंद धनी, श्रीमंत असून, गेली गोष्ट ती त्यांनीं सुधरून द्यावी, हा मनोदय त्यांचा. याजविषयीं खातरजमेचें पत्र त्यांस पाठवावयाची आज्ञा जाली पाहिजे, ह्मणजे त्यांची स्थिरता होईल, व मल्हारराव यांजला हस्तगत केलें पाहिजे. तें कर्म बाईच्यानें व रखमाबाईच्यानें होत नाहीं. सरकारचे दाबानें होईल. दुसरा अर्थ नाहीं. सौभाग्यवती रखमाबाईनीं इंदुरास यावें ह्मणून मजला लिहिलें, परंतु मी गेलों नाहीं.कारण आज्ञा आल्यावर जाईन. अथवा ज्याप्रमाणें पत्रीं आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. सारांश, रखमाबाई यांचें नांवें खासगत पत्र अगत्यरूप पाठविलें पाहिजे. तेव्हां त्यांचें समाधान होईल. चिरंजीवाचा बंदोबस्त करावयाकरितां सरकारांत मुजरद कारकून इंदुरीहून त्यांनीं पाठविला आहे व राजश्री केसो गणेश कुंटे यांस पत्र लिहिलें आहे. ते विनंति करितील. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस येत गेलीं कीं, चिरंजीवास देशीं रवाना न करावें; आह्मांकडे पाठवून द्यावें. त्यांनीं त्याप्रमाणें न करितां, देशीं रवानगी करून लोकांची नुकसानी केली. दोन हजार गुरें वळून बराबर नेलीं आहेत. सुलतानपुर, नंदुरबार, चांदवड या महालांत मास पक्ष रहाणार. मग पुढें काय करणार तें करोत. जमियत दोनशें पायदळ व स्वार शंभर आहेत, ते चांगलेच आहेत. राजश्री बापूजी जनार्दन जामगांवकर व बापूजी चिटणीस निसबत शिंदे हे उज्जनीस आले. हल्लीं चिटणीस तेथें राहणार. बापूजी जनार्दन जामगावीं जाणार. ते इकडून येतात. येथील मार्गाचीं पत्रें गेलीं आहेत. राजश्री पाटीलबावांकडून राजश्री आंबोजी इंगळे यांचा बंधु बाळोजी इंगळे दिल्लीपुढें होते. तिकडून गुलाम कादर याची मातुश्री व कनिष्ठ बंधु आले, त्यांची यांची एक लढाई जाली ह्मणून वर्तमान. राजश्री काशीराव होळकर साता हजारा फौजेनिशीं दिल्लीस आहेत, असें वर्तमान येथें आलें आहे. त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. श्रुत होय हे विज्ञापना.”

---

## लेखांक २००.

पैवस्ती चंद्र १० रजब तिसैन चैत्र. **श्री.** १२ मार्च इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २५ माहे जमादिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-चंद्र २ जमादिलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्याउपर इकडील वर्तमान, राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं. त्यांत वर्तमान कीं, सीख व रोहिले एक होऊन कुंजपुऱ्यास जमाव करून आहेत. विठोजी इंगळे फौजसुद्धां सारणपुराचा घाट उतरून यमुनापार कुंजपुऱ्याचे सुमारें गेले. आह्मीं चिरंजीव राजश्री काशीराव होळकर याजसमागमें पांच हजार फौज देऊन, विठोजी इंगळे यांजकडेच पाठविले आहेत. हेही जलद जाऊन पोहोंचतील. मथुरेहून फौजा आह्मांसुद्धां त्रिवर्गाच्या जयपुरास रवाना करावयाचा बेत आहे. सरदारांनीं मथुरेस असावें, फौजा पुढें रवाना कराव्या, असें लिहिलें होतें. राजश्री मल्हारराव होळकर खरगोण परगणियाचा गांव मारून बऱ्हाणपुरास गेले. तेथून रावेरीं जाऊन दोन हजार रुपये घेतले. पुढें नसिराबादेवरून उत्राणेस गेले. तेथें शिमगा केला. पुढें कोणीकडे जातील हें कळत नाहीं. येविषयीं सौभाग्यवती रखमाबाई होळकर यांनीं विनंति सरकारांत लिहावयाविषयीं पांच चार पत्रें पाठविलीं, त्याप्रमाणें विनंति लिहीत गेलों. त्याप्रमाणें मल्हारराव यांचा बंदोबस्त सरकारांतून व्हावा. याविषयीं परभारें त्यांनीं कारकून व राजश्री केसो गणेश कुंटे यांस पत्रें लिहिलीं आहेत. मीं त्यांस उत्तर काय लिहावें, येविषयीं आज्ञापत्र आलें पाहिजे. त्यासारखें सौ॥ रखमाबाई यांस लिहून पाठवीन. त्यांचीं माणसें व पत्रें वरचेवर येतात कीं, सरकारचें उत्तर काय आलें तें लिहिलें पाहिजे. त्यावरून सेवेसीं विनंति लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०१.

पैवस्ती चंद्र २५ रजब तिसैन, चैत्र. **श्री.** २८ मार्च इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ११ माहे रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-येथील वर्तमान चंद्र २५ जमादिलाखरीं विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत. त्याउपरी इकडील वर्तमानः- राजश्री मल्हारराव होळकर रावेरीहून कूच करून उत्राण परगण्यास गेले, तेथें हुताशनी केली. राजश्री हरी गणेश कमाविसदार नि॥ होळकर यांजपासून चोवीसशें रुपये घांसदाणा व मेजवानीचे घेतले.

त्याशिवाय दुमाले गांवापासून पांच हजार व महालांतून पांच हजार व कसबेकर झेङ्कक पाटील यापासून पांच हजार येणेंप्रमाणें, एकूण रुपये सत्रा हजार चारशें घेऊन, चाळीसगांवापावेतों जाऊन, मागतीं माघारें थालनेर परगणीं आले. श्रीमहायात्रेहून १० दहा ब्राह्मण आले, ते देशीं जात होते. त्यांस मार्गांत गांठून भाल्याची जखम मारून लुटून घेतलें. जो मार्गांत कोणी भेटतो त्यास सुरक्षित येऊं देत नाहींत. जमाव वरचेवर करीत आहेत. येविषयीं सौ॥ रखमाबाई यांचीं पत्रें आलीं, त्यावरून विनंति पांच चार पत्रीं लिहिली. परंतु उत्तराची आज्ञा होत नाहीं. याचें कारण काय ह्मणोन चिंता लागली आहे. सौ॥ रखमाबाईस आह्मीं काय उत्तर लिहावें? राजश्री केसोपंत कुंटे यांजकडे कारकून व पत्रें सौ॥ रखमाबाईनीं पाठविलीं, त्याप्रमाणें उत्तरें त्यांजकडे पाठविलीं असल्यास मजला आज्ञा करावी, ह्मणजे मी त्यांस लिहीन. दुसरें, बाईचे उजवे हातास फोड तळहातास जाला, व उजवे पायावर फोड जाला. त्यास औषध, भोई राजश्री त्रिंबक बाबूराव यांजकडील, त्यानें रानांतील मुळी आणून उगाळून लाविली, त्यानें हात व पाय फार सुजला. आणखी फोड येऊन वाहूं लागले. कोंपरापावेतों सूज चढली. त्यामुळें ज्वर प्राप्त जाला. दोन दिवस स्नान राहिलें. श्रमी आहेत. दरबार बंद आहे. शरीरप्रकृति ठीक नाहीं. चैत्र शुद्ध ६ पासून श्रमी आहेत. दशमीपासोन तर स्नानच नाहीं. राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान, त्रिवर्ग सरदार मथुरेस आहेत. फौजा जयपुराकडे रवाना केल्या ह्मणोन वर्तमान आलें. जोधपूरकरांची फौज दहा हजार जयपूरकरास मदत आली. याप्रमाणें तिकडील वर्तमान आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०२.

**श्री.** २ मे इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—छ २६ रजबचें आज्ञापत्र व छ १ साबानचें आज्ञापत्र एकूण दोन पत्रें छ १४ माहे मिनहूस पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री मल्हारराव होळकर सरकारमहालास व शिंदे होळकर यांचे महालास उपद्रव देतात; त्याजविशीं गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांसी सांगावें कीं, पागा पाठवून त्याचा बंदोबस्त करावा. येविसीं राजश्री केसो गणेश कुंटे यांस समक्ष सांगितलें आहे, व ते बाईस लिहितील. तुह्मीं बाईसी बोलावें कीं, मल्हारराव याजकडे पागा पाठवून घेऊन जावें ह्मणोन

आज्ञा. त्यावरून बाई यांसीं समक्ष लिहिल्याप्रमाणें त्यांसीं बोललों. त्यांचें उत्तर बाईनीं केलें कीं, "सरकारांत अनुभव आहे. घरचा प्रकार, मीं काय करावें? दादासाहेबांचा प्रकार घडला, त्यास कोण श्रम लागले?" हें उत्तर केलें. यांत दर्शविलें काय, गोष्ट कठीण, मजला होत नाहीं. तेव्हां मीं उत्तर केलें कीं, श्रीमंतांस म्यां काय लिहावें? आपण बोललां तसें लिहावें, किंवा मल्हारराव यांस आपण आणवितां? तेव्हां बोलली कीं, "माझें ह्मातारपण, मी जाऊन घेऊन येईन हें सामर्थ्य नाहीं. त्याचे आईनें अथवा त्याचे बापानें येऊन त्यास घेऊन जावें. इतराच्यानें तो येत नाहीं." याप्रमाणें बोलली. त्यास असेंच पत्रीं लिहून पाठवणें ह्मणोन सांगितलें. फिरोन दुसरे वेळ विचारलें, तरी हेंच उत्तर कीं, त्याचे आईनें अथवा त्याच्या बापानें येऊन त्यास घेऊन जावें. असेंच तुह्मींही श्रीमंतांस लिहावें, ह्मणोन सांगितलें. त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. राजश्री नारो गणेश यांचे भाचे, राजश्री बाळाजी लक्ष्मण, श्रीमहायात्रेस कुटुंबसुद्धां गेले होते. ते यात्रा करून वैशाख शुद्धांत इंदुरास आले. नारोपंत यांची स्त्री येथें होती, त्यास मावंद्यासाठीं इंदुरास घेऊन गेले. मावंदें जाल्यावर नारोपंताकडे त्यांची रवानगी वैशाख शुद्ध ७ स केली. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०३.

**श्री.** ५ माहे मे इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २० माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ १९ साबानीं राजश्री आनंदराव गंगाधर यांचा लखोटा छ १३ चा लिहिला आला, तो बजिन्नस पाठविला आहे. दोन लखोटे पूर्वींचे व एक आतां आला तो, एकूण तीन लखोटे त्यांजकडील पाठविले आहेत. राजश्री मल्हारराव याचा बोभाट राजश्री सुभेदारांकडे गेला कीं रुसून जात होते, परंतु श्रीमंतांनीं पक्का बंदोबस्त करुन चौकी ठेविली. दोन तीन दिवस उपवास केले, मग सरकारांतून ताट वाढून जात आहे. दादाजीस आज्ञा सरकारांतून जाली कीं, यांस घेऊन जाणें. हें वर्तमान राजश्री सुभेदारांस कळल्यावर, त्यांचें पत्र बाईचे नांवें आलें कीं, कोणी तरी भला माणूस पाठवून त्याजला घेऊन येणें. असें पत्र काल आलें, ह्मणून ऐकिलें. तेथून त्यास कोणी आणावयास धजत नाहीं. गुणाचें सर्वांस कळलें आहे. याउपर बाई काय तजवीज करितात ती करोत. येथें महागाई फार जाली आहे. पूर्वींचे लोकांचें देणें, व पुढेंही नित्य खर्चाची वोढ आहे. मी निरुपाय

आहे. परामर्ष जाल्यास देणेदारांचें देऊन पुढें घेत जाईन. वोढीमुळें विनंति लिहितों. तेथेंच ऐवज राजश्री कृष्णाजी नाईक तात्याकडे पावता केला पाहिजे. बहुत दिवस सरकारांतून कांहीं पावलें नाहीं. पूर्वीं दोन हजार रुपये पावले, ते तात्याकडेच देण्याचे ते दिले. आतांही त्यांजकडेच द्यावयाचे आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०४.

**श्री.** १४ मे इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २९ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेषः—येथील वर्तमान चंद्र १९ माहे साबानीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमानः—राजश्री रघुनाथ हरी पाऱ्होळेकर यांची व त्रिंबकराव सदाशिव या उभयतांची घरवांटणीचा पूर्वीं फडशा, हरिपंत व सदाशिवपंत यांनीं करून ठेविलाच होता. त्यापैकीं पेटेचा व देवाच्या उपकर्ण्यांचा लढा राहिला. त्याकरितां त्रिंबकराव सदाशिव झांशीस गेले, तेथें निकाल न जाला. तेथून महेश्वरास आले. येथें बाईनीं ठेऊन घेतले. हें वर्तमान रघुनाथ हरीस कळलें. यावर त्यांजकडून राजश्री धोंडोपंत व नरसिंगराव, जाबसालास येथें आले आहेत. उभयतांचा वाद प्रतिवाद उदंडच जाला. निकाल होतां दिसत नाहीं. पुढें पंचाईत वे॥ राजश्री धोंड दीक्षित पटवर्धन यांस सांगितली. उभयतां राजी जाहल्यास निर्गमांत येईल. कलम १.

खेची राघोगडवाला, त्याचा पुतण्या चेतसिंग, त्यानें सिरोंज व भेलसें या प्रांतीं प्रळय मांडिला. मार्ग चालत नाहीं. हजार पांचशें जमाव जाहल्याखेरीज मार्ग शुद्ध चालत नाहीं. त्यामुळें खेचीचा वकील येथें बाईकडे आला आहे. आमचें संस्थान पाटीलबावांस सांगोन सोडवावें. त्यावरून बाईनीं वकिलास ठेऊन घेऊन, राजश्री सुभेदारांस पत्रें लिहिलीं आहेत कीं, यांचा बंदोबस्त करून देणें. कलम १.

राजश्री मुरारजी जाधव भोइंजकर यांजसमागमें पन्नास राऊत आहेत. एक मास जाला, सोमाखेडी नजीक महेश्वर येथें आहेत. राजश्री यशवंतराव फणशे यांचें कर्ज रुपये १५०० घेतलें. त्यांचें देणें. ते जाऊं देत नाहीं. त्यांचें देणें वारून देशीं जाणार ह्मणोन वर्तमान ऐकतों. बाईचे भेटीस येत होते, परंतु बाईनीं सांगितलें कीं, भेटीचें अगत्य नाहीं. परभारें मर्दान्याचे घांटें उतरून जाणें. असें उत्तर दिलें. कलम १.

राजश्री चिमाजी बुळे लोकांसुद्धां येथेंच आहेत. त्यांचा व दिवाणांचा फडणिशीचा लढा आहे. आनंदराव बावाजी दिवाण व निळकंठ जनार्दन फडणीस यांस दूर करून नवे दिवाण, फडणीस करावे, हा आग्रह धरून येथेंच आहेत. चाकरीस जात नाहींत. बाईच्यानें नेट धरून त्यांजला लष्करांत पाठवीत नाहीं. येविषयीं राजश्री सुभेदारांचीं पत्रें येतात. दोन वर्षें बुळे येथेंच आहेत. कलम १.

राजश्री लक्ष्मणराव कृष्ण परांजपे यांजला बाईनीं रामपुऱ्याचे मदतीस पाठविलें. चंद्रावताच्या कजिया रामपुऱ्यासी लागला आहे. दहा पांच गांव चंद्रावतांनीं मारले. तेथील का॥ राजश्री गणपतराव विष्णु यांची मामलतदार मातबर, परंतु महालीं आठवडे गुमास्ते जातात. एकावर इतबार रहात नाहीं. त्यामुळें मामलत खराब जाली. तिगस्तां चार लक्ष रुपये दिले, त्यांपैकीं रदकर्ज हा कालवर पडलें नाहीं. कलम १.

नारायणजी बारगळ यांचे शरीरीं समाधान नव्हतें. भगींद्राचा उपद्रव फार जाहला, त्यामुळें श्रमी फार होते. मध्यें ब्राह्मणाचा द्वेष उत्पन्न जाहला. बाई समाचारास गेली, तिजबरोबर ब्राह्मणमंडळी येऊं दिली नाहींत. अशी रीत जाली होती. येथून निरोप घेऊन घरास जात होते. सेंदव्यापावेतों गेले. तेथें वैशाख व॥ १३ स काळ जाला. दोघे पुत्र आहेत व कुटुंब आहे. पागा पथक लष्करांत चाकरीस सुभेदारांपाशीं आहेत. कलम १.

धरणेकर धोकलसिंग राजा व राणी त्यांजकडून सरकारांत वकील जावयास येथें आले. बरोबर सिताराम बैरागी आहे. हत्ती छावा, नग एक, वगैरे नजर घेऊन सरकारांत येतात. चंद्र २८ साबानीं बाईची भेट घेतली. पत्रें राजांचीं देऊन, निरोप घेऊन आज उद्यां इतके रेवापार होतील. कलम १.

एकूण कलमें सात ७

सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०५.

श्री. २६ जुलई इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १३ माहे जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—

राजश्री आबाजी नाईक वानवळे लष्करांतून देशीं जावयाकरितां महेश्वरीं छ ७ मिनहूस आले. तों त्यांचें घरचें पत्र आलें. नाईकांची मातुश्री पंचत्व पावली. आठवे दिवशीं वर्तमान कळलें. त्यानंतर उत्तरकार्य करून छ मजकूर पार गेले.

हजार रुपयेपावेतों धर्म, दान भूयसीशिवाय दीड हजारपावेतों धर्म केला. पुढें पैठणास गेलियानंतर विशेष धर्म करणार ह्मणोन ऐकिलें. कलम १.

नायकास दुखवट्याचीं वस्त्रें बाईनीं व कारभारी यांनीं एक एक शेला पांघरविला. सर्वांबरोबर मींही एक शेला सा रुपयांचा आंगावर घातला. कलम १.

नायकांसमागमें हत्ती नग २ व घरपागा पाऊणशें घोडीं व उंट रथ गाडी सरंजाम, वडील पुत्राची स्त्री, येणेंप्रमाणें व पंचवीसपावेतों ब्राह्मणमंडळी व शिपाई बरकंदाज दोनशेंपावेतों लोक होते. कलम १.

राजश्री अल्लीबहादूर व राजश्री सुभेदार या उभयतांची खराबी सांगितली. त्यांत सुभेदाराचे चालीस बहुतकरून स्तव ऐकिलाच नाहीं. कारभारी यांकडे दोष नसतां आब घेतली. पंधरा लक्ष घेतले, तेच आजपावेतों भक्षिले. पुढें कोठें कांहीं नाहीं व जयपुरचेंही बनत नाहीं. सामर्थ्य असावें, तर कोणी लवून गोष्ट सांगावी, तो प्रकार नाहीं. अल्लीबहादूर आहेत तोंवर श्रम. ते वेगळे जाले तर त्यांची स्थिति राहाणार नाहीं. असें सांगत होते. कलम १.

राजश्री नाईक छ ११ मिनहूस बाईचे दर्शनास हवेलीस आले. समक्ष भाषणें जालीं. बाईचे चित्तांत याजविषयीं राग होता. यांनीं राजश्री सुभेदार यांस आडवून कर्जाचा निर्गम करून घेतला. व्याजास व्याज व मनोती मनस्वी घेतलें. फेरखत केलें आहे, त्याचा उल्लेख कांहींच न केला. बहुत समाधानाच्या गोष्टी सांगितल्या. त्यांनीं बहुत स्तुति केली. प्रसन्न करून पोटास कांहीं योजना करून द्यावी. यांनीं मान्य केलें. पुढें घडेल तेव्हां खरें! छ १२ रोजीं निरोपास आले. वस्त्रें बाईनीं दिलीं. मेजवानीचें साहित्य चांगलें, बारीक खानदेशी तांदूळ, देशींची ज्वारी वीस शेर, व पोहे येणेंप्रमाणें दिलें. वस्त्रें शालजोडी व पागोटें दिलें. कलम १.

नायकाचे जबानीचें वर्तमान–राजश्री पाटीलबावांची तारीफ, सावधानी बहुत. हिंदुस्थानांतील बंदोबस्त चांगला केला. दिल्लीस फौज येऊन व मथुरेचा व मेवाडचा बंदोबस्त करून, आपण छावणीस श्रावणमासीं उज्जनीस येणार. जोतपुरचा कारभार जरब देऊन केला. क्रोड रुपयापावेतों नक्त व महालसुद्धां ऐवज लावून घेतला. उज्जनीस दोन महिने राहून, आश्विन मासीं देशीं जाऊन श्रीमंतांचें दर्शन घ्यावें ह्मणोन आबाजी सांगत होते. कलम १.

बावांसांगातें तोफखाना व पलटणें व फौजसरंजाम भारी घेऊन येतात. तोफा दीडशें दोनशेंपावेतों बराबर आहेत. कलम १.

एकूण कलमें सात ७

सेवेसीं श्रुत होय हें विज्ञापना.”

# लेखांक २०६.

श्री. १७ आगष्ट इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ५ माहे जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ २८ जिल्काद व छ १ जिल्हेजचीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं, त्या पत्रांबराबर राजश्री आनंदराव गंगाधर यांचीं पत्रें पाठविलीं आहेत. त्याउपरी काल छ ४ जिल्हेजीं आनंदराव गंगाधर यांचें पत्र आलें, तें बजिन्नस पाठविलें आहे. त्यावरून श्रवण होईल. इकडील वर्तमानः—राजश्री पाटीलबावा राणाजीचा पक्ष धरून भीमसिंगास माजी करणार. त्यावरून जमाव सुद्धां हमीरगडास महसरा करून गड घेतला. तेथें भीमसिंगाचा कुंवर होता, तो धरून त्यास आलंकार पायांत घालून अटकेंत ठेविला. मालियत, गल्ला व जिन्नस दारूगोळी व घोडीं चारशेंपावेतों सांपडलीं. गल्ला फार सांपडला. आणिकही मालियत बहुत निघाली. भीमसिंगास तगादा कीं, तुह्मीं किल्ला खालीं करून राणाजीपाशीं जावें; किल्ला चितोडचा आह्मांस द्यावा; असा तगादा केला. त्यावरून भीमसिंगांनीं सांगून पाठविलें कीं, चितोडासीं माझें शीर लागलें आहे, हें गेल्यावर कोणीही किल्ला घेवोत. असें त्यांस सांगून, सुंदरनाथ वकील, गंगाजल-निर्मळ अहिल्याबाईकडे पाठविला. त्याचें बोलणें कीं, तुह्मीं मदत करावी. खर्च पडेल तो आह्मी देऊं. अथवा कोणी मातबर भला माणूस पाठवून, पाटिल-बावांचा आमचा स्नेह करून द्यावा. हें होत नाहीं तर आह्मांस उत्तर द्यावें. त्यावरून बाई विचारांत पडले आहेत. आपले ठिकाणीं बोलतात कीं, भीमसिंगाचा पक्ष धरून पाटीलबावांशीं विरुद्ध करावें हें ठीक नाहीं, व कोणी मातबर पाठवावया योग्य नाहीं. कोणी पाठविल्यास पाटीलबावाही ऐकत नाहींत. या अंदेशांत पडोन राजश्री सुभेदारांस पत्र गेलें आहे. त्याचें उत्तर येईल त्या अन्वयें वकिलास सांगणार. कलम १.

राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं आहेत कीं, आमचा व जयपूर-कराचा भाईचारा पूर्वींपासून आहेच. सांप्रत त्यांनीं रामपुरा खाली करून दिला, त्याप्रमाणें किल्ल्यांत अंमल जाला. जयपुरकराचें बोलणें, आमचे भाईबेटे आह्मांसी बदलून आहेत, त्यांचें पारिपत्य तुह्मीं करावें ह्मणोन ह्मणतात, व आपला ऐवजही खंडणीचा द्यावा लागतो. त्यास, तुह्मीं चिरंजीव राजश्री काशीराव होळकर यांची रवानगी, पांच हजार फौज देऊन करावी. खर्चाची बेगमी पोक्त करून द्यावी. ऐशीं पत्रें आलीं. त्या दिवशींच देशींचे माहाल व इकडील माहालची

याद करून सावकारास ऐवज लाऊन दिला. श्रावणअखेरीस रवानगी करतील. सरकारांतही पत्रें सुभेदारांनीं लिहिलीं, ते बाईनीं दादाजीकडे पाठविलीं आहेत. ते पावले असतील. कलम १.

श्रावणमासाचें ब्राह्मणभोजन, नित्य ब्राह्मण चार हजार जेवितात. शिवाय एक हजार ब्राह्मणांचे शिधे नित्य होतात. सर्वांस अनुष्ठान, जप व पार्थिवलिंगें व शिवकवच व नमस्कार सांगितले आहेत. कलम १.

राजश्री मल्हारराव होळकर यांजपाशीं आपाजी राजाराम कारकून पारनेरकर आहे. त्याचें पत्र, लढाई राजश्री बहिरोपंत व शामराव यांशीं जाली, ह्मणोन पत्र आलें. त्यांतील वर्तमान आलादा पत्रीं लिहिलें आहे. त्यावरून श्रवण होईल. सरकारच्या फौजेसीं लढाई केली ह्मणोन, सौभाग्यवती रखमाबाईनीं निषेध करून लिहिलें आहे ह्मणोन ऐकिलें. कलम १.

एकूण कलमें चार असेत सुमारी.

सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०७.

पौ चंद्र २७ मोहरम तिसैन. **श्री.** १ सप्टेंबर इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २० माहे जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री तुकोजी होळकर यांणीं मथुरेपासून महेश्वरपावेतों डांक बसविली, ती चंद्र १२ जिल्हेजीं येथें आली. बाईस पत्रें लिहिलीं होतीं कीं, "आमचे खर्चाची तारांबळ फार आहे. कर्ज जालें. मोहिम साधली नाहीं. राजश्री बापूजी होळकर व काशीराव होळकर हे वगैरे लोक आडवून बसले आहेत. पैसा कोठून येत नाहीं. कोठ्यास पागा पाठवून ऐवज घेऊन पाठवणें. कांहीं तुह्मी मदत कराल तर स्थिति राहील. नाहींतर सोय पडत नाहीं. राजश्री पाटीलबावांस हिस्सा मागावा, तर सोय नाहीं. तूर्त आलों. आतांच वांटा ह्मणावा तर ते देतात, हें कळतच आहे. तत्रापि आह्मी जाबसाल करितों कीं, तुमचा आमचा भाऊपणा. एक भाऊ घरीं असतो, एक कमाई करितो; परंतु वांट्यास उभयतां बराबर आहेत. नेहमीं राजश्री नारोपंत, त्यांजपाशीं जाबसालाकरितां ठेविले आहेत." याप्रमाणें पत्रें बाईस आलीं. डांक बसविली. वरचेवर याच मजकुराचीं पत्रें येतात, व खासगी खिजमतगार पाठविला, त्याचें नांव बहिरू. त्याचे जबानीं सांगून पाठविलें कीं, नारोपंत कामांत मन घालित नाहींत. पारनेरकर कारकून मंडळी, त्यांचें व नारोपंताचें विरुद्ध लागलें

आहे. कामकाज दुईमुळें नीट होत नाहीं. असें कित्येक लहान मोठें सांगून पाठविलें. खिजमतगार येथें चंद्र १५ जिल्हेजीं आला. सौभाग्यवती रखमाबाई इंदुरीं आहेत. देपालपूर व पिंढावें व रामपुरा येथें उपद्रव कमाविसदारांस दिला. त्यामुळें कमाविसदार यांनीं बाईस पत्रें पाठविलीं कीं, रखमाबाईनीं फर्मासीच्या चिठ्या केल्या आहेत. आह्मीं ऐवज कोठून द्यावा? तुह्मी रसद घेतां. आमचीं फाजलें मुबलक असून इकडील उपद्रव लागतो. त्यावरून बाईनीं रखमाबाईस पत्र लिहिलें कीं, तुह्मी परभारा उपद्रव मामलेदारांस करितां, हें ठीक नाहीं. फर्मासीसाठीं राऊत पाठविले तें बोलावून घेणें. त्याचें उत्तर रखमाबाईनीं पाठविलें कीं, फर्मासीचा ऐवज आपण द्यावा; राऊत बोलावून घेऊं. असें पत्र आल्यावर आपले ठिकाणीं श्रमी जाली. राजश्री महादजी शिंदे यांचें पत्र बाईस आलें होतें कीं, आमच्या शरीरास समाधान नव्हतें; परंतु आतां आराम जाला आहे. राजश्री तुकोजीबावाच्या आमच्या भेटी जाल्या. तुह्मांस कळावें. इतकें पत्रीं लिहिलें होतें. बाईनीं सावकारापासून तूर्त कर्ज घेऊन राजश्री तुकोजीबावाकडे रवानगी करणार. दोन लक्षांची तजवीज केली आहे. रवाना करावयास मास पक्ष पाहिजे. येवल्याची पाटिलकी सुभेदार यांनीं घेतली. तेथील मोकासा आंबीकराचा व जहागिर राजश्री शिवाजी विठ्ठल यांची. त्याजविषयीं सरकारचीं पत्रें बाईस आलीं कीं, पाटिलकीचा हक्क वाजवी न घेतां मोकासियाचे व जहागिरीचे अमलास खलेल करितात. तर गुमास्ते यांस लिहून वाजवी रीतीनें पाटिलकीचा हक्क घेऊन, आह्मांस दिक्कत न पडे तें करावें. येथून सरकारच्या पत्राचीं उत्तरें गेलीं, चिरंजीव देशीं असतां वहिवाट जाली, त्याप्रमाणें पुढें चालेल. यांच्यांनीं निस्तुक होत नाहीं. सौभाग्यवती रखमाबाईनीं पागा येवल्यास पाठविली आहे, ह्मणून ऐकिलें. त्यावरून सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २०८.

श्री. ९ आक्टोबर इ. स. १७९०.

"विज्ञापना तागाईत चंद्र २९ मोहरमपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान तर पुढें फौजा मेडत्याचे मुक्कामीं होत्या. त्याहून गोपाळराव चिटणीस मात्र कूच करून तीन कोस पुढें गेले. होळकर व शिवाजी विठ्ठल व बळवंतराव हे येथें राहिले आहेत. होळकर ह्मणतात कीं, जप्ती व खंडणी वगैरे ते घेतात, आह्मांस एक पैसा देत नाहीं; तेव्हां आह्मी जात नाहीं. सुभेदार यांची आज्ञा येईल त्याप्रमाणें करूं. येथें सुभेदार यांनीं नारो गणेश यांची

अप्रतिष्ठा फार केली. तवे तापवून पुढें टाकिले व गळ्यांत सांखळदंड हत्तीचा गळ्यांत घातला. आंगास जामग्या लाविल्या. मिरच्याची धुरी दिली. राखेचा तोबरा दिला. कांही केल्यास ऐवज कबूल न होय. हल्लीं तीस लाख रुपये कबूल जाहला. तितका फडशा करून घेत आहेत. पुढें आणिक निकड आहे. घराची जप्ती केली. अंगावर एक वस्त्र मात्र ठेविलें आहे. बायकोनें त्यास सांगितलें कीं, "कां अप्रतिष्ठा करून घेतां? जें काय असेल तें देणें. भीक मागून खावूं." नारोपंतांनीं आनंदराव यांस बोलाविलें होतें. सुभेदार यांची परवानगी आली मग गेले. त्यास सांगितलें कीं, लेकास हातीं धरून यमुनेंत जातों. जें असेल तें देतों. मला संन्यास द्यावा. याप्रमाणें सुभेदार यांस सांगितलें. ते बोलले कीं, पन्नास लाख घेईन. येथें न दिल्यास बाईकडे पाठवून घेईन. परवाचे दिवशीं राणेखानभाई पाटीलबावांनीं सुभेदार याकडे पाठविले कीं, इतकी अब्रू त्याची घ्यावयाची नव्हती. त्याजवरून बहुत रागें भरले कीं, तुह्मांस आमचे घरांत बोलावयास कारण काय, वगैरे आणीक बहुत रागें भरले. मग ते गेले. कळावें. बावांचें यांचें अद्याप कांहींएक जालें नाहीं. शिवाजी विठ्ठल मध्यस्त आहेत कीं, तुह्मांस मुलुख लावून देतों. बंदोबस्त करून देववितों. तुह्मीं राहावें. गोसावी बावांचे हातीं द्यावा असा करार आहे, त्याप्रमाणें तुह्मीं द्यावा. याप्रमाणें निश्चय करून, उदयीक शिवाजी विठ्ठल व आपाजीराव दाभोळकर मथुरेंत राहिले आहेत. ते पाटीलबावांकडे जाणार. हल्लीं पत्रें आलीं त्यांत, श्रीमंतांची आज्ञा अल्लीबहादूर यास आहे कीं, तुमचा बंदोबस्त यांनीं चांगला वसुली मुलूख पंचवीस तीस लक्ष, तुमचा खर्च अगदीं नालबंदी वगैरे मागील कर्जसुद्धां फडशा होय, अशी सोय जाहलीयास राहणें. नाहींतर एक दिवस न रहावें, उठून देशास यावें. याप्रमाणें उभयतांस पत्रें आहेत कीं याचा बंदोबस्त याप्रमाणें करून देऊन ठेवणें असल्यास ठेवावा, नाहींतर ठेवूं नये असें आहे. मग उद्यां हें पत्र देणार आहेत. काय होईल तें पहावें हें विज्ञापना."

---

## लेखांक २०९.

**श्री.** १५ आक्टोबर इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ६ माहे सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–चंद्र २१ मोहरमीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. सांप्रतचें वर्तमानः– राजश्री पाटीलबावा भाद्रपद शुद्ध १५ पौर्णिमेस राजश्री सुभेदार यांचे डेऱ्यास येऊन, एक प्रहरपावेतों एकांत करून माघारें आपल्या डेऱ्यास गेले. त्याचे दुसरे

दिवशीं वद्य १ राजश्री नारो गणेश बमय कबिले व चिरंजीव सुद्धां अटकेंत ठेऊन, गारदी दोनशें व बारगीर दोनशें ठेविले. कारकून हस्तगत जाले; कांहीं पळाले. येणेंप्रमाणें वर्तमान जालें, व पत्रें बाईस सुभेदारांनीं लिहिलीं होतीं. कलम १.

राजश्री मुकुंदराव हरी, राजश्री नारोपंताचे भाचे, यांनीं बाईस लागू होऊन मनसुबा केला कीं, मी येथून कारकून पाठवून त्यांची मुक्तता करून येथें नारोपंतास आणावें. आपण वडील आहेत. येथें आणून काय करणें तें करावें. त्यावरून त्यांचे मर्जीस्तव राजश्री नारो विश्वनाथ पूर्वीं गेले होते, ते चंद्र ५ सफरीं बिदा केले. राजश्री सुभेदार यांस पत्रें लिहिलीं कीं, माणूस कोठें मिळतें? नारोपंताची अब्रू घेतली हें ठीक केलें नाहीं. तर त्यास आह्मांकडे पाठवून देणें. येथें आल्यावर तुमचे अनुमतें घडेल. कलम १.

राजश्री सुभेदार यांनीं दिवाणगिरीचें काम खासगीकडे ठेऊन, तूर्त मुतालकी राजश्री पाराशर दादाजींस सांगितली आहे. तेच काम करितात. कलम १.

जयपूरकराची फौज व इस्माइलबेग हे बिजेसिंगाचे फौजेंत सामील जाले. कलम १.

येथील खर्चाविषयीं विनंति पूर्वीं लिहिलीच आहे. त्याविषयीं आज्ञा जाली नाहीं. बहुत दिवस जाले, परामर्ष जाला नाहीं. येथें कर्जही कोणी देत नाहीं. उपाय काय करावा? आजपावेतों राजश्री कृष्णाजी नाईक थत्ते यांचा ऐवज, असाम्याकडे होता तो घेत गेलों, त्यांचाही तगादा आहे. नित्य कृत्याचें चाललें पाहिजे. अडचण जाणोन विनंति लिहिली आहे. बाईकडून आमचे विषयीं नामस्मरण नाहीं. यंदा सर्वत्रांची समजावीस जाली, परंतु इकडल्याविषयीं अनुकूळ पडलें नाहीं. मीही त्यांस हटकीत नाहीं. लिहिणें तें स्वामींसच लिहितों. कलम १.

राजश्री सुभेदार यांनीं खिजमतगार पूर्वीं बाईकडे पाठविले होते कीं, आमचे कारभारी यांसीं बनत नाहीं. दुसरा कारभारी करावा. त्याचें उत्तर त्यांणीं पाठविलें नव्हतें. खिजमतगार ठेऊन घेतले होते, ते हल्लीं खिजमतगार व कापड खरेदी केलें तें, चंद्र ५ सफरीं काल रवाना केलें. कलम १.

दिवाणजीवर चौकी बसली, हें वर्तमान कळल्यावर बाह्यात्कारें मात्र वाईट केलें ह्मणोन बोलतात. आंतून संतोष, चांगलें केलें, आपलें घर पहावें हे रीतच आहे, ह्मणून मानितात. कलम १.

राजश्री महिपतराव गिरमाजी पारनेरकर येथें आले. त्यांसीं खलबत होत असतें. त्यांनीं विचार करून मुजरद कासद पुण्यास रवाना केला, तो चंद्र ३

सफरीं येथून बिदा जाला. त्याजबरोबर पत्रें राजश्री दादाजींस आहेत ह्मणून कळलें. सरकारांत लिहिलें न लिहिलें याचा शोध लागला नाहीं. नारोपंताचें वर्तमान आल्यावर तो मजकूर लिहून पत्रें पाठविलीं आहेत. कलम १.

राजश्री बापूजी होळकर व काशीराव होळकर यांचीं पत्रें भाद्रपद वद्य ३ चीं आलीं मेडत्याचे मुक्कामीं. तेथें वर्तमान बिजेसिंग यांनीं पैगाम सलुखाचा केला आहे, सलूख करावा ह्मणून पत्रें पाठविलीं. हें वर्तमान आह्मीं वडिलांस लिहिलें आहे. त्यांचें उत्तर येईल तसें केलें जाईल. कलम १.

राजश्री मल्हारराव होळकर जमावसुद्धां चांदवडाबाहेर होते. तेथून जमाव घेऊन राजश्री आनंदराव होळकर यांजवर चालून आले. त्यांची यांची लढाई भाद्रपद वद्य १३ त्रयोदशीस जाहली. यांजकडील दहा वीस माणूस ठार जालीं व कांहीं जखमी जालीं. दुसरे दिवशीं वद्य १४ चतुर्दशीस राजश्री आनंदराव होळकर जमाव घेऊन त्यांजवर गेले. पुन्हा लढाई जाली. मल्हारराव यांचा मोड केला. दहा पांच घोडीं पाडाव करून आणलीं. त्यांचा जमाव बाहेर होता, तो चांदवडांत नेऊन घातला. येणेंप्रमाणें पत्रें राजश्री आनंदराव होळकर यांचीं बाईचे नांवें आलीं. याच लढाईंत फडच्या ( फडशा ) होता, परंतु अंदेशा करणें प्राप्त ह्मणून हयगय केली. ह्मणून पत्रें लिहिलीं होतीं. कलम १.

एकूण कलमें सुमारें दहा आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक २१०.

**श्री.** १३ नोवेंबर इ. स. १७९०.

''सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे रविलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री सुभेदार बनासे नदी भिलाड्यानजीक आहेत. चवडावन व राणाजी उभयतांकडील वकील आहेत. कोठून पैसा प्राप्त नाहीं. भीमसिंगाकडे टाणीं आहेत तीं घेऊन दिलीं, तर राणाजी कराराप्रमाणें खंडणी देतील. जोंपावेतों राजश्री अलीबहाद्दर यांसमागमें होते, तोंपावेतों दाब होता. ते कूच करून गेल्यावर कमी पडली. मेवाड, टोंक वगैरे याच मुलुखांत फिरतात. सौभाग्यवती रखमाबाई आली, ती इंदुरास येऊन राहिली. राजश्री मल्हारराव होळकर येथें बाईपाशीं आले आहेत. राजश्री नारो गणेश यांचें कुटुंब, महेश्वरीं येऊन राजश्री मुकुंदराव हरी यांचे घरीं राहिलें आहे. नारोपंत यांची आज्ञा कुटुंबास कीं, रांझ्यास जाऊन रहावें, तूर्त येथेंच आहेत. राजश्री यशवंतराव

फणसे यांची कन्या राजश्री चिमाजी बुळे यांचे पुत्रास देऊं केली. मार्गशीर्ष शुद्ध १० चें लग्न नेमलें आहे, आहेर करावे लागतात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २११.

श्री. ५ डिसेंबर इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ माहे रबिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री पाटीलबावांनीं चितोडास मोर्चे लाविले आहेत. पूर्वीं पातशाहांनीं टेकडी बांधून तोफा चढविल्या होत्या, त्याच टेकडीवर सांप्रत तोफा चढवून मारगिरी करून दोन बुरुज उडविले. तोफा लागू जाल्या आहेत. किल्ला घेतील असें वर्तमान आहे. राजश्री सुभेदार यांजकडील जाबसाल हा कालवर निर्गम नाहीं. जयपूरकर दिवसगतीवर घालून खराबा करितात. यांजपाशीं फौजेचा जमाव नाहीं. त्यामुळें श्रम पावतात. दबाव नाहीं. राजश्री अलीबहादर फौजेसुद्धां झांशी प्रांतीं आहेत. दतीया, वोंडसे वगैरे जमीदार यांजकडून दोन लाख रुपये घेतले. समागमें राजश्री शिवराव हरी आहेत. आणखी जमीदार त्या प्रांतीं आहेत, त्यांजपासोन खंडणी घेऊन पुढें बुंदेलखंडाकडे जावें, असा विचार आहे. राजश्री आनंदराव गंगाधर वकील, राजश्री सुभेदारापाशीं आहेत. त्यांचें पत्र दीड महिना येत नाहीं. मग त्यांचें वर्तमान काय तें कळत नाहीं. येथून पत्रें पाठविलीं, त्यांचें उत्तर येत नाहीं. राजश्री पाटीलबावांचे लष्करांत माहागाई फार जाली आहे. चार शेर सारी जिन्नस ! तत्रापि स्थळ घेऊन उठावें असें मानस, त्यांजकडील खिजमतगार देशीं गेले त्यांनीं सांगितलें. उदेपुरचे राणाजी समागमें आहेत. त्यांचा अभिमान धरून भीमसिंगाचें पारिपत्य करावें. येणेंकरून होळकरांस समाधान नाहीं. आपले ठिकाणीं श्रमी आहेत. येविषयीं राजश्री सुभेदाराकडे वकील गेले, येथें आले, परंतु दोन्हींकडून उपराळा भीमासिंगाचा जाला नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २१२.

श्री. ५ डिसेंबर इ. स. १७९०.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ रबिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ १५ रबिलावलीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं

आहेत. त्यानंतर इकडील अर्थ, मामलेदार जमा जाले आहेत. अंबाडची मामलत राजश्री वामनाजी हरीकडे सांगून दोन महिने जाले, हा कालवर ठाणें दाखल अंमल जाला नाहीं. खंडो बाबूराव कुटुंबसुद्धां महेश्वरीं आहेत, त्यांच्या हातच्या सोडचिठ्या ४ घेऊन वामनाजी हरींनीं पाठविल्या, तत्रापि ठाणें देत नाहींत. शिबंदीचा अडथळा घालून बसले आहेत. रुबरू बाईनीं ताकीद केली असतांही जबरदस्तीनें अंमल सोडीत नाहीं. खावंदगिरी जरबच नाहीं. वामनाजी हरीपासोन दीड लक्ष रुपये घेऊन सावकाराकडे दिले. हे वाण्याची गत. यावेगळी रयत व जमीनदार आंबाडचे आले, त्यांनीं तकरीर लिहून दिधली. त्यांची रुजवात कलमाची समक्ष करून त्यांचे आंगीं लागल्यास लागूं देत नाहींत. मोठे धट्ट मोजीतच नाहींत. पुढें कसें घडेल तें लिहीन. रावेरचे मामलेदाराकडील हिशेबास राजश्री भास्करपंत आले आहेत. त्यांचें फाजील कांहीं नाहीं. परंतु सावकारीचा ऐवज कर्जाऊ आहे. वरकड मामलेदार आहेत; हा कालवर कोणाचा निर्गम नाहीं. इकडे पर्जन्य अतिशय दोन दिवस जाला. असा कधींही जाला नाहीं. कार्तिक वद्य ९ व दशमी दोन दिवस प्रळय जाला, पिकें नासलीं. रबीचीं पिकें येतील, खरीप गेलें. माहागाई जिन्नस आठ नऊ शेर होते, ते वीस शेर जाले आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २१३.

**श्री.** ७ जानेवारी इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ २२ माहे रबिलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बहुत समाधानाचीं आलीं कीं, आह्मी लवकर यावयाचें करितों. राजाची भेटी व्हावी इतका गुंता आहे; त्यास राजेही बाहेर डेरेदाखल जाले. पौष शु॥ ५ चा करार भेटीचा जाला आहे. यास्तव येतां येत नाहीं. भेटी जाल्यानंतर लौकरच वडिलांचे भेटीस येतों. आपण उदास होऊं नये. श्रीमहायात्रेस जावयाचें न करावें. येथील कारभारी आहेत, त्यांस पत्रें पाठविलीं कीं तुह्मीं मातुश्रीचें समाधान राखून उदास न होत तें करावें. आह्मी लवकरच येतों. अशीं पत्रें कारभारी यांस आलीं. राजेश्री बापूजी होळकर यांस जयपूर प्रांतीं ठेवून सडे आह्मी येतों. सांप्रत राजेश्री आनंदराव गंगाधर यांचे लाखोटे ३ तीन आले आहेत ते बजिन्नस

पाठविले. डाक बसावयाची आज्ञा जाली ह्मणोन ऐकिलें. त्यास कासदजोडी एक पुण्यास गेली. एक जोडी; त्यापैकीं एक आसामीस आराम नाहीं; आसामी एक राहिली. ती छ २२ रविलाखरीची डाक पाठविली. त्याचे दुसरे दिवशीं तीन लाखोटे एका दिवसाचे आंतेरें आले. आठ दिवस लाखोटे राहिले. हल्लीं सेवेसीं पाठविले आहेत. तेथील वर्तमान श्रवण होईल. गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांचेंही समाधान सर्वांनीं केलें आहे. कारभार करायास लागली आहेत. दोन चार दिवस जाले, दरबार करूं लागली. मामलेदार जमा जाले. त्यास निरोप, हिशेबाचा निर्गम करून देणार. राजश्री संताजी होळकर यांजकडे खाजगी गांव आहेत, त्यांचा हिशेब येथेंच बाईपाशीं द्यावा ह्मणोन राजश्री सुभेदार यांणीं लिहिलें. त्यावरून ते हिशेबासाठीं आले. त्यांजकडे शिलकही सरकारचे हिशेबीं निघते. त्याजविषयीं बाईनीं त्यास तगादा लाविला आहे. त्याचा खर्च ते दाखवितात. पुढें ठरेल तें खरें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २१४.

श्री. ३० जानेवारी इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—छ ११ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलीं आहेत, प्रविष्ट जालीं असतील. राजश्री आबाजी नाईक वानवळे येथें येऊन देशीं गेले. हें वर्तमान पेशजीचें पत्रीं लिहिलें आहे. त्यांचें खलबत जालें, त्यांतील मजकूर समजला तो लिहिला असे. त्यांनीं होळकराचे दवलतीविषयीं बाईपाशीं बहुत निषेध केला. नारो गणेश यांजकडे दोष नसतां, राजश्री सुभेदार यांनीं त्यांची अब्रू घेतली. घेऊन पैका काय घेतला? पंधरा लक्ष रुपये घेतले. ते आजपावेतों भक्षिले. पुढें ठिकाण नाहीं. यापूर्वी मीच रदबदली करीत होतों कीं, राजश्री नारोपंत याचा आब घेऊं नये. याजकडून वीस लक्ष रुपये देवितों. त्याचा कारभार त्याजकडे असों द्यावा. तें न ऐकतां कर्म केलें, तें नाश मात्र केला. रांगडे रजवाडे याजकडील दाब कमी होऊन जयपुरचे मामलतीचा बंदोबस्त न जाला. जयपूर प्रांतीं सुभेदारांनीं जप्ती करून ऐवज घेतला. त्याचे रुजवातीस यादी रांगड्यांनीं लिहून आणिल्या, त्यांत गांव गांवभेट व तरकारी व पानपत्रावळी व नक्त ऐवजसुद्धां यादी केल्या. पांचा लक्षांच्या यादी केल्या त्या मुजरा घेऊन बारा लक्ष रुपये राहिले ते पटाइतावर वराता करून देतों असें रांगडे ह्मणतात. सतरा लक्ष रुपये

मामलतीचे ठरले त्याची योजना अशी केली. यांचे पदरीं पडावयाचें नाहीं. रामपुराही सुटत नाहीं. ह्मणून मजकूर केला. नाईक गेलियावर पाठीमागें बोलली कीं, दौलत बुडते. त्यास माझें काय बुडावयाचें आहे ? दाभाड्याची दौलत पन्नास साठ वर्षें बुडत बुडाली. माझा जीव आहे तोंवर चिंता नाहीं. मागें कांहीं का न होवो! अशीं भाषणें केलीं, ह्मणोन ऐकिलें तें सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २१५.

श्री. ३० जानेवारी इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५ माहे जमादिलावलपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—गंगाजलनिर्मळ अहिल्याबाई होळकर यांचे नांवें छ २५ व २६ सवालीचे दोन लाखोटे सादर जाले, ते छ १८ जिल्कादीं पावले. मुजरद जोडीच आली. पत्रें पावल्यानंतर दोनही लाखोटे पावते केले. दरबारांतच अक्षरशः राजश्री मुकुंदराव हरी त्यांनीं वाचून दाखविले. वर्तमान ऐकून संतोष पावली. कर्नाटक प्रांतींचा बंदोबस्त व शत्रूचें पारपत्य चांगलें जालें. परंतु पुरता टिपूचा बंदोबस्त जाला नाहीं; तोही श्रीमंतांच्या प्रतापें घडेल. छावणीस फौजा तुंगभद्रेचे अलीकडे राहिल्यास उत्तम आहे. टिपूचा जमाव तुटक नाहीं, त्या अर्थी तुंगभद्रेचे अलीकडेच छावणीचा प्रकार चांगला असें उत्तरें केलीं. दोन दिवस जासुदास ठेवून पत्राचें उत्तर सरकारांत स्वामींचे नांवें लिहून दिधलीं तीं बजिन्नस सेवेसीं रवाना केलीं आहेत. राजश्री मल्हारजी होळकर हे वाफगांवीं जाऊन गांव बळकावून बसले. त्यावरून सरकारच्या फौजेशीं लढाई मातबर जाली. उभयतांकडील घोडीं व माणसें ठार जालीं. राजश्री शामराव हिवरेकर याजशीं लढाई जाली. राजश्री बहिरोपंत सामील नवते ह्मणोन येथें वर्तमान बाईस आलें तेव्हां, मल्हारराव याजपाशीं जमाव आहे तोच आहे त्यामुळें शेर जाले आहेत. महाराजांचे मनांत त्यास जाया न करितां पुण्यास आणावें, परंतु ते माणसें केवळ नीचाचे सोबतीचीं आहेत. येथें होते तेव्हां त्याचे गुणदोष लिहीतच होतों, त्याचें पारपत्य चांगलें करावें. अमर्यादानरूप जालें पाहिजे. त्याजसमागमें लोक आहेत त्यास देहेनगी भारी देतो, आणि त्या लोकांस कोणी मागें पुढें नाहीं यामुळें जमाव तुटत नाहीं. वाफगांवीं आहेत; बाहेरून फौजेचा घेरा घालावा. आंतच जेर करून निर्माल्य केले ह्मणजे हस्तगत होतील. मल्हाररावसंबंधीं खर्च पडेल तो

होळकर देतील. राजश्री दादाजीस बाईनीं लिहिलें आहे असें ऐकिलें. सौभाग्यवती रखमाबाईचें गतवर्षी बोलणें होतें कीं, चिरंजीवास धरून मजकडे पावते करावें. हें सरकारांतून जालियास मी यासंबंधीं खर्च पडेल तो देईन, असें बोलणें मजशींच जालें होतें. त्यास दिवस बहुत जाले. त्याप्रमाणें घडलें नाहीं; तसाच जाबसाल राहिला. हें वर्तमान गतवर्षी सेवेसीं लिहिलें असावें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २१६.

श्री. २० मार्च इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १४ माहे रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— चंद्र ३ रजबचें आज्ञापत्र सादर जालें तें चंद्र मजकुरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं चंद्र १९ जमादिलावल व चंद्र २१ चीं पत्रें पावलीं; व चंद्र ६ व चंद्र ७ व चंद्र १० व चंद्र ११ व चंद्र २१ जमादिलाखरचीं पत्रें पावलीं. पुढें वर्तमान होईल तें लिहीत जावें ह्मणून आज्ञा. ऐसीयास, एथून चंद्र १० रजबीं विनंतिपत्रें लिहून व राजश्री आनंदराव यांचें पत्र पाठविलें आहे तें सेवेसीं पावतील. सांप्रतचें वर्तमान राजश्री सुभेदारांनीं टोंकेचे संस्थानांतील दोन गढ्या घेतल्या. दुसऱ्या दोन गढ्या, त्याचा जाबसाल लाविला आहे. राजश्री नारो गणेश फितूर रांगड्याचे गढ्याची करीत, व बोलणें लाविलें तें कोरें असें जाणून कुटुंबसुद्धां रामपुऱ्याचे किल्ल्यांत त्यांस पाठविलें. हें वर्तमान बाईस कळल्यावर फार रागें भरली. ह्मणाली कीं, उगेंच त्याचा पिच्छा घेतला आहे. बरें येथें येतों मग त्याचा जाबसाल करीन. असें भाषण मुकुंदराव हरीसीं केलें. राजश्री मल्हारराव होळकर यांस आणावें या विचारांत आहेत. फाल्गुन वद्य पंचमी जाल्यावर समजेल तें सेवेसीं लिहीन. राजश्री पाटीलबावा आज हुताशनीस बऱ्हाणपुरीं जातील. कालचा मुक्काम असेरचा होता. हल्लीं लखोटा १ आनंदराव गंगाधर यांचा आला, तो बजिन्नस पाठविला आहे तो सेवेसीं पोंहचेल. डांक उठली. आतां एक जोडी आणखी पाहिजे, येविषयींची आज्ञा जाली पाहिजे. चंद्र मजकुरीं सोमाजी लांबहाते यांस बाईनीं बोलावून एकांत केला. त्यांस मल्हारराव यांस आणावयास पाठवितात. कोणें प्रकारें त्याची खातरदारी करून आणावें, ते ह्मणतील तें ऐकावें; याप्रमाणें ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

# लेखांक २१७.

श्री. २३ एप्रील इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १९ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ २२ रजबचीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत व त्या पत्रांसमागमें आनंदराव गंगाधर यांचें पत्र पाठविलें आहे. त्याउपर इकडील वर्तमानः–राजश्री काशीराव होळकर यांस समाधान नव्हतें ह्मणून, इंदुरास कैलासवासी सुभेदार मल्हारराव यांची छत्री तेथें आहे, त्यांच्या दर्शनास गेले. एका दो दिवशीं येतील. ज्वर येत होता, नवस केला ह्मणोन दर्शनास गेले.

कलम १.

सौभाग्यवती रखमाबाई यांस पत्र सुभेदाराचें आलें कीं, तुह्मीं इंदुरास न रहावें, महेश्वरीं मातोश्रीपाशीं असावें. तुह्मांपाशीं शेटीबा वगैरे लोक आहेत त्यांस रजा देऊन महेश्वरास जाणें. अशीं पत्रें त्यांस, व येथें बाई यांस आलीं कीं, तिजला तेथें राहूं न देतां महेश्वरीं घेऊन जावें. त्यावरून बाई त्यांस पत्र लिहून येथें घेऊन आली. शेटीबा होळकर वगैरे यांस निरोप दिल्हा नाहीं. रखमाबाईची मर्जी नाहीं. जाबसाल लागला आहे. घडल्यासारखें लिहीन.

कलम १.

सौभाग्यवती रखमाबाई येथें चैत्र शुद्ध २ स आली; भेटीस गेलों. त्यांनीं एकांतीं बोलावून सांगितलें कीं, आह्मांवर इतराजी सुभेदाराची. निमित्य कीं, राजश्री नारो गणेश यांची सुटका करावी ह्मणोन आह्मीं पत्रें श्रीमंतांस पाठविलीं, असा आरोप ठेऊन इतराजी केली आहे. त्यास हें निमित्य मजकडे आलें आहे. तर याचा दोष मजकडे नसतां लटका बोभाटा सुभेदाराजवळ करणारांनीं केला आहे. त्यास श्रीमंतांस माझे तर्फेनें विनंति लिहून उत्तर आणवावें. मीं तों पत्र लिहिलें नाहीं. आणि निमित्य तर आलें. याचा परिहार करणार धणी समर्थ आहेत. याप्रमाणें समक्ष वर्तमान सांगितलें, त्यावरून विनंति लिहिली. आज्ञा होईल तैसें उत्तर देऊं.

कलम १.

राजश्री रामचंद्र कृष्ण भुस (अपूर्ण)

राजश्री नारो गणेश यांचे भाचे मुकुंदराव हरी हे दिवाणगिरीचें काम करीत आहेत. येविशीं १०।५ पत्रें राजश्री सुभेदारांचीं आलीं कीं, त्यांचे हस्तें काम घेऊं नये. तत्रापि बाईनीं त्यांजकडूनच कामें घेतलीं. सांप्रत राजश्री गोविंद रघुनाथ खासगी दिवाण आले. त्यांनीं सरकारचा निरोप सांगितला कीं, जशी

मर्जी सुभेदाराची, त्याप्रमाणें बाईनीं करीत असावें, ह्मणजे दौलतीस गोड. त्यावरून चैत्र शुद्ध १ प्रतिपदेपासोन सरकारच्या पत्रांवर व सुभेदारांच्या पत्रांवर मुकुंदराव यांणीं लिहूं नये इतकें जालें. वरकड कामकाज तेच करितात. हल्लीं पत्रें सरकारांत लिहिलीं त्यांजवर मुकुंदराव यांची विनंति जाली नाहीं. राजश्री दादाजीकडील गुमास्ते यांनीं पत्रें पुरीं केलीं आहेत. याप्रमाणें सुभेदारांकडे पत्रें जातात. कलम १.

राजश्री मल्हारराव होळकर यांस आणावयासी चिमाजीराव बुळे व सोमाजी लांभाते यांस पाठवून घेऊन येणें ह्मणोन सुभेदारांचीं पत्रें आलीं, त्यावरून बाईनीं त्यांस जावयाकरितां बहुत सांगितलें. त्यांनीं साफ उत्तर केलें कीं, आह्मी जात नाहीं. गेल्यानें तो मार्गांत नीट वर्तणूक करणार नाहीं. लटके आंदेश आमचे माथां देऊं नका. त्यावरून बाईनीं सरकारांत पत्रें लिहिलीं कीं, जमीयत सरकारची देऊन बिदा त्यांस करावें, व दादाजीस याप्रमाणें लिहिलें कीं, सरकारांत लिहिलें आहे. समागमें लोक देतील त्यांस खर्च पडेल तो आह्मी देऊं; असें ऐकिलें. सांप्रत वर्तमान कीं, मल्हारराव यांनीं तेथें पुन्हां बेकैदी करून मारामारी केली, त्याजकरितां चांगलेंच बंदोबस्तांनीं ठेऊं.

---

## लेखांक २१८.

श्री. १५ मे इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ माहे रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ २४ साबानीं विनंतिपत्रें लिहून राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील पत्रें देऊन सेवेसीं पाठविलीं आहेत. सांप्रत छ ५ साबानचें आज्ञापत्र सादर जालें तें छ रमजानीं काल पावलें. पत्रीं आज्ञा कीं, आनंदराव गंगाधर यांचे लाखोटे तुह्मीं पाठविले ते पावले. त्याचें उत्तर लिहून पत्रें पाठविलीं तीं त्यांजकडे पाठवून देणें ह्मणोन आज्ञा. त्यास आमचे नांवाचें आज्ञापत्र पावलें; त्यांच्या नांवाचीं पत्रें लाखोटे आलीं नाहींत. परभारें उज्जनीस गेलीं असतील तर न कळे. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं होतीं कीं, आमची तारांबळ खर्चाची फार आहे. कांहीं करून ऐवज पाठवावा. त्यावरून तूर्त बाईनीं एक लक्ष रुपये त्यांस खर्चास पाठविले आहेत. परस्परें एकवाक्यता जाली आहे. जयपुराकडून रोड्डू खवास मामलत करावयास राजश्री सुभेदारांकडे आले आहेत. सतरा लक्ष रुपये मागील सालें

राहिलीं त्यासुद्धां करार करून रामपुरा येथील सोडचिठ्ठी दिधली. त्यावरून सुभेदारांनीं सोडचिठ्ठी घेऊन रामपुऱ्यास कारकुनासमागमें पाठविलीं. परंतु बैरागी यांनीं मान्य केलीं नाहीं. उत्तर दिलें कीं, रामपुऱ्याचे ऐवजीं दुसरें स्थळ जयपूरकरांनीं मजला द्यावें; तेव्हां हें स्थळ मी सोडीन, नाहीं तर देत नाहीं. जमाव करीत आहे. त्यावरून रोड्डू खवास निरोप मागत होते, यांनीं आज्ञा दिधली नाहीं. जयपूराकडील निर्गम जालियाखेरीज सुभेदार तेथून जात नाहींत. मोठ्या तोफा इकडून बाईंनीं पाठविल्या त्या पोहोंचल्यावर पुढें काय करतील हें नकळे. राजश्री अलीबहादुर तेथें आहेत. वैशाख शुद्ध ३ स कूच करून बुंदेलखंडांत जावयाचें येथें वर्तमान ऐकिलें. राजश्री पाटीलबावा पुष्कराजवळ आहेत तेथेंच हुताशनीचा समारंभ बहुत केला. संवत्सरप्रतिपदेपावेतों रागरंग बहुत अप्रतिम जाला. डभई पलटणासुद्धां तेथेंच आहेत. पुढें दोन मनसबे. एक उज्जनीस यावें, हें न जालें तर मथुरेस छावणीस जावें. जयपूरचे शहास कांहीं फौज ठेऊन वरकड जमीयत दिल्लीस पाठवावी असें वर्तमान ऐकिलें. राजश्री सुभेदार यांचे दासीपुत्र दोघे येथें राजश्री काशीराव होळकर यांजसमागमें आले. त्यांत धाकट्या पुत्राचें लग्न व्हावयाचें तें काल वैशाख शुद्ध १० स लग्न लागलें. आहेर कोणीं केले नाहींत. समारंभही विशेष करविला नाहीं. पाटासारखें करून एका दिवसांत उरकिलें. वेदमूर्ति राजश्री मनसारामभट पटवर्धन सरकारांतून हत्ती खरीदी करावयास श्रीकाशीस गेले होते, जातांना परभारें गेले. तिकडून येतांना येथें छ ७ रमजानीं आले. चार हत्ती खरीदीचे, व एक इंग्रजांनीं सरकारांत नजर दिला तो, एकूण पांच नग घेऊन, येथून पुढें मार्गाचें दस्तक व आपला कासद एक मुक्कामपावेतों देऊन, रेवापार करून उत्तर आणवून ठेविलें. सरकारांत येऊन पोंहचतील. समागमें सरंजाम कापड वगैरे होतें, व हस्तीराम जोहरी समागमें होते तेही हुजूर येतात. येथें वर्तमान संतोषाचें ऐकिलें कीं, धारवाड व कोल्हार व हुसकोटे व बेंगरूळ इतकीं संस्थानें सरकारांत आलीं. राजश्री तात्या व नवाब निजामअलीखान एकत्र होऊन फौजा तुंगभद्रापार जाल्या. टिपूचे मुलखांत हंगामा आहे. मोठी गोष्ट जाली. बेंगरूळ जागा मोठी बाकी; पाण्यावर .... .... जागा; कोठें पडकोट व खंदक वगैरे, चांगली मजबूत, श्रीरंगपट्टणापासोन तीस कोस, अशी जागा हस्तगत जाली, मोठें काम जालें. तेथील संरक्षण करणार मजबूत माणूस ठेविले पाहिजे. शत्रूचें पारपत्य चांगलें जालें, तसें पुरतें जालें पाहिजे. सेवेसीं श्रुत होय विज्ञापना."

---

## लेखांक २१९.

**श्री.** ता. २७ मे इ. स. १७९१.

" सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २३ माहे रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ ११ मिनहूस विनंतिपत्रें व राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील पत्रें सेवेसीं रवाना केलीं आहेत तीं प्रविष्ट जालीं असतील. सांप्रत छ ६ रमजानचें आज्ञापत्र सादर जालें तें छ ११ मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री आनंदराव गंगाधर यांच्या नांवें लाखोटा पाठविला आहे तो, डांकेबराबर रवाना करून उत्तर आणवून पाठवावें ह्मणोन आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें लाखोटा पावतांच पुढें डांकेसमागमें रवाना केला. उत्तर आलें ह्मणजे पाठवून देऊं. तूर्त लाखोटे दोन आनंदराव यांजकडील आले, ते बजिन्नस सेवेसीं पाठविले आहेत; पावलीयाची आज्ञा करावी. इकडील वर्तमानः—राजश्री सुभेदार यांस बाईचीं पत्रें निकडीचीं बोलावण्याविषयीं जात होतीं, परंतु त्यांनीं छावणीचा मज़कूर तेथें केला. राजश्री अलीबाहादुरबाबांस ठेऊन घेतलें. चार मास बरसात ओढीत ओढ त्यांस दरमाहा देऊन त्यांची सोय करून, पुढें बादबरसात कोठें मोहिमेस जावें; याप्रमाणें पत्रें बाईस पाठविलीं. जयपूरकरांची मामलत विल्हे लागली. सतरा लक्ष रुपये ठराव जाला. रामपुरा द्यावा. यांनीं त्याचीं ठाणीं घेतलीं आहेत तीं सोडावीं. परस्परें ठाणीं द्यावीं. यांनीं रोड्डू खवास यास मेजवानी केली व त्यांनीं यांस वस्त्रें जवाहीर बहुमान दिल्हा. याप्रमाणें राजश्री अलिबाहादुर यांस जवाहीर वस्त्रें बहुमान रांगड्यांनीं केला. बहादुर यांनीं त्यांस मेजवानी केली. त्यास सरंजाम लागला तो, राजश्री सुभेदार यांनीं दिल्हा. रांगडे निरोप घेऊन जयपुरास जाणार. येथून मोठ्या तोफा दोन गेल्या त्या टोंकेस पावल्या. तेथून लष्करांत घेऊन जाणार, असें वर्तमान बाईस त्यांनीं लिहिलें होतें. राजश्री पाटीलबावा रूपनगरास आहेत. रूपनगर कृष्णगडकरास दिल्हें होतें तें फिरून बावांनीं घेतलें. कृष्णगडकर यांजपासोन कांहीं पैसा घेऊन मागती देणार. राजे बिजेसिंग यास हवाल प्राप्त जाला आहे ह्मणोन सावकारी वर्तमान. उदेपुराकडे फौज बावांनीं पाठविली आहे. उदेपुरकर खंडणी देतील. भीमसिंगाचा व राणाजीचा सलूख जाला आहे. राजश्री मल्हारराव होळकर यांचा बंदोबस्त सरकारांतून केला, फार चांगलें जालें. मोठा प्रलय केला होता. मार्ग चालत नवते. रयतीस उपद्रव फार जाले होते. मोठी गोष्ट जाली. त्यांजपाशीं हजारपावेतों घोडीं जालीं आहेत. वगैरे सरंजाम हत्ती लोक समागमें जागांजागांचे आहेत.

त्यांसुद्धां पारपत्य जालें पाहिजे. सरंजाम सरकारांत आला पाहिजे. त्यांनीं चोरीचा जुलमाचा जमाव केला तितका सरकारांत घ्यावा. रिखबदास जोहरी याची स्त्री व कन्या येथें आहेत. त्यांची वस्तभाव अमानत ठेऊन यादी व पत्रें सेवेसीं पाठविलीं. त्याउपर दोन तीन वेळां विनंति लिहिली, परंतु आज्ञा उत्तराची जाली नाहीं. राजश्री दादाजी गंगाधर विनंति करितात. येथून बाईचीं पत्रें त्यांस जातात कीं, त्या रांडमुंड आहेत; वस्तभाव माघारें द्यावी. त्यांचें उत्तर बाईस आलें कीं, एक वेळ विनंति केली आहे. मागाहून परवानगी घेऊन पाठवितों, असें त्यांजकडून पत्र आलें. ऐशीयास याजविषयीं आज्ञा काय? त्यासारखी वर्तणूक करूं. बहुत दिवस जाले, तिसरे ठिकाणीं अमानत जिन्नस आहे, ह्मणोन विनंति लिहिली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२०.

छ २९ सवाल. **श्री.** २० जून इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १७ माहे सवालपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री पाटीलबाबा सामरानजिक आहेत. मेवाड प्रांतीं फौज पाठवून नगद १५ लक्ष रुपये घेऊन, कृष्णगडास शह देऊन, तेथून जागीर कांहीं घेऊन सामराजवळ मुक्काम केला. खंडणीचा ऐवज येणें आहे जोतपुरकराकडील. तो आलियावर छावणीस मथुरेस जातील. राजश्री सुभेदार पूर्वस्थळींच आहेत. रामपुरा खालीं जालीयावर तेथें ठाणें ठेऊन, मग कूच करणार. राजश्री अलीबाहादुर त्यांजपाशींच आहेत. राजश्री त्रिंबक बाबुराव देशपांडे परगणे चांदवड हे येथें आहेत. दहाबारा वर्षें येथें अहिल्याबाई यांजपाशीं वतनसंबंधें आहेत. त्यांचे भाऊ राजश्री विसाजी भास्कर देशपांडे परगणे मजकूर हे सांप्रत राजश्री मल्हारराव होळकर यांचे भयास्तव घोडपेस जाऊन राहिले. तेथून मागती चांदवडास येणार. त्यांस किल्लेदाराचे व राजश्री रंगराव त्रिंबक यांचे मारफतीनें त्यांचें बोलणें सरकारांत होऊन, वीस हजार रुपये नजर करार करून, त्यांस निरोप किल्लेदार देणार ह्मणोन त्यांचे बंधूंनीं सांगितलें कीं, वीसहजार रुपये घेऊन त्यांस निरोप न द्यावा. त्यांजकडून पन्नासहजारपावेतों नजर घेऊन, मग आज्ञा द्यावी. कूळ मातबर आहे. भाऊबंद यादी घेऊन येथें दरबारांत १० वर्षें फिरतात. येथील द्रव्यादृष्ट नाहीं. यांचा महाल ह्मणोन येथें आहेत. त्रिंबक बाबुराव यांनीं सांगितलें त्यावरून विनंति लिहिली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२१.

श्री. २७ जुलई इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५ जिल्कादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री पाटीलबावा यांची स्वारी उज्जनीस श्रावण शुद्ध ५ पंचमीस येणार ह्मणोन बातमी होती. सांप्रत वर्तमान आलें कीं, चितोडानजिक सा कोसांवर मुक्काम करून आहेत. चितोडकरांचे कबिले तेथून निघोन प्रतापगडास जाणार. येविषयीं चितोडकरांचें पत्र अहिल्याबाईस आलें होतें कीं, तुह्मीं प्रतापगडकरांस पत्र लिहून द्यावें, ह्मणजे कबिले तेथें पाठवूं. यांनीं पत्र लिहून द्यावें असा बेत केला. परंतु मागती संशय मनांत कीं, हें पाटीलबावांस कळलियावर विरोध वाढेल. जाणोन चितोडकरांस उत्तर लिहून दिलें कीं, प्रतापगड कांहीं मजबूत स्थळ नाहीं. तिकडेच कोठें सोईनें कबिले ठेवावे. असें वर्तमान ऐकिलें; त्यांवरून लिहिलें असे. दुसरे, इस्मालबेग कांहीं फौज घेऊन गुजराथ प्रांतीं जाऊन दंगा मांडला आहे. हें वर्तमान बावांस समजलें. त्यावरून मागतीं माघारे जाणार, हेंही वर्तमान आहे. तूर्त चितोडानजिक आहेत. चितोडकरांनीं साफ उत्तर केलें कीं, आह्मांपाशीं दारूगोळी आहे. प्रांतांतील पैसा तुह्मीं घ्यावयाचा तो घेतला. आतां मेहेरबानगी राखोन आल्या मार्गें जावें. आह्मीं द्यावें काय, आह्मांपाशीं पैका राहिला नाहीं. असें चितोडकरांनीं उत्तर दिलें, ह्मणोन वर्तमान आलें. पुढें काय ठरेल तें नकळे. राजश्री सुभेदार यांजकडील हा कालवर जयपुरचा निर्गम जाला नाहीं. जेथें आहेत तेथें आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२२.

श्री. २९ जुलई इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ माहे जिलकादपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— सरकारची जोडी जोत्याजी नाईक पवार यांजकडील, पत्रें घेऊन महेश्वरास आली. जाबसाल लिहून दिल्हे, परंतु जोडीपैकीं एक जासूद बहुत बेआराम. हींवज्वर त्यास छ २३ जिलकादीपासोन लागला, त्याचा निभाव मार्गांत न होय, ह्मणोन मजपाशीं दोन जोड्या आहेत, त्यांपैकीं एक जोडी डांक देऊन पाठविली. ती बऱ्हाणपुरकरांनीं पुढें पुण्यास रवाना केली. एक जोडी येथें आहे. त्यापैकीं एक कासद व सरकारचे जोडीपैकीं जासूद, असे दोन पत्रें देऊन बऱ्हाणपुरास पाठविले. तेथून एक जासूद

घेऊन पुढें जातील. आमचा कासद माघारें येईल. काल छ २६ मिनहूस सायंकाळीं राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील लखोटा एक आला, तो बजिन्नस सेवेसीं रवाना केला आहे. राजश्री सुभेदार यांजकडील पत्रें आलीं. ऐवजाची निकड फार. बाईस व राजश्री काशीराव यांस लिहिलें आहे. येथें त्या गोष्टीची काळजीही नाहीं. मामलेदार हा कालवर देशाकडील कोणी आले नाहींत. रामपुरा व खरगोण देपाळपूर इकडील महाल मातबर. त्याचा ऐवज घेऊन पाठवावा, त्याची तजवीज करणार. वरकड इकडील माळवे प्रांतींचे महाल शिरोंज, पाटण, बुंदी, कोंच, निंबहेडा, किरकोळी, हे राजश्री सुभेदारांकडे ओढतच आहेत. रामपुरा, बैरागी यांनीं खालीं करून दिल्हा नाहीं. चाळीस हजार रुपये जिनसाचे बैरागी यांनीं घेतले. किल्ला खालीं करून द्यावयाचा करार केला. असें वर्तमान आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२३.

श्री. २ आगस्ट इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १ माहे जिल्हेजपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान विनंतीपत्रें लिहून छ २८ सवालीं जोडी सेवेसीं रवाना केली आहे. त्याउपर राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडून बातमीचा लाखोटा छ २९ सवालीं आला तो बजिन्नस सेवेसीं रवाना केला आहे. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें छ २९ सवालीं बाईचे नांवें आलीं. पत्रीं वर्तमान रामपुरा घेतल्याचें होतें. व लोकांचा गवगवा आहे, ऐवजाची निकड भारी आहे, तर कांहीं करून सालमजकुरचा ऐवज रसदेचा घेऊन पाठविणें ह्मणोन लिहिलें होतें. सरकारच्या नांवें पत्रें सुभेदारांनीं लिहिलीं होतीं; ते बाईनीं रवाना केलीं असतील. जेव्हां सुभेदारांचीं पत्रें येतात तेव्हां ते दिवशीं ताकीद कारभारीयास होती, ऐवजाची तरतूद करून लौकर पाठविणें. दुसरे दिवशीं त्याचें स्मरणही राहत नाहीं. राजश्री मुकुंदराव दिवाण त्यांचें येणें दरबारांत नित्यशा नाहीं. ते उदास नारोपंतांकरितां आहेत. राजश्री काशीराव होळकर यांस बाईनीं १० वेळ सांगून, त्यांचीं पत्रें राजश्री सुभेदारांस पाठविलीं कीं, नारोपंतांची मुक्तता करून येथें पाठवावें. अथवा पुढें काम त्यांचे हातें घ्यावें. हा प्रयत्न मुकुंदराव यांनीं करविला, परंतु साध्य जाला नाहीं. त्यामुळें उदास. घरींच असतात. राजश्री पाटीलबावा यांचा मुहूर्त उज्जनीस यावयाचा श्रावण शुद्ध ५ पंचमीचा होता तो राहिला. हा कालवर आले नाहींत. चितोडानजिक आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२४.

श्री. ६ सपटेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ७ माहे मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथून छ २६ माहे जिल्हेजचे तारखेचीं विनंतिपत्रें लिहून राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील लाखोटा एक, एकूण दोन पत्रें सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस आलीं कीं, आह्मांपासोन राजश्री अलिबाहादुर निरोप घेऊन डंगईस कूच करून आह्मांपासोन दोन कोस गेले. धवलपुरचे घाटानें जातील ह्मणून, व आह्मी सावकारापासोन साडे तीन लाख रुपये घेऊन येथें फौजेस दिले. पुढें दोन लाख रुपये घ्यावे लागतात. तर वडिलीं साडे तीन लाख रुपयांचा ऐवज त्यांस लावून द्यावा ह्मणजे, पुढें दोन लाख रुपये तिलोकसी पदमसी यांजपासोन घेऊं; अशीं पत्रें निकडीचीं आलीं. त्यांवरून काल छ ५ मोहरमीं महालसंबंधें ऐवज ठरावून साडे तीन लाख रुपयांच्या वराता सावकार मजकूर यांचे गुमास्तियास लिहून दिधल्या. कमाविसदार हा कालवर कोणी आले नाहींत. सुभेदारांची निकड जाणोन वराता लिहून महालोमहालींचे वकील जाबसालास येथें आहेत. त्यांजकडून निशा करवून घेतली. याप्रमाणें ऐवजाचा निकाल केला, ह्मणोन उत्तरें राजश्री सुभेदारांस बाईनीं पाठविलीं. धर्मदास निसबत हरकुबाई होळकर यांस हिंदोलचें काम सांगितलें होतें. तेथील ऐवज बराबर केला व फितूर करून लोकांस मिळून मलई केली होती. त्यावरून त्यांस धरून त्यांच्या पायांत बिडी घालून येथें बाईस पत्र पाठविलें कीं, धर्मदास यांचा कबिला तेथें आहे त्याजवर चौकी बसवावी. वस्तभाव यादी करून घ्यावी. त्यावरून छ ६ मोहरमीं त्यांचें घर व मुलें माणसें जप्त केलीं. येथेंच त्यांचा कबिला होता त्याजवर जप्ती केली. वस्तभाव यादी करून घेतली. याप्रमाणें वर्तमान जालें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२५.

श्री. १० सपटेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ११ माहे मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथून छ ७ माहे मिनहूस विनंतिपत्रें व राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील लाखोटे देऊन पत्रें सेवेसीं पाठविलीं आहेत. त्यानंतर छ १० मोहरमीं आनंदराव

गंगाधर यांजकडून लाखोटा एक आला त्याजबराबर आमचे नांवें पत्र होतें. तेथें लिहिलें कीं, लाखोटा पाठविला आहे हा जलद पुढें रवाना करणें ह्मणोन लिहिलें. त्यावरून आनंदराव यांजकडील हल्लीं लाखोटा आला तो पाठविला आहे. राजश्री अलीबाहादुर कूच करून गेले. ढवलपुरचे घाटानें चमेली उतरोन बुंदेलखंडाकडे जात आहेत. राजश्री पाटीलबावांनीं भीमसिंगाकडील कुवारीगढी लहानशी चांगली मजबूत होती ते घेऊन ठाणें ठेविलें. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें बाईस छ १० मोहरमींस काल आलीं. ऐवजाची निकड लिहिलेली होती. दुसरें लिहिलें होतें कीं, रोडु खवास यांचे विद्यमानें आह्मीं मामलत जयपूरची केली. करारमदार होऊन त्यांस शिरपांव देऊन बिदा केले. खवास जयपुरास गेलियानंतर राजांनीं त्यास कैद करून पूर्वीचे कारभारी दवलतराम हळद्या व खुषाली बोहरा यांस वस्त्रें देऊन काम दिवाणगिरीचें सांगितलें. पुढें आमचे जाबसालांत कसें पडेल ह्मणून पत्रें आलीं. वाचून राजश्री काशीराव होळकर यांशीं एकांत जाला. नंतर मुत्सद्दी यांस बोलावून सांगितलें कीं, साडेतीन लक्षांची भरती सावकाराकडे जाली आहे. पुढें दुसरी तजवीज वराता करून देणें ह्मणोन जलदी आहे. राजश्री भीमसिंग चितोडकर यांजकडील मजकूर, छ ७ मोहरमीचे पत्रीं विनंति लिहिली आहे. इकडे महागाई फार जाली आहे. गहूं, हरभरे, जोरी, बाजरी, एक भाव. दर रुपयास दाहा शेर. तोही दाणा मिळत नाहीं. बहुत श्रम आहेत. पाऊस चांगला, दाणाही पिकला आहे परंतु महागाई उणी होत नाहीं. उज्जनीस मात्र भाव, पंधरा सोळा शेर. इंदुर व महेश्वर येथें दाहा शेर प्रमाणें आहे. सरकारांतून खर्चाचा समाचार फार दिवस घेतला नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२६.

श्री. ३ अक्टोबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ४ माहे सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री पाटीलबावा व राणाजी, नाऱ्या मगऱ्यावर भेटी होऊन उराळ्याचे मुक्कामानजिक चितोड येथें येऊन मुक्काम उभयतांनीं केला. मामलत ठराव नजरेचा जाबसाल जाला नाहीं. परंतु राणाजीचा कारभार महालीं मुलखीं जालमसिंग व लालाजी बल्लाळ शेणवई या उभयतांनीं करावा. राणाजीस नेमणूक करून द्यावी, त्याप्रमाणें त्यांनीं असावें. फौज व मुलखाचा जाब उभयतांकडे. चितोडास निकड करितात तेथें फौज ठेऊन, आपण राणाजीस निरोप देऊन, सडे स्वारीनशीं उज्जनीस

यावें असें वर्तमान आजच आलें. राजश्री नारो गणेश यांचें वर्तमान, शरीफभाई व राजश्री बापूजी होळकर यांनीं त्याच्या मुक्ततेसाठीं प्रयत्न केला. फारच लागू राजश्री सुभेदारांपाशीं जाले. सुभेदारांनीं उत्तर केलें कीं पन्नास लक्ष रुपये रोख द्यावे, कर्ज सरदारीचें वारावें, तेव्हां काम मागती त्यांजकडे सांगतों. हें होत नाहीं तर मुक्तता करीत नाहीं. त्यावरून त्या उभयतांनीं रदबदली केली कीं, त्याजपाशीं पैसा होता तो तुह्मीं घेतला. काम सांगावें, कर्ज वारून फौजेचा बंदोबस्त करितील. त्याजवरून सुभेदार उभयतांवर रुष्ट जाले कीं, माझे प्राण घ्यावे असें तुमचे मनांत आहे तर त्यांची रदबदली करा. त्यावरून उभयतां समजोन उगेच आहेत. नारो गणेश यांचा महालोंमहालीं दरक व अंतस्थ आहे. त्याजविषयीं राजश्री पाराशरपंत यांचे नांवें वराता कमाविसदारावर केल्या, त्याऐवजीं पाराशर दादाजीपासोन ऐवज घेऊन वराता त्यांस लिहून दिल्या. त्या वराता इकडे आल्या. मामलेदारांनीं उत्तर दिलें कीं, अंतस्थ कांहीं दिल्हें नाहीं. दरक आहे तो ऐवज कांहीं वसुलांत मशारनिल्हे आगाऊ घेतला. राहिला असला तर देऊं. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२७.

**श्री.** ३ अक्टोबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विज्ञापना तागाईत छ ४ माहे सफरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ ५ जिल्हेज व छ ८ मोहोरम व छ १० मोहोरमपावेतों विनंतीपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत, व राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील पत्रें आलीं तींही पाठविलीं आहेत, पावलीं असतील. सांप्रत मशारनिल्हेकडून लाखोटा एक आला तो हल्लीं बजिन्नस पाठविला आहे. इकडील वर्तमान,—

राजश्री पाटीलबावा यांची व राणाजी उदेपुरकर यांची भेट भाद्रपद शुद्ध ७ सोमवारचे दिवशीं जाली. राणाजीस आणावयास राजश्री आंबोजी इंगळे व लालाजी बल्लाळ व जालमसिंग गेले होते, ते घेऊन आले. आल्यानंतर बावाही दोन कोस सामोरे जाऊन भेटले. दोन घोडे व हत्ती वाघदोन व तोफा २ अशी नजर राणाजींनीं केलीं. बावांनीं त्यास सन्मानेंकरून घेऊन येऊन मुक्काम केला. पुढें खंडणीचा जाबसाल लागला आहे. मस्तमगऱ्यावर भेटी जाल्या. चितोडचा

मुलुख बावांनीं घेतला. फक्त चितोडचा किल्ला मात्र राहिला आहे. पुढें भीमसिंगास निकड आहे. येणेंप्रमाणें वर्तमान येथें आलें. कलम १.

राजश्री भीमसिंग चितोडकर यांचा वकील येथें आहे त्याचें बोलणें बाईंनीं मान्य न केलें. तो मजकूर पेशजीं लिहिला आहे. त्यास सरकारांतून बंदोबस्त जाला पाहिजे, असें वकिलाचें बोलणें आहे. हें वर्तमान पूर्वीं लिहिलें आहे. कलम १.

होळकराकडील मामलेदार देशीचे महालाचे आले त्यांची नांवनिशी

१ खंडो बाबुराव आंबडकर.
१ वामनाजी हरी नंदुरबार.
१ गणपत माधोराव भागवत सुलतानपूर.
१ श्रीपत मैराळ थालनेर.
१ कोहाळे भागवताकडे.
—
५

पांचा महालांचे हिशेब होतात, फाजील झडल्यास निघालें. मामलेदाराचे कागदीं त्याचा तपशील अजमास.

१ खंडो बाबुराव तीन लक्ष.
१ वामनाजी हरी यांचे आठ लक्ष.
१ भागवत यांचे फाजील दीडलक्ष, शिवाय कर्जाऊ ऐवज निराळा.
१ श्रीपत मैराळ यांचे पन्नास हजार.
—
४ एकूण तेरा लक्ष.

याची चौकशी रुजवात जमीदारास पुसोन करणार. तुरूत सूडबंद लिहितात. चांदवडकर गणपतराव मोरेश्वर यांजकडील मामलेदार आले. त्यांचे फाजील देशमुखीसमेत दोन लक्ष आहे. कलम १.

राजश्री सुभेदार खवासाचे मुक्कामीं आहेत तसे आहेत. रोडु खवास मामलत करून गेला तो राजांनीं कैद केला होता, त्याजला मुक्त करून त्याजपासोन ८ लक्ष रुपये घेतले. दरबारांत असावें, काम करूं नये. नवे कारभारी दवलतराम वगैरे जाले. त्यांनीं राजश्री सुभेदारांस खातरजमेचीं पत्रें पाठविलीं कीं, जो कारभार रोडू खवास करून आले, त्याप्रमाणें निर्गमांत येईल. चिंता नाहीं. ह्मणोन पत्रें आलीं. त्यांवरून यास भरंवसा जाला. येथेंही याप्रमाणें बाईस सुभेदारांनीं लिहिलें, व ऐवजासाठीं वोढ खर्चाची भारी त्याजविशीं लिहिलें. कलम १.

राजश्री मल्हारराव होळकर वाफगांवीं होते ते दोनशें स्वारांनशीं पुण्यास गेले. सरकारांतून मान सन्मान होऊन मेजवानी दिधली. गारपिरावर जाऊन राहिले आहेत. असें वर्तमान येथें आलें. त्यांजकडील कारभारी त्यांजपाशीं आहेत, ह्मणोन बाईकडे वर्तमान आलें. बावाजी मदकर व लाडू पाटील, व रावजीपंत असे आरगळेंत आहेत. भगवंतराव मुख्य कारभारी मल्हारराव यांजपाशीं आहे. तोही मोकळा असों नये. कारभारी जे धरिले ते ते अटकेंत असावे. मल्हारराव याचा बंदोबस्त जसा करावयाचा तसा करावा, परंतु मदकर वगैरे आरगळेंत असावें. कलम १.

राजश्री मल्हारराव यांनीं इतकें महाली ऐवज घेतला तो फाजिलांत आला आहे. शिवाय रावेर व शेवगांव या दोन्ही महालांचे मामलेदार आले नाहींत. व देवपूर तर्फेचे कमाविसदार यावयाचे. वरकड फूटगांव इनामी वतनी कमावीसदार आले आहेत. त्यांचे हिशेब फाजलाचे नाहींत. इकडील माळव्यांतील महालकरी येत होते, त्यांचे हिशेब येथेंच होत गेले. देशाकडील आले नवते ते आले. कलम १.

एकूण साहा कलमें सेवेसीं श्रुत हे विज्ञापना.''

---

## लेखांक २२८.

श्री. १४ नोव्हेंबर इ. स. १७९१.

''सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ माहे रविलावलपावेतों सेवकाचें वर्तमान, यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ १५ रविलावलीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर माधवराव कृष्ण भुसकुटे यांचें वर्तमान. बऱ्हाणपुरीहून पत्र बाईचे नांवें आलें. पत्रीं वर्तमान लिहिलें होतें कीं, मशारनिल्हे मुहूर्तेंकरून बागांत राहिले होते. तेथें ज्वर उत्पन्न जाला, तो फारच. एका रात्रींत विशेष जाला. त्यामुळें शहरांत घरास आले. त्यावर चार दिवस ज्वर सारखाच होता. उपाय करीतच होते. तों एकाएकींच कार्तिक शु॥ १५ परलोकास गेले. मोठा अनर्थ जाला! वय फार थोडें. त्यांत रीत फारच चांगली. उदारत्व, देवब्राह्मणांचे ठायीं आस्था, मामलतीस योग्य, सरमंडळचा कारभार व राजश्री पाटीलबावांकडील मामलती सावकारी वगैरे कामाची सावधता करून आटोप केला होता. मी नऊ वर्षें येथें आहे. त्यांत पांच सात वेळ त्यांचा सहवास जाला, परंतु दुर्गुणाची जात नवती. सर्व अनुकूळता असुन भोक्तृत्व दैवयोगें थोडें जालें. वर्तमान आल्यावर बाई फार

श्रमी जाली. दोन घटकां पुराण ठेऊन विस्मय फार जाला. त्यामुळें आपले दुःखास स्मरून श्रमी जाली. पुढें त्यांचे कनिष्ठ बंधु आहेत. त्यांजला संतान नाहीं. स्त्री एक प्रथम. पुढें लग्न दुसरें करावें संतानार्थ विचार, तों हेंच मध्यें जालें. भुसकुटे यांचे पदरीं माणसें चांगलीं आहेत, त्यामुळें मामलतीचा बंदोबस्त राहील. अष्टे वगैरे महाल तेथें राजश्री आबाजी बल्लाळ सोमण आहेत. खांडवे व शहर बऱ्हाणपूर येथें राजश्री हरिपंत गोखले आहेत. मंडलेश्वर येथें राजश्री कृष्णाजी अनंत भागवत, असे जेथील तेथें मामलतीचा बंदोबस्त आहे. सरकारांतून समाधानाचीं पत्रें जातील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २२९.

श्री. २ दिसेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ५ माहे रबिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथून विनंतिपत्रें छ २७ माहे रबिलावलीं लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री पाटीलबावांनीं छ २० विसावी रबिलावलीं चितोडचा किल्ला घेऊन, खासगत लगी एक व राणाजीकडील निशाण व त्याजकडील लोक किल्ल्यावर चढविले. भीमसिंग रावत येऊन भेटले. राजश्री आबाजी रघुनाथ चिटणीस व राजश्री आंबोजी इंगळे यांचे मध्यस्थीनें किल्ला हस्तगत जाला. भीमसिंगाचा खंड ऐन १०॥ लक्ष रुपये व दोन लक्ष दारू गोळा खर्च जाला. त्याचे ऐवजीं बारा लक्ष रुपये करार केले. हें वर्तमान गंगाजळनिर्मळ अहिल्याबाई यांस कळलियावर संतोष असंतोष. संस्थान यांजकडील. यांचे मार्फतीनें तेथील जाबसाल घडावा तें न जालें, यामुळें असंतोष. त्यांनीं किल्ला घेतल्यावर त्यांचेंही पत्र आलें नाहीं. यांनीं वर्तमान ऐकून त्यांस पत्र लिहिलें नाहीं. यांजकडील महाल चितोडानजीक आहेत. त्यांस उपद्रव कही काबडाचा न लागावा याविषयीं मात्र पत्रें किल्ला घेतल्यावर लिहिलीं आहेत. त्यापूर्वीं पत्रें लिहिलीं नवतीं. चितोडचा बंदोबस्त करून उज्जनीस पाटीलबावा येतील असें वर्तमान आलें. राजश्री सुभेदार हा कालवर जयपूर प्रांतीं आहेत. खंडणीचा ऐवज आला नाहीं. रा आनंदराव गंगाधर यांजकडून दोन महिने जाले पत्र येत नाहीं. सांप्रत त्यांजकडून मुजरत जोडी पत्रें घेऊन आली आहे, ते बजिन्नस येथून रवाना केली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३०.

**श्री.** २ डिसेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ५ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ २७ रबिलावलीं विनंतीपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर हा कालवर माहालकरी यांचे निर्गम जाले नाहींत. आंबाडचें ठाणें वामनाजी हरि यांचे स्वाधीन जालें. आंबाडचे जमीदार आहेत. रुजुवात येथें माजी मामलेदार खंडो बाबुराव यांची करावी ह्मणोन जमीदार बोलाविले असतां, रुजुवात खंडो बाबुराव करीत नाहींत. महालीं करूं ह्मणोन बोलतात. चार लक्ष रुपये त्यांजकडे वाजबी निघत आहेत. त्यांतून एक पैसा कबूल होत नाहींत. त्यांत बाईचा दाबही नाहीं. रावेरचा हिशेब जाला. जमीदार नाहींत त्यांस बोलावूं गेले आहे. ते आल्यावर कमीजास्त पाहून फडशे करणार. राजश्री वामनाजी हरि यांचे फाजील ८ लक्ष, त्यांपैकीं फाजलाचे व्याज व अंतस्थाच्या यादीचा ऐवज कांहीं तकरीर होऊन फाजील बराबर केले. झडत्या लिहून शिक्के देखील करून ठेविले. परंतु वामनाजी हरि यांची समजोती पडून निर्गम जाला नाहीं. यांस ह्मणतात कीं, शिक्के झडत्यावर केले आहेत. तुह्मीं घेऊन महालीं जाणें. हे ह्मणतात कीं, वाजबी केलियास गुंता काय? आह्मांस व्याज सावकारानें सोडिलें असल्यास आपण व्याज न द्यावें. रदबदलीखालीं आहे. हा कालवर निर्गम नाहीं. चांदवडचा कजीया देशपांडेपणाचा वांटणीचा भाऊपणीचा दोन दिवस जाले उत्पन्न जाला. त्याचे पंचायतीस राजश्री वामनाजी हरि व माधवराव भागवताचे कारकून आहेत. यांचा निर्गम जाल्यावर चांदवडची घालमेल करणार. राजश्री काशीर व होळकर हा कालवर येथेंच आहेत. रवानगी जाली नाहीं. राजश्री मल्हारराव होळकर यांजसंबंधीं ऐवज लावून दिल्हा. ऐवजाच्या हुंड्या राजश्री दादाजी गंगाधर यांजकडे भरणा केला आहे. ते सरकारांत ऐवज देतील. असें वर्तमान ऐकिलें त्यावरून लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३१.

**श्री.** ९ डिसेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १२ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे.

विशेषः– येथील वर्तमान चंद्र ७ रविलाखरीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. मार्गशीर्ष शु० ८ सह नवमी शनिवारीं, यशवंतराव फणसे यांचा काल जाला. त्यांजसमागमें सौभाग्यवती मुक्ताबाईसुद्धां तिघीं स्त्रियांनीं सहगमन केलें. हें वर्तमान पूर्वीं लिहिलें. दुसरे दिवशीं त्यांचे घरची वस्तभाव त्यांजकडील कारकून बोलावून शोध केला. कापड, द्रव्य वगैरे त्याच्या यादी सांभाळून घेतल्या. ऐवज मुबलक. त्यांस, घाट व छत्री बांधावी, कांहीं द्रव्य क्रियेस लावावें, क्षेत्रोक्षेत्रीं पाठवावें, ही विवंचना केली आहे. आपण उदास होऊन, श्रीमहायात्रेस जावयाचा उद्योग आपले ठिकाणीं व समागमीं कारभारी यांस सल्ला विचारून, रा० सुभेदार यांजकडे पत्रें चंद्र १० व ११ रविलाखरीं, दोन पत्रें लागोलाग पाठविलीं कीं, तुह्मीं पत्र देखतांच स्वार होऊन येणें. आह्मी महायात्रेस जातों. अशीं निकडीचीं त्यांजकडे पत्रें पाठविलीं. नंतर एक पत्र, रा० दादाजी गंगाधर यांस लिहून चंद्र ११ रविलाखरीं पाठविलें. त्यांत मजकूर कीं, हें वर्तमान श्रीमंतांस निवेदन करून, उत्तर चांगलें घेऊन पाठवून द्यावें. स्वामींच्या नांवें पत्र लिहिलें त्यांत, दादाजी विनंति करितील ते ध्यानास आणून उत्तर पाठवावें. असें वर्तमान येथील आह्मांस कळलें होतें. सरकारांत विनंतिपत्रें लिहितात किंवा नाहीं, यास्तव अगोदर लिहिलें नव्हतें. कालचे तारखेस त्यांचीं पत्रें गेलीं हें कळलीयावर सेवेसीं विनंति लिहिली आहे. यांचा निग्रह श्रीस जावें. याउपर दुःखाचे पर्वत पहाणें काय राहिले आहेत! रा० सुभेदारांचें वृद्धपण, अखंड त्यांच्या शरीरास समाधान नसतें. ते आहेत तोंवर त्यांच्या गळां दौलत घालून आपण वेगळें व्हावें. आमचें दैव तर दुःखेंच पहावीं. त्यामुळें मागें पुढें कांहीं विश्रांत राहिली नाहीं. यांस बरें वाईट जालें तर मग तोंड दाखवावयास जागा नाहीं. जहर खाऊन प्राण द्यावा. अशी भावी कल्पना मनांत आणून, रा० सुभेदारांस बोलाऊं पाठविलें. दररोज एक पत्र डांकेस लिहून द्यावें अशी ताकीद कारभारी यांस केली. सात रोज सात पत्रें वेगळीं तारीखवार जाऊं द्यावीं. त्यावरून चंद्र १० व चंद्र ११ दोन रोज पत्रें गेलीं. आजही जातील. याप्रमाणें येथील वर्तमान. विनंति, सरकारांत राजश्री दादाजी गंगाधर करितील. त्यांजपाशीं आज्ञा कर्तव्य ती होईल. येविषयींची आज्ञा सेवकास असली पाहिजे. रा० सुभेदारांचें येणें कसें घडतें? यांचें जाणेंही तसेंच दिसतें. फौज त्यांजपाशीं नाहीं. त्यांनीं यावें तर जयपूरचा निर्गम जाला नाहीं. भावी काय हें कळत नाहीं. यांचा आग्रह तो निकडीचा दिसतो. मजपाशीं जासूदजोड्या दोन आहेत. त्या वातमी घेऊन बऱ्हाणपुरास कागद पोंचवितात. तेथें जोड्या नसल्या-

स पुढें जातात. त्यामुळें कागद जवळ रहात नाहींत. पल्ला लांब पडला. येतांनीं-जातांनीं एक महिना लागतो. येथें वर्तमान कोणे वेळेस काय होईल, हें कळत नाहीं. यावरून विनंति लिहिली आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३२.

श्री. ९ डिसेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १२ रबिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— सौभाग्यवती रखमाबाई होळकर इंदुरींहून बाईच्या समाधानास येत होती. हें वर्तमान यांस कळलियावर यांनीं मना करून पाठविलें. तत्रापि जांबेपावेतों आली. तेव्हां येथून राजश्री संताजी होळकर यांस बाईनीं पाठविले कीं, तुह्मीं पुढें जाऊन त्यांस मना करवणें. मना करतां येऊंच लागली तर मी येथून दोन कोस कोठें जाऊन राहीन; असा आग्रह. तेव्हां संताजी होळकर येथून गेले. त्यांस जांबेच्या मुक्कामीं ठेऊन घेतलें. त्यांजकडून राजश्री बाळाजी लक्ष्मण, नारो गणेश यांचे भाचे, काल चंद्र ११ रबिलाखरीं आले. त्यांनीं विनंति केली कीं, सौभाग्यवती रखमाबाई येतात त्यांस आज्ञा करावी; येऊं द्यावें. त्यांजपासोन अंतर मागें पुढें पडलें असलें तर चित्तांत येऊं न द्यावें. बहुत प्रकारें त्यांनीं विनंति केली. तत्रापि मर्जी फिरली नाहीं. चिरंजीव मुक्ताबाईचा गतवर्षीं मृत्य पावला, त्या समयीं रखमाईनें यावें तेव्हां न आली, आतां येणें हें काय? यास्तव तिनें येऊं नये. ही मनांतील गोष्ट. त्यावरून सर्वांनीं यथाज्ञानें विनंति केली, ऐकिलें नाहीं. बाळाजी लक्ष्मण येथून जातील, तोंवर सौभाग्यवती रखमाबाई जांबेस आहेत. एक दोन दिवस आणखी राहतील. यांची मर्जीच नसली तर माघारे जातील. कमाविसदार झाडून व जमीदार जमा आहेत. चार पांचशें महालाचे लोक जमा आहेत. कोणाचा निर्गम नाहीं. आतां तों उदास आहेत. पंधरा दिवस जाल्यानंतर कमाविसदार विनंति करतील. पुढें कामांत येऊन निर्गम करून, मार्गस्त करितात किंवा राजश्री सुभेदारांकडे जाबसाल सांगतात, हें कळत नाहीं. राणाजींनीं यांजकडील कारकून मंडळीस गांव दिले होते, ते त्यांनीं जप्त केले. आपाजी गीते यांजकडील, त्यास गांव चाळीस राणाजींनीं दिले होते. आपाजी गीते मृत्यू पावले, तेव्हां बाईनीं ते गांव आपले जप्तींत ठेविले. त्यास तीन वर्षें जालीं. सांप्रत ते गांव राणाजींनीं राजश्री पाटीलबावांकडे दिले. त्यावरून बावांनीं जप्ती केली. हें वर्तमान काल ह्यांस कळलें. ऐकून उत्तर दिलें कीं, हें वर्तमान

राजश्री सुभेदारांस कळवावें. मजपाशीं सांगत जाऊं नये. याउपर मजला दौलतींत कांहीं बोलावयाचें नाहीं. अशी उदासीनता आहे. राजेश्री बावांचा मुक्काम चितोडापाशींच आहे. भीमसिंग रावत याचा खंड बारा लक्ष रुपये जाला. त्यास तगादा केला. त्यांनीं उत्तर दिलें कीं, माझे कारभारी आपणांपाशीं कैदेंत आहेत त्यांस माझे स्वाधीन करावें. ते आह्मी एकत्र होऊन ऐवजाचा निर्गम करून देऊं. त्यावरून सिताराम कोटारी व सरदारसिंग या उभयतांस भीमसिंगाजवळ पाठविलें. आणि मागाहून चौकी चांगली मजबूत त्यांजवर पाठविली. भीमसिंगासमेत अटकेंत आहेत. राजश्री अंबोजी इंगळे यांच्या डेऱ्याजवळ भीमसिंग आहेत. याप्रमाणें वर्तमान आलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३३.

श्री. १९ डिसेंबर इ. स. १७९१.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २२ माहे रबिलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान, छ १२ मिनहून विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील अर्थ, अलाहिदा विनंतिपत्रीं लिहिला आहे. वरकड कलमबंदीः—

राजश्री पाटीलबावांनीं चितोडापासून कूच केलें. भीमसिंग बराबर आहेत. चौकी त्यांजवर आहे. खंडणीचा ऐवज घेऊन, राणाजीस टिका देऊन, आणखी स्थळें आहेत तीं हस्तगत करून मग उज्जनीस यावें असें आहे. कलम १.

राजश्री चिमट हजुरी निसबत धोकलसिंग बुंदेले हे पुण्याहून येऊन महेश्वरीं छ १५ रबिलाखरीं आले. समागमें सरकारचे कारकून बावाजी नारायण घाणेकर व हुजरे फिरंगोजी वगैरे, त्यांनीं मुक्काम आजपावेतों केले. अहिल्याबाईची भेट घ्यावी व खर्चास नाहीं, सावकार करून खर्चास घेऊन पुढें जावें, त्यावरून बाईची भेट करविली. त्यांचा निरोप घेऊन कर्ज सावकारापासून घेऊन त्यांसी करारमदार करून देऊन, आज उद्यां निघोन जातील. कलम १.

राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडील पत्र येत नवतें. सांप्रत लाखोटा १ आला तो बजिन्नस पाठविला असे. कलम १.

परगणे उत्राणचे सरदेशमुखीचा ऐवज कचे आकाराप्रमाणें देत नाहीं. मक्ता देऊं म्हणतात. मक्ता परभारें कमाविसदार विंझे यांनीं केला होता. त्यांनीं मामलत सोडली तेव्हां, सरकारांतून मामलेदार दुसरे पाठविले. त्याजविषयीं सरकारचीं पत्रें



अयोध्येचा नबाब सादतखान.

## २५. जयपुराकडील राजकारणें. 

### लेखांक १.

[भिणवलीदप्तर.] श्री. इ. स. १७८७।८८.

" राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री खंडोपंत नाना स्वामींचे सेवेसीं:-

सेवक लक्ष्मण संभाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागायत श्रावण शुद्ध १३ मुक्काम सवाई जैपूर यथास्थित असे. जाणोन स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष:- बहुत दिसांनीं कृपा करून पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर सविस्तर ध्यानास आला. श्रीमंतांचें पत्र मस्तकीं वंदून दर्शनातुल्य आनंद जाहला.

१. श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं 'दूर पथ, तेथून मोघम लिहिलें; तेव्हां समजावें तरी कसें ? जबाब येण्याजाण्यास चार महिन्याचा आरसा; यास्तव उगवून लिहिलें असतें ह्मणजे समजण्यांत येतें. बरें, अस्तु. तेथून राखून लिहिलें तर काय गुंता आहे ? तुह्मीं येथून तपसीलवार लिहून पाठविणें ह्मणजे जबाब उगवल्यांत येतील.' त्यास आज्ञा केली ते मस्तकीं वंदिली. परंतु म्यां अगोदरच येथें महाराजांस विनंति केली होती कीं, तपसीलवार वर्तमान लिहिल्यावांचून ध्यानास येणार नाहीं. त्यावरून उत्तर जालें कीं, गुदस्तां वकील गेला होता, त्यानें सुभेदाराच्या मार्फतीनें सर्व जबाबसाल केले आहेत. ते ध्यानांत असतीलच. प्रस्तुत विस्तार करून लिहावयाचें कारण नाहीं. निमित्य त्याप्रमाणें विनंतिपत्र सेवेसीं पाठविलें होतें. कलम.

१. लिहिलें कीं, जैपूर जोधपूरचा जबाब एकत्र आहे किंवा वेगळा आहे ? वेगळा असल्यास लिहून पाठविणें कीं, त्याच अन्वयें बोलण्यांत येईल. व एकत्र असल्यास जैपुराकडे मामलतसंबंधीं बाकी असेल ती द्यावी; व पुढें सुदामत माफक देत असावें. व जोधपुरकरांनीं अजमेर सोडून, मामलतसंबंधींची बाकी आज तागायतची झाडून द्यावी, व पुढें दरसाल फडशा करीत असावा, ह्मणून आज्ञा केली, हें प्रमाणच आहे. त्यावरून श्रीमहाराजांस विनंति केली. त्यांनीं उत्तर दिल्हें कीं, आह्मां उभयतां राजांचा जाबसाल पूर्वापासून वेगळालाच होत आला आहे; एकत्र नाहीं. परंतु जैपुरासीं कजीया पडला, तेव्हां राठोड वगैरे लहानमोठे राजे येऊन सामील जाले. ते आतां वेगळे कसे होतात ? निमित्य जो जबाब करणें तो सामीलच होईल. कलम.

१. जैपुराकडे बाकी आहे ते द्यावी, पुढें सुदामत प्रमाणें वर्तावें ऐसी आज्ञा. त्यास, याजविषयीं विचारितां उत्तर दिल्हें कीं, हिशेब पाहतां आमच्या मतें कांहीं बाकी राहिली नाहीं. त्यांच्या हिशेबीं बाकी निघाल्यास द्यावी हें वाजवीच. परंतु अज्ञाप तऱ्ही आमचा त्यांचा वडिलांपासून स्नेह चालत आला आहे, व पुढेंही सर्व प्रकारें आह्मी त्यांच्या कृपेची इच्छा करितों. याजवर नजर देऊन, आमच्या नादारीकडे पाहून, प्रस्तुत आह्मांवर कृपा करावी. ह्मणजे मुलकांत वगैरे आबादानी जालीयासी आह्मी सर्वप्रकारें त्यांचे आज्ञांकित आहों. पेशजीं कधीं अंतर पडलें नाहीं व पुढेंही पडावयाचें नाहीं. हें राज्य सर्व प्रकारें त्यांचेंच आहे.

 

कैलासवासी श्रीमंत बाजीराव साहेब व महाराज जैसिंगजी यांचा दुसरा अर्थ नव्हता. परस्परें एक घर जाणत होते, तेणेंप्रमाणेंच जाणावें. आह्मी सर्व प्रकारें तत्पर आहोंत. त्यांनींही स्नेहावरच दृष्टि असों द्यावी. विचारानें राहिल्यास परस्परें बहुत उपयोगी आहोंत. विरुद्धांत कांहीं नाहीं. यास्तव आमुची शावुती राखून, आपले करून ठेविल्यास दूर नाहीं. मामलतही निकालाखालें घेतलीयानें उगवेल व आह्मीही कार्याचे राहूं. कलम.

१. मारवाड्यापासून अजमेर व मामलत घेणें. त्यास अजमेर सोडावयाचा त्यांचा आग्रह विशेष दिसतो. दुसरा निकाल काढावयाची मर्जी असल्यास निघेल. आणि खामखा अजमेरच घ्यावी ऐसेंच आहे, तरी पुरकस (?) बखेडा पडल्यास खावंद प्रतापी आहेत. खालीं होईल ऐसें आहे. कलम

१. येथून उभयतां राजांचे वकील, श्रीमंत राजश्री सुभेदार व राजश्री अलीबहादूर यांजकडे गेले आहेत. त्यांच्या विद्यमानें श्रीमंत राजश्री पाटील-बावांसीं बोलत आहेत. उत्तर प्रत्योत्तर निखालस जालीं नाहींत. अन्वय परस्परचे समजण्यांत आले आहेत. याजवर पहावें, काय निश्चय होतो. कलम.

१. आपण श्रीमंतांचें पत्र मजविषयीं पाठविलें तें पावलें. याउपरी आमचें जाणें लष्करांत जालीयावर समक्षच पत्र देऊन, हरयेक तोड करून पाहून, निकालाखालें आणूं. प्रस्तुत वोढ आहे, तोंवर जाण्यास विलंब आहे. निदान उभय पक्षीं ढाळा-खालें घेतल्यासी निकाल निघेल. त्यास मजला तरी रात्रंदिवस हाच निजध्यास आहे. तेथूनही लिहिणें तें ल्याहावें कीं, बहुत आग्रहांत गोष्ट न पडे. कलम.

१. श्रीमंतांचे खलिते श्रीमहाराजांच्या नांवाचे आले, ते काल दरबारांत पावले. मुख्यांनीं वाचून आह्मांकडेस पाठविले होते. त्यांत विशेष तों कांहीं नव्हते. शिष्टाचारच लिहिला होता. त्यांचीं उत्तरें येथून खलिते पाठविले आहेत, ते पावतील. याचे दर-जबाब विनंति करून पाठवून द्यावें, व आपल्या नांवें दरबारचा रुका पाठविला आहे हा पावेल. याचें उत्तर बहुत शिष्टाचारानें पाठवावें कीं, येथें संतोष होय. श्रीमंत राजश्री हरिपंततात्यांस महाराजांचा खलिता व आह्मीं विनंतिपत्र लिहिलें आहे, तें प्रविष्ट करून उत्तरें घेऊन पाठवावीं. कलम.

सदरहूप्रमाणें ज्वाब पाठवून द्यावे. आह्मीं येथून विनंतिपत्रें पाठविलीं आहेत. हें मनन करून, जेथें प्रविष्ट करावयाचीं असतील तेथें निवेदन करून, उत्तरें घेऊन पाठवावीं. कमपेश मजकूर असेल तो ध्यानास आणून द्यावीं. बहुत काय लिहिणें लोभ असावा हे विनंति."

## लेखांक २.

### श्री.

"चिरंजीव राजश्री गोपाळराव नाना यांसीः-

लक्ष्मण संभाजी कृतानेक आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत श्रावण शुद्ध १२ मुक्काम सवाईजैपूर यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेषः—बहुतां दिवसांनीं पत्र पाठविलें तें पावून बहुत संतोष जाला. ऐसेंच सदैव पत्र पाठवुन

तोषवीत जावें. यावर आमचें वर्तमान मुक्काममजकुरीं आहों. श्रीमहाराज बहुत कृपा करितात. यांच्या मतें हरएक कामाकाजांत रहावें, आणि आमच्या शरीराची क्षीणता विशेष; त्याजमुळें चित्ताची उदासी. निमित्य इच्छा ऐसी कीं, एखाद्या तीर्थी बसोन दिवस पूर्ण करावे. याअर्थी दोन चार वेळां निरोपही मागितला. परंतु देत नाहींत. आमचे विचारें आश्विनपर्यंत येथें राहून देशास यावें. नंतर एखाद्या यात्रेची योजना करावी. ऋणानबंधानुसार घडेल तें खरें. दुसरें येथील वर्तमान, उभयतां राजांची ऐक्यता बहुत. अनेक प्रकारच्या विचारांत आहेत. शहा फौजसुद्धां विलायतेहून लटीच्या मुलुकापर्यंत येऊन पोहोंचला. पुढें यावें ऐसा इरादा. त्याजवरून उभयतां राजांचे वकील जाऊन तेथें ज्वाबसाल निश्चयांत आणून, शहाचे मातबर घेऊन येथें आले. कांहीं ज्वाबसाल याची भानगड होती, ते ठरावांत आली ह्मणजे शहा दरकूच येणार. ऐसें असतां आह्मांस आज्ञा केली कीं, येणेंप्रमाणें निश्चय ठरोन अविंध येत आहे. त्याजवरून आह्मी आदि पश्चात् सर्व अर्थ उमजोन सांगितले कीं, "तुमचे आजे महाराज जैसिंगजी यांनीं भगीरथ प्रयत्न करून, श्रीमंत कैलासवासी बाजीराव साहेब यांसी आणोन, म्लेंच्छांचें उत्थापन केलें, आणि हिंदुस्थान पुन्हां स्थापून देवयात्रा इत्यादिक यथास्थित घडूं लागल्या. हिंदुमात्रास सौख्य होऊन आपआपले स्थळीं स्वस्थ कालक्षेप करीत असतां, प्रस्तुत क्षुल्लक आग्रहास प्रवर्तोन अविवेक विचारितां, हें एकरूप कल्याणकारी नाहीं. इहलोकीं परलोकीं ह्या गोष्टी निंदक आहेत. येणेंप्रकारें बहुतांपरी समजावितां, सर्व गोष्टी ध्यानास आल्या. म्लेंच्छाविसीं तो त्रासच घेऊन वकीलास सामदानी उत्तर देऊन दुसरे सोबल्यास सांगितलें कीं, "म्लेंच्छांस तो साफ आणावयाचा नाहीं. त्यांनीं आग्रह विशेष केला, परंतु येथून निखालस त्याजविसीं ज्वाबच होत गेले कीं, ज्या गोष्टी वडिलांनीं बहुत विचारून केल्या आहेत, त्या आह्मीं मोडून नव्या कराव्या, हें उत्तम नाहीं. यास्तव म्लेंच्छाविरहित आपण आपली शाबुती बांधून आपलाले स्थळीं स्वस्थ असावें. दक्षणी चालून आल्यास पाहून घेऊं. जमीदार आहों. कांहीं चिंता नाहीं." वगैरे उत्तर दिल्हें. तेव्हां तेही लाचार होऊन उगेच राहिले. अविंधाच्या वकिलास ज्वाब दिल्हा. ते जाऊन पोहोंचतांच, शहा कूच करून माघारा गेला. दुसरें येथील वर्तमान, उभयतां राजांच्या फौजा जमा होऊन आपापलाले मुलकांत बंदोबस्त करून आहेत. आपले सरदार श्रीमथुरेवर आहेत. येथून उभयतांचे वकील श्रीमंत राजश्री सुभेदार व पाटीलबावांकडे गेले आहेत. परस्परें ज्वाबसाल होत आहेत. परंतु रहस्याचा डौल दिसत नाहीं. त्यांचें बोलणें कीं, मागील बाकी झाडून द्यावी, व अजमेर सोडावी वगैरे ज्वाबसाल आहेत. यांचें बोलणें कीं, हिसेबीं पाहतां तुमची बाकी कांहीं राहिली नाहीं. तत्रापि मुलुक उजाड; कांहीं हालत राहिली नाहीं. याजमुळें कोण्या गोष्टीचें तष्ट न लावितां स्नेहावर दृष्टि यावी, व मारवाडकरांचें बोलणें, अजमेर सुदामत आमची आहे, हे सोडावयाची सोय नाहीं, हें सरदारांस मान्य नाहीं. यांजमुळें परस्परें आग्रह विशेष दिसतो. श्रीमंत साहेबांनीं कृपा करोन पत्रीं कित्येक आज्ञा केली, ते मस्तकीं वंदिली, व आह्मांविषयीं सरदारांस पत्र लिहिलें तें, पावून...आह्मी

आपल्यापाशींच ठेविलें असे. उभयपक्षींचा शुद्धतेचा अर्थ ध्यानास आला, तर आह्मी लष्करास जाऊन सरदारांस पत्र देऊन ज्वाबसाल ठरावांत आणूं. कांहीं कंपेश तफावत असल्यास उभयपक्षीं विनंति करावयासी येईल. विशेष वोढींत समजून पडणें कळतच आहे. आपल्या कडोन आग्रह होतो, तेणेंकरून येथें जूट बांधलें जातें. ढाळाखालें घेतलीयानें बहुत उपयोग आहे. तुह्मीं लिहिलें कीं, श्रीमंतीं एक दोन वेळां स्मरण केलें होतें. त्यास धनी समर्थ आहेत. कृपामृतें सिंचन जालीयास सेवकाचें कल्याण आहे. येविषयीं विस्तार करून पत्रीं ल्याहावें ऐसें नाहीं. श्रीमंत साहेबांचे सेवेसीं व राजश्री खंडोपंत नानांस पत्रें पाठविलीं आहेत. हें प्रविष्ट करून आज्ञापत्र सादर होईल तें घेऊन पाठवून द्यावें. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे आशीर्वाद. देसीहून श्रीमंत राजश्री रावसाहेबांचीं व श्रीमंत राजश्री नानांचीं, व राजश्री तात्यांचीं खलितेपत्रें येथें श्रीमहाराजांस आलीं. त्यांचीं प्रत्योत्तरें येथून दरबारचीं व आमच्या नांवाचीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावतीं करून उत्तरें घेऊन पाठवून देणें. सरकारची हलकाऱ्याची जोडी पाठविली आहे. यासी सुदामत माफक इनाम देवणें हे आसीर्वाद."



## २६. निजामाकडील दरबारखर्च.

नवाब निजामअलीखान बहादूर ह्यांच्याकडून इ. स. १७९५ सालीं मराठ्यांस जो दरबारखर्च मिळाला, त्याची एक याद सांपडली आहे. ही फार महत्त्वाची असून त्या वेळच्या प्रमुख लोकांचीं नांवें तिच्यावरून व्यक्त होतात.

[मिणवलीदप्तर.] श्री.

"यादी नवाबाकडून दरबारखर्च येणें त्याची वांटणी. सन खमस तिस्सैन मय्या व अलफ सन १२०४. रुपये १५०००००

यास वांटणी नांवनिसीवार.

४००००० नाना.

३१५०० नि॥ सरकार.

५००० भास्कर दीक्षित.
३००० दाजीबा आपटे.
२००० मोरोपंत भावे.
२००० विठ्ठलपंत वांकनीस.
२००० बर्वे सबनीस.
२००० आबा ठोसर.
१५०० तामसी भटाचे चिरंजीव.
१५०० दिनकरपंत भडभडे.
१५०० महादाजीपंत साठे.
१००० बाळाजीपंत केळकर.

५००० आप्याशास्त्री.
२००० महादेव दीक्षित आपटे.
२००० वैद्य.
१००० जोशी.

३१५००

४२००० नि॥ दप्तर.
१०००० गुरुजी.
१०००० त्रिंबकराव परचुरे.
७००० गोविंदपंत आपटे.
५००० गोविंदराव बाजी.
५००० पांडुरंगपंत ढमढेरे.
५००० लेले वगैरे मंडळी.

४२०००

१०००० मजमदार.
१०००० चिटणीस,
१०००० पोतनीस.
७००० पारसनीस.
१००००० परशराम रामचंद्र.
१००००० रामचंद्र हरी.
५०००० आप्पा बळवंत.
७५००० गोविंदराव कृष्ण.
४०००० गोविंदराव भगवंत.
२५००० असाम्या नि॥ गोविंदराव कृष्ण.
१५००० बहिरोपंत मेहेंदळे.
१०००० राघोपंत गोडबोले.
१०००० नारोपंत चक्रदेव.
३००० जोशी नि॥ नाना.
२००० दिवाकर दीक्षित.
१५००० भिकंभट निदसुरे.
४००० नारायणराव व सखारामपंत वैद्य.
२००० लक्ष्मण शास्त्री वैद्य.
४००००० नि॥ शिंदे.
१००००० सदाशिव मल्हार.
१००००० बाळाजी अनंत.

१००००० जिवाजी बल्लाळ.
५०००० रामजी प॥
५०००० धोंडीबा.

४०००००

१२५००० नि॥ भोंसले.
५०००० श्रीधर लक्ष्मण.
५०००० कृष्णराव माधव.
१५००० रामचंद्र दादो.
१०००० बाबूराव वैद्य.

१२५०००

१२००० शागिर्दपेशा.
६००० सरकार.
४००० नि॥ नाना.
२००० किरकोळ.

१२०००

१४९८५००

## २७. संगमेश्वर येथील श्री० संभाजी महाराजांचा राजवाडा.

[ मेणवलीदप्तर. ] श्री.

"यादी क॥ संगमेश्वर तालुके रत्नागिरी येथें श्रीमंत कैलासवासी संभाजी महाराज राज्य करीत होते. त्या राजवाड्याचे चौथऱ्यावर सदाशिव नाईक सरदेसाई यांणीं घर बांधिलें आहे. त्याजविसीं समस्त जोसी संगमेश्वरकर यांची विनंति. सु॥ इहिदे तिस्सेनः– कलमें.

१ सरदेसाई वाड्याचे चौथऱ्यावर घर बांधों लागले; तेव्हां परशराम रामचंद्र परांजपे यांजकडे आह्मीं जाऊन त्यांस सांगितलें कीं, महाराजांचे वाड्यावर देसाई घर बांधितात. तुह्मी हकीम. हा वाडा सरकारचा ह्मणून तुह्मांस सांगतों. त्याजवरून ते बोलले कीं, राजवाड्यावर देसाई घर बांधितात, त्यास घर बांधों देत नाहीं. याप्रमाणें आह्मांस उत्तर जाल्यावर आह्मी आपले घरीं आलों. उपरांत देसाई यांस घर बांधावयाची परवानगी दिल्ही. तेव्हां घराचें काम देसाई करूं लागले. त्या वेळेस मागतीं परशराम रामचंद्र यांजकडे आह्मी गेलों. त्यांणीं सांगितलें कीं, आह्मीं घर बांधावयाची परवानगी दिल्ही. याप्रमाणें उत्तर जाल्यावर आह्मी बोलिलों कीं, राज-आश्रित जोसी. आह्मी घरास ग्वाही देऊं. तेव्हां सुभेदार बोलले कीं, तुह्मीं ग्वाही दिल्यास आह्मी मोकळी करूं. याप्रमाणें उत्तर जालें ह्मणून हुजुर आलों. कलम.

१ गुदस्तां सरकारांत विनंति वाड्याविसीं केली. आज्ञा जाली कीं, घर मोडावें. याप्रमाणें सरसुभेदार यांस परवानगी जाली असतां, अद्याप घराचा फडशा जाला नसतां, दुसरा नवा सोपा, पहिलें घर बांधिलें आहे त्यालगता, सरदेसाई यांणीं बांधिला. कलम.

१ राजवाड्यासन्निध कबजीच्या वाड्याचा चौथरा होता, तो गुदस्तां देसाई यांणीं चिरे नेले. कलम.

१ वाड्याचे चौथऱ्यासन्निध बाग महाराजांचा आहे. त्या बागांत सरकारचे कमाविसदार व सरकार इतल्याचे जे कोणी येतील, ते त्या बागांत रहातात. याप्रमाणें पूर्वींपासून चाल आहे. कलम.

१ श्रीमंत कैलासवासी नानासाहेब कोंकणांत गेले, तेव्हां संगमेश्वरीं मुक्काम जाला. ते समयीं राजवाड्याचा चौथरा पहावयासी गेले होते. कलम.

१ देसाई यांचें बोलणें, वाडा आपला खरा येविसीं:— कलम.

१ को मजकुरीं महाराज आले, तेव्हां आह्मीं आपले घरीं महाराजांस जागा रहावयास दिल्ही. याप्रमाणें बोलतात. कलम.

१ महाराज तेथून गेल्यावर त्या वाड्यांत आह्मी कांहीं दिवस घर बांधोन राहिलों होतों.

६ २ कलमें.



## २८. इंग्रजी लष्कराचें बातमीपत्र.

[ मेणवलीदप्तर. ] श्री. ता. १५ मार्च इ. स. १७८१.

" जबानी जान डबीस मेयर गोलंदाज संमवेल क्लार्क इंग्रज दि॥ कपितान मिकलाउत हा तोफांचे आवाज करावयाचा सरदार. इंग्रजांचे लष्करची बातमीः— घाटावर तळ्यानजीक गाडर आहे. बराबर पलटणें तीन आहेत. असामी तीन हजारपर्यंत आहेत. पैकीं गोरे सरदार सर्व व अजारी व चांगले मिळोन नऊशें आहेत. एकवीस बंगाली व मदराज व मुंबईचे मिळोन आहेत. तोफा आठ; पैकीं थोर सहा शेरी दोन; तीन तीन शेरी लांब लांब पल्याच्या कित्ता दोन; तीन शेरी रेजगण मारावयाच्या जवळ पल्याच्या दोन शेरी लहान; एकूण आठ आहेत. पुढें अघाडीस मोरचा आहे, तेथें नऊशें असामी नेहमीं राहत्ये; व दोन तोफा तीन शेरी व थोर येक त्याचे बाजूस आहे ती सुटत नाहीं. दोन लढाईच्या वेळीं सुटत असतात. दक्षणेकडील पाहऱ्यापासून उत्तरेकडे तळ्यापर्यंत जवळ जवळ राहत आहेत. तोफा तैशाच आहेत. पांच हजारपर्यंत जमेत मुंबई व बेलापूर, व पनवेल, व कल्याण येथें रसद व दारूगोळा वगैरे जिन्नस आणावयास गेले आहेत. ते आल्यानंतर कूच मुक्कामाचें काय होईल तें न कळे. परंतु कांहीं कांहीं लोक छावणीचा मजकूर बोलतात. जिन्नसाचा पाड ठाऊक नाहीं. सरकारचा शेर खातों. बाजारांत जात नाहीं. तळ्यास

पाणी जितें आहे. बेगमीचें आहे. मोरचास पाणी नाहीं. त्यास पुढें झिलांत डहुरे खटले आहेत, ते कांहीं नेतात, व तळ्याचे सकेकरी आणितात. सरकारचे गोळे जातात, त्यास पेशजीं गरनाळेचा गाडा मोडिला, व दोन गोलंदाज यांचे पाय कतरोन गेले, व एक तुरकस्वार याचा घोडा पडला. घाटावर आल्यापासून कालपर्यंत गोलंदाज वगैरे शिपाई पन्नासपर्यंत गोळ्यानें व बाणानें व गोळीनें ठार जाले. शिवाय जखमी शंभरपर्यंत जाहले. ते कांहीं वसईस पाठविले, कांहीं खोपवलीस आहेत. दररोज लढाईच्या दिवशीं दहा पांच असामी जखमी व कांहीं ठार होतात. गोळे टप्पे खाऊन जातात. ते बातेरीच्या मागें गोटांत पडतात, व उकाल जातात ते तळ्यानजीक गोटांत पडतात. त्याणें वाणी बाजारचे कांहीं जाया जाले. दारूगोळा तूर्त बेगमीचा आहे. जिन्नसांचा तूर्त तोटा आहे. त्यास वरचेवर कांहीं येतो. गाडर लढाईच्या समयीं येतो. मोरचे फिरोन जातो. कोरणेल, गाडर याचा मुतालीक, याचा घोडा गोळ्यानें ठार जाला. तो वांचला. हिरव्या पालखींत बसोन गाडर येतो. एकाद दिवस हत्तीवर बसोन येतो. चार हत्ती आहेत. पैकीं घाटावर एक दोन आहेत. दोन, घाटाखालीं आहेत. लोकांस रोजमरा महिन्या महिन्या द्यावा, त्यापैकीं एक महिना ठेवून बाकीचे वरचेवर देतात. घाटाखालें सहा हजारपावेतों जमात, पैकीं तीन पलटणें व तीन हजार स्वार, कांहीं लोक दादासाहेब यांजकडील मिळोन आहेत. तोफा चार थोर व गरनाळा चार आहेत. ही बातमी मागील. आह्मी घाट चढल्यावर किती काय आहेत हें ठाऊक नाहीं. वणजाऱ्याचे बैल चार हजारपर्यंत आहेत. शिवाय बाजारचे वगैरे दोन तीन हजारपर्यंत होतील. बारा हजार कांहीं बाण आहेत. वसईंत सांपडले ते आणिले. दादासाहेब तूर्त यावयाचें नाहीं व कुमकही कांहीं यावयाचें नाहीं. लोक जमातींत बोलतात कीं पुढें आले तरी येतील. गाडर वसईहून आला. त्यास पुढें कूच करून यावें, तरी हैदरनाईक नवाब यांणीं त्या प्रांतीं जरब बसविली आहे. याजकरितां मुक्काम करून राहिला. फुलचरीकडून पत्र आलें होतें कीं, दोन पलटणें मदराजचीं आहेत, तीं पाठवून देणें. त्यास गाडरास गरज होती ह्मणोन ठेवून घेतलीं. आह्मी त्या बिरादरींतील आहों. सोनगडाकडील कांहीं वर्तमान ठाऊक नाहीं. सरकारची फौजेची आवई लाख दीड लाखपर्यंत आहे. तोफा किती काय आहेत हें ठाऊक नाहीं. प्रस्तुत इंग्रजांचे लष्करांत सरकारचे फौजेची दहशत फार आहे. घाबरे आहेत. चार महिने घाटावर राहून पोक्त सामान करून पुढें पर्जन्यकाळ गेलीयानंतर पुण्यास यावें ऐसें आहे. तूर्त कूच होत नाहीं. तळ्यावर दोन बंगले तयार होत आहेत. काल आह्मी दोघेजण नदींत आंगें धुवावयास आलों होतों, तेथें सरकारचे लोकांनीं धरून साहेबाकडे आणिलें. दोघांजवळ नख्त रुपये वीस होते ते घेतले. जरीची टोपी व आंगरखे काळे दोन घेतले होते. (इत)र कांहीं आणिलें नाहीं. छ १९ रबिलावल. सुमा इहिदे समानीन मया व अलफ."

## २९. राक्षसभुवनची लढाई.

पै॥ श्रावण वद्य नवमी श्री.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

पोष्य रामचंद्र गणेश साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत चंद्र ५ सफर जाणून स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेष:—आपण कृपा करून ज्येष्ठ वद्य द्वितीयेचें पत्र पाठविलें तें चंद्र १ सफरीं पावोन परम संतोष जाहला. इकडील वर्तमान तरी, चंद्र २९ मोहरमीं नजीक राक्षसभुवन येथें निजामअल्लीकडील सारे सरदार व निमे फौज याप्रमाणें गंगेअलीकडे विठ्ठल सुंदर होता. निजामअल्ली खांसा मात्र पलीकडे होता. त्यानंतर आपले लोकांनीं सकाळच्या दीडप्रहरा दिवसास मोंगलाचे फौजेवर चालोन घेतलें, ते बेजरब गोटांतच गेले. लढाई चांगली जाहली. विठ्ठल सुंदर व विनायकदास व गोपाळसिंग खंदारकर राजा हे त्रिवर्ग ठार जाहले, व सदाशिव रामचंद्र यांस जखमा लागल्या होत्या, त्यास तो तसाच गंगेंत उडी घालून पार जाहला. निजामअल्लीस खबर पलीकडे कळतांच जनानखाना तेच वेळेस औरंगाबादेस पाठवून दिल्हा, व आपण चंद्र ३० मोहरमीं पहाटेचे प्रहरे रात्रीस डेरे दांडे टाकून दोनशें राउतांनिशीं औरंगाबादेस गेला. अलीकडे फौज व बाहेर बुणगे जितके होते त्यांपैकीं कांहीं मारले गेले व फार करून लुटले गेले. आपणांस कळावें ह्मणोन लिहिलें असे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे. प्रस्तुत फौज गंगा उतरून पार जाऊन शहरास शह द्यावा, ऐसा विचार होत आहे. गंगेस पाणी फार आहे. नावा नाहींत. ही विनंति."



## ३०. टिपूकडील मराठ्यांच्या एका जासुदाचें बातमीपत्र.

श्री.

"जबानी शिवाजी व॥ खंडोजी कासीद जथे खेमा. सुमा सीत समानीन.
आपण श्रीबनशंकरीं येथील तळावरून शुक्रवारीं निघालों तों:—

१ शुक्रवारीं रात्रीं वस्तीस आबगिरे कोस १०

१ शनवार पूर्णिमा हसेरूर तुंगभद्रा तीर १५

१ रविवार प्रतिपदा हणमसागराजवळ तुंगभद्रा उतरून कोदुरास राहिलों कोस १६

१ सोमवारीं २ जगनूर उज्जनी गांवचे पुढें १५

१ मंगळवारीं प्रहर दिवस पहिला चित्रदुर्गे ७ तेथें मुक्काम. बुध व गुरुवारीं दोन प्रहर गांवांत प्यादे यांणीं झाडा घेऊन आडविलें तेव्हां, अजुरकरी कागदी पोटार्थी ह्मणोन बाजारकरी बाहेरगांवचे जाऊं लागले, तेव्हां बाहेर निघालों. तेथें बातमी लागली कीं टिपूची फौज इकडेच येत आहे, ऐसें समजोन निघालों तों.

१ गुरुवारचे रात्रीं हटीस गेलों कोस ८
१ शुक्रवारीं नागसुंदरकुंदा कोस २०
१ शनवारीं बल्लारीस आलों तों टिपूचे बुणगे आले. त्यांस रात्रीं बेते कोस १२
१ रविवारीं अदवानीस टिपूचे फौजेंत गेलों कोस २०
६०

येणेंप्रमाणें गांवावरून रविवारीं आदवानीस पोहोंचलों. तेच दिवशीं टिपूचीही फौज अगोदर दाखल जहाली होती. मग आपण एक वोलखा परीट बहिरू ह्मणोन होता त्याचे जवळ गेलों. त्याणें पुसलें कीं तूं येथें कां? तेव्हां कागदी आजुरे करीत असतों ऐसें बोलून लष्करांत हिंडत होते. फौज अजमासें.

फौज राउती १५ पंधरा वीस हजार आहे. १
पाईचे गाडदी वगैरे पन्नास हजारपावेतों आहे. १
तोफा शंभर दीडशेंपावेतों आहेत.

लष्करांत फिरावयाची मोठी मुष्कील. जागा जागा चौकी पाहारे वाजपूस होते. आदवानीस मोर्चे सोमवारीं एकादशीस लागले. पहिले दिवशीं बाहेरील पेठ लुटून शहरपन्ह्यास मोर्चे लाविले. चार तोफा सुरू केल्या होत्या व वरील चार सुरू होत्या. खांसा टिपू किल्ल्याचे पश्चिमेकडील आंगें खासे निशाणसुद्धां· मध्यें व डावे बाजूस सेदाची फौज व उजवे बाजूस पाईचे गाडदी वगैरे सरदार. मोर्चे एक बाजूनें पश्चिम व दक्षिण असे बसले आहेत. पूर्व उत्तरेकडे घोड्याचे राऊत फौज पांच सात हजार उभी राहते कीं मराठी फौज तिकडून कुमकेस येईल, ह्मणोन तोंडावर उभे राहतात. टिपू खासा फौजेंत आहे. मी आपले दृष्टीनें चाळीस पन्नास हाताचे तफावतीनें पाहिला. रंग गोरा मध्यम आहे. डेऱ्याहून मोर्चांत सोमवारीं आले. तेव्हां निळ्या घोड्यावर बसला होता. पागोटें चक्रीदार छिटी बेंदरी व आंगरखा पिवळा ताप्त्या व जुबा मोठ्या पटीचे मश्रूचा व पिवळी शालजोडी. येणेंप्रमाणें पोशाख होता. मिशा मध्यम गालांवर, कानात्या केंसाच्या, येणेंप्रमाणें पाहिला. लष्करांत आपले फौजेची दक्षत भारी आहे. आवाई खातात. लोक बेदील आहेत. दहा दहा वीस वीस वर्षे लोक तिकडे चाकरीस आहेत. त्यास देशांत येऊं देत नाहीं. ह्मणोन मराठी फौज जवळ आली म्हणजे घोड्यासुद्धां निघोन जावें, ऐसें कोणी बोलतात. आदवानी घेऊन रायचुराकडे जावें असें बोलतात. व मराठ्यांवर जावें असेंही बोलतात. दोन हजार फौज कचनगुंडा घ्यावयास गेली होती. त्यांनीं कचनगुंडा घेऊन ठाणें बसविलें असें बोलतात. आदवानीचे बाहेर रावचे बंदिवान धरून रांडापोरेंसुद्धां आणिले ते, बल्लारीस पाठविले. एक ठाणें गोळी वाजविली. सबब ठाणें पाडून शेंदीडशें माणूस धरून आणून नाकें कापिलीं. तीं आपण दृष्टीनें पाहिलें. सडेस्वारींत धारण रुपयाचें फुलम, दर फुलमास वजन पक्कें तीन साडेतीन प्रमाणें १.

| | |
|---|---|
| ८८२॥ | तांदूळ ८८२ |
| ८८२ | कणीक. |
| ८८३ | पीठ जोरी८८३॥ |
| ८८४ | पीठरागी. |
| ८८२ | हरभरे. |
| ० | बाजरी मिळत नाहीं. |
| ८८३ | ज्वारी. |
| ८८२ | तूप वजन कच्चें. |
| ० | तेलाचा पाड पाहिला नाहीं. |

येणेंप्रमाणें धारण आहे. याप्रमाणें आठ दिवस फौजेंत राहून पाहिलें. सोमवारीं आठवे दिवशीं हल्ला करावा ऐसा बेत होता. सरदारास ताकीद करावयाचा हुकूम जाहला होता. आपण आठवे दिवशीं रविवारीं आदवानीहून निघालों तों

१ हयाग्री नदीचे तीरीं चेल्लूर कोस १०

१ सोमवारीं कंपलीचे गांवाबाहेर रानांत होते. कंपली कोस १०

१ मंगळवारीं तुंगभद्रा कोसावर उतरून कनकगिरी अलीकडे वडारकलगांव कोस १०

१ बुधवारीं वडारकलाहून निघालों तों अस्तमानीं मलीयाळ नजिक बदामी कोस तीन. लष्करचा मुकाम मौजे मनेली येथें दाखल जालों. कोस २०

५०

चवथे दिवशीं साहेबाजवळ आलों. टिपूचें लष्कर सडी फौज अदवानीजवळ आहे. तेथें पाणी ओढा थोडें आहे. व सेद याजकडे डावे बाजूस तलाब आहे. पेठेंत पाणी विहिरी आहेत व जवळ आसपास बाग जाले नाहींत. टिपूचा धाकटा भाऊ मिरा त्यासांगातें भांडूं लागला सबब मारून टाकिला, ऐसें बोलतात, व कोणी बोलतात बेंगरुळांत आहे. आपण येतेसमयीं कागदी अजुरदार ऐसें सांगितलें. तेव्हां लोकांनीं आपले घरीं कागद दिल्हे.

पारसी लिहिणें.

१ जान महमद नगरकर याणें लालमहमद यास दिल्हा. बारगिरीवर आहे.

१ दुसरा जान महमद नगरकर याणें बायकोस नेपतीस माहेरीं आहे, तीस द्यावा अगर नगराचे तलाटी दरवाजावर द्यावा. बारगीर आहे.

मराठी लिहिणें.

१ बहिरजी रणजोर परीट आपला ओळखी याणें आपला भाऊ भवानी भाट गव्हाण येथें राहतो. नजिक मूर्ती मोंढवे यास द्यावा.

१ सखेजीस जाब खेडकडे आष्टी खालते, तेथें द्यावा.

२

३ कुडचीकर सीलदार

१ ———————

१ ———————

१ ———————

३

५

नांवाचें स्मरण नाहीं. हे कागद कुडचीस पीर जादे यांचे वाड्यांत द्यावे. येणेंप्रमाणें कागद सात घेऊन आलों. चंद्र ३ साबान बुधवार.

किल्ला कबजी उत्तर दक्षिण पेठेस शहरपन्हा खंदला आहे. किल्ला पहाडी नहरवाथ पश्चिम दक्षिणचे मध्यें. टिपूचे डेरे हिरवे जंगलाचे रंगाचे. डेऱ्यास बाड सराचे. नवाब निजामअल्ली याचे बाडासारखे आहेत. देवडीवर दोन डेरे व दोन तोफा आहेत. एक तोफ सायंकाळीं सुटते मग गोटांत बंदोबस्ती होते. ढाल हिरव्या लाल व सफेद पट्याची.

१ डेऱ्याचे खांबावर रुप्याचे कळस व ढालावर रुप्याचे कळस. सैंयाची ढाल हिरवी व कळस रुप्याची. चित्रदुर्गाचा किल्लेदार यानें चिखलाची हुडकी खूण देऊन बाहेर लाऊन दिल्हे.



## ३१. गुजराथेंतील हसोट गांवच्या जमाबंदी प्रकरणीं दोन पत्रें.

महादजी शिंदे ह्यांच्या पुढील पत्रामध्यें, सरकारी जमाबंदी जास्त झाली व त्यामुळें बाकी राहिली तर ती कोणत्या रीतीनें वसूल करीत असत, ह्याची थोडीशी माहिती समजून येते. ती येथें नमूद करण्यासारखी आहे.

### लेखांक १.

**श्री.**

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीं:-

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ महादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः—मिस्तर इंद्रसेन इंग्रज यांणीं सांगितलें कीं, परगणे हसोट येथें सरकारची जमाबंदी जास्ती जाली. सबब रुपया बाकी परगणे मजकुरीं राहिला. त्याजमुळें परगणे मजकूरचे रयतेस अंमलदाराकडील तसदी लागली. तेव्हां प्रा॥० मजकूरचे जमीदार व पाटील मिस्तर पारट आंगरेज व आनंदराम मेहता याजकडे येऊन आजीजी करून, त्याजपासून कर्जाऊ ऐवज घेऊन, अंमलदार यास दिल्हा.

त्याचा वायदा केला त्याप्रमाणें रुपये न पावले तेव्हां, राजाराम खंडेराव कमाविसदार परगणे मजकूर व जमींदार एकत्र होऊन साऊकाराचे रुपयाची तोड काढिली कीं, ज्या गांवांवरी बाकी रुपये राहिले, त्या गांवची पडली आत्फोद जमीन लावून दिल्ही, कीं तुमचे रुपये वसूल कराराप्रमाणें होत तोंपावेतों भोगवटा जमिनीचा घेऊन, उपरांत माघारी द्यावी. ज्या गांवचे रुपये वसूल जाले तेथील जमीन त्यांणीं माघारी दिल्ही; आणि ज्या गांवावर बाकी रुपये राहिले, ते सालगुदस्ता शेशाद्री कमाविसदार आले, त्यांणीं बखेडा केला. तेव्हां राजश्री चिंतामण दीक्षित सरसुभे यांजकडे आनंदराम मेहता यानें जाऊन वर्तमान सांगोन, त्यांजपासून पत्र लेहून घेऊन, कमाविसदार यांजकडे पाठविलें; तें त्यांनीं मान्य केलें नाहीं. याजकरितां कमाविसदार यांस सरकारांतून ताकीद होऊन रुपयांचा वसूल कराराप्रमाणें होय तें केलें पाहिजे. ह्मणोन त्यावरून आपणांस पत्र लिहिलें आहे. तरी येविसीं सरकारांतून परगणे मजकूरचे कमाविसदारांस पत्र देववून, कराराप्रमाणें सावकाराचे रुपये फडशांत येई तें केलें पाहिजे. रवाना चंद्र १२ मोहरम बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."

लेखांक २.

श्री.

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीं:-

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ महादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीयें कुशल लेखन करित असिलें पाहिजे. विशेष:-मिस्तर पारट इंग्रज व आनंदराम मेहता यांचे कर्जाऊ रुपये परगणे हसोट व परगणे उकलेसर प्रांत गुजराथ येथील गांवगन्ना लोकांकडे येणें आहेत. त्यास सुरळीतपणें फडशा करून देत नाहींत. यास्तव महालमजकूरचे कमाविसदारांस सरकारांतून ताकीद व्हावी ह्मणोन मेस्तर इंद्रसेन इंग्रज यांणीं सांगितलें. त्यावरून हें पत्र आपणांस लिहिलें आहे. तरी येविसीं सरकारांतून परगणे मजकूरचे कमाविसदार असतील त्यांस पत्रें देऊन, त्यांजकडोन महालचे गांवगन्ना इंग्रज मजकूर व मेहता यांचे कर्जाऊ रुपये असतील त्यांचा, वाजबी फडशा, ताकीद करून होय तें केलें पाहिजे. रवाना चंद्र १२ मोहरम बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."



## ३२. वणगोजी नाईक निंबाळकर ह्यांची स्पष्टोक्ति.

महाराष्ट्र मंडळामध्यें फलटणचे निंबाळकर हें फार प्राचीन व सर्वमान्य घराणें आहे. ह्या घराण्यांतील पुरुष मोठे पराक्रमी व रणशूर होऊन गेले. ह्यांपैकीं कित्येकांनीं रणांगणावर एकनिष्ठपणें स्वामिसेवा बजावून आपले देह धारातीर्थीं

अर्पण केले आहेत व त्याबद्दल त्यांच्या वंशजांनीं स्पष्टपणानें इनामगांवें मागून घेतलीं आहेत. ह्याचा मासला पुढील वणगोजी नाईक निंबाळकर ह्यांच्या पत्रावरून दिसून येईल.

श्री.

"राजश्री नाना गोसावी यांसीं:-

सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित वणगोजी नाईक निंबाळकर दंडवत विनंति उपरी येथील कुशल छ० २१ जिल्काद मुक्काम नजिक अदवानी जाणून स्वकीये लेखनाची आज्ञा केली पाहिजे. याउपरी गुजराथप्रांतीं इंग्रेजाची लढाई जाली, त्या समयीं राजश्री शहाजी नाईक सरकारकामासी आले ह्मणोन राजश्री हरीपंत तात्या यांनीं त्यांच्या पुत्रासी इनामगांव एक पांच हजार रुपयांचा देयाचा करार करून, धण्याकडे सनद, पांच हजार रुपयांचा गांव देवावा ह्मणून पाठविली. ते सनद राजश्री सखारामपंत बापू यांनीं पाहून सोलापूर प्रांतें पांच हजार रुपयांचा गांव नेमून, कमाविसदारांसीं पत्रें दिल्हीं. त्या प्रांतींचा गांव आमचे सोईचा नाहीं, ऐसें आह्मांसीं दिसोन आलें. त्याउपरी मागती आह्मीं विनंति केली कीं, स्वदेशी गांव देणें, तरी द्यावा. तेव्हां ते बोलिले कीं, स्वदेशीं पांच हजार रुपयेचा गांव देयासी अनुकूल पडणार नाहीं. दोन हजार अडीच हजारपावेतों एखादा गांव तुमचे सोईचा, आणि दिल्ह्यास बहुत काळ चाले ऐसा पाहून देऊं; मग कांहीं तुह्मीं न म्हणावें. ऐसा आह्माकरवीं करार करून घेऊन मौजे तांदुळवाडी प्रांत भाळवणी हा गांव महाल, दोन हजार बेरजेचा देऊन इनामपत्रें करून दिल्हीं. आह्मीं धन्याची मर्जी जाणून मानिली. परंतु इनामपत्रांत एक दुसरी कानुबाबेचा उद्धार होऊन पत्रें न जालीं. हें आपलें देणें आह्मांसीं निखालसपत्रें वंशपरंपरेनें चालेत ऐशीं असावीं. यांत कालुश नसावें. तरीच आपण दिल्हे, आणि आह्मीं घेतलेची सार्थकता. इतर देण्यासारखा हा अर्थ नव्हे. पानिपतावरील लढाईस तीर्थस्वरूप खंडेरावबाबा आमचे, श्रीमंत भाऊसाहेब यांजपासीं सरकारकामास आले. त्या समयीं एक खेडें आह्मां चवघा बंधूंस कोळेगांव भाळवण परगणींयाचेच इनाम करून इनामपत्रें दिल्हीं आहेत. त्या पत्राच्या नकला आपणांकडे राजेश्री व्यंकाजी कान्हेरे यांजबरावरी पाठविल्या आहेत. त्याप्रमाणेंच तांदुळवाडीचींही इनामपत्रें चारी नवीन करून देविलीं पाहिजेत. सर्वप्रकारें आमचे अभिमानी आपण आहेत, हें जाणून विनंति लिहिली असे. बहुत काय लिहिणें हे विनंति."

## ३३. पानिपतच्या लढाईचें बातमीपत्र.

शिंद्याचे दिवाण रामाजी अनंत दाभोळकर हे पानिपतच्या लढाईंत हजर होते. त्यांचें एक पत्र पानिपतच्या मुक्कामाहून लिहिलेलें उपलब्ध झालें आहे. गोविंदपंत बुंदेले युद्धामध्यें मारले गेले, त्याच्या अगोदरचें हें पत्र आहे.

श्री.

श्रीमंत राजश्री रावसाहेब स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक रामाजी अनंत साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र १५ जमादिलावल मुकाम पानिपत स्वामींचे कृपेंकरून सुखरूप असों. विशेषः— बहुत दिवस स्वामींकडून पत्र येऊन सांभाळ होत नाहीं तेणेंकरून चित्त सापेक्षित आहे. तरी सदैव कृपापत्र पाठवून सांभाळ करीत असलें पाहिजे. इकडील वर्तमान तरी, आज दोन मास मोंगलांसी लढाई होत आहे. दोन लढाया उत्तम जाहाल्या; ते समयीं मोंगलांचा मोड जाहला. श्रीमंतांची फत्ते जाहली. एक बळवंतराव गणपत स्वामींच्यावरी खर्चले एवढी गोष्ट ईश्वरें वाईट केली. त्यांचे स्त्रीनें आपलें सार्थक केलें. राजश्री गोविंद बल्लाळ यांस अंतर्वेदींतून नजिबखानाच्या मुलकांत रसद बंद करावयानिमित्य बोलाविलें होतें. ते येऊन मेरटेस पावले. रसद बंद कांहींसी केली. हें वर्तमान गिलज्यास कळतांच पांच सात हजार फौज यमुना उतरोन पाठविली. ते फौज गाजदी नगराजवळ गोविंदपंताजवळ पावली. कांहींसें युद्ध जाहालें, तेव्हां सोसेनासें पाहिलें मग निघाले. गोविंदपंताचा पुत्र व पाराजीपंत वगैरे दिल्लीस येऊन दाखल जाहले. गोविंदपंताची ठिकाण अद्याप लागलें नाहीं. पळाले कीं कामास आले हें ठीक नाहीं. ठीक खबर आलियावरी लेहून पाठवूं. श्रीमंत राजश्री नाना सहकुटुंब सुखरूप आहेत. शरीर फार बारीक आहे. आपणांस वरचेवर त्यांचीं पत्रें येतच असतात. आह्मीं त्याहावेंसें काय आहे? बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.”

## ३४. महादजी शिंद्यांचे नातजांवई दौलताबादचे राजे आनंदराव जाधवराव.

दौलताबादेचे सुप्रसिद्ध लखुजी जाधवराव ह्यांचे वंशज राजे आनंदराव जाधवराव हे, महादजी शिंदे ह्यांचे नातजांवई होत असें पुढील पत्रांवरून सिद्ध होतें.

लेखांक १.

श्री.

“राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसः—

दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे. विशेषः—चिरंजीव राजश्री आनंदराव राजे जाधवराव देशमुख देशपांडिये सरकार दौलता-

बाद यांचे वतनाचे कामाकरितां आपणांस तीन चार पत्रें पाठविलीं, परंतु त्याजविशीं नवाबास पत्रें सरकारचीं, आपलीं दिल्हीं नाहींत. नवाबाचे नजरेचा ठराव होऊन कागदपत्र जाहाले आहेत. आपले पत्राचा मात्र गुंता आहे. त्यास सरकारचे नजरेकरितां आपणांकडून गुंता जाहला आहे. ह्मणोन ऐकिलें त्यास चिरंजीव जाधवराव यांचा प्रकार आहे तो सर्व आपले ध्यानांतच आहे. तीर्थस्वरूप मातुश्री भागिरथीबाई यांचे नातजांवई ते आमचे. त्यांचें सर्व प्रकारें आह्मांस अगत्य जाणून पूर्वीं पत्रें नवाबास पाठविलीं व तीर्थस्वरूप मातुश्री आनंदीबाई निंबाळकर तेथें प्रसंगीं होती. त्यांणींही नवाबास सांगून त्याकडील ठराव करून दिल्हा. आपल्यांकडील पत्रें गेलीं ह्मणजे चिरंजिवाचें येणें आपले वतनावरी होईल. याकरितां आपणांस लिहिलें असे; तरी सरकारचे नजरेविशीं अडथळा न करितां नवाबास पत्रें अगत्यवादाचीं देऊन, चिरंजिवाचा बंदोबस्त होऊन आपले जाग्यावर येत तें करावें. त्याचे भाऊबंद गैरवाका समजावतील तें मनास न आणावें. आमचे नातजांवई, आह्मांस अगत्य तेंच आपणांस आहेच. सरकारचा नजराणा नच घ्यावा तथापि घ्यावा असाच विचार असल्यास आह्मांस लेहून पाठवावें. परंतु त्यांचे कामास दिकत न करितां जरूर लिहिल्याप्रमाणें बंदोबस्त करून दिल्हा पाहिजे. येविशीं राजश्री नारो शिवदेव यांसही सांगितलें आहे, लिहितील. रा॥ छ १२ जावल. नवाबाकडील नजर ठरली. त्यास चिरंजीव जाधवराव यांची जाहगीर नवाबाकडे जप्तीस आहे. त्यापैकीं वसूल साठ हजार रुपये पडले आहेत. ते नजरेपैकीं मजुरा पडून, बाकी ऐवजाचा निर्गम करून घेऊन, कागदपत्र देऊन, चिरंजिवाची रवानगी करीत तें करावें. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."

## लेखांक २.

### श्री.

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसः—

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य स्ने॥ माहादजी शिंदे दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः—चिरंजीव राजश्री आनंदराव राजे जाधवराव देशमुख व देशपांडीये सरकार दौलताबाद यांजकडील स्वराज्याचे नजराण्याचे ऐवजाकरितां येथून आपणांस चार पांच वेळ लिहिलें, परंतु अद्याप त्याचा कांहीं बंदोबस्त होऊन आला नाहीं ह्मणोन कळलें. त्यावरून हल्लीं आपणांस लिहिलें असे. तरी आह्मी देशीं येई तोंपर्यंत चिरंजीवास स्वराज्याचे नजराण्याचे ऐवजाविशीं सरकारांतून उपसर्ग न लागे तें केलें पाहिजे. रा॥ छ २४ सवाल बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ३ रें.] मे, जून, जुलै १९११. [अंक १०।११।१२.

## विषयानुक्रम.


| विषय. | पृष्ठांक. |
|---|---|
| १ दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें. ... ... ... | १–३० |
| २ तंजावरचें राजघराणें. ... ... ... ... ... | ८५–१०० |
| ३ महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें, भाग २ रा.... ... ... | २०१–२६८ |
| ,, ,, मुखपृष्ठ. ... ... ... | १–४ |
| ४ ऐतिहासिक टिपणें, भाग ३ रा. ... ... ... ... ... | ५७–७२ |

चित्रें—१ दिल्ली येथील बादशाही दरबार. २ राजा तुळाजी. ३ राजा सरफोजी. ४ तंजावरचे शेवटचे राजे शिवाजीमहाराज. ५ श्री० महाराणी कामाक्षीबाईसाहेब. ६ श्रीरंगपट्टण येथील टिपू सुलतानाची स्वारी.




मुंबई येथें
तुकाराम जावजी ह्यांनीं
'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु. अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# काव्यसंग्रहग्रंथमाला.

## मोरोपंतकृत.

| | किं. रु. | ट. ख. आ. |
|---|---|---|
| १. महाभारत—१ आदिपर्व. ... ... ... ... ... | १। | ८≡ |
| २. महाभारत—२ सभापर्व. ... ... ... ... ... | ·॥= | ८– |
| ३. महाभारत—४ विराटपर्व. ... ... ... ... ... | ·॥।= | ८–॥ |
| ४. महाभारत—५ उद्योगपर्व. ... ... ... ... ... | १॥। | ८≡ |
| ५. महाभारत—६ भीष्मपर्व. ... ... ... ... ... | ·॥।· | ८– |
| ६. महाभारत—७ द्रोणपर्व. ... ... ... ... ... | १। | ८= |
| ७. महाभारत—८ कर्णपर्व. ... ... ... ... ... | २ | ·।· |
| ८. महाभारत—९ शल्यपर्व. ... ... ... ... ... | ·।= | ८– |
| ९. महाभारत—१० (गदापर्व) यांतच सौप्तिक आणि ऐषिक पर्वांचा अंतर्भाव झाला आहे. ... ... ... ... ... ... ... | १। | ८= |
| १०. महाभारत—११ स्त्रीपर्व. ... ... ... ... ... | ·।= | ८– |
| ११. महाभारत—१२ शांतिपर्व. ... ... ... ... ... | ·॥· | ८– |
| १२. महाभारत—१३ अनुशासनपर्व. ... ... ... ... | ·॥।· | ८= |
| १३. महाभारत—१४ अश्वमेधपर्व. ... ... ... ... | १ | ८= |
| १४. महाभारत—१५ आश्रमवासिकपर्व. ... ... ... ... | ·॥· | ८– |
| १५. महाभारत—१६ मौसलपर्व, १७ महाप्रस्थानिकपर्व, १८ स्वर्गारोहणपर्व. ... ... ... ... ... ... ... | ·॥· | ८– |
| १६. रामायणें—भाग पहिला. ... ... ... ... ... | १ | ८= |
| १७. रामायणें—भाग दुसरा. ... ... ... ... ... | २ | ·।· |
| १८. रामायणें—भाग तिसरा. ... ... ... ... ... | ·॥।· | ८–॥ |
| १९. रामायणें—भाग चौथा. ... ... ... ... ... | २॥ | ८≡ |
| २०. रामायणें—भाग पांचवा. ... ... ... ... ... | २। | ·।· |
| २१. कृष्णविजय—पूर्वार्ध. ... ... ... ... ... | ·॥।= | ८–॥ |
| २२. कृष्णविजय—उत्तरार्ध. ... ... ... ... ... | १॥। | ८≡ |
| २३. मंत्रभागवत—प्रथम माला.... ... ... ... | १। | ८= |
| २४. मंत्रभागवत—द्वितीय माला.... ... ... ... | ·॥= | ८– |
| २५. मंत्रभागवत—तृतीय माला.... ... ... ... | ·।= | ८– |
| २७. स्फुट काव्यें—भाग पहिला. ... ... ... ... | ३ | ·।· |
| २८. स्फुट काव्यें—(भाग दुसरा.) ... ... ... ... | १॥। | ·।· |
| २९. स्फुट काव्यें—(भाग तिसरा.) ... ... ... ... | १॥ | ८= |
| ३०. स्फुट काव्यें—(भाग चवथा.) ... ... ... ... | १। | ८= |
| ३१. केकावली—(आवृत्ती तिसरी.) ... ... ... ... | २ | ·।· |
| ३२. हरिवंश—पूर्वार्ध. ... ... ... ... ... ... | १॥ | ८≡ |
| ३३. हरिवंश—उत्तरार्ध. ... ... ... ... ... ... | १॥। | ·।· |



दिल्ली येथील बादशाही दरबार.

# दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें.

## दिल्ली दरबारांतील पेशव्यांचे वकील

## हिंगणे.

दिल्ली येथील राजकारणांत, मराठ्यांचा प्रवेश, मोंगल बादशाहा औरंगजेब व छत्रपति शिवाजी महाराज यांच्या कारकीर्दीपासून झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. औरंगजेब बादशाहाचा सरदार मिर्झा राजा जयसिंग व शिवाजी महाराज यांची भेट इ. स. १६६७ मध्यें झाली. नंतर त्यानें शिवाजी महाराजांस दिल्लीस औरंगजेब बादशाहाच्या भेटीस येण्याबद्दल निमंत्रण दिलें, व बादशाही पत्रेंही आणविलीं. ह्या वेळीं शिवाजी महाराजांनीं रघुनाथपंत या नांवाचा आपला वकील भेटीची योजना करण्यासाठीं दिल्लीस प्रथम पाठविला. हा मोंगल बादशाहाच्या दरबारांतील मराठ्यांचा पहिला वकील होय. यानंतर शाहू महाराजांचे कारकीर्दींत मराठ्यांचे वकील दिल्लीस गेल्याचे दाखले सांपडतात. इ. स. १७०७ मध्यें शाहू महाराजांचे वतीनें रायभान या नांवाचा वकील दिल्लीस गेला होता. इ. स. १७१७ मध्यें शंकराजी मल्हार हे सय्यद बंधूंशीं तहाचें बोलणें लावण्यासाठीं दिल्लीस गेले होते. यांनींच दिल्लीचा मुख्य वजीर हुसेन अलीखान याचें मन वळवून, त्याजकडून शिवाजी महाराजांचे वेळीं मराठ्यांच्या अमलाखालीं असलेला 'स्वराज्याचा'प्रांत शाहू महाराजांस परत मिळवून देण्याची खटपट केली. बाळाजी विश्वनाथ पेशवे हे सय्यद बंधूंच्या मदतीसाठीं दिल्लीस जाण्यापूर्वीं बादशाहाकडून 'स्वराज्या'च्या कराराची जी सनद आली, ती शंकराजी मल्हार यांच्या सहीशिक्क्यानिशीं आहे. बाळाजी विश्वनाथ पेशवे ह्यांनीं दिल्लीस गेल्यानंतर तेथें आपलें वर्चस्व स्थापन करून, महंमदशाहा बादशाहाकडून, चौथ, सरदेशमुखी व स्वराज्य अशा तीन हक्कांच्या सनदा मिळविल्या. या वेळीं बाळाजी विश्वनाथ यांनीं दिल्ली येथें देवराव हिंगणे या नांवाचा एक वकील ठेविला, असें मराठ्यांचे इतिहासकार क्याप्टन ग्रँट्डफ यांनीं लिहिलें आहे. परंतु त्यांत कांहीं गैरसमज असावा, किंवा नांवामध्यें चूक असावी असें दिसतें. ह्या वेळेपासून मराठ्यांचा राजकीय संबंध दिल्लीच्या बादशाहाशीं विशेष वाढल्यामुळें त्यांचा कायमचा वकील दिल्ली येथें अधिष्ठित झाला, ही गोष्ट निश्चित आहे; परंतु तो देवराव हिंगणे हा होता कीं काय ह्याबद्दल संशय आहे.

थोरले बाजीराव पेशवे यांचे कारकीर्दींत मयाराम या नांवाचा एक कायस्थ वकील दिल्लीदरबारीं होता. त्याजकडे, बादशाही पत्रव्यवहार पेशव्यांकडे पाठविणें व पेशव्यांकडील पत्रव्यवहार बादशाहास पोंचविणें आणि दिल्लीदरबारांतील गुप्त बातम्या पेशव्यांस कळविणें, हीं मुख्य कामें होतीं. हा इसम जातीचा मराठा नसल्यामुळें व महत्त्वाच्या राजकारणांत सर्व विश्वास एकव्या परक्या माणसावर टाकणें इष्ट नसल्यामुळें, पेशव्यांकडून दिल्ली येथें मराठी वकील स्वतंत्रपणानें जाऊन राहूं लागले.

इ. स. १७३२ पासून इ. स. १७३९ पर्यंत यादवराव प्रल्हाद या नांवाचा वकील दिल्ली येथें रहात होता. त्याप्रमाणें इ. स. १७३९ पासून बाबूराव मल्हार या नांवाचा इसम तेथें वकिलीच्या कामावर असल्याचें आढळून येतें.

मयाराम वकील हा इ. स. १७४२ पर्यंत दिल्ली येथें होता. त्यानंतर त्याचा पुत्र मनसाराम हा त्याचें काम करीत असे. याशिवाय, बाळाजी बाजीराव पेशव्यांचे कारकीर्दींत, आसाराम या नांवाचा एक वकील इ. स. १७४५ ते ४७ पर्यंत होता, असाही दाखला सांपडतो. परंतु बाळाजी बाजीरावांचे कारकीर्दींत पेशव्यांचे मुख्य वकील महादेव गोविंद हिंगणे व त्यांचे पुत्र बापूजी महादेव, देवराव महादेव आणि दामोदर महादेव हे असून, ते दिल्ली येथील मराठ्यांच्या सर्व राजकारणांचे मुख्य सूत्रचालक होते. एवढेंच नव्हे तर, सवाई माधवरावांच्या कारकीर्दीच्या अखेरपर्यंत दिल्लीच्या राजकारणांत त्यांचा विशेष संबंध असून, ते दिल्लीदरबारांतील मराठ्यांचे सनदशीर प्रतिनिधि होत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, अशा इतिहासप्रसिद्ध घराण्याची माहिती अद्यापि अप्रसिद्ध असून, त्यांच्या राजकारणांची पुष्कळांस ओळखही नाहीं! ह्यासाठीं या घराण्याची संक्षिप्त माहिती व त्यांचा पत्रव्यवहार आह्मीं येथें देण्याचें योजिलें आहे.

हिंगणे घराण्याचे मूळ पुरुष, श्रीक्षेत्र नासिक येथील पेशव्यांचे उपाध्ये महादेवभट हिंगणे हे होत. हे वेदशास्त्रपारंगत असून पिशाचलिपी व फारसी भाषा जाणत होते. यांच्या अंगीं वक्तृत्व, बहुश्रुतता आणि चातुर्य इत्यादि अनेक गुण असल्यामुळें बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची मर्जी त्यांच्यावर बसली, व त्यांचा विशेष घरोबा जडला. त्यामुळें महादेवभट हे त्यांच्या स्वारीबरोबर जाऊं येऊं लागले. दिल्ली येथें बाळाजी विश्वनाथ पेशवे इ. स. १७१९ मध्यें गेले, त्या वेळीं महादेवभट हिंगणे हे कदाचित् बरोबर गेले असावेत. ग्रँट्डफ् यांनीं देवराव हिंगणे ह्मणून जें नांव दिलें आहे, तें बहुत करून चुकीनें पडलें असून, तें महादेव गोविंद

हें असावें, असें वाटतें. परंतु त्याबद्दल खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. हिंगण्यांच्या कैफियतीवरून, थोरले बाजीराव साहेब पेशवे यांचे कारकीर्दींत महादेवभट हिंगणे हे इ. स. १७३४ चे सुमारास दिल्लीस गेले, असा दाखला सांपडतो. या वेळीं बादशाहाचे वजीर नवाब अमीर-उल्-उमराव हे होते. इ. स. १७३४ पासून इ. स. १७४० पर्यंत महादेवभट हिंगणे हे दिल्लीस असून, त्या मुदतींत झालेल्या मराठ्यांच्या दिल्ली येथील राजकारणांत त्यांचा संबंध होता व ते मराठ्यांच्या सरदारांस उपयोगीं पडले, असें मानण्यास आधार सांपडतो. राणोजी शिंदे व रामचंद्र मल्हार हे इ. स. १७३८ मध्यें दिल्लीहून परत आले. त्यांनीं बाजीराव पेशव्यांजवळ हिंगण्यांची शिफारस केली. याचा उल्लेख बाजीराव पेशव्यांच्या ता. १२ जुलई इ. स. १७३८ च्या एका पत्रामध्यें आढळून येतो. तो येणेंप्रमाणेंः—

"राजश्री राणोजी शिंदे व राजश्री रामचंद्र मल्हार आले. यांनीं तुमचे कष्टमेहेनतीचा मजकूर विस्तारें सांगितला; त्यावरून संतोष वाटला. ऐसियास, तुह्मीं कामकाजास जपून कार्यभाग करून दाखविला. पुढेंही न चुका, ऐसा भरोंसा आहे. कित्येक कार्यभागाचा मजकूर हल्लींही मशारनिल्हेंनीं तुह्मांस लिहिला आहे; तदनुरूप करून वर्तमान लिहीत जाणें. तुमच्या वर्षासनाविषयीं उभयतांनीं विनंति केली. त्यावरून तुमचे गुदस्ताचे रुपये शंभर व सालमजकूरचे शंभर एकूण दोनशें रुपये देवले आहेत. तुह्मांस पावतील. सारांश, सर्व प्रकारें तुमचें आवश्यक आहे. हरएकविशीं समाधान रक्षून कामकाज करीत जाणें." (रा० कृत खंड ६.)

इ. स. १७४० मध्यें बाजीराव पेशवे मृत्यु पावले. त्या वेळीं महादेवभट हिंगणे, बाळाजी बाजीराव व चिमाजी आपा यांचे समाचारासाठीं, पुण्यास आले होते. इ. स. १७४१ मध्यें पेशव्यांनीं त्यांस निरोप देऊन पुन्हां दिल्लीचे वकिलीवर पाठविले. त्या वेळीं सवाई जयसिंगजी याचे मार्फत मराठ्यांचीं दिल्लीकडील राजकारणें चालू होतीं, व दिल्लीच्या बादशाहाकडून पुष्कळ द्रव्य मिळवून कर्जमुक्त व्हावें, अशी पेशव्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं, सवाई जयसिंगाच्या मार्फत हें काम करून घेण्यासाठीं महादेवभट हिंगणे यांची योजना केली. पेशवे त्यांस लिहितातः—

"तुह्मीं उत्तम प्रकारें सवाईजीशीं बोलून, सत्वर कार्य होय ऐसें करणें. दिवस गेले! चालढकलीवर घालून चार दिवस गेले ह्मणजे अगोट समीप आली. लांबणीवर गोष्ट पडते. आह्मांस तों सर्वप्रकारें सवाईजीचा भरंवसा. कर्जावेगळें आह्मांस त्यांनीं करावें. पातशाहापासून जें साधेल तें साधून आह्मांस द्यावें. आपणापासून उत्तम प्रकारें रयात करावी. हें त्यांचे वडीलपणास ये समयीं विहित आहे."

असो. महादेवभट दिल्ली येथें इ. स. १७४१ पासून इ. स. १७४५ पर्यंत वकिलीच्या कामावर असून, त्यांचे पुत्र बापूजी महादेव व दामोदर महादेव हे त्यांच्या समागमें दिल्लीस होते. ते तिघेही दिल्लींतील बादशाही राजकारणांत मराठ्यांच्या वतीनें निमग्न असून, त्यांनीं मराठ्यांची सत्ता, राजपुताना व उत्तर हिंदुस्थान यामध्यें प्रसृत करण्याचे कामीं, पुष्कळ साहाय्य केल्याचें दिसून येतें. महादेवभट व त्यांचे पुत्र बापूजी महादेव व दामोदर महादेव यांनीं दिल्ली येथें राहून बादशाहाच्या दरबारांत आपलें चांगलें वजन बसविलें, आणि बादशाहाच्या मर्जीप्रमाणें अनेक कामकाजें करून त्याची कृपा संपादन केली. त्यामुळें बादशाहानें त्यांजवर प्रसन्न होऊन त्यांस अंतरवेद प्रांतांत सात हजारांचीं गांवें जहागीर दिलीं. महादेवभट हे इ. स. १७४६ चे अखेरीस दिल्ली येथें मृत्यु पावले. त्यांचे पश्चात्, बापूजी महादेव व दामोदर महादेव हे दिल्ली येथील पेशव्यांच्या वकिलीचें काम चालवूं लागले. या दोघांनीं दिल्ली येथें मोठ्या मानमरातबानें राहून आपलें प्रस्थ व डामडौल विशेष वाढविला.

इ. स. १७५० पासून इ. स. १७६१ पर्यंत दिल्ली येथें अनेक मोठीं राजकारणें घडून आलीं. त्या सर्वांमध्यें बापूजी महादेव व दामोदर महादेव यांचें विशेष अंग दिसून येतें. या अवधीमध्यें रोहिले, पठाण, जाट, रजपूत व अयोध्येचा नबाब-वजीर यांच्या बरोबर झालेलीं पेशव्यांचीं राजकारस्थानें अत्यंत महत्त्वाचीं असून, त्या सर्वांवर मराठ्यांनीं आपली छाप चांगलीच बसविली होती. या वेळीं शिंदे, होळकर वगैरे मराठे सरदारांनीं आपल्या बाहुपराक्रमाची व बुद्धिकौशल्याची शर्थ करून, दिल्लीपर्यंत मराठ्यांची सत्ता नेऊन पोंचविली होती. इ. स. १७६१ मध्यें अवदालीचें अरिष्ट येऊन पानिपत येथील रणकंदन झालें नसतें, तर दिल्लीपदपातशाहास मराठ्यांनीं अंकित केल्यावांचून कधींही सोडिलें नसतें. या सर्व राजकारणांत हे हिंगणेबंधू अनेक रीतींनीं समाविष्ट होते यांत शंका नाहीं.

बापूजी महादेव व दामोदर महादेव यांनीं दिल्ली येथें स्वार शिबंदी वगैरे ठेवून आपला दर्जा व मरातब मोठा वाढविला होता, आणि दिल्लीदरबारांत आपलें विशेष वजन संस्थापित केलें होतें. एवढेंच नव्हे तर, त्यांनीं बादशाहास चांगल्या रीतीनें अनुकूल करून घेऊन, त्याला पठाण व रोहिले यांच्या ताब्यांतून दूर करून, आपल्या संरक्षणाखालीं ठेवण्याचा घाट घातला होता. त्यांनीं मराठ्यांची पांच हजार फौज दिल्ली येथें ठेवून, बादशाहास सर्वस्वीं आपल्या मुठींत ठेवण्यासाठीं व मराठ्यांचा नक्ष राखण्यासाठीं, अंताजी माणकेश्वर नामक सरदारास दिल्ली येथें

आणविलें, व त्याच्या फौजेच्या खर्चासाठीं बादशाहाकडून दरमाहा तीस हजार रुपये कबूल करून घेतले. त्याप्रमाणें अंताजी माणकेश्वर दिल्ली येथें इ. स. १७५३ मध्यें येऊन दाखल झाले.

बापूजी महादेव, दामोदर महादेव व अंताजी माणकेश्वर हे दिल्ली येथें एकमतानें राहून त्यांनीं पेशव्यांची सेवा एकनिष्ठपणानें केली असती, तर त्या सेवेची योग्यता फारच वर्णनीय झाली असती. परंतु, अंताजी माणकेश्वर व हिंगणेबंधू यांच्यामध्यें परस्पर मत्सर व स्वार्थबुद्धि उत्पन्न होऊन मोठी चुरस लागली. दिल्लीस ज्या वेळीं अंताजी माणकेश्वर गेले व मराठ्यांच्या फौजेचा तेथें कायमचा तळ पडला, त्या वेळीं नवाब-वजीर व पठाण रोहिले यांना मोठें संकट उत्पन्न होऊन, त्यांनीं अंताजी माणकेश्वर यांस लांच देऊन अनुकूल करण्याचा प्रयत्न केला. परंतु हिंगण्यांनीं त्यांच्याकडून नवाब-वजिराशीं मिलाफ होऊं दिला नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांच्याकडून असा करार लिहून घेतला कीं, "नवाब-वजिरानें दहा लाख रुपये दिले, तरी ते कामाचे नाहींत. यांत श्रीमंतांचें नुकसान आहे. तरी, नवाब-वजिराचा पैसा न घेतां बादशाहीची चाकरी एकनिष्ठपणें करूं. आणि, तुमच्या आज्ञेप्रमाणें वागून, कोणत्याही गोष्टींत प्रतारणा करणार नाहीं, व तुमच्या मानांत उणेपणा आणणार नाहीं." परंतु दिल्ली येथील वैभव, तेथील अमीरउमरावांची संपत्ति आणि दरबारांतील अव्यवस्था इत्यादि मोह उत्पन्न करणारी एकंदर परिस्थिति अवलोकन करितांच, अंताजी माणकेश्वर यांस मत्सरबुद्धि उत्पन्न झाली, व दिल्लीदरबारांतील हिंगण्यांचें प्रस्थ कमी करून आपलें घोडें पुढें ढकलावें, अशी लालसा त्यास वाटूं लागली. त्यांनीं तेथें अनेक दुफळ्या व अनेक भानगडी करून तंटे उपस्थित केले, व पेशव्यांस हिंगण्यांचे विरुद्ध चुगल्या लिहून, त्यांचेंही मन कलुषित केलें. हिंगण्यांचा दिल्ली येथील लवाजमा व डामडौल फार अवाढव्य असून त्यांची खर्चाची ओढाताण फार असे. त्यामुळें त्यांना पेशव्यांकडे तिकडील प्रांताचा वसूल पाठविण्यास सवड होत नसे. त्यांत अंताजी माणकेश्वरांची चुरस भरीस पडून पेशव्यांचें मन त्यांचेबद्दल फार कलुषित झालें. इ. स. १७५७ मध्यें ज्या वेळीं रघुनाथराव पेशवे दिल्लीकडे गेले, त्या वेळीं बापूजी महादेव हिंगणे यांच्यावर त्यांची इतराजी होऊन, त्यांनीं त्यांची जहागीर जप्त करण्यापर्यंत मजल आली. पेशव्यांच्या बखरीमध्यें, बापूजी महादेव हिंगणे यांनीं गर्वांध होऊन, मेजवानीच्या प्रसंगीं, 'श्रीमंत दादासाहेब ते कोणते?' असा भर पंक्तींत प्रश्न करून पेशव्यांचा अपमान केला; त्यामुळें दादासाहेबांनीं संतप्त होऊन, हिंगण्यांची सर्व संपत्ति यमुनेंत टाकून दिली व जहागीर जप्त केली,

अशी आख्यायिका दिली आहे. ही आख्यायिका कितपत खरी आहे, हें सांगतां येत नाहीं. तथापि, या वेळीं रघुनाथराव पेशव्यांचा व त्यांचा बेबनाव होऊन त्यांनीं त्यांची जहागीर जप्त केली, ही गोष्ट सत्य आहे.

हिंगणे यांनीं दिल्ली येथें आपला इतमाम बराच मोठा वाढवून, पेशव्यांच्या वतीनें तिकडील कित्येक महालांवर आपला अंमल चालवून वेळोवेळीं, पेशव्यांस पुष्कळ द्रव्य दिलें होतें, व नवाब-वजीर याचा तेरा लक्ष खंडणीचा जिम्मा आपल्या माथीं घेऊन, मेरट महाल आपल्या ताब्यांत घेतला होता. परंतु अंताजी माणकेश्वरानें रघुनाथराव पेशव्यांचें मन हिंगण्याविरुद्ध कलुषित करून ते महाल आपल्याकडे घेतले. त्यामुळें हिंगण्यांचें फार नुकसान झालें. तेव्हां दामोदर महादेव यांनीं पुण्यास श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांच्याकडे जाऊन त्यांस आपली स्थिति निवेदन केली. श्रीमंतांनीं, रघुनाथराव दादासाहेबांची समजूत करून, हिंगण्यांची जप्ती उठविण्याबद्दल दुसरा हुकूम पाठविला. रघुनाथराव पेशवे यांनीं हिंगण्यांकडून सहा लक्ष रुपये घेऊन त्यांची जप्ती उठविण्याचें कबूल केलें. पण हिंगणे त्या वेळीं इतके रुपये देण्यास समर्थ नव्हते. तेव्हां त्यांनीं चिंतामण दीक्षितांकडे पांच लक्षांचा व अंताजी माणकेश्वराकडे एक लक्षाचा असा हवाला देऊन जप्ती दूर करविली.

बापूजी महादेव यांचे बंधु पुरुषोत्तम महादेव हे पुढें बरेच दिवस दिल्लीस होते. हे पानिपतच्या लढाईच्या प्रसंगीं महादेव पेशव्यांच्या सल्लामसलतींत असल्याचें दिसून येतें. पानिपतची लढाई झाल्यानंतर मराठ्यांच्या दिल्ली येथील अमलाची वाताहत झाली. तथापि, बापूजी महादेव व पुरुषोत्तम महादेव हे त्या प्रांतींच राहून, तिकडील राजकारणांच्या बातम्या पेशव्यांस पाठवीत असत. पानिपतच्या लढाईत त्यांची सर्व जहागीर वगैरे गेल्यामुळें कांहीं दिवस त्यांची फार हालाखी झाली होती. परंतु थोरले माधवराव पेशव्यांनीं, इ. स १७६९ आक्टोबर १७ तारखेस, पुरुषोत्तम महादेव व देवराव महादेव यांचे नांवें दिल्लीच्या वकिलीच्या पुनः सनदा दिल्या. त्याप्रमाणें ते तेथें राहून काम करूं लागले. पुरुषोत्तम महादेव हे इ. स. १७६९ पासून इ. स. १७८३ पर्यंत दिल्ली येथेंच होते; व देवराव महादेव हे कांहीं दिवस लखनौस सुजाउद्दौल्याकडे वकिलीच्या कामावर होते. बापूजी महादेव मात्र पुढें दिल्लीस राहिले नाहींत. ते पुढें बुंदीस जाऊन राहिले व तेथेंच ते मृत्यु पावले असें दिसतें.

पुरुषोत्तम महादेव यांनीं दिल्ली येथील वकिलीचें काम फार उत्तम रीतीनें बजाविलें. नाना फडनविसांचे कारकीर्दींत दिल्ली येथें मराठ्यांचीं जीं राजकारणें घडून

आलीं, तीं सर्व पुरुषोत्तम महादेव यांच्याच बुद्धिचातुर्यानें होत. त्यामुळें नाना फडणविसांची पुरुषोत्तम महादेव यांच्यावर फार मेहेरबानी होती. पुरुषोत्तम महादेव हे इ. स. १७८३ मध्यें दिल्ली येथें मृत्यु पावले. त्यांच्या पश्चात् त्यांचा मुलगा गोविंदराव पुरुषोत्तम हा अल्पवयी असल्यामुळें, दिल्लीच्या वकिलीचें काम, त्यांचा विश्वासू व प्रामाणिक कारकून शंकराजी सखदेव हा करीत असे. परंतु त्याचें व पुरुषोत्तम महादेव यांचे बंधु देवराव महादेव यांचें न पटल्यामुळें दिल्ली येथील वकिलीचा दर्जा फार कमी झाला. शंकराजी महादेव हा फार प्रामाणिक, हुशार व स्वामिभक्त असल्यामुळें व दिल्ली येथील माहिती त्यास बरीच असल्यामुळें त्यानें नाना फडणविसांस व पेशव्यांस तिकडील कच्ची बातमी देण्यांत कसूर केली नाहीं. त्याच्या एकंदर पत्रांवरून, पेशव्यांकडून त्यास खर्चास भरपूर मिळालें नाहीं, व देवराव महादेव यांनीं त्याचा परामर्ष घेतला नाहीं, असें दिसतें. त्यामुळें दिल्ली येथें हिंगण्यांचें तेज कमी कमी होत जाऊन, ते पेशव्यांच्या वकिलाच्या ऐवजीं त्यांचे अकबरनवीस होऊन राहिले.

इ. स. १७८३ पासून १७८८ पर्यंत, दिल्ली येथें अनेक घडामोडी होऊन मराठ्यांचे रणशूर सरदार महादजी शिंदे यांचा तेथें अंमल झाला. अर्थात् त्यांचे कारकीर्दींत पेशव्यांच्या वकिलाची मातबरी व जरूर राहिली नाहीं. पुरुषोत्तम महादेव यांचे चिरंजीव गोविंद पुरुषोत्तम यांनीं इ. स. १७८९ मध्यें लिहिलेलें एक खाजगी पत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. त्यावरून हिंगण्यांच्या त्या वेळच्या स्थितीचें चित्र नेत्रांपुढें उभें राहतें. त्यांची पूर्वीं भरभराट किती झाली होती व ह्या वेळीं त्यांस किती विपदवस्था प्राप्त झाली होती, तें या पत्रावरून चांगलें दिसून येतें. तें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

'पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, आह्मांस येथें लोकांचें व शिबंदीचें देणें तीर्थरूपांचे हातचें आहे. त्यास, याविषयीं पेशजीं हजुरांत विनंति लिहिली होती. त्याचें उत्तर आलें कीं, जहागिरीवर ऐवज घेऊन कर्ज वारणें. त्यास दोन तीन वर्षें जालीं, खुशकी या प्रांतीं पडली आहे, त्याजकरितां जहागिरीपैकीं कपर्दिक न आली. आणि आमचा प्रकार ह्मणावा, तर राजश्री शंकराजी सखदेव व आह्मीं दिल्लींत गहाण सावकारांनीं व शिबंदीचे माणसांनीं अटकावून ठेविलें आहे. बाहेर निघूं पावत नाहीं! विना पैका घेतल्याखेरीज येथून आमचा गुजारा नाहीं. याचें कारण हेंच कीं, जैसें तीर्थस्वरूप राजश्री देवराव तात्या येथून गेले, पुन्हां येथें पैकाही न पाठविला व आपणही परत न केली, तैसें हेही निघून गेलियावर मग आह्मी

पैका कोणापाशीं मागावा ? याप्रमाणें हे बोलतात. याजकरितां विनंति कीं, सरकारांत रोशनगांवाचा ऐवज येणें तो कृपा करून देवाल, तर आमची मुक्तता कर्जापासून व शिबंदीपासून होईल. नाहींतर आणिकही हवाले कफालेबद्दल ऐवज येणें त्यास, सांप्रत तीर्थस्वरूप तात्याही तूर्त दरबारीं आहेत. त्यास कजियाचा फडशा करवून तो ऐवज देवाल तर गुंता उरकेल. ह्या दोहीं गोष्टींतून एक गोष्ट तऱ्ही विल्हेस लावून, येथील देण्यापासून व शिबंदीपासून मुक्त करणार स्वामी समर्थ आहेत, व हल्लीं पातशाहाचे येथें राजश्री पाटीलबावांची मुखत्यारी जाली आहे. त्यास, आजपावेतों ऐवज, मुखत्यार होते ते आपले फौजेचें बळ पाहून, कालानुरूप आमचें चालवीत होते. त्यास पाणिपताची गर्दी जाली. त्यादिवसापासून तों आह्मांस कोणी पुसतच नाहीं, व वकालतीचें काम आमचे हातून कोणीं घेतलें नाहीं. राजश्री विसाजीपंत आले, त्यांनीं राजश्री दादो मल्हार यांचे हातून वकालतीचा कारभार घेतला, व शिंदे होळकर येतात, ते आपले कारकुनाचे हातून काम घेतात. आह्मी सरकारी ह्मणोन आमचे हातून काम घेत नाहींत. त्यास, आतां तर वकालतीचा दर्जा कांहीं राहिलाच नाहीं! पातशाहात सरकारांत आली. पातशाहा आहे त्यास अन्नवस्त्राची मात्र गरज आहे. पातशाहीची व हुकुमाची गरज नाहीं. श्रीकृपेंकरून बंदोबस्त यथास्थित जाल्यास आतां या स्थळावर दुसरियाचा काबू चालणार नाहीं. याजकरितां विनंति कीं, महंमदशाहा पातशाहा व अहंमदशाहा पातशाहापासून आह्मांस पातशाहाचे येथून पावत आलें आहे, त्याचा बंदोबस्त करून देविणार स्वामी समर्थ आहेत.

बितपशीलः—

३ प्रो गणमुक्तेश्वर पैकीं गांव तीन.

१ अफजलगंज, उ॥ विसागंज सरकारी. विसाजीपंतांनीं अंमल केला होता.

१ अमरी खजान्यांत दरमाहा रुपये ४४०० चव्वेताळीसशें.

१ प्रो सरावा दरोबस्त बमय ता॑ भोजपूर व किवारे व साडसोदा.

१ झारेडा वगैरे गांव १३ तेरा.

१ करोडीवर दरमाहा रुपये १००. शंभर.

५ प्रो शिकंदराबाद पैकीं करावल नगर वगैरे गांव.

१ प्रो सोहनें दरोबस्त जहागीर.

१ वृंदावन सरकारी. नजबखानानें दिल्हें आहे.

१ प्रो झाडसा दरोबस्त.

१ कुसलीया प्रा डासना.

१ अडतला प्रो लोणी.

१ प्रो सोनपत येथें मालावर दरमाहा रुपये १००० एक हजार.

सदर्हूप्रमाणें पाणिपताची गर्दी जाली, तोंपावेतों आह्मांकडे चालत होती. अलीकडे जाटानें वगैरे लोकांनीं, ज्याची काबू चालली त्यांनीं, आपला अंमल केला आहे. त्यास आतां सलतनत सरकारांत आली आहे, आणि परदरबारीं कारभार आहे. खर्च पातशाहाचा व यश आपल्यास. याजकरितां राजश्री पाटील-बावांस एक पत्र व एक अर्जी पातशाहास ऐसीं दोन पत्रें लिहून पाठवावीं कीं, येणेंप्रमाणें सरंजाम पातशाहींतून यांजकडे चालत आला आहे त्याप्रमाणें चालवावें. ह्मणून जरूर जरूर दोन पत्रें शिफारसी लिहून पाठविणार स्वामी समर्थ आहेत. पूर्वीं राजश्री रामचंद्रबावा यांनीं तीर्थस्वरूप दामोदरपंत यांची मुरबेगिरी करून, ऊर्जित करून, चोवीस हत्ती घरचे व सातशें घोडे त्यांचे कृपेनें जाले होते. त्याअलीकडे मुरब्बी व धनी, मायबाप श्रीरघुवीराप्रमाणें आह्मांस आपण आहेत. त्यास, आपले कृपेनें कांसवदृष्टीनेंच आमचें ऊर्जित होईल ऐसा प्रकार आहे. विस्तार लिहिणें विस्तारच आहे. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

इ. स. १७८९ पासून इ. स. १८०३ पर्यंत दिल्ली येथें शिंदे ह्यांचा अंमल होता. त्यांच्या अंमलांत हिंगणे हे दिल्लीस राहून तेथून पुण्यास पेशव्यांकडे बातमीपत्रें पाठवीत असत. इ. स. १७९५ पर्यंतचीं त्यांचीं बातमीपत्रें नाना फडणविसांच्या दप्तरांत बहुतेक शाबूद सांपडलीं आहेत. तीं 'इतिहाससंग्रहांत' प्रसिद्ध करण्याच्या आमचा मानस आहे.

हिंगणे ह्यांनीं दिल्ली येथून पेशव्यांस लिहिलेलीं पत्रें इतिहासदृष्टीनें फार महत्त्वाचीं आहेत. ह्या पत्रांवरून दिल्ली येथील राजकीय घडामोडींचें उत्कृष्ट चित्र नेत्रांपुढें उभें राहून, अठराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्यें दिल्लीची पातशाहात हस्तगत करून घेऊन तेथें आपल्या सत्तेचा चंचुप्रवेश करण्यासाठीं, मराठे, इंग्रज आणि रोहिले ह्यांच्यामध्यें केवढी चुरस लागली होती, व त्यांनीं कसकसे प्रयत्न केले, तें चांगलें कळून येतें. आह्मांस उपलब्ध झालेलीं पत्रें इ. स. १७८० पासून १७९५ पर्यंतचीं आहेत. हा काल मराठ्यांच्या इतिहासांत अतिशय महत्त्वाचा मानिला जातो. इंग्रज व मराठे ह्यांच्या पहिल्या युद्धापासून तों खर्ड्याच्या रणभूमीवर मराठ्यांच्या शेवटच्या विजयापर्यंत घडलेल्या राजकारणांचा त्यांत समावेश होत असून, मराठेशाहींतील उच्च प्रतीचे मुत्सद्दी व योद्धे ह्यांचा कर्तबगारीचा जो कांहीं शेवटचा प्रकाश चमकला, तो ह्याच अवधीमध्यें होय. हिंदुस्थानामध्यें जी पाश्चात्य राजसत्ता पुढें सम्राट्पदारूढ झाली, तिच्या अभ्युदयाचा हा प्रभातकाल होय असें ह्मटल्यास हरकत नाहीं. अर्थात् हा काल सर्वप्रकारें अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें, त्यांत

घडून आलेल्या राजकारणांचा यथातथ्य, संगतवार व साधार असा इतिहास माहित करून देणारीं अस्सल पत्रें जगापुढें येणें किती अवश्य आहे, हें इतिहासवाचकांस सांगावयास नकोच. ह्या पत्रांमध्यें दिल्लीच्या सलतनतीचा ऱ्हासकाल विशदरीतीनें चित्रित झालेला असून, तेथील सार्वभौमसत्ता व दुसरीं एतद्देशीय राष्ट्रें कोणत्या कारणामुळें विनाश पावलीं, त्यांची विचिकित्सा करण्यास हीं पत्रें फार साधनीभूत होण्यासारखीं आहेत. मि० कीन ह्या नांवाच्या इतिहासकारानें "Fall of the Mogul Empire" ह्या नांवाचें मोंगल बादशाहीच्या ऱ्हासकालावर एक उत्कृष्ट पुस्तक लिहिलें आहे. त्यांतील माहिती व विधानें ह्यांचा पडताळा पाहण्यास, हिंगण्यांचीं दिल्ली येथील राजकारणांचीं पत्रें ह्मणजे केवळ आदर्शच आहेत. ह्या पत्रांच्या वाचनानें, दिल्लीच्या पादशाहातीची शोचनीय स्थिति, एतद्देशीय लोकांची परस्पराविषयींची मत्सरबुद्धि आणि स्वार्थैकपरता, आणि पाश्चात्य लोकांचें दूरदर्शित्व आणि उच्च प्रतीचें राजकारणचातुर्य हीं व्यक्त झाल्यावांचून राहत नाहींत. जी ब्रिटिश राजसत्ता परमेश्वराच्या कृपेनें आजमितीस हिंदुस्थानांत साम्राज्यपदावर आरूढ झाली आहे व जिच्या यशोदुंदुभीचा मेघनाद सर्व पृथ्वीतलावर गर्जत आहे, आणि जिच्या भाग्यरवीचा दिव्य प्रकाश सर्व जगास दिपवून सोडीत आहे, तिच्या अभ्युदयाचा खरा वृत्तांत देखील ह्याच पत्रांवरून कळून येतो. त्यामुळें अनेक दृष्टींनीं हीं पत्रें फार महत्त्वाचीं व विचारार्ह आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. ह्या पत्रांत नमूद झालेल्या गोष्टी गतकालांतील असून, त्यांचें निरीक्षण केवळ इतिहासदृष्टीनेंच केलें पाहिजे, हें निराळें सांगावयास नकोच आहे.

हिंगण्यांच्या चार बंधूंपैकीं बापूजी महादेव, दामोदर महादेव व पुरुषोत्तम महादेव हे इ. स. १७८९ पर्यंत मृत्यु पावले. बाकी राहिले देवराव महादेव, ते दक्षिणेंत आले.

या चार बंधूंपैकीं कनिष्ठ बंधु देवराव महादेव हे मोठे मुत्सद्दी असून, ते नाना फडणविसांच्या सांगण्यावरून अहिल्याबाई व तुकोजी होळकर यांचा तंटा मिटविण्याकरितां इ. स. १७९३ त महेश्वरास गेले होते. ते इ. स. १७९६ त वारले. त्यांचे वंशज नासिक जिल्ह्यामध्यें चांदोरी येथें आहेत. त्यांच्याकडे सुमारें सात हजारांचे इनामी गांव चालू आहेत.

# दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें.

## भाग पहिला.

### इ. स. १७८०.

पो॥ चंद्र २९ जमादिलावल, समानीन. हस्तें कासीद अजुरदार.

**लेखांक १.**

**श्रीवरद.**

५ मे. इ. स. १७८०.

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

"विनंति सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत चंद्र २९ माहे रविलाखर मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनें- करून यथास्थित असे. विशेषः– इकडील वर्तमान, सविस्तर विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं, तीं प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. सरकारचें आज्ञापत्र आलें कीं, "गोहदकर जाटांनीं सरकारतालुक्यांत उपद्रव केला होता. त्यास, सरदारां- कडील फौज व राजश्री शिवाजी विठ्ठल व बळवंतराव धोंडदेव आदिकरून सरकारची फौज [ह्यांनीं] त्यांजकडील गढ्या व ठाणीं कांहीं घेतलीं. सरकारचा अम्मल बसविला आहे. तंबी चांगलीच केली आहे. आणीकही ठाणीं व गढ्या घेत आहेत. तुह्मीं बादशाहांसीं व नजबखानांशीं बोलून, पक्कें करून, कुमक न करीत तें करणें. इंग्रज सांप्रत हांवभरी होऊन गुजराथ प्रांतीं हंगाम करूं लागले. याजकरितां त्यांचे तंबीस उभयतां सरदार व सरकारची फौज गुजराथ प्रांतीं रवाना केली आहे. लवकरच पारिपत्य होईल. दक्षिणेकडे कंपू येऊं लागल्यास सरकारची फौज व सरदाराकडील फौज ते प्रांतीं आहेच. तिकडून इंग्रज येतील तर ठासून राखावें, येविषयीं पत्रें गेलींच आहेत. काम पडल्यास वरचेवर पत्रें आणीख जातील. तुह्मीं नजबखानाची व सरकारची एकवाक्यता होयसें करून, इंग्रेजांस ताण बसून इकडे न येत तें करणें, व हैदरनाईकाकडील विजापूरचे सनदेविषयीं फिरून पैगाम करितील, तरी त्याचे बोलण्याचें संधान राखून, पुन्हां पादशाहांसीं बोलून, सनद न द्यावयाचें पक्कें करणें." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यांस व नजबखानास एकत्र करून इंग्रेजांची कुमक न करावी ह्मणून पक्कें केलें आहे, व पुढें त्यांशीं बिघाड करावा याअन्वयें बोलणें बहुत जालें, तो मजकूर सविस्तर पुरवणीपत्रीं लिहिला आहे त्यावरून श्रुत होईल. उत्तरें येतील त्याप्रमाणें पुढें यांस श्रुत करूं. व

हैदरनाईकाकडील प्रथम वकील आला होता. त्याचा जाबसाल माजी केला. याजकरितां हल्लीं मुकुंदराव नामें वकील दुसरा आला आहे. यांनीं नजबखानास कांहीं लालूच दाखवून विजापूरचे सनदेचें काम करून घ्यावें या विचारांत आहेत. परंतु आह्मीं पादशाहांसीं एकांतीं गांठ घालून आपले सरकारचे बंदगीचा मजकूर समजाऊन सनद न द्यावीसें पक्कें केलें आहे. नजबखानांसींही मोठी मसलत फिरंगी यांचे बिघाडाची व आपले सख्यत्वाची गोष्ट समजाऊन, सनद न द्यावी व पुढें फिरंग्यांसीं बिघाड करावा हें ठरविलें आहे. परंतु अनुभवास येईल तें खरें. तात्पर्य, गुजराथप्रांतीं लढाई आहे. श्रीकृपेनें फत्ते जाल्यास हें सर्व सरकारचें लक्षा-खेरीज कांहीं करूं शकत नाहींत. इंग्रेजांशीं सलूख केल्यास सर्वांचीं लक्षें तिकडे लागतील. श्रुत होय. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

---

## लेखांक २.

**श्रीवरद.** मे. इ. स. १७८०.

"पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञप्ति ऐसीजे. नवाब नजबखानास हेंही श्रुत केलें कीं, हैदरनाईकाशीं व श्रीमंतांशीं सलूख जाला. वीस लक्ष रुपये खंडणी सरकारांत दिधली. येथें विजापुरची सनद मागावयास वकील पाठविले नाहींत. गृहस्थ आले आहेत ते, तुमचा श्रीमंत स्वामींचा स्नेह आहे तो खरा खोटा पाहावयास तुह्मांस लालूच दाखऊन बोलतात. येविषयीं चित्तांत संदेह असेल तर प्रथम सुजाखान नामें वकील हैदर नाईकाचा आला आहे त्यास पुसणें. अबदुल अहदखानानें या गोष्टीमुळेंच सनद विजापुरची हैदर नाईकास न दिधली. याप्रमाणें सुजाखानाचे हातेंही दाखला नजबखानास पुरविला. त्याजला दाखला पुरवायाकरितां सरकारचे चाकरीचे उमेदवार केलें आहे. व मुकुंदराव काम करून गेल्यास तो अयशी होईल हें त्यास समजाऊन व उमेदवार सरकारचे कृपेचा करून, पातशाहा (व) नजबखानास दगा आहे ह्मणून साशंकित करून, विजापुरची सनद न देणें ठरविलें. श्रुत होय. पुढें होईल तें विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ३.

**श्रीवरद.** मे. इ. स. १७८०.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति उपरी केशवराव हरकारियांचे पुत्र, बदरीनाथराव, येथें निजामअली-खानाकडून हरकारगिरीचे कामावर आहेत. या दिवसांत निजामअलीखानाकडील

बातमी पातशाहा (व) नजबखानास पाविली कीं, निजामअल्लीखान व हैदरनाईक व इंग्रज व सरदार उभयतां एकचित्त होऊन, श्रीमंत दादासाहेबांस स्थापून, स्वामींसीं विपरीत करावें. हें वृत्त बदरीनाथानें नजबखानास श्रुत केल्यावर, आह्मांसीं खानमजकूर मोघम बोलिले कीं, 'कितीक विपरीत वृत्त दक्षिणचें येतें. त्याजवर आह्मांस मदार नाहीं.' ह्मणून सांगितल्यावर आह्मीं पुसिलें कीं, 'काय आहे तें सांगावें.' तेव्हां बोलले कीं 'सांगावें याजोगें नाहीं!' त्यावरून आह्मीं शोध केला. तों कळलें कीं, बदरीनाथानें हें वृत्त यांस श्रुत केलें आहे. त्याजवरून सेवेसीं श्रुत करणें जरूर जालें. त्यास, स्वामींनीं निजामअल्लीखानास, राजश्री कृष्णराव बल्लाळ यांस न कळतां लिहून, अथवा मातबर पाठवून, आपले स्नेहाची पोक्तगी करावी. कृष्णराव बल्लाळ यांस न कळतां निजामअल्लीखानास लिहावयास सांगावयास कारण काय ह्मणाल, तर त्यांचीं पत्रें बदरीनाथाकडे येतात, व यांचीं त्याजकडे जात आहेत. हें वृत्त फिरून बदरीनाथास कळेल, तेव्हां आह्मांस त्यांचें घरचें वृत्त तथ्य कळतें, तें कळणार नाहीं. यास्तव लिहिलें असे. कृष्णरावजीचा व बदरीनाथाचा स्नेह स्वामींस श्रुत केला. याकरितां आह्मांसीं ते विषम मानितील ह्मणोन मनांत ठेऊन, जे सलाह असेल तें करणार स्वामी समर्थ आहेत. विनंति मनन करून फाडून टाकावी. श्रुत होय कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ४. मे इ. स. १७८०.

### श्रीवरद.

"पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञप्ति ऐसीजे, पूर्वीं पातशाहासीं व नजबखानासीं बोलणीं जालीं, त्याचा मजकूर सेवेसीं विनंतिपत्रें पाठविलीं. तें प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं पातशाहासीं व नजबखानासीं दुहराऊन बोलून पक्कें केलें. त्याचें उत्तर त्यांनीं दिधलें कीं, "आह्मीं इकडे यांसीं स्वच्छ बिघाड केला, आणि तुम्हीं तिकडे गुजराथ प्रांतीं कंपू गेला आहे त्यासी सलूख केला, तर मग हे गोष्ट बहुत विलग पडेल. याचें कारण हेंच कीं, तुह्मी दूर आणि आह्मी यांचे समीप. यांनीं हा मुलूख सर्व वेष्टिला आहे. आह्मी यांचे पोटांत आहोंत. याजकरितां तुह्मीं व उभयतां सरदार एक विचार पक्का करून, करोड रुपये फिरंगीं यांनीं दिल्हे तरी त्यांसीं सलूख न करावा. आह्मी यांसीं इकडे बिघाड करावयासी सिद्ध आहोंत." याप्रमाणें पातशाहांसीं व नवाब नजबखानासीं बोलणें जालें, व हजूर याप्रमाणें

लिहून पाठवा आणि पत्राचीं उत्तरें सत्वर आणवा" ह्मणून सांगितलें; व हेही बोलले कीं, "जर कदाचित् तदबिरीचे तूर्त मसलतीमुळें इंग्रेजांसीं सलूख केला, तर पुढले वर्षी फिरोन इंग्रेज पुण्यास येतील, यांत संदेह न जाणावा. आपले-कडील, निजामअल्लीखान व हैदरनाईकाकडील आह्मांस पत्रें आलीं होतीं, त्यांचीं उत्तरें लिहिलीं. त्यांत आह्मीं हेंही लिहिलें आहे कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांसीं व इंग्रेजांसीं लढाई लागली आहे. त्यास श्रीमंतांची फत्ते, तुह्मी आपले मनोदय एक जाणून, हिंदुस्थानचे सलतनतीस उपयोगी होणें सलाह आहे. याप्रमाणें इशारा निजामअल्लीखानासही लिहिला. खोलून न लिहावयास कारण हेंच कीं, फराशीसांस आह्मीं पत्रोत्तर लिहिलें, तें पत्र बजिन्नस त्यांचे मुनशीनें इंग्रेजांचे स्वाधीन केलें. फराशीसांसीं व इंग्रेजांसीं शत्रुत्व आहे, तैसें कोणासीं नाहीं. असें असतां, तेथें मंत्रभेद त्यांचेच मातबरानें केला. यास्तव निजाम-अल्लीखानास इशारा आह्मीं लिहिला आहे. तर श्रीमंतांनीं त्यांस अधिक ममतेंत घेऊन इंग्रेजांचे पारपत्यास निजामअल्लीखानाचीही फौज आणवावी, व हैदर-नाईकाचीही फौज सामील करून घ्यावी, कीं त्याचा व इंग्रेजांचा बाह्यात्कारें विरोध पडल्यास श्रीमंतांसीं विपरीत होऊं पावणार नाहींत. यास्तव जलदीनें श्रीमंतांस विनंति लिहिणें. ह्मणून सांगितलें; व भोंसल्यास बंगाल्याकडे पाठविलें. परंतु, त्यांचा व इंग्रेजांचा अंतस्थ सलूख आहे ह्मणून श्रवणांत आलें आहे. जर भोंस-ल्यांनीं बंगाल्यास जाऊन त्यांसीं बिघाड केला, तर इकडून पाण्याप्रमाणें धाऊन कलकत्त्यापर्यंत आह्मी प्रांतांत अमल करूं. गोहदेकडे तुमची फौज आहे, त्यांनीं सामील व्हावें व आणीक हजूरची फौज जरूरीस आणवूं; नाहीं तर आमची फौज व तोफा तीनशें, पायदळ कंपू तीन, चकमकी व तोडेदार, याशिवाय फौज राऊत पन्नास हजार तयार आहेत. परंतु जायदाद टाकून दुसरे कामास जाव-यास फौजेस रुपया आह्मांपाशीं नाहीं, यास्तव नाइलाज आहों! जर बंगाल्याकडे भोंसल्यांनीं बिघाड केल्यास आह्मी इकडून कलकत्त्यापर्यंत जावयास कुमक इच्छित नाहीं." याप्रमाणें स्वामींशीं एकनिष्ठतेचीं भाषणें बहुत केलीं. तात्पर्य, सर्वांचें मानस कीं, गुजराथेस कंपू गेला आहे त्याचें पारिपत्य आपले फौजेचे हातून व्हावें....या लक्षावर सर्व ध्यान धरून आहेत. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ५.

पैवस्ती छ० २५ रमजान. **श्रीवरद.** २१ जून सन १७८०.

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

"विज्ञप्ति ऐसीजे:- पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहास अर्जी व नवाब नजबखान जुलफकारदौले बहादूर यांस सरकारांतून पत्रें रवाना केलीं आहेत, व दौले बहादूर यांस राजश्री बाळाजी जनार्दन यांनीं विस्तारें लिहिलें आहे. हा मजकूर तुह्मांस समजावा सबब मसोदे पाठविले आहेत, त्याजवरून कळेल. त्याप्रमाणें बोलून इंग्रेजांची मसलत लिहिल्याप्रमाणें विस्कळीत होऊन, सरकारकाम अमलांत येईल तें करणें. सविस्तर राजश्री बाळाजी जनार्दन लिहितील त्यावरून कळेल." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, स्वामींचे आज्ञेप्रमाणें पातशाहांस वरचेवर उत्तेजन देऊन इंग्रेजांचा यांचा स्नेहसंदर्भ होता तो तोडिला. सेवकासीं पातशाहांनीं व नवाब नजबखानांनीं शपथ वाहून सांगितलें जे, "नानांनीं लिहिलें आहे, हेंच आमचे चित्तांत आहे. याप्रमाणेंच करूं." ह्मणोन वचन दिधलें. वजिराकडील चार हजार फौजेनसीं पातशाहाचे तैनातीस लताफत आहे. त्याचा आमचा जोड आहे. आपले सरकारची फौज दोन हजार सेवकापासीं असिल्यास पातशाहाचें मनास आल्हाद होईल. अतःपर पुढें श्रीमंतांस लिहून आपले सरकारची फौज हुकुमांत राहेसी जलदीनें हुजुरांत ये तें करणें ह्मणून लिहावयास सांगितलें, तें लिहिलें असे. आपला मातबर माणूस सेवकाचे समागमें देऊन सेवेसीं रवाना करितों ह्मणतात. अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. तख्ताची जागा, या स्थलीं सरकारची फौज असिल्यास यांजवर दाब राहून, शत्रूचे पारिपत्याची तजवीज वरचेवर होईल तें सेवक करील. प्रथम पातशाहापासीं खर्चाची तंगी; त्यांत एक उमराव ह्याजला दुसरीयाचें बल नाहीं. त्यांत मोंगल लोक काबूची. यास्तव सेवेसीं विनंति लिहिली असे. तर सलाह असलियास एक दोन पथकें धोंडो दत्तात्रय व पवार तऱ्ही सेवकाचे तैनातीस पाठवावें कीं, सरकारचे फौजांची आमदानी यांजला कळून, नवा प्रांत घेऊन, खर्चाची तंगी दूर करावयाची उमेद दाखवून, कंबर बांधऊन, डेरे दाखल करऊन, होईल ते चाकरी करूं. इंग्रेज तूर्त खर्चास रुपये देऊं ह्मणतात. आह्मी कोरडी गोष्ट फौजेविना सांगून, नफे भारी दाखवून, स्वामींचे आज्ञेप्रमाणें आजवर इंग्रेजांचा रुपया पातशाहास घेऊं दिधला नाहीं, व वचनींही गुंतूं देत नाहीं. पातशाहा स्वामींस रुपया मागत नाहींत; फौज आणा ह्मणतात. यास्तव सेवेसीं लिहिलें असे. गोहद प्रांतीं पथकें आहेत, त्यांपैकीं एखादें दोन पथकें सेवकापासीं राहिल्यास सरकारउपयोगी आहे. श्रुत होय. उत्तम असेल तें करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ६.

### श्रीवरद.

पैवस्ती छ० २५ रमजान. २१ जून सन १७८०.

"पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:-

विज्ञप्ति ऐसीजे, इंग्रेजांचा कंपू इटावीयास होता, तो गोहदकर एकत्र होऊन, खंडेराव हरी वगैरेचें तोंडावर गोहदकरास ठेऊन, इंग्रेजांनीं लाहरचें ठाणें घेतलें. कछवाघारेंत अमल त्यांचा जाला. यास्तव नजबखानास आह्मीं सांगितलें कीं, तुह्मीं आपली फौज दाहा हजार, खंडेराव हरीचे कुमकेस पाठविणें, कीं इकडे तुमचे फौजेनें सरकारचें काम केल्यानें श्रीमंतांस व सरदारांस संतोष होय. व आज त्यांनीं त्या प्रांतांत अंमल केला, उदईक तुमचा प्रांत जाईल. यास्तव, तुह्मी व ते एक होऊन, गोहदकराचें पारपत्य करणें. हे सलाह निवेदिल्यावर पातशाहांपासीं येऊन पातशाहांस कूच करावयाविषयीं अर्ज केला. त्यांनींही मान्य केलें. डेरे वगैरेची तयारी करितात. कूच निश्चयात्मक अयोध्येकडे करितों ह्मणून निश्चय केला आहे. जे दिवशीं कूच करतील व फौज गोहदकरावर रवाना करितील तें लिहूं. तात्पर्य, हेंच कीं, सरकारची फौज एक मातबर सरदार ये प्रांतीं आलियास, हे सामील होऊन ये प्रांतीं इंग्रेजांसीं खोडाली करितील. अयोध्येकडील इंग्रेजही कलकत्त्यास जाणार ह्मणून वर्तमान आलें. दुहराहून वृत्त येईल व इंग्रेज जातील, तेव्हां सेवेसीं विनंति लिहूं. मुख्य गोष्ट, नजबखान व पातशाहा, काया-वाचा-मनसा स्वामींचे पत्राचे खातरजमेनें........आहेत. खर्चाचे तंगीमुळें मागें पुढें पाहात होते.........स्वामींचे आज्ञेप्रमाणें सविस्तर पत्रार्थ नजबखानास व नजबखानांनीं व सेवकांनीं पातशाहास संकल्प केला. पातशाहांनीं श्रवण करून सिद्धतेंत लागले आहेत. परंतु आपले सरकारचा एक सरदार मातबर आलियावर, इकडील तिकडील इंग्रजाचें पारपत्य करावयास जमाव बसेल, तें सत्वर करणार स्वामी समर्थ आहेत. येथें पातशाहापासीं व नजबखानापासीं तोफा तीनशें, जिलेबी व स्वार प्यादे पन्नास हजार, तोडे चकमकी व बंदूख आहे; व इंग्रजांचे दोन कंपू लखनऊस आहेत, त्यांचा मुकाबिला घ्यावयास कजाखी फौज असिल्यास एकतोंडीं झुंज पडणार नाहीं, व इंग्रजांचे तोफखानीयावर यांचा तोफखाना गालिब! कजाखी फौजेचे योगानें त्यांचे तोफखानियाचे जोरापुढें ठरतील. यास्तव, सरकारची फौज गोहदप्रांतीं आहे, त्यास येथें सेवकापासीं पाठवावी कीं, यांजला सरकारचे फौजेनें उत्साह विशेष होईल, व येथें स्वामींचा दाब अधिक होईल तें करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन हे विज्ञप्ति."

## लेखांक ७.

पैवस्ती छ. २५ रमजान. **श्रीवरद.** २१ जून इ. स. १७८०.

"पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञप्तिपत्रीं आज्ञा कीं, "नवाब निजामअलीखान बहादूर व राजश्री खंडोजी भोंसले सेनाबहादूर यांस हुजूरचे फर्मान इनायत व्हावें कीं, तुह्मीं व राव पंतप्रधान एकदिल होऊन इंग्रेजांचे तंबीची मसलत ठराविली ह्मणून हुजुरांत अर्ज जाला. त्यास हे गोष्ट बज्या आहे. हजुराहूनही इकडील कुल्हापोशाची सजा करणें मंजूर आहे. तुह्मीं व राव पंतप्रधान खातरजमेनें दिलखा तदारुक अमलांत आणावा; याअन्वयें शिरस्तेप्रमाणें फर्मान यावें. याशिवाय जयपूर व उदेपूर व बुंदेलखंड व गोहद्कर जाट यांस तमाम फर्मान कीं, इंग्रेजांची तंबी मोकरर हजुराहून जाली, आणि राव पंतप्रधान यांसही फर्माविलें आहे. तर तुह्मीं आपलाले जमावांनिसीं राव पंतप्रधान यांचे फौजेस सामील होऊन, इंग्रेजांची तंबी व तदारुक खातरखा करणें, ऐसें फर्मान सत्वर यावें. यास दिवसगत न लागावी. जरूर लिहिल्याप्रमाणें घेऊन पाठवावें" ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यावरून पातशाहास सरकारची गरज न दाखवितां, सलाह तरीक समर्पक विनंति केली. त्यावरून फर्मान ल्याहावयास विचारांत पडले कीं, तूर्तच इंग्रेजांस बातमी जाऊन विषम मानतील. हें लक्ष जाणून, सेवकानें कितीका प्रकारें पूर्वील सरकारचाकरीचे प्रकार यांस समजाऊन, नवाब निजामअलीखान व राजेश्री खंडोजी भोंसले सेनाबहाद्दर यांस फर्मान लिहून पाठवणें ठराविलें आहे. तयार जालीयावर घेऊन सेवेसीं रवाना करूं. स्वामीकारणें नजबखानांनीं पत्र लिहिलें, तें बहुत स्नेहममतेनें. याचें उत्तर अलकाब वजिराप्रमाणें लिहून पाठवावें, कीं यांचें समाधान होय. हलका अलकाब लिहिलियामुळें विषम मानितात. यास्तव पुढें कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८.

पैवस्ती छ. २५ रमजान. **श्रीवरद.** २१ जून इ. स. १७८०.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १६ माहे जमादिलाखर मुक्काम दिल्ली जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः– छ० २६ रविलाखरचीं पत्रें पाठविलीं, तें छ० २३ जमादिलावलीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, "अलीकडे तुह्मांकडून पत्र येऊन वर्त-

मान कळत नाहीं. त्यास सविस्तर वरचेवर लिहीत असावें. सरकारांतून पातशाहास अर्जी व नवाब नजबखानास पत्रें व आह्मांकडून खानमजकुरास पत्रें पाठविलीं आहेत, तें त्यास देऊन लिहिल्याप्रमाणें सर्व गोष्टी घडोन येसें जरूर व्हावें. पारसी पत्रांतील मजकूर तुह्मांस समजावा याजकरितां मसोदे आलाहिदा पाठविले आहेत, त्यांजवरून कळेल. कित्येक मजकूर आलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिला आहे, त्याप्रमाणें अमलांत आणणें." ह्मणोन लिहिलें. त्यास, पैदरपै विनंतिपत्रें सेवेसीं पाठवितों. त्यांचीं उत्तरेंही सेवकास येतात, व आज्ञेप्रमाणें पत्रें आपलीं व सरकारचीं पातशाहास व नजबखानास देऊन, त्यांस इंग्रेजांचे शाम करावेसें वारंवार बोध करून ठेविलें आहे. त्याचा तपसील सरकारांत विनंतिपत्रें लिहिलीं आहेत, त्यांवरून ध्यानास येईल. सेवकाच्यानें यथाज्ञानेंकरून जे चाकरी घडोन येईल, तीस अंतर करणार नाहीं. परंतु लोकांचें येथील देणें वारून स्वामिदर्शन घडे तें करणार आपण आहेत. खर्चाची आबाळ विशेष! यास्तव विनंति मान्य करणार स्वामी समर्थ आहेत. सविस्तर पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. नजबखानांनीं स्वामीस पत्र बहुत स्नेहवृद्धीचें व सरकारउपयोगी लिहिलें आहे. त्याचे उत्तरीं, विशेष लोभानें व पातशाहास इंग्रेजावर मोहिमेस घेऊन निघतों ह्मणून सेवकानें तुमचे जबानीं लिहिलें, त्यावरून बहुत संतोष जालियाचें लिहावयास आज्ञा करावी. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन हे विनंति."

---

## लेखांक ९.

(नक्कल.) **श्रीवरद.** २१ जून इ. स. १७८०.

"श्रीमंत राजश्री पाटीलसाहेब गोसावी यांसीः—

स्नेहांकित पुरुषोत्तम महादेव कृतानेक आशीर्वाद विनंति येथील कुशल तागाईत छ० १७ माहे जमादिलाखर मुक्काम दिल्ली जाणोन स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः—आपलीं पत्रें चंद्र २६ रविलाखरचीं आलीं, तीं येथें चंद्र १३ जमादिलावलीं पाऊन बहुत संतोष जाला. पत्रीं आज्ञा कीं, "इंग्रेज बलवान नजबखान यांनीं होऊं न द्यावें. पातशाहांनींही यांसीं राजकारण लावणें ठीक नाहीं. वजीर सुजायद्दौले यांचे घरांत पाय इंग्रजांचा शिरला असतां, सारेंच हाताखालें घातलें, हें त्यांस न समजलेंसें नाहीं. सांप्रत तिकडे कायममिजाज व मजबूत एक नवाब नजबखान आहेत. यांनीं इंग्रेजांचा पाय शिरूं न द्यावा. आमची स्वारी, गुजराथेंत इंग्रजांनीं दखल केली याकरितां त्यांचे पारपत्यास

आली आहे. इंग्रेजांचा व स्वारीचा मुकाबिला आहे. थोडक्याच दिवसांत इंग्रेजांचें पारपत्य करून, स्वारी उज्जनीस येऊन पुढें त्या प्रांतीं येईल. नवाब नजबखान यांच्या भेटी होऊन इंग्रजांचें पारपत्य होणें तेंच होईल. स्वारी येई तोंपर्यंत इंग्रजांस ताण बसे तेंच करावें. राजश्री देवराव महादेव यांचे खर्चाविसीं लिहिलें, त्यास कोव्ह्यावर नेमणूक आहे त्याचा बंदोबस्त करून देविला जाईल." म्हणून पत्रीं आज्ञा. त्यावरून पातशाहास व नवाब नजबखानास वारंवार दूरआंदेशीच्या व परिणामाच्या गोष्टी समजाऊन, इंग्रेजांकडील भला माणूस यांजपासीं लालूच दाखवून आपला पाय दिल्लींत कायम करावा या विचारावर आला होता, त्यास यांजकडून साफ उत्तर देविलें. तो न पुसतां रुसून उठोन गेला. पातशाहांसीं व नजबखानांसीं शपथपूर्वक पक्केपणें बोलणें बोलून, इंग्रेजांचे मोहिमेस कुचाचा निश्चय ठरविला आहे. तमाम रोहिले व शीख वगैरे गंगापारील जमीदार या सर्वांस पत्रें पाठविलीं आहेत कीं, खासा स्वारी इंग्रेजांचे पारपत्यास निघणार; त्यास, तुम्हीं आपलाले सामानांनसीं येऊन हजर होणें. म्हणून पत्रें गेलीं आहेत, व कोणा कोणाचे वकील हुजूर हजर आहेत. त्यांनीं उत्तर केलें कीं, स्वारी जाल्यास चाकरी करून दाखवायास सिद्ध आहेत. म्हणून बोलणीं जालीं. त्यावरून पातशाहांनीं फरासखाना सिद्ध करावयास आज्ञा केली आहे. तयारी होत आहे. मासपक्षांत डेरेदाखल होणार. यांजपाशीं सरंजाम, तोफखाना जरब सुमार तीनशें, जिलेबी व पायदळ व फौज मिळून पन्नास हजार स्वार माणसांची भीड आहे. त्यांची यांची लढाई बरोबरीची आहे. त्यांत अंतर हेंच कीं, इंग्रेजांची तोफ जलद चालते. यांचे तोफेस बार व्हावयास विलंब लागतो! या अर्थीं कजाकी फौज यांचे कुमकेस असल्यास हे त्यांस मारून चालवितील म्हणून बोलत होते. त्यास, आपली खासा स्वारी या प्रांतीं आलियास हे सर्व आपली ताबेदारी करून, हें यश आपल्यासच ईश्वरें नेमिलें आहे. या दिवसांत अयोध्येकडून जनरल कोट नामें इंग्रजांकडील होता, तो जातीनसीं कलकत्त्यास गेला. व परलंग (?) इंग्रेज आहे, तो पलटण नवें तयार करून इटावियास येणें ठराविलें आहे. गोहदकर जाटाकडील वृत्त व सरकारचें फौजेचें वृत्त परस्परें श्रुत जालेंच असेल. नजबखानापासून वचन घेतलें कीं, पातशाहास इंग्रेजांचे मोहिमेस अयोध्येकडे न्यावें, व बंगस, रोहिले, शीख जमा करावयास सिद्ध आहे. परंतु भोंसले यांणीं कलकत्त्याकडे ताण बसवावा, व आपण व राजश्री सुभेदार यांणीं गुजराथ प्रांतीं पिच्छा न सोडावा. हें न जाल्यास दिल्लीहून इंग्रज जवळ आहेत, यांजला तोंडांत टाकतील. बिघाड केल्यावर कुमक आपली

जाली पाहिजे. कजाकी फौज यांजपासीं आपली येथें असल्यास, शिखास पथरगडाकडे उतरा देतील, व अयोध्येकडे खलश करावयास आरंभ करावयास सिद्ध आहेत. सरकारची स्वारी इकडे आली तर सामील होऊन, मोहिमेस तयार आहेत.......................यास्तव रात्रंदिवस आपले फत्तेस इच्छितात. या दिवसांत पातशाहाचे घरीं वर्तमान आलें कीं, आपली छावणी उज्जेन इंदूर होणार, व इंग्रज भडोचेस गेले. त्यास, काय ठराव जाला तें पत्रीं कृपा करून लिहावें कीं समाधान होय. आपले आज्ञेप्रमाणें चिरंजीव देवराव यांनीं सविस्तर पातशाहास व नजबखानास श्रुत करावयास लिहिलें. तें यथाज्ञानें समर्पक सुचलें तें समजाऊन, यांचें चित्त इंग्रजापासून रुपये घेणें व त्यास दखल देणें मोडिलें, व साहेबांची स्वारी येऊन पातशाहाचे खर्चाची खातरजमा केली, व नजबखानास पुढें मोहीम करून रुपये मिळतील त्यांत घेणें देणें पूर्वील त्याचे कराराप्रमाणें उमेदवार करून, कौलनामा पूर्वीं आह्मीं घेतला तो दाखवून, लाजऊन, लालूच साहेबांचे कृपेची दाखऊन, इंग्रेजांकडून काया-वाचा-मनसा तोडिलें; वारंवार शपथ घेतली व पोख्तगी केली, व पातशाहाचा शुका व नजबखानाचें पत्र आपणास पाठविलें आहे, तें पावून सविस्तर श्रुत होईल. याचीं उत्तरें सत्वर पातशाहास व नजबखानास पाठविलीं पाहिजेत. बहुत काय लिहिणें, लोभ कीजे हे विनंति.''

---

## लेखांक १०.

पैवस्ती छ० २५ रमजान. **श्रीवरद.** २१ जून सन १७८०.

''विनंति कीं, नजबखानासहित पातशाहापासून शपथ घेतली, व श्रीमंत स्वामींसीं सामील व्हावयास निजामअल्लीखानास त्याचे वकिलाकडून नजबखानांनीं लिहिविलें. त्याचीं पत्रें स्वामींस व श्रीमंतांस घेऊन पाठविलीं आहेत. त्यावरून व पातशाहाचा शुका पाऊन वृत्तांत श्रुत होईल. तात्पर्य, अंतःकरणांतून इंग्रेजांची जड पातशाहींतून काढावी व सरकारचे फौजेस सामील व्हावें. परंतु कदाचित् आपण तिकडे सलूख केला, तर इकडे इंग्रेज यांस समीप आहेत; एकले हे त्यांचें पारिपत्य करितीलसें दिसत नाहीं, पेंचांत येऊं; या साशंकिततेची ......................विनंति लिहावयास बहुत ममतेनें नजबखानांनीं सांगितलें. तें श्रीमंत स्वामींचे सेवेसीं विनंति लिहिली आहे, त्यावरून श्रुत होईल. मुख्य यांचे मनांतील भाव, इंग्रेजांसीं आपण सलूख न करावा, व ते जेर जालियावर यांनीं त्यांचे प्रांतासीं खलश करावयाचे समयीं, सरकारचा एक सरदार, मातबर

फौजेचा, निःकपट पातशाहापासीं असिल्यास, नजबखान चाल करील यांत संदेह नाहीं. इंग्रेजांची ताबेदारी न करावी, स्वामींची फत्ते व्हावी, हें अंतःकरणापासून शपथ वाहून वारंवार बोलतात. इंग्रेजांसीं स्वामींनीं एकोपा केलीयास सरदार फौजेसहित येऊन, जाटाचा प्रांत व जयपूर प्रांत नजबखानापासून सोडवितील, या धाकांत साशंकितही आहे. यास्तव स्वामींसीं निःकपटता करून, सरकारची फौज सामील करून घेऊन, इंग्रेजांसीं बिघाड करून, आपले प्रांतास उपद्रव न लागावा, या मनोदयास्तव सरकारचे फौजेची इच्छा करितात. उभयतां सरदार एकचित्त होऊन, हिंदुस्थानांत येऊन, यांचें संरक्षण करून पुढें यांजला राहूं देतील, हा यांजला भरंवसा पुरता पुरत नाहीं. सेवकानें सरदाराकडूनही खातरजमा केली, व पत्रापत्रीं स्नेहवृद्धि सरदारांची यांचीही केली आहे. परंतु, मनांतून शंकित होऊन ह्मणतात कीं, इंग्रेजांसीं तुह्मी सलूख कराल, तर इंग्रेज दिल्लीही घेतील; तेव्हां आह्मांस कुमक कोणाची येणार? यास्तव वारंवार सलूख न करावयाविषयीं नजबखानांनीं सेवकास सांगितलें, व सोबत पत्रांतही याच प्रकारें लिहिलें आहे, तें श्रुत होईल. पातशाहाचें मनांत नजबखान नसावा, व याचे कबजांत न राहावें. स्वामींचे काबूंत राहावें. दिल्ली आग्रे यांत स्वामींचा बंदोबस्त असलियास पातशाहास सुख आहे. परंतु नजबखान नसावा, हें अंतःकरण पातशाहाचें आहे. यास्तव सेवेसीं विनंति. राजश्री हरिपंत अथवा राजश्री महादजी शिंदे, एकानें दिल्लीस राहून, दोन लक्ष रुपये दरमाहा पातशाहास खर्चास देऊन, हें स्थळें करोडीचीं हस्तगत करावीं, व पातशाही हुकूम आपले ताबे ठेविणार स्वामी समर्थ आहेत. नजबखानांनीं पत्रें बहुत स्नेहवृद्धीनें लिहिलीं आहेत. यांचीं उत्तरें पाठवावीं. निजामअलीखानास व खंडोजी भोंसले यांस शुके स्वामींचे आज्ञेप्रमाणें लिहिविले आहेत. ते तयार करऊन सेवेसीं मागाहून पाठवितों. नजबखानांनीं करार केला आहे कीं, पातशाहास अंतरवेदींत डेरेदाखल करितों; व इंग्रजांचे कलकत्त्याकडे भोंसल्यांनीं ताण बसवावा; व सरदारांनीं त्यांचा पिच्छा न सोडावा. हें करणें स्वामींचें स्वाधीन आहे. येविषयीं पैं दरपैं हुजूर विनंति लिहावयास सेवकास सांगतात कीं, सलूख कदाचित् केला तर पुढें जड जाईल.........आपण समयोचित उत्तम असेल तें करावें. स्वामींचे प्रतापें ईश्वर फत्ते करील तो सुदिन. पूर्वींही एक दोनदां सेवेसीं विनंति लिहिली कीं, नजबखानास श्रीमंतांचे पत्रांत अलकाब केवळ हलका पूर्वस्थितीप्रमाणें मुनशी लिहितात. यास वजिराप्रमाणें पत्रांत श्रीमंत स्वामींकडून लिहावयास आज्ञा केली पाहिजे. वाढऊन लिहिलियांत समास

उत्साह होऊन, कामास तत्पर विशेष होतील तें करावें. हलके फारसींत लिहिलें यास्तव विषम मानिलें. आह्मीं श्रुत केलें कीं, आमचीं पत्रें श्रीमंतांपाशीं न पावलीं. पावलियावर वजिराप्रमाणेंच लिहितील. याप्रमाणें सांगून समाधान केलें. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. येथील बाह्य अंतस्थ सविस्तर ध्यानारूढ असावें, याकरितां लिहिलें. अधिक विस्ताराकरितां रागास न यावें. श्रीमंत स्वामींस पातशाही इनायत टिका वगैरे घेऊन यावयास्तव उत्कंठा, व कर्जदारीमुळें एकादशी शिवरात्र मोडावयास्तव बाळाजी [ व ] गंगाधर गोविंदास सरकारचीं सनदापत्रें पाठविलीं, त्यांचें उत्तरही न देत ! मग रुपये नेमणुकेपैकीं बाकीचे पाठवणें व वसुली जमेचे गांव लाऊन देणें कळतच आहे !! उल्हासें हजूर लिहावें, त्याचें उत्तर त्याजवरच ताकिदीनें आज्ञापत्र येतें. ते उत्तरही न देत ! पांच सालांत एकसाला ऐवज कमालजमेचे गांव लाऊन दिधले आहेत, त्याच गांवांवर दुसाला कर्ज दहा हजार रुपये कालपी प्रांताचे साहुकाराकडून आणविलें. तेथें एकसालाही कर्ज मागील देणें गांवावर ठेविलें आहे, यामुळें न मिळे. दुसरें कारण, खंडेराव हरी, पवार वगैरे फौज ग्वालेर प्रांत सोडून झांसी प्रांतांत व कोंचकालपीकडे लूट करावयास पोट भरावयास गेले आहेत. कछवाघरांत गोहदकराचा अंमल जाला. इंग्रेजसहित गोहदकरानें रात्रौ धाऊन छापा घातला. पांच सहाशें घोडें माणूस गमाविलें. आतां सुरक्षित भांडेरीस आहेत. हेंही कारण जालें. या दिवसांत सेवकाचें हजूर येणें व येथें ठेरणें दुस्तर जालें. जाणून विनंति मान्य करून, बाळाजी गोविंदाचे कारकुनास सत्वर लाऊन, एक साल रुपये येथें खर्चास पाठवावे कीं, येथील देणें वारून सेवेंत येऊन, बुंदेलखंड व झांसीचे रुपये सालबसाल कांहीं स्वामींस पावेत, तो विचार श्रुत करूं. बाळाजीपंत कायम राहून सरकारकाम होय तें करावेंसी मर्जी असिल्यास, विनंति करूं. सेवकाची नेमणूक (न) दिधली यास्तवच लिहीत नाहीं. त्यांचे अस्ताव्यस्ततेनें सरकारकाम होत नाहीं, म्हणोन तात्पर्य लिहिलें असे. तर, हरएक साहुकारापासून कर्ज घेऊन, सेवकास दहा हजार रुपये तऱ्ही जरूर पाठविणार स्वामी समर्थ आहेत, व या रुपयांची तनखा साहुकाराची बाळाजी गोविंदाचे कारकुनावर करावी कीं, त्यास तिडीक लागून रुपये हजूर आणऊन घेईल, तें केलें पाहिजे. निराश्रित सेवकास दर्शनलाभ होऊन सनाथ करावयास आपण समर्थ आहां. “स्वस्थे चित्ते बुद्धियः संभवन्ति.” कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. श्रीच कृपा करो, व स्वामींचा प्रताप अधिकोत्तर होय ते सुघडी. बहुत काय लिहूं हे विनंति.”

---

## लेखांक ११.

**श्रीवरद.** जून इ. स. १७८०.

"सेवेसीं विनंति कीं, राजेश्री बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद यांस लिहितां व कारकुनाचे मुशारे देतां थकलों! परंतु पत्रोत्तर सा सा महिने न पाठवीत. मग बाकीचे रुपये व वसुली जमेचे गांव लाऊन देणें कळतच आहे! कदाचित् पत्रोत्तर आलें, तर आपला ओढा लिहून उमेदवारी लिहितात. याचा विस्तार पूर्वी वरचेवर सेवेसीं विनंति लिहिली, व उत्तरें त्यांस ताकीदपत्रांसहित आलीं, तें त्यांजकडे पाठविलीं. उत्तरें येतील तें सेवेसीं पाठवूं, तूर्त सेवकास हुजूर पातशाही टिका घेऊन यावयाची त्वरा, व वर्षाकाळ समीप आलीयामुळें फसाव होईल. बहुत दिवस दर्शनलाभ न जाला, या उत्कंठेंत अत्यंत चिंताग्रस्तता. दुसरें, स्वामींस शत्रूचें पारपत्य करावयाचे अहिर्निश उद्वेगाकरितां चित्त उद्विग्न. यांत सेवकानें आपली अवस्था लिहिणें परम संकट जाणून विनंति लिहिली कीं, बुंदेल्याचे मातबर तेथें असतील, त्यांजपासून कर्ज रुपये दहा हजार स्वामींनीं घेऊन पाठवावे. तरच जीवनोपाय होऊन दर्शनलाभ घडेल व स्वामींचा शब्द लागणार नाहीं व ऊर्जित होईल तो सुदिन करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. हुजूर येणें व येथें राहाणें खर्चाचे तंगीमुळें दुस्तर जालें. याकरितां दरपत्रीं विनंति लिहिली, याचा अपराध क्षमा केला पाहिजे. केतकीचे फुलाचा अर्क एक शिसा सेवेसीं पावेल. प्रातःकाळीं पूजनोत्तर, अथवा जेव्हां सरबत घेणें मर्जीस येईल ते समयीं एक तोळाभर पाण्यांत घालून घेतल्यास डकार सुगंध येईल. घरीं तयार ब्राह्मणाकडून करवून सेवेसीं रवाना केला असे. सुरक्षित पावल्याचें उत्तरीं कृतार्थ केलें पाहिजे. दर्शनलाभ घडे ते सुघडी. हे विनंति."

---

## लेखांक १२.

**श्रीवरद.** २२ आगष्ट इ. स. १७८०.

"पु॥ श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञप्ति ऐसीजेः—सरकारांतून नजबखानास खलिता पाठविला होता, त्यांत अलकाब हमेशा पूर्वींपासून लिहितात तोच लिहिला होता. याजविसीं पूर्वीं विनंतिपत्रें हुजूर पाठविलीं. त्या समयीं वरचेवर विनंति लिहिली होती कीं, असफदौला वजीर यांस अलकाब सरकारांतून लिहीत असतां, तो नजबखानास लिहीत जावा; ह्मणून विज्ञप्ति लिहिली. परंतु विस्मरणेंकडून फिरून पूर्ववत्प्रमाणेंच पत्र लिहिलें आलें. तें यांस द्यावें तर अलकाब हलका लिहिलियामुळें पूर्वीं

विषम मानिलें व हल्लींही मानितील, यास्तव न दिधलें. यांचा प्रकार पहिला राहिला नाहीं. त्या अलकाबावर बहुत वाईट मानितात. ह्मणून तें पत्र न दिधलें. तर आतां कृपा करून असफदौलाप्रमाणें अलकाब ल्याहावयाची आज्ञा राजेश्री नारायणराव मुनशीजीस करावी, कीं हे संतोषी राहून सरकारउपयोगी राहते तें करणार स्वामी समर्थ आहेत. ईश्वरें स्वामींचा प्रताप थोर केला आहे, यास्तव सर्व मान इच्छितात. कृपा करावी व पत्रामृतीं नजबखानास स्नेह-वृद्धीनें सेवकवत् करावें. हे विज्ञप्ति."

## लेखांक १३.

**श्रीवरद.** २२ आगष्ट इ. स. १७८०.

"पु॥ श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे:— छ० १९ साबानीं इंग्रेजांकडील वकील फजलअल्लीखान नामें कांहीं जाबसाल घेऊन आला आहे. त्याचा तात्पर्य हाच कीं, आमचे कोठीस दिल्लीस आगरियास जागा द्यावी, व खर्चास दोन लक्ष रुपये दरमाहा घेत जावा; व पूर्वील बंगालीयाचे वर्षासनाचे व बाकीचे रुपये आह्मी पेशजीं देऊं, व कोठीस जागा द्यावयाची नजरेचे ठरावयास वकील खानमजकूर आला आहे. पुढें बाह्य अंतस्थ ठरेल तो शोध घेऊन सेवेसीं विनंति लिहूं. मुख्य गोष्ट, पूर्वीपासुन इंग्रेज, जागा कोठीस जयपूर, दिल्ली, आगरे वगैरे मातबर स्थळीं इच्छितात. आतां ग्वालेर त्यांचे हातास गेली. याकरितां इंग्रेज सर्वास्थळीं अंमल जालासें जाणतात. श्रीइच्छा प्रमाण. यास्तव फौजा ये प्रांतीं जलदीनें आल्यास पृथ्वीपतीस खातर-जमा होऊन इंग्रेजांसीं ललोप तों न करीत, व हें स्थळ सरकारचें व पातशाहांचें काबूंत राहे तें श्रीस्वामींचे प्रतापें करो. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

## लेखांक १४.

पैवस्ती छ २३ सवाल इहिदे समानीन. ह्य॥ अजुरदार.

**श्रीवरद.** २७ सप्टंबर इ. स. १७८०.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना, येथील कुशल तागाईत छ० २७ माहे रमजान मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनें-करून यथास्थित असें. विशेषः— सरकारचें आज्ञापत्र छ० १७ जमादिलावलचें आलें, तें छ० १६ रजबीं पावलें. त्यास, सविस्तर वृत्त आज्ञेप्रमाणें व यथामतीनें समर्पक सुचलें तें पातशाहास व नजबखानास श्रुत केलें. बहुत संतोषी होऊन

बोलिले कीं, "आमचे मनोदयानरूपच श्रीमंतांचा इरादा आहे. परंतु तूर्त तताथबा करून इंग्रेज सुरतेस गेले, व सरदार उज्जनीस इंदुरास आले, व गोहदेकडील सरदार आपलाले ठिकाणीं गेले. आह्मीं आपली फौज पाठवावी, तर वर्षाकाल, नदी नाले चढले आहेत. या दिवसांत फौज व तोफखाना कैसा जातो? यास्तव वर्षाकालानंतर श्रीमंतांचे सरकारची फौज आल्यास, आह्मीही फौज रवाना करूं. तोंवर आमचा व सरदारांचा इमान प्रमाण करून देणें कीं पुढें अंतर न पडे. व इंग्रेजांसीं आह्मीं इकडे बिघाड केलियावर तुह्मांकडील आश्रा पक्का न राहिला तरी आह्मी एकले पडून त्यांचे काबूंत सांपडूं, तें न करावें." तेव्हां आह्मीं पुरती खातरजमा केली, व आपली कैसी खातरजमा होईल हें पुसिलें. त्यावरून बोलिले कीं, "त्यांचा आमचा कौल करार जाला ह्मणिजे खातरजमाच आहे." याप्रमाणें बोलणें जालें आहे. हल्लीं इंग्रेजांची मोहीम अपुरी सोडून सरदार उज्जनीस इंदुरास आले. यास्तव यांस वसवास होऊन, पातशाहाकडून कमर नामें खोजा व नजबखानानें आपलेकडील इलमास नामें खोजा, वजिरास नालकी, व इंग्रेजांस वस्त्रें जवाहीर व पत्रें, व असफदौलाचे मातुश्रीस व आजीस वस्त्रें देऊन अयोद्धेस रवाना केलें. ते समयीं आह्मीं पृच्छा केली कीं, हा शिष्टाचार करावयाचें कारण काय? तेव्हां बोलिले कीं, "वजिराची अब्रू वाढावी, आणि इंग्रेजांनीं वजिरास ग्रासिलें आहे, ते तूर्त आमचे खातरदास्त केवळ ग्रासून चुकणार नाहींत. तोंवर सरकारची फौज सरदार या प्रांतीं आलियावर त्यांचे आमचे विचारें जें करणें तें करूं. येविषयीं तुह्मीं आपलें चित्तांत संदेह न मानावा." याप्रमाणें आमची खातरजमा केली, व पूर्वीं पातशाहांनीं डेरेदाखल व्हावें व अंतरवेदींत उतरावें हें ठरलें होतें, याचें कारण हेंच कीं, सरदारांनीं इंग्रेजांस सुरतप्रांतीं सरकारचे फौजेनें घेरलें होतें या प्रतापावर हे बहुत उत्साहयुक्त होते. आतां सरदार, फौज घरोघर गेले, व एकदोन स्थळीं फौज इंग्रजांनीं मोडिली, व या प्रांतीं गोहदेकडील फौजेवर शह बसून पडला. सरदार वीस हजार फौज असतां आपसांत फुटून गेले. अंबाजी इंगळे यांनीं ग्वालेरसारखा किल्ला गमाविला; इंग्रेजांनीं घेतला. आपले फौजेचें बळ नाहींसें जाणून, हे साशंकित होऊन, बाहीर निघणें राहिलें. वर्षाकालानंतर सरदार मातबर फौजेनें आलियावर, त्यांचे आमचे सलाहानें उत्तम असेल तें करूं ह्मणतात. जें वर्तमान आह्मांस कळत नाहीं तें बातमी, पुणीयाहून कुंवरसेन नामें कोणी आहे, तो तेथून दिल्लीस नजबखानास वगैरे चहूंकडे बातमी लिहितो, व उज्जेनचीही बातमी कच्ची पक्की वरचेवर अनुपगीर गोसाव्याकडे येते, तो यांस श्रुत करितो. तें वर्तमान आह्मांस नजबखानांनीं सांगितलें. तेव्हां आमचे कर्ण शिथिल जाले! परस्परें पातशाहास व नजबखानास याप्रमाणें बातमी

येते. ते वेळेस हे ह्मणतात कीं, हे आपले सरकारच्या गोष्टी उजमाच्या सांगतात. परंतु तेथील लिहिणार लिहितात, ह्या गोष्टी सत्य आहेत. याप्रमाणें इकडील जालेलें वृत्त श्रवण व्हावें ह्मणून विनंति लिहिली असे. व शेवटीं आह्मीं यांसीं बोलिलों कीं, इंग्रेजांची जड कायम ठेविलीयास आमचे सरकारचें नुकसान नाहीं; परंतु पातशाहीस ठीक नाहीं. तेव्हां बोलिले कीं, "श्रीमंतही त्यांचे पारपत्यास सिद्ध आहेत, व आह्मांसही तेच आपले मकदुराप्रमाणें करणें प्राप्तच आहे. वर्षाकालानंतर श्रीकृपेनें सरकारचे फौजेसहित सरदार आलियास, त्यांचेच विचारें जें करणें तें करूं." याप्रमाणें यांसीं पक्कें केलें आहे. पुढें इंग्रेजांची यांची तुटातूट होऊन त्यांचे प्रांतावर मोहीम करीत तें करावयास सरदारांस सेवकानेंही लिहिलें, व पातशाहा नजबखानाकडूनही लिहिविलें व वचनीं गोविलें आहे.........यास्तव एक सरदार मातबर ये प्रांतीं पाठविणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

---

## लेखांक १५.

**श्रीवरद.** ७ आक्टोबर इ. स. १७८०.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम तागाईत चंद्र ८ सव्वाल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लिहिला पाहिजे. विशेषः—इकडील सविस्तर वृत्त श्रीमंत स्वामींचे सेवेसीं विनंतिपत्र लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. हल्लीं आपलीं आज्ञापत्रें छ० १२ रमजानचीं आलीं, ते चंद्र ६ सव्वालीं पाहून सनाथ जालों. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावयास अंतर करीत नाहीं. पसंतीलायख सरस तसबीर तलास करीत आहे. हातास आली ह्मणजे ते दिवशीं रवाना करूं. दिल्लींत न मिळे हें अपूर्व आपणांस वाटलें, तें न वाटावें. कां कीं, रोहिल्यांचे अंमलापासून वस्तीचे लोक तफरका जाले. यास्तव सेवकाचे शोधास शब्द न लावावा. स्वामींनीं संदेह न धरावा. अहिर्निश ध्यान ईश्वराप्रमाणें रक्षून मनोरंजनाचे शोधांत तत्पर आहे, व जमा केली आहे तें अपूर्व नाहींत. मार्गाचे दुस्तरतेमुळें व बेखर्चीस्तव आजवर सेवेसीं न पावली, व हेंच कारणें सेवकाचें येथें अटकणें जालें. खरीदीस्तव समयास रुपया नाहीं! अवस्था सेवेसीं लिहावयाची लज्जा वाटते! यास्तव विनंति, सेवकाचे नेमणुकीपैकीं रुपये दहा हजार हरएका साहुकराकडून कर्ज घेऊन हुंडी करून पाठविणार धणी समर्थ आपण आहेत. बाळाजी गोविंद व गंगाधर गोविंद यांजपासून हरएक कावा दावा करून रुपये उगवून घेतल्यास सेवकाचा जीवनोपाय होईल, तें

करावें. इतकें खोलून लिहावयाचें कारण, पुढें इतराजी जाल्यास भूमंडळांत स्वामीशिवाय दुसरा आश्रय नाहीं. कृपा करणार व पालन करून सेवा घेणार स्वामी समर्थ आहेत. दर्शनलाभ होय तो सुदिन. दया केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १६.

पैवस्ती छ० १९ जिल्काद. **श्रीगणराज.** १० नोव्हेंबर इ. स. १७८०

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य देवराव महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १२ जिल्काद स्वामींचे कृपेंकरून यथास्थित असों. विशेषः—कृपा करून पत्र छ० १९ रमजानचें पाठविलें, तें पावोन परम संतोष जाला. पत्रीं आज्ञा कीं, "सरकारचा जाबसाल होणें यास्तव राजश्री पाटिलबावांचा निरोप घेऊन पुण्यास येणें, ह्मणोन पेशजीं तुह्मांस लिहिलें होतें; परंतु त्याचें उत्तर न आलें. त्यास तुह्मी कोठें आहां? काय करतां? वर्तमान काय? तें सविस्तर लिहून पाठवावें." ह्मणून आज्ञा. त्यास, पुणियाहून स्वामींपासून आज्ञा घेऊन जांबगांवीं आलों. तेथून राजश्री पाटिलबावांची स्वारी गुजरात प्रांतीं जावयाची जाली, तें साकल्य विनंति लिहिलीं. त्याचीं उत्तरें आलीं. त्यांत आज्ञा येणियाविसीं जाली. त्याजवरून यावें. परंतु पांच वर्षें यांचे संग्रहीं राहिलों; यांनीं सरकारचे सनदेप्रमाणें दरमाहा व आपले तर्फेनें विशेष करून वरात संस्थान कोटें येथें करून दिधली. त्यास पांच वर्षें जालीं. पैशास ठिकाण नाहीं! पदरचे सुखी आह्मी कोणे प्रकारें व काय अवस्थेनें दिवस काढितों, हे अवस्था स्वामीचरणांसीं लोपली नाहीं. चार दिवस येथें काळहरणार्थ आलों, तों येथील नेमणूक दरमाहाचा दरमाहा द्यावासी केली. त्यास, पांच वर्षें समूळ ठिकाण नाहीं. तेव्हां येथें लोकांचें देणें पोटामुळें जालें. कुटुंबसहित येथें फसाव जाला. निघणें संकट! यास्तव, कोंडाईबारीपर्यंत समागमें आलों. वरातीची ताकीद होऊन कार्य होईल. नित्य विनंति केल्यास उत्तर हेंच कीं, 'देवितों.' ज्यांचें देणें तेही लष्करांतच. त्यांचा आग्रह वरातीस ठिकाण लाऊन आमचा निकाल पाडून जावें. तेव्हां निरुपाय होऊन बारी उतरणें प्राप्त जाली. वरातीचें उत्तर निस्तोष होत नाहीं. हेंही होईना. वरकड कोणी अनकूळ होऊन ममता धरून, हटकून कार्य करून निकाल पाडून घ्यावा व साहुकाराचें समाधान चार गोष्टी बोलून करावें, तर अनकूल होते ते देखील प्रतिकूळ जाले. त्याचें कारण जालें तें जांबगांवींहून साकल्य विनंति सेवेसीं लिहिलीच होती. निरुपाय होऊन गुजराथ प्रांत पाहून संपूर्ण मुलगिरी [?]

महर्गता, शरीरीं समाधान नाहीं हें सोसून, मधें सोबत पाहून कोणेही प्रकारें चरणापासीं यावेंसें योजिलें. परंतु निर्फळ होऊन उज्जेनपर्यंत येणें प्राप्त जालें. येथें येतां दीड दोन महिने शरीरीं पीडा प्राणांतिक जाली. स्वामींचे कृपेंकरून उलगडलों. संस्थान कोटें येथील कमाविसदार येथें आले. नित्य ताकिदीचें हटकितां, आज उद्यां करतां आजपर्यंत जाले. शेवट प्रतिकूल होतें तें अनुकूल करून घेण्यास, यांची मर्जी कार्य करून देण्याविषयीं आणण्यास, प्रयत्न करितां, सांप्रत जाबसाल सोईस येऊन, कमाविसदारास ताकीद मागील बाकी देण्याविषयीं व पुढें चालवण्याविषयीं जाली आहे. आतां कमाविसदाराकडून तजविजेनें साहुकारांसीं गांठ घालून, त्यांची खातरजमा करून यावें, हें बाकी आहे. त्यास उद्योगास लागलों आहों. स्वामीकडील शिफारस आणून कार्य करून घ्यावें, तर तोही प्रकार येथें उपयोगी पडणार नाहीं. हें जाणून सेवेसीं विनंति लिहिली. आपली हलाकी वारंवार वर्तमान लिहावी, तर मर्जी दिक होईल. वारंवार रड लिहितां. सेवकाचें लक्ष तों चरणापाशीं कीं, कोणेही प्रकारें उलगडून यावें. आमचें भयत्राता ईश्वरस्थानीं आपण. इहलोकीं संसार सर्व आज वीस वर्षें सेवकाचा स्वामीचरणांचे आधारावर. स्वामींनीं कृपा करून, शरीरसंरक्षण व अन्नसंरक्षण केलें, व करितात. दैवदशा बलवत्तर आहे. इतःपर मासपक्षांत सर्व कुटुंबसुद्धां देशास यावें. चिरंजीव आठा नवा वर्षांचा आहे. त्यास स्वामींचे शागिर्दीस ह्मणून हातीं घावें. चार कामें असतील त्यांचा मार्ग स्वामींचे मर्जीस येईल तैसा करतील. न जाल्यास श्रीइच्छा ह्मणून स्वामींची आज्ञा घेऊन, एकाकीं श्रीकाशीवास अथवा तीर्थाटन करून जन्म सफळ करावा हाच निजध्यास. येविषयीं विनंति समक्ष केलीच आहे. येणेंकडून माझा इहलोक परलोक यथास्थित स्वामीचरणांचे कृपेनें जालासा होईल. हा निजध्यास अहर्निशीं लागला आहे. येथील उलगडा पाडावा सांगतां. परंतु स्वामींचे कृपेनें सांप्रत कांहीं सोईस आला आहे. मासपक्षांत निकाल पाडून स्वार होऊन, यांची स्वारी जलदीनें आल्यास यांजसमागमेंच येतों. कदाचित् दिवसगतीखालीं असल्यास, विनंति लिहिल्याप्रमाणें येथील गुंता उरकून येतों. साकल्य चरणदर्शनांतीं निवेदन करीन. पत्रीं लिहितां विस्तार आहे. तीर्थस्वरूप राजश्री पुरुषोत्तमपंत नानाकडील पत्रें व मुजरद कासद आला, त्याची रवानगी उदईक सेवेसीं करितों. त्याजवरून साकल्य कळेल. त्यांचें संरक्षण व आमचें करणार स्वामी समर्थ आहेत. सत्वर येतों. येथें एक एक घटका युगवत् जाते. त्याचा विस्तार काय लिहूं? विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति.

वेदमूर्ति राजश्री गोविंद भटजी तात्या स्वामींस साष्टांग नमस्कार. विनंति लिखितार्थ परसोन कृपा करावी. येथून उलगडून निघावें व पत्राचें उत्तर पाठवावें

यास्तव उत्तरीं लिहिलें. परंतु ग्रहदशा बलवत्तर. आणखी मास पक्षाचा अवकाश पाहून उत्तर लिहिलें. अहर्निशीं निजध्यास हाच आहे. इतःपर सत्वर कोणेही प्रकारें येतों. कळावें लोभ कीजे, हे विनंति."

---

पो छ० ११ मोहरम इहिदे समानीन ह॥ कासीदजोडी.

## लेखांक १७.

श्रीवरद.

२५ नोव्हेंबर इ. स. १७८०.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २१ माहे जिलकाद मुक्काम दिल्ली जाणोन स्वकीय लेखन आज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेषः– पूर्वीं पै दर पै विनंतिपत्रें व आपलें नावें नवाब नजबखानाचा खलिता व नवाब निजामअल्लीखानास व राजश्री खंडोजी भोंसले यांस पातशाहांचे शुके फर्मान पाठविले, ते पावलेच असतील. उत्तरीं सनाथ करणार धणी समर्थ आहेत. हल्लीं इकडील वर्तमान तरी, स्वामींचे आज्ञेप्रमाणें नित्यानीं पातशाहास व नवाब नजबखानास इंग्रेजांवर निघावयास उत्तेजन देत आहोंत. पातशाही खेम्याची वगैरे तयारीची मात्र आज्ञा केली आहे. तयारी होते. आह्मांस आश्वासन देतात कीं बाहीर निघतों. परंतु अनुभवास येईल तें खरें. विना आपले सरकारची फौज मातबर सरदार आलियाखेरीज यांची खातरजमा हिंमत होत नाहीं, व इंग्रेजांनीं आपला वकील फयाजअल्लीखान पाठविला होता. त्यानें यांसीं चापकेसीच्या गोष्टी सांगून, नादीं लाऊन, आपलीं पलटणें सामील करून, पातशाहास भक्षावयास देऊन, पातशाहाची स्वारी बाहीर काढावी, या विचारावर आला होता. व ह्या गोष्टी नजबखानासीं व पातशाहासीं बोलणीं जालीं. हें वृत्त आह्मीं ऐकून पातशाहास व नवाब नजबखानास अर्ज केला कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान व नवाब निजामअल्लीखान व हैदरनाईक हे सर्व एकत्र होऊन, तुमचे मर्जीप्रमाणें हैदर नाईक अर्काट चिनापट्टणाकडे मोहिमेस गेले आहेत. त्यांनीं इंग्रेजांचें पारपत्य केलें व पुढें आणीक करीत जातात. हें वर्तमान परस्परें आपणांस बातमी येतच आहे, व नवाब निजामअल्लीखानाकडील फौज, धौशा वगैरे, शिकाकोलाकडे गेलेच आहेत, व राजश्री खंडोजी भोंसले यांची श्रीजगन्नाथीं छावणी होती. या दिवसांत कलकत्त्याकडे लूट हंगामा केला आहे. कलकत्ता पळून पाहाडांत गेला. हें वर्तमान आपले सरकारांत परस्परें आलेंच आहे. व आमचे श्रीमंत स्वामींचे सरकारची फौज सुरतेकडे व वसईकडे सरदार विजयादशमीचे मुहूर्तें गेले आहेत.

आपण मात्र दिल्लींत बसून आमच्या समाधानाच्या कोरड्या गोष्टी सांगतां. याप्रमाणें कित्येक मजकूर, सरकारचे उपयोगी, यथामतीनें यांसीं बोलून, इंग्रेजांकडील वकील फैयाजअल्लीखान आला होता, त्यास तोंडीं न लावितां, त्याचे मतलबाची गोष्ट कांहींही कबूल न करितां, त्यास रुसकत करून देविलें. तो इंग्रेजांकडे गेला. अतःपर यांजला दिल्लीहून बाहीर इंग्रेजांचे प्रांताकडे काढावयाचे ताकिदींत लागलों आहों. परंतु आपली फौज कांहीं यांजपासीं आलियास बेधडक इंग्रेजांचे प्रांतांत जातीलसें बोलतात. निश्चयें इंग्रेजांसीं बिघाड करावयाचें इमानप्रमाण आह्मी मागतों, हें 'देतों' ह्मणतात. सेवकाचे हस्तगत जालियावर सविस्तर लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. राजश्री बाळाजी गोविंद याजकडील रुपये खर्चास त्वरेनें येथें पावेत तें करणार स्वामी समर्थ आहेत. लाईलाजीस्तव दरपत्रीं सेवेसीं विनंति लिहितों. रागास न यावें. ईश्वर स्वामींचा प्रताप अधिकोत्तर करो. कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १८.

पैवस्ती छ० ११ मोहरम पौष इहिदे समानीन हस्तें कासीदजोडी.

श्रीवरद.

२७ नोव्हेंबर सन १७८०.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति उपरी. येथें लखनऊहून बातमी आली कीं, हैदरनाईकानें अर्काट मारून तेथें अमल केला, व चिनापट्टणास मोर्चे लाविले आहेत. त्यावरून कलकत्त्याहून एक कंपू अर्काटचे कुमकेस पाठविला. त्यास मशारनिल्हेंनीं अर्काटेंत अंमल केला. त्याजवरून कंपू इंग्रेज माघारा फिरून कलकत्त्यास आला, व तीनशें गोरा हैदरनाईकानें जिवंत धरून आणिला, व शेंकडो मारले गेले. हें वर्तमान येथें आलियावर पातशाहा व नवाब नजबखान बहुत खुश जाले, आणि हैदरनाईकाचा स्तव बहुत केला; व नाईकाचा, येथें व लखनऊंत वजिरापासीं लौकिक बहुत जाला. मोठें यश त्यानें संपादिलें, ह्मणून सर्वतोमुखीं जालें आहे. व राजश्री चिमणाजी भोंसले यांची फौज कलकत्त्याकडे गेली आहे. त्यांनींही तिकडे तमाम मुलूख जाळून ताराज केला. कलकत्ता पळून पाहाडांत गेला. शहर उजाड जालें आहे. त्यावरून इंग्रेजांनीं भोंसल्यांकडे आपला वकील पाठऊन, त्यांजकडील वकिलास बोलाऊन नेऊन, त्याचा शिष्टाचार फार केला, आणि बहुत सन्मान करून, वस्त्रें पात्रें हत्ती घोडा वगैरे देऊन, बहुत खुश वकिलास करून पैगाम केला आहे कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींसीं व आह्मांसीं सलूख करून द्यावा. ह्मणून भोंसल्यांकडे पैगाम केला आहे. भोंसल्यांचेही फौजेची

जरब इंग्रेजांवर बसली आहे. याप्रमाणें येथें वर्तमान, पातशाहापासीं व नजबखानापासीं लखनऊहून बातमी आली, ते लिहिली असे. मागाहून वृत्त येईल तें लिहूं. श्रीमंत स्वामींचे प्रतापें शत्रूचा नाश होईल व स्वामींस यश येऊन आश्रित जनांचें पालन होय तो सुदिन. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ घडे ते सुघडी. हे विनंति."

---

पैवस्ती छ० ११ मोहरम पौष इहिदे **लेखांक १९.**

समानीन ह॥ कासीदजोडी. **श्रीवरद.** २७ नोव्हेंबर सन १७८०.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २९ माहे जिलकाद मुक्काम दिल्ली जाणोन स्वकीय लेखन आज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेषः– इकडील वृत्त सविस्तर पूर्वीं श्रीमंत स्वामींस व आपणांस पत्रें पाठविलीं, त्यावरून श्रुत जालें असेल. हल्लीं सविस्तर वृत्त विनंतिपत्रावरून श्रुत होईल. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. इंग्रेजाकडील फैज नामें सरदार सहा पलटणें घेऊन मुंबईचे कुमकेस ग्वालेरीहून गेला, तो हांडीयाचे वाटें नर्मदा उतरून बऱ्हाणपुरावरून जाणार. मार्गीं त्याचें पारिपत्य करावयास सरदारांसही लिहिलें आहे. होईल तें करतील. अमलांत येईल तें लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २२ मोहरम इहिदे **लेखांक २०.**

समानीन. **श्रीवरद.** १७ दिसेंबर सन १७८०.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे:- येथील कुशल तागाईत छ० २० माहे जिल्हेज मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः– इकडील वृत्त पै दर पै विनंतिपत्रें पाठविलीं, तीं पाऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, नवाब नजबखान यांनीं आपला भाचा मिर्जा सफीखान व जाबतेखान ऐसे विसा पंचविसा हजार स्वारप्याद्यांनिसीं शिखांवर रवाना केलें. ते कुंजपुरीयासमीप मुक्काम करून आहेत. तिकडून शिखांच्याही फौजा यांचे मुकाबिलेयास येत जातात. पुढें अमलांत येईल तें विनंतीं लिहूं, व लखनऊकडील बातमी पातशाहाकडे आली कीं, हैदरनाईकानें अर्काटचा किल्ला घेतला, व तिकडील मुलूख मारून ताराज करून आपलीं

ठाणीं बसविलीं. पुढें चिनापट्टणाकडे चाल केली आहे. इंग्रेजांचे बंदरांतून किमखाप व मुशजर व बनात व मखमल वगैरे कापड व मोतीं व खजाना बहुत व हत्ती शंभर व घोडीं व तोफा व बंदुका, जकीरा, दौलत बहुत हातास लागली. आणि पुढें अंमल करीत चालला आहे. हें वृत्त पातशाहा व नजबखान ऐकून बहुत खुश जाले. सर्वत्र तारीफ करितात. व भोंसल्यांकडील फौज कलकत्त्याकडे गेली आहे, त्यास इंग्रेजांनीं आपले वकील पाठवून, मागील देणें चवदा सालची बाकी राहिली आहे तिचा जाबसाल लाविला आहे, ह्मणून वृत्त आलें. व निजामअल्लीखान याजपासीं चिनापट्टणचे इंग्रेजांचे वकील हैदराबादेस आले आहेत; नवाब निजामअल्लीखान यांसीं सख्याचा जाबसाल लाविला आहे. व कलकत्त्यासही कागदींपत्रीं लिहिणें बोलणें घरोब्याचें व सख्यत्वाचें लागलें आहे. निजामअल्लीखान व इंग्रेज एक विचारें असावे. ह्मणून औरंगाबादेहून वर्तमान आलें, तें सेवेसीं श्रुत व्हावें ह्मणून लिहिलें असे, व येथील प्रकार ह्मणावा, तर पातशाहा व नजबखान दिल्लींत आहेत. आह्मांसीं करार केला होता कीं, बाद बरसात आह्मी बाहीर निघूं. त्यास ते गोष्ट अद्याप अमलांत येत नाहीं. ह्मणून आह्मी रोज तगादा करितों कीं, तुमचे सांगितल्याप्रमाणें सरकारांत विनंति लिहिली कीं, पातशाहा व नवाब नजबखान आपले विचाराप्रमाणें बाद बरसात बाहीर निघतील. त्यास आपण अद्यापि बाहीर निघत नाहींत. याजवरून श्रीमंतांस आपली कमहिंमत दिसेल. आमचें लिहिणें मिथ्या वाटेल. ह्मणून कितेकाप्रमाणें उत्तेजनाच्या गोष्टी बोलून जाबसाल करितों. हे आह्मांस आश्वासन मात्र देतात कीं, सत्वरच बाहीर निघतों. परंतु सरकारची फौज श्रीमंतांस लिहून सत्वर आणवणें. सरदार मातबर आले ह्मणिजे,— दक्षिणी फौज दहा वीस हजार, नामी सरदार कोणी आला,— ह्मणजे आमची सिद्धता आहे. ते फौज कजाखीस व आमची फौज सन्मुख झुंजास कामास येईल व पोक्त मसलत घडेल, ह्मणून बोलतात. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. व जयपूरप्रांतीं मूर्तजाखान व महमुदअल्लीखान दोन्ही सरदार मिळून स्वार प्यादा तीस पस्तीस हजार आहेत. तमाम मुलूख काबीज करून अंमल केला, व जयपूरकर मामलतही करितात. परंतु नजबखानाचें मानस कीं, पैकाही घ्यावा आणि मुलूख घेतला आहे तोही न सोडावा, याप्रमाणें आहे. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. विलायती मेवा सेव दाणे पंधरा, एक पेटारी सेवेसीं पावेल. उत्तरीं कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. हे विज्ञप्ति."

---

पैवस्ती छ० २२ मोहरम इहिदे समानीन

## लेखांक २१.

श्रीवरद.

११ दिसेंबर सन १७८०.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील क्षेम तागाईत छ० २० जिल्हेज मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लिहावयास आज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वृत्त पूर्वीं सविस्तर वरचेवर सेवेसीं विनंति लिहिली, व नवाब निजामअल्लीखानास व खंडोजी भोंसले यांस पातशाही शुके इंग्रेजांचे पारपत्यास्तव व सरकारचे मनोदयानरूप वर्तावयास लिहून घेऊन सेवेसीं पाठविलें, ते पावल्याचें उत्तर न आलें व नजबखानास श्रीमंत स्वामींकडून पत्रें आलीं, त्यांत अलकाब हलका लिहितात, यास्तव विषम मानितात. तर निजामअल्लीखानास सरकारांतून वजिरास लिहितां, त्याप्रमाणें नजबखानास लिहावयास आज्ञा करावी, म्हणून वारंवार विनंति लिहिली. परंतु पूर्ववतच त्यास खलित्यांत अलकाब लिहिला, व सेवकास उत्तरीं येविसीं काय मर्जी ते आज्ञा न लिहिली. तर कृपा करून सनाथ करावें. पूर्वीं आज्ञा आली, त्याप्रमाणें पातशाहास व नजबखानास उत्तेजन देत आहों. "वर्षाकाल गेला; शीतकाल आला. अतःपर विलंब न करतां, श्रीगंगापार फौजांसहित चालणें व प्रांत हस्तगत करणें. हा समय पुढें येणार नाहीं. हैदरनायकांनीं चिनापट्टणास मोर्चे लाविले. भोंसले यांनीं कलकत्ता घेरला. तुम्हीं कांहीं पराक्रम करणें." म्हणून वरचेवर लाजवितों. त्याचें उत्तर नजबखान देतात कीं, "आम्ही सिद्ध आहों. पातशाहा चालत नाहीं. श्रीमंतांचे सरकारची फौज एक सरदार मातबर आल्यास यांची स्वारी इंग्रेजांवर काढूं. शपथपूर्वक इंग्रेजांचे पारपत्यास अंतर करणें नाहीं." म्हणतात. पातशाहास अंतस्थ विचारिलें. ते आज्ञा करितात कीं, "सरकारची फौज आली तरच आमची खातरजमा होईल. नजबखानाचे कबजांतून सोडवाल, तर तुमची पातशाही आहे. नित्यकृत्याचें घर बसल्या चालत नाहीं! स्वारीस निघाल्यावर, मोहिमेस लागल्यावर, तंगी खर्चाची जाल्यास, पराधीनता कार्याची नाहीं. तर स्वामींस लिहून, मातबर सरदार एक, अब्रूची गरज असेल व नक्ष करीलसा असेल, तो बोलावणें. निजामअल्लीखान इंग्रेजांकडे जाबसाल करितात व त्यांजकडे जोड करितात, हे गोष्ट कामाची नाहीं. सर्वांनीं एकचित्त होऊन, शत्रूचें पारिपत्य करावें, येविषयीं परस्परेंही त्यांस ताकीद लिहिली आहे, कीं श्रीमंत पंतप्रधान स्वामींसीं जोड करणें." म्हणून पातशाहांनीं आज्ञा केली. त्यास, निजामअल्लीखान उठावयाचें कारण

काय ते आज्ञा करावी. त्याप्रमाणें यांस श्रुत करूं. व यांचें वचनप्रमाण लिहून घेऊन सेवेसीं यांची इनायतसहित येऊं, व नजबखानास सरकारचें पत्र, अलकाब वाढवून लिहाल, त्यांत खातरजमा लिहावी व फौज पाठवावी कीं, ह्यांजकडे सूत्र न करीत. पातशाहाकडे बुभुक्षित व नजबखानाकडे कृतकृत्यता जाली आहे. या समयीं सरकारची फौज एकदिल सरदार पाठवाल, तर यांची फौज व सरदार आहेत ते सर्व, निरनिराळे सरकारचे ताबेदारींत राहतीलसें पक्कें करून ठेविलें आहे. श्रुत होय. निजामअल्लीखानाचे बंधू मोंगलअल्लीखान आजवर येथें होते. उपजीविका न चाले, यास्तव अबदालीकडे गेले. पूर्वीं सेवकानें विनंति लिहिली होती कीं, निजामअल्लीखानाचें सूत्र इंग्रेजांकडे लागलें आहे. त्यांसीं स्नेहाची पोख्तगी करावी. अंतस्थ होतें तें आतां प्रगट जालें. हैदरनायकाचे फौजेसीं झुंजास निजामअल्लीची फौज गेली. शिकाकोलाकडे गेली नाहीं. येथले ह्मणतात, यास्तव सेवेसीं लिहिलें. उत्तम असेल तें करून, उत्तरीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. या दिवसांत विलायती मेवा सेव आले. त्यांत सेव तीस सेवकाचे हातास आले, ते सेवेसीं पाठविले आहेत. त्यांत एक पेटारी श्रीमंत स्वामींस व एक स्वामींनीं घेऊन उत्तर पावलियाचें लिहावें. पुढें मेवा येईल तो सेवेसीं पाठऊं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. राजश्री बाळाजी गोविंद आज्ञेप्रमाणें खर्चास न पाठवीत, यामुळें येथें फसलों, व स्वामींचे मनोरंजनीं कृष्णजीची तसबीर फर्माश हातास न ये. बाळाजीपंत गंगाधरपंतास सरकारची आज्ञा निक्षून असतां सेवकास वोढाच लिहितात. त्यास ताकीद मानीतसें केलें पाहिजे. निराश्रित सेवक, स्वामींचें दर्शन घडे ते सुघडी. बहुत काय लिहूं, हे विनंति.''

---

## इ. स. १७८१.

ता ४
८१

पै॥ छ. २६ रविलाखर इहिदे समानीन ह्य॥ अजुरदार

### लेखांक २२.

श्रीवरद.

२२ मार्च इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

पो॥ पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ता॥ छ० २६ माहे रविलावल मुक्काम दिल्ली जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः– आपण कृपा करून छ २७ जिल्कादचें पत्र पाठविलें, तें छ. ७ मोहरमीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, कितेक मजकूर अलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिला आहे, त्यावरून कळेल; व केतकीचा अर्क व स्फटिकाची स्मरणी पावली, हें पेशजीं लिहिलेंच आहे ह्मणून आज्ञा लिहिली, ते शिरसा वंदिली. ऐसीयास, इकडील सविस्तर पुरवणीपत्रीं विनंति लिहिली आहे, त्यावरून श्रुत होईल. व कासीद अजूरदार पत्रें देऊन हुजूर पाठवितों, त्यांस अजुरा मिळून पत्रांचे जाब सत्वर येत नाहींत, तर पत्रांचीं उत्तरें वरचेवर येत, तें करणार स्वामी समर्थ आहेत. इकडील वर्तमान तर पातशाहा व नवाब नजबखान दिल्लींत आहेत. येथून कलकत्त्यापावेतों इंग्रेजांचे तीन कंपू, त्यांपैकीं कलकत्त्यांत एक कंपू, व लखनऊस एक कंपू, व कानपुरीं एक कंपू होता. त्यांपैकीं पांच पलटणें फुलयेर नामें इंग्रेज घेऊन, ग्वालेर प्रांतीं सा पलटणें आहेत त्यांचे कुमकेस इटाव्यास येऊन पोंहचला आहे. अद्याप सामील जाला नाहीं. राजश्री महादजी शिंदे यांजकडील वर्तमान पातशाहाकडे आलें कीं, राणेखान वगैरे हिंदुस्थानी फौज रजवाड्यांची मिळून सिरोंजेस आले. तेथें इंग्रेजांकडील तीन पलटणें होतीं, त्यांसीं कांहीं झटपट होऊन, तें पलटणें माघारा नवी सराईस कालेबागापासीं आलीं. त्यांचे पाठोपाठ फौजा येऊन, तीन पलटणें सराईंत घेरलीं आहेत. मागाहून पाटीलबावाही येऊन पोंहचले आहेत. भेलशाहून तोफखाना आणून, गोळ्याखालें पलटणें मारून ताराज करावीं, ह्मणून वर्तमान आलें आहे, व कलकत्त्याकडे भोंसले आहेत, त्यांजला कांहीं इंग्रेजांनीं मागील खंडणीपैकीं पैका देऊन, शांतवन करून ठेविलें आहे. कांहीं लढाईबिढाईचा प्रसंग नाहीं. ह्मणून बातमी यांजकडे आली. विशेष वर्तमान आलीयास विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन, हे विनंति."

पैवस्ति छ १९ जमादिलावल इहिदे समानीन.

## लेखांक २३.

श्रीवरद. १५ एप्रील इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ २० माहे रविलाखर मुक्काम दिल्ली जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे. विशेषः– इकडील वर्तमान पै दर पै विनंतिपत्रें हजूर पाठविलीं, तें पावून वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा व नवाब नजबखान दिल्लींतच आहेत. यांजकडील फौजा व पलटणें, तोफखाना, अंबाल्याकडे शिखांवर मिर्जा सफीखान यांसमागमें गेले आहेत. तिकडून शीखही भारी जमावानिशीं मुकाबल्यास आले आहेत. नित्यांनीं गोळागोळीचें झुंज होतें. परंतु शिखांचा गलबा भारी जाणून, यांजपाशीं दिल्लींत फौज व पलटणें व तोफखाना आहे त्यांतून आणीक सरंजाम त्यांजकडे स्वार व पलटणें रवाना करितात. आह्मी नित्यांनीं इंग्रेजांचे प्रांतांत बाहेर निघण्याविषयीं तगादा करितों. त्यास उत्तर देतात कीं, "शिखांशीं झुंज लागलें; आतां त्यांसीं दबून सलूख करावा, तर सलतनतेची अब्रू रहात नाहीं. जर त्यांसीं सलूख न करावा, तरी तुह्मांसीं बोलत गेलों व श्रीमंतांस लिहीत गेलों, या गोष्टींत अप्रामाणिकता येते. या अर्थीं राहिली साहिली हजूरची फौज तेही शिखांवर पाठवून, सरहद्दपर्यंत मुलूख हस्तगत करून तिकडील खातरजमा जाली, ह्मणजे पातशाहासहित अंतरवेदींत उतरतों." ह्मणून धातुपोषणाच्या गोष्टी मात्र बोलून आमचें समाधान करितात; परंतु अमलांत येईल तेव्हां खरें. वरकड सविस्तर पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २४.

श्रीवरद. १९ मे इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पो। पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ता॥ छ० २४ माहे जमादिलावल मुक्काम दिल्ली जाणोन स्वकीय लेखन आज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेषः– इकडील वृत्त सविस्तर पूर्वीं विनंति लिहिली, त्याउपरी जाबतेखानांनीं अंतरवेदींत पातशाही ठाणीं घेतलीं. नजबखानाचे अनुमतें अंतर केलें. हें श्रवणांत येतांच, फरुखंदे बकश पातशाहाजादी सहित नवाब अबदूल अहदखान, छ० १८ माहे मजकुरीं आज्ञा घेऊन, अंतरवेदींत जाबतेखा-

नाचे पारपत्यास यमुनातीरास कूच केला. हें वृत्त श्रवण करून जाबतेखानांनीं मिन्नत करावयास वकील पाठविला आहे, व तिकडे प्रांतांत धूम करीत आहे. यास्तव आह्मांस आपलेकडे पातशाहांनीं बिदा केलें कीं, सत्वर स्वामीपासीं पावून, सरदारांची स्वारी ये प्रांतीं ये, तो अर्थ करावयास सेवेसीं विनंति करावी. दर्शनोत्तर सविस्तर श्रुत करूं. दर्शनलाभ होय तो सुदिन. सरकारची अजूर जोडीसमागमें पत्रें अबदुल अहदखानास पैदरपै दोन पावलीं. परस्परें पत्रें यावयाचें कारण काय ? स्वामींचे कृपेचा स्फुंद सदैव गात असतां, ह्मणून नवाब मजकुरांनीं आह्मांस शब्द लाविला; व पत्रोत्तर स्नेहबुद्धीनें श्रीमंतांस लिहून कासिदास इनाम देऊन सेवेसीं रवाना केलें. तें पावून वृत्त श्रुत होईल. सदैव पत्रामृतीं कृपा केली पाहिजे. निराश्रित सेवक स्वामींचे अंकित आहों, हे विनंति."

---

## लेखांक २५.

### श्रीवरद.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति छ० ५ साबानीं हुंडी पत्र संक्रमणाचे तीळ शर्करासहित पावले. सनाथ जालों. छ० १४ सफरचीं पत्रें सा महिनियांत कासीद येऊन पावला. जबानीं सांगतो कीं, इंग्रेजांकडे धरला गेला. कैदेंत होता. आपले घरीं राहिला किंवा कैद, हें ईश्वर जाणे. पुढें मर्जीप्रमाणें येथून उलगडा पाडून, सेवेसीं यावयाचे उद्योगांत लागलों. बाकी देणें पाहिलें. याविषयीं कमाविसदारास ताकीद निक्षून स्वामींनीं करून, नेमणुकीचे बाकीपैकीं रुपये आज्ञेप्रमाणें पावीत, तें करावें. व वसुली जमेचे गांव विसा हजारांचे लाऊन देणें, ह्मणून फडणिसी दप्तरची सनद पाठवावी कीं, बाळाजी गोविंद गांव वसुली जमेचे देतील तर पुढें सेवेसीं विनंति लिहिणें न पडे. तें करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक २६.

### श्रीवरद. २४ मे इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:––

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपर येथील क्षेम तागाईत छ. २९ जमादिलावल मुक्काम लष्कर जाणून स्वानंद लिहावयास आज्ञा केली पाहिजे. विशेषः–हस्ताक्षर पत्रामृतीं ममतापूर्वक गौरविलें. ईश्वर स्वामींचे

मनोरथ पूर्ण करो. आज्ञेप्रमाणें तसबिरा जमा केल्या आहेत. या वर्षाकाळाकरितां पुढें सेवेसीं रवाना करूं. वरकड तोफा जिन्नस मिळेल तो घेऊन सेवेंत येतों. दर्शनलाभ घडेल तो सुदिन. अहर्निश आपण मनांत ध्यानांत दिसतां. भूमंडळांत दुसरा आश्रय नाहीं. दोन वर्षें जालीं, बाळाजी (व) गंगाधरपंत गोविंद गांव वसुली व बाकीचे ऐवजास्तव ताकीद निक्षून इच्छितात. त्यास बोध होय तें करणार स्वामी समर्थ आहेत. दूर पंथ; परराज्य; रांगडे दाबाचे स्नेही! सरकारची फौज इकडे आलीयावर एकचित्त राहून सरकारकाम करितील व सरदार एकदेटीं जाबसाल ठेवितील, तें केलें पाहिजे. नजबखान बक्षी यांनीं आपणांस पत्र लिहिलें आहे. त्यास मनन करून, उत्तरीं कृपा केली पाहिजे. वरकड वृत्त श्रीमंत स्वामींचे सेवेसीं विनंतिपत्र लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. विशेष चिरंजीव देवराव सेवेसीं लिहितील. आपले चरणापासीं कांहीं सोय करून दिधलियास सेवेंत समीप राहूं तें केलें पाहिजे. भेट होय ते सुघडी. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७.

**श्रीवरद.** इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति कीं, पातशाहाचें येथें छ ५ मीनहूस श्रीकाशीची बातमी आली कीं, "या दिवसांत इंग्रेजांचे विलायतींत फरासीसांसीं व वलंदेजांसीं एकोपा होऊन, इंग्रेजांचे पातशाहासीं बिघाड जाला. फरासीस गालब आहेत. इंग्रेजांनीं नवी दुनिया ह्मणून शंभर कोस आसपास ऐसा मुलूक समुद्राचे बेटांत वसविला होता, तो मुलूक फरासीसांनीं घेतला. तेव्हां इंग्रेजांचे पातशाहाकडून पांच प्यादे व कांहीं खजाना कुमकेस यावयाची उमेद नाहीं. आणि हैदरनाईकाकडील व भोंसल्यांकडील फौजा तों समीप येऊन बाज खाल्या, व आपलेपासीं फौजही नाहीं, व खजानाही नाहीं. या स्थळीं बसून राहावें, तों एकादे दिवसीं स्थळही दुष्मन घेतील आणि अब्रूही जाईल. याजकरितां तेथील कंपेश बंदोबस्त करून हिंदुस्थानांत जावें, कीं राजा चेतसिंग काशीचा व सुजाउद्दौलाची मातुश्री व स्त्री, व फैजुल्लाखान रोहिला यांचा झाडा घेऊन, खजाना जमा करून व पातशाहा काबूंत घेऊन दक्षणेस यावें. हैदरनाईकाचे प्रांतांत शिरावें. या विचारावर श्रीकाशीस येऊन, राजे चेतसिंग, बलवंतसिंगाचा पुत्र भेटीस गेले. यास गोष्टी मातेंत गोंवून कैद केलें. इंग्रेजांचे समागमें चार पलटणें व तीनशें गोरा, तीनशें तुरकस्वार येणेंप्रमाणें सरंजाम आहे. त्यास तीन प्रहर राजा कैदेंत होता. त्याचे

दिवाणांनीं व भाऊबंद मुदामी लोक होते यांनीं विचार केला कीं, हे फिरंगी कैद आहे, पैकाही घेतील आणि जिवेंही सोडणार नाहींत; या अर्थीं मरणें बरें. हा निश्चय करून, दोन हजार स्वार येकांडे रात्रीस तयार होऊन, इंग्रेजांचे गोटावर पडले. गोट मारून ताराज केला. पांच सातशें माणूस तेलंगा व फौजेचा बक्षी व दिवाण व मातबर दहा पांच गोरे याप्रमाणें इंग्रेजांचे लोक मारले गेले, आणि राजे चेतसिंगास कैदेंतून सोडवून सांभाळून घेऊन गेले. इष्टीन साहेब व त्याची स्त्री पलंगावरून पळून, लष्कर सोडून, बाहीर निघून गेली होती. ते दिवस निघाल्यावर लष्करांत आपले डेऱ्यास आली. याप्रमाणें राजाकडील लोकांनीं इंग्रेजांची फजीती केली. असफद्दौला यास फौजसुद्धां व रोहिल्यास फौजसुद्धां बोलाविलें आहे. वजीर तीन कोस लखनऊहून बाहीर डेरे देऊन आहे. राजाचें वृत्त ऐकिल्यावर यासही धीर पुढें जावयास पुरत नाहीं, व रोहिलाही आपले ठिकाणीं फौज जमा करितो. याप्रमाणें चहूंकडे गव्हारगर्दी जाली आहे." .... .... ....त्याचा विस्तार आलाहिदा पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २८.

**श्रीवरद.** ३१ मे. इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, पातशाहा व नवाब नजबखान दिल्लींत आहेत. यांजकडील सरदार मिर्जा सफीखान यांस कुंजपुऱ्याकडे पाठविलें होतें. त्यांनीं गजपतसिंग जाटाचा मामला सा लक्षांचा करून, त्यांपैकीं तीन लक्ष रुपये वसूल घेऊन, त्याचे पुत्रास वोलीस ठेऊन, त्यास वस्त्रें देऊन मार्गस्त केलें. तीन लक्ष रुपये राहिले, तेही किस्तीप्रमाणें येतील. व कलकत्त्याकडील बातमी आली कीं, मिस्तर इष्टीन यास कांहीं भ्रम होऊन वेडा जाला आहे, व तेथें मरी आली आहे. नित्यांनीं माणसें बहुत मृत्य पावतात. याप्रमाणें लखनऊहून वर्तमान आलें कीं, इंग्रेजांनीं वजीरास सांगितलें कीं, आमच्यानें तुमचा मुलूक राखवत नाहीं. तुह्मीं आपली फौज ठेवून मुलकाचें संरक्षण करणें. त्यांनीं उत्तर दिल्हें कीं, आमची फौज होती ते तुह्मीं खराब केली. आतां आह्मीं नवी फौज ठेवावी, तर आह्मांपासीं पैका नाहीं! याप्रमाणें उत्तर देऊन स्वार होऊन शिकारीस गेले; व कारभारी यास आज्ञा केली कीं, फौज मिळेल ते ठेवणें. याप्रमाणें वजीराकडील वृत्त आलें,

तें श्रुत व्हावयास लिहिलें असे. इंग्रेजांकडील जहाज,–कलकत्त्यास इष्टीनचे बदलीचा सरदार येत होता तें जहाज, आंग्रे यांनीं मारिलें, बुडविलें. हें वृत्त कलकत्तेकराचें श्रवण करून संतोषी जाले. पुढें येईल तें विनंति लिहूं. दर्शनलाभ होय तो सुदिन. कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक २९.

पै॥ छ १६ रजब इसन्ने समानीन. ह॥ सरकारची जोडी.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

''श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:––

विनंति सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ ५ माहे जमादिलाखर मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः–कृपा करून छ १५ रविलावलचें पत्र पाठविलें, तें छ ५ माहे जमादिलावलीं सरकारचे कासिदासमागमें पावलें. पत्रीं आज्ञा कीं, ''तुह्मी पातशाहांसीं व नबाब नजबखानांसीं बोलून इंग्रेजांचे तंबीचा अहदपैमान घेऊन पाठविणें. वरकड सविस्तर राजश्री बाळाजी जनार्दन यांस लिहिलें आहे, त्यावरून कळेल'' ह्मणून आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें यांजपासून अहदपैमान सरकारचे नांवें लिहून घेतला आहे. त्याप्रमाणें राजश्री महादजी शिंदे यांचे नांवें मागतों. पाटीलबावा यांणीं ग्वालेरप्रांताची इंग्रेजांची लढाई मारिली ह्मणजे यांजवर दाब बसून, पूर्वीं कौलनामा लिहून दिधला आहे त्याप्रमाणेंच वर्तणूक करितील, व सरकारचे सरदाराचे सामील होतील. वरकड सविस्तर राजश्री बाळाजी जनार्दन यांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. सदैव कृपा करून हस्ताक्षरपत्रामृतीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. दर्शनलाभ होय तो सुदिन. कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक ३०.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

''पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति पत्रीं आज्ञा कीं, ''सरदार तिकडे पाठवावयाचा निश्चय जाला; इंग्रेजांसीं सलूख होणेंच नाहीं; सर्व त्यांचे तंबीवर; ऐसें असतां इकडून सलूख कैसा घडेल ? येविषयींचीं खातरजमेचीं पत्रें पेशजीं तुह्मांकडे पाठविलीं, व राजश्री महादजी शिंदे यांनीं लिहिलें, त्यावरून तुह्मीं पातशाहाची व नबाब नजबखानाची

यामध्यें तंजावरच्या राजानें, जुन्या खंडणीबद्दलची बाकी २२ लक्ष रुपये दोन वर्षांत हप्तेबंदीनें नबाबास द्यावी, आणि पूर्वापार चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें पेशकसीबद्दल २ लक्ष रुपये व नजराण्याबद्दल २ लक्ष रुपये मिळून ४ लक्ष रुपये दरसाल देत जावे, असें ठरलें. याबद्दलची हमी इंग्रजांनीं घेतली. परंतु ह्या अटी अर्थातुर झालेल्या नबाबास पसंत पडल्या नाहींत. त्यामुळें त्याचा असंतोष कायम राहून हें खंडणीचें भांडण आंतल्या आंत तसेंच धुमसत राहिलें व तें पुढें फार विकोपास गेलें. असो.

तंजावरचे प्रतापसिंग राजे हे यानंतर फार दिवस जगले नाहींत. त्यांची कारकीर्द एकंदरींत अस्वस्थतेची व धामधुमीची झाली. ते इ. स. १७६३ च्या डिसेंबर महिन्यांत मृत्यु पावले. त्यांच्या बरोबर त्यांची तिसरी स्त्री यमुनाबाई व पांचवी स्त्री सखवारबाई यांनीं सहगमन केलें. प्रतापसिंह राजे यांची कारकीर्द जरी शांततेची झाली नाहीं, तरी त्यांनीं प्रजापालन चांगल्या रीतीनें करून मोठी कीर्ति मिळविली. ते मोठे औदार्यशाली व धर्मनिष्ठ असे होते. त्यांनीं कुंभकोनम् व चिदंबरम् येथील देवालयांचा जीर्णोद्धार केला; आणि कुंभकोन त्रिवेलूर, मदुरा, रामेश्वर आणि त्रिणोमाली येथें मोठमोठे राजवाडे बांधिले. त्यांची कीर्ति अद्यापि प्रसिद्ध आहे. त्यांस तुळाजी ऊर्फ तुळजा राजे व अमरसिंग असे दोन पुत्र होते. त्यांपैकीं त्यांचे मागून तुळाजी ऊर्फ तुळजा राजे हे गादीवर बसले.

---

# भाग ९ वा.

## तुळाजी ऊर्फ तुळजा राजे यांची कारकीर्द.

[इ. स. १७६३ पासून इ. स. १७८७ पर्यंत.]

प्रतापसिंह राजे मृत्यु पावल्यानंतर त्यांचे पुत्र तुळाजी ऊर्फ तुळजा राजे हे तंजावरच्या गादीवर आरूढ झाले, हें मागील भागांत सांगितलेंच आहे. तुळाजी राजे यांची कारकीर्द सुमारें तेवीस चोवीस वर्षें झाली. परंतु ती विशेष शांततेची किंवा भरभराटीची झाली, असें ह्मणतां येणार नाहीं. ह्या राजाच्या कारकीर्दींतही अर्काटचा नबाब महंमदअल्ली, मद्रासकर इंग्रज, ह्मैसूरचा हैदरअल्ली, इत्यादि सत्ताभिलाषी आणि स्वार्थपटु मंडळींनीं तंजावर संस्थानावर दृष्टि ठेवून, तें हस्तगत करण्यासाठीं अनेक प्रयत्न केले. तुळाजी राजे यांनीं या सर्व शिरजोर व बलिष्ठ लोकांच्या राजकारस्थानांचा प्रतिकार करण्यांत व त्यांच्यापासून आपला बचाव करण्यांत आपली कारकीर्द खर्चीं घातली, असें ह्मटलें असतां अयथार्थ होणार नाहीं. या राजाच्या कारकीर्दींतील महत्त्वाच्या ठोकळ ठोकळ गोष्टींचा आह्मी येथें निर्देश करतों.

तंजावरच्या राजाचा मुख्य शत्रु ह्मटला ह्मणजे अर्काटचा नबाब महंमदअल्ली हा होय. याचें व तंजावरच्या राजाचें मुख्य भांडण ह्मटलें ह्मणजे पेशकस ऊर्फ खंडणी याबद्दलचें होय. या भांडणाचा निकाल इंग्रजांच्या मध्यस्तीनें ता. १२ अक्टोबर इ. स. १७६२ मध्यें झालेल्या तहानें कांहींसा लागला होता. परंतु, त्या योगानें महंमदअल्लीचें समाधान न होऊन, तो तंजावरच्या राजाशीं पुनः भांडण उकरून काढण्याची संधि पहात होता. ती त्यास अनायासें प्राप्त झाली. तंजावर प्रांताच्या सुपीकतेचें मुख्य साधन, कावेरीनदीचा जलप्रवाह हें होय. ही नदी ह्मैसूर प्रांतांत उगम पावून पूर्व व पश्चिम किनाऱ्यांच्या मध्यभागीं असलेल्या पर्वतावलींतून उड्या घेत, त्रिचनापल्लीजवळ येऊन दाखल झाली आहे. तेथून तिचे दोन भाग होऊन ती तंजावर प्रांतांतून समुद्रास मिळण्यासाठीं गेली आहे. त्रिचनापल्लीनजीक तंजावरच्या राजांनीं प्राचीनकाळीं धरण बांधून मोठा कालवा तयार केला आहे. तो 'मेलूरचा कालवा' या नांवानें प्रसिद्ध आहे. तो वस्तुतः जरी नबाबाच्या हद्दींत आहे, तरी त्यावर खरी मालकी तंजावरच्या राजाचीच होय. परंतु अर्काटच्या नबाबानें त्यावर आपलें

स्वामित्व चालवून, त्याची दुरुस्ती तंजावरच्या राजास करूं दिली नाहीं. अर्थात् वादाचें कारण उत्पन्न होऊन, तुळाजी राजे व नवाब महंमदअली यांचा हर्शामर्श सुरू झाला, आणि नबाबानें हा कालवा बंद करून तंजावर संस्थानच्या सुपीकतेवर गदा आणण्याचा प्रयत्न केला. तेव्हां तुळाजी राजे यांनीं भयभीत होऊन मद्रासच्या इंग्रजांचें साहाय्य मागितलें. त्यांनीं मि० जेम्स बोरशियर (Mr. James Bourchier) नामक एक कौंसिलर चौकशीसाठीं तिकडे पाठविला. त्यानें बरोबर चौकशी करून दोन्ही बाजूंची खरी हकीकत मद्राससरकारापुढें ठेविली. या वेळीं मद्रासचे गव्हर्नर ऑनरेबल राबर्ट पॉक हे होते. ह्यांनीं नबाबाची कानउघाडणी करून, त्याजकडून तंजावरच्या राजास कालव्याची दुरुस्ती करण्याबद्दल परवानगी मिळवून दिली. अशा रीतीनें इ. स. १७६४ मध्यें या तंट्याचा शेवट झाला. परंतु नबाबाच्या मनांतील द्वेषाग्नि तसाच धुमसत राहून, तो तंजावरच्या राजाविरुद्ध युद्ध करण्याच्या मसलती योजूं लागला.

कर्नाटकामध्यें याच सुमारास, अर्काटचा नबाब महंमदअली व इंग्रज यांनाही शिरजोर होऊन त्यांची सत्ता संपुष्टांत आणण्याची इच्छा करणारा असा दुसरा एक प्रबल शत्रु निर्माण झाला. तो ह्मैसूरचा राजा हैदरअली हा होय. यानें कर्नाटकांत एकसारखी धुमश्चक्री चालविली होती. त्याच्या मनांत, इंग्रज व त्यांचा स्नेही महंमद अलीखान यांस पादाक्रांत करून, कर्नाटकांत आपला अंमल बसवावा, अशी फार महत्त्वाकांक्षा होती. ह्मणून त्यानें त्रिचनापल्ली व तंजावर प्रांतापर्यंत स्वाऱ्या करून महंमदअलीच्या मनांत फार दहशत उत्पन्न केली. ह्या वेळीं तंजावरकर तुळाजी राजे यांची स्थिति फार दुर्बळ व परस्वाधीन झाली होती. ते एकीकडून महंमदअली, एकीकडून इंग्रज, व एकीकडून हैदर या प्रबल त्रयीच्या पेंचांत सांपडले होते. ह्मणून त्यांनीं स्वतःच्या बचावासाठीं पेशव्यांकडे संधान बांधून मराठ्यांची फौज कर्नाटकांत यावी आणि तिनें तंजावरचें रक्षण करावें, असा गुप्त प्रयत्न केला. परंतु त्यांत त्यांस चांगलेंसें यश आलें, असें दिसत नाहीं. तंजावर संस्थान हें हिंदूंचें असल्यामुळें त्याबद्दल मराठ्यांस सहानुभूति वाटणें अगदीं साहजिक आहे, आणि त्याप्रमाणें तंजावरच्या बचावासाठीं व त्याच्या मुक्ततेसाठीं पेशव्यांचीं व मराठे मुत्सद्यांचीं एकसारखीं राजकारणें चालू होतीं. परंतु कर्नाटकांत इंग्रज व महंमदअली यांचें प्राबल्य विशेष असल्यामुळें आणि मध्यंतरीं हैदरासारखा डोईजड शत्रु मराठ्यांस उत्पन्न झाल्यामुळें मराठ्यांच्या सत्तेचा प्रवेश तंजावरापर्यंत कधींही होऊं शकला नाहीं. त्यामुळें तुळाजी राजे यांस, इ. स. १७६९ मध्यें जेव्हा हैदराची स्वारी तंजावरावर येऊन पोंचली, त्या वेळीं स्वसंरक्षणार्थ सामदा-

दामाचा उपाय करणें भाग पडलें. या वेळीं तुळाजीराजे यांनीं हैदरअल्लीस चार लाख रुपये रोख व पांच हत्ती नजर देऊन त्यास वाटेस लाविलें. ही गोष्ट मराठे सरदारांच्या अनुमतानें झाली असावी, असें दिसतें. तुळाजी राजे यांचे मुख्य दिवाण नारोपंत डबीर ह्यांस मराठे सरदारांकडून गेलेलें पुढील पत्र वाचण्यासारखें आहे. ह्या पत्रावरून, तंजावरच्या तुळाजी राजांनीं, हिंदु धर्माचें रक्षण करण्यासाठीं, हैदरअल्लीबरोबर सलोखा करून आपला बचाव केला, ही गोष्ट उघड होत आहे. हें पत्र पेशवे किंवा कर्नाटकच्या मोहिमेवरील मराठे सरदार ह्यांपैकीं कोणाचें तरी असून, तें अस्सल पत्राची नक्कल आहे. तें येणेंप्रमाणेंः–

श्री. इ. स. १७६९.

"यादी चंदावर संस्थान राजे तुळजाजी यांचे डबीर नारोपंत यांस पत्रः—

जे आमच्या ठायीं आपली ममता, अंतःकरण व गुणानुवाद सुबराव अरणीकर यांणीं सांगितलेंवरून बहुत संतोष पावलों. इंग्रज व हैदरखान या उभयतांत लढाई तळघांटें आपल्या प्रांतांत पडली, त्यावरून तुह्मीं इंग्रजांस कुमक केली. ह्मणोन हैदरखान तुह्मांवर बहुत कटाक्ष धरून, वीस कोसांचे तफावतीनें त्रिमलवाडीवर उतरला; व हेजिबीस वकील पाठविला जे, "तुह्मीं इंग्रजांस कुमक करून आमचे मुलुखाची खराबी तुह्मांकडून जाली. मातबर पैका मागोन संस्थानास अपाय करावा असें योजिलें असतां, तुमचे आप्त इष्टांनीं राजांस समजाविलें जे, खामखां लढाई करावी. त्या समयीं आपण समयावर दृष्टि देऊन, देवब्राह्मणांचे अन्नछत्र व अग्रहार यांची खराबी होईल ह्मणोन चारी गोष्टी महाराजांस समजावून, चार लाख रुपये व पांच हत्ती देऊन संस्थान राखिलें. हे गोष्ट महंमद अल्लीखान यानें ऐकून संस्थानावर बदनजर ठेविली आहे." ह्मणोन हुजूर विदित जालें. येथून महंमद अल्लीखानांस व इंग्रेजांस ताकीदी पुण्याहून पाठवून देतों. सांप्रत सुबराव अरणीकरास पाठविलें आहे. स्वारी सत्वर त्या प्रांतें येणार आहे. मशारनिल्हे यांची रवानगी सत्वर करणें. सर्वही आपल्या मनोगतानुरूप घडून येईल."*

अर्थात् तंजावरच्या राजानें, इंग्रज व महंमद अल्लीखान यांचा शत्रु जो हैदर त्याजबरोबर युद्ध करून आपली स्नेहबुद्धि व्यक्त करण्याचें सोडून देऊन, त्यानें उलट त्यास द्रव्य दिलें, आणि मराठ्यांशीं पत्रव्यवहार चालविला, ह्मणून महंमद अल्लीखान हा त्याजवर अत्यंत रुष्ट झाला, व त्यास इंग्रजांची मदत घेऊन

* ऐ. ले. संग्रह. पु. ३ पृ. १३४.

तंजावरावर स्वारी करण्यास चांगली संधि मिळाली. मद्रासच्या गव्हर्नरानें नबाबाच्या ह्या राजकारस्थानास प्रथम पाठबळ दिलें नाहीं. परंतु त्या संबंधानें बराच पत्रव्यवहार होऊन अखेर नबाबाच्या इच्छेप्रमाणें तंजावरावर स्वारी करावी असें ठरलें. प्रथमतः नबाबाचा मुलगा उमदत-उल्-उमराव यास सर्व अधिकार देऊन तंजावरच्या राजाकडे बोलणें करण्यासाठीं पाठविलें. परंतु राजानें त्याच्या अटी मान्य केल्या नाहींत. तेव्हां जनरल स्मिथ याच्या हाताखालीं बरेंच सैन्य देऊन त्याची तिकडे रवानगी करण्यांत आली. त्यानें इ. स. १७७१ च्या सप्टेंबर महिन्यांत तंजावर संस्थानावर स्वारी करून बलमचा किल्ला जिंकून घेतला व पुढें तंजावरावर चाल केली. तंजावर येथें उभय सैन्यांचें हातघाईचें युद्ध झालें. जनरल स्मिथ यानें तंजावरच्या किल्ल्यास वेढा दिला. त्या वेळीं तंजावरच्या लोकांनींही आपलें शौर्य दाखविण्यास कमी केलें नाहीं. तंजावरचा किल्ला हस्तगत होणार, इतक्यांत नबाबाच्या मुलानें तंजावरच्या राजाबरोबर तहाचें बोलणें लावून युद्ध बंद केलें. या युद्धामध्यें राजाकडील किती लोक पतन पावले, तें समजण्यास मार्ग नाहीं. परंतु इंग्रजांकडील ४३ गोरे लोक व ८४ काळे शिपाई मृत्यु पावले; आणि १३९ गोरे लोक व १९७ काळे लोक जखमी जाले, अशी माहिती सांपडते. ह्यावरून उभयपक्षांकडील सैन्यांनीं फार आवेशानें व शौर्यानें लढाई केली, हें स्पष्ट होतें.

या वेळीं तंजावरच्या राजाकडून नबाबाच्या पुत्रानें ज्या अटी कबूल करून घेतल्या, त्या फार जरब होत्या. त्यांतील मुख्य कलमें येणेंप्रमाणें:—

१ राजानें पेशकशीची दोन वर्षांची बाकी आठ लाख रुपये आणि लढाईच्या खर्चाबद्दल साडे बत्तीस लाख रुपये रोख द्यावे.

२ ज्या वेळीं नबाबास सैन्याची मदत लागेल, त्या वेळीं स्वतःच्या खर्चानें सैन्य पाठवावें.

३ मरवरच्या राजाकडून तंजावरच्या राजानें हनुमंतगडी नांवाचा जो प्रांत घेतला आहे, तो परत द्यावा.

४ अरणीची जहागीर व त्रिचनापल्ली प्रांतांतील कांहीं गांवें यांजवरील तंजावरच्या राजानें आपला हक्क सोडावा.

५ लढाईच्या खर्चाबद्दल साडेबत्तीस लाख रुपयांचा भरणा राजानें रोख केला नाहीं, तर त्यानें मायावरम् सुभा व कुंभकोनचा कांहीं प्रांत त्याच्या फेडीसाठीं दोन वर्षें नबाबाच्या स्वाधीन करावा.

६ परस्परांचे शत्रू व परस्परांचे मित्र ते परस्परांनीं शत्रू व मित्र समजावें. नबा-

बानें बलमूचा किल्ला आणि येलंगाडू व कोइलाडी हीं दोन स्थळें राजास परत द्यावीं.

येणेंप्रमाणें नबाबानें तंजावरच्या राजावर आपलें स्वतःचें स्वामित्व स्थापन करून, स्वतःचा मतलब साधण्यासाठीं वरील तह करून घेतला. यांत इंग्रजांचा कोठेंही उल्लेख न करतां त्यांस अगदीं वगळून टाकिलें. एवढेंच नव्हे, परंतु त्यानें गुप्त रीतीनें, स्वतःसाठीं व स्वतःच्या भावासाठीं, सात लाख रुपयांची नजर वेगळी ठरविली, आणि ७७,००० रुपये पेशकशीच्या बाकीवरील व्याज ह्मणून घेण्याचें योजिलें! अर्थात् राजाकडून एकंदर ४८,२७,००० लक्ष रुपये घेण्याचा ठराव केला; व त्यापैकीं ३ लाख रुपये रोख घेतले!! ह्याप्रमाणें नवाबानें, इ. स. १७६२ च्या तहामध्यें इंग्रजांची जी मध्यस्ती होती ती काढून टाकून, तंजावरच्या राजास पूर्णपणें आपल्या अंकित करून घेतलें. परंतु नबाबाची ही स्वार्थपरायणता लवकरच उघडकीस येऊन, त्यानें गिळलेला हा सोन्याचा घास त्यास फार वेळ पचला नाहीं.

या प्रसंगीं तंजावरच्या राजानें पेशव्यांस व मराठे सरदारांस स्नेहभावाचीं पत्रें लिहून त्यांच्या मदतीची फार अपेक्षा केली असावी, हें उघड आहे. या वेळीं मराठ्यांचे सरदार त्रिंबकराव मामा हे कर्नाटकांत हैदराच्या तोंडावर शह देऊन बसले होते, व हैदराशीं तहाची वाटाघाट चालू होती. त्यामुळें त्यांना तंजावराच्या राजास कुमक करणें शक्य झालें नाहीं. या प्रसंगीं श्री० नारायणराव पेशवे यांनीं आपल्या मातोश्रीस कर्नाटकांतील राजकारणांचें वर्तमान लिहिलें आहे, त्यावरून तंजावरच्या कुमकेसाठीं जाण्याचा मराठ्यांचा विचार होता असें स्पष्ट दिसून येतें. तें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री. इ. स. १७७१.

" तीर्थरूप मातुश्री ताईसाहेब वडिलांचे सेवेसीं:-

अपत्ये नारायणरायानें चरणावर मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान ताा छ १७ रमजानपावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असे. विशेषः- कर्नाटकांतून मामांचीं पत्रें आलीं. त्यांतील वर्तमान, हैदरखान पट्टणांतच आहे. आपाजीराम हैदराकडून मामाकडे आला होता. त्यास मामाचें बोलणें जाहालें. परंतु येथील मर्जीप्रमाणें तह होत नाहीं. यास्तव तहाचा प्रकार तर राहिलाच. इंग्रेजांनीं चंदावरास मोर्चे लाविले आहेत. त्यास चंदावर संस्थान सरकारचेंच, यास्तव चंदावरची कुमक करणें जरूर. यास्तव घाटाखालीं चंदावरालगता हैदरखानाचाही मुलूख आहे, त्या मुलकांत जावें

ह्मणजे सहजच इंग्रजांचे चित्तांत भय उत्पन्न होईल. तेणेंकरून हरयेक निकाल चंदावरचा पडेल. बाह्यात्कारें हैदरखानाचा मुलूक मारावयास आलों असें दाखवितील. परंतु इंग्रेज मामाचे येण्यामुळें हरयेक निकाल करितील. बहुतकरून उगाच इंग्रेजांवर दबाव टाकून इंग्रेजांसीं सख्य करून, मग हैदराचे पारपत्यास येतील, असे पत्रांतील भाव आहेत."

असो. तुळाजी राजे ह्यांस कर्नाटकचा नबाब महंमद अल्लीखान ह्यानें अगदीं गोगलगाय करून त्यास सर्वस्वीं आपल्या अमलाखालीं आणिलें, ही गोष्ट मद्रासकर इंग्रजांस अगदीं रुचली नाहीं. त्यांना तंजावरच्या राजानें मराठ्यांचें सहाय्य मिळविण्यासाठीं त्यांच्याशीं जो पत्रव्यवहार केला, त्याबद्दल फार राग आला. शिवाय महंमद अल्लीखानाची तहाप्रमाणें तुंबडी भरण्यासाठीं व लढाईच्या खर्चाची मिळवणी करण्यासाठीं नागोर बंदर व इतर कांहीं प्रांत डच लोकांजवळ गहाण ठेवून तंजावरच्या राजानें कर्ज घेतलें, ही गोष्ट त्यांस पसंत पडली नाहीं. अर्थात् तंजावरचें संस्थान अशा स्थितींत कायम ठेविलें, तर त्यापासून कदाचित् परक्या युरोपियन राष्ट्रांस अंतःप्रवेश करण्यास संधि मिळून एकादे वेळीं अनिष्ट परिणाम घडून येईल, अशी भीति मद्रासकर इंग्रजांस उत्पन्न झाली. ह्मणून त्यांनीं, तंजावरच्या राजाकडे खंडणीची बाकी तुंबली हें निमित्त काढून, तंजावरावर सैन्य पाठवून तें पूर्णपणें हस्तगत करून टाकावें असा विचार मनांत आणिला. त्याप्रमाणें इ. स. १७७३ मध्यें जनरल स्मिथ याच्या हाताखालीं पुनः सैन्य देऊन त्याची तंजावराकडे रवानगी करण्यांत आली. जनरल स्मिथ यानें ता. १७ सप्टेंबर इ. स. १७७३ रोजीं तंजावरचा किल्ला जिंकून घेतला. तंजावरच्या राजानें सुमारें वीस हजार सैन्य जमवून मोठ्या धैर्यानें किल्ल्याचा बचाव करण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यास अपशय येऊन अखेर तंजावरच्या किल्ल्यावर इंग्रजांचें निशाण फडकूं लागलें. अर्थात् तंजावरचा किल्ला पाडाव झाल्यानें राजा तुळाजी आणि त्याचें कुटुंब हें इंग्रजांच्या हातीं सांपडलें. जनरल स्मिथ यानें त्यांस कैदेंत ठेवून, तंजावरचा प्रांत अर्काटचा नबाब महंमदअल्ली ह्याच्या स्वाधीन केला. याप्रमाणें नबाब महंमदअल्ली व मद्रासकर इंग्रज ह्यांची मनीषा तृप्त होऊन तंजावर संस्थान कांहीं दिवस लुप्तप्राय झालें.

मद्रासकर इंग्रज ह्यांनीं अशा रीतीनें तंजावरच्या राजास पादाक्रांत करून तें संस्थान अर्काटच्या नबाबाच्या ताब्यांत दिलें, ही गोष्ट इंग्लंडांतील कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांस अगदीं नापसंत झाली, आणि त्यांनीं मद्रासचे गव्हरनर व कौंसिलचे प्रेसिडेंट मि० विंच यांच्यावर अप्रयोजकपणाचें व अन्यायाचें कृत्य

केल्याचा दोष ठेवून त्यांस कामावरून दूर केलें; आणि तंजावरच्या राजास बंधमुक्त करून पुनः गादीवर बसवावें असा ठराव केला. अर्काटचा नबाब व तंजावरचा राजा यांच्या मधील भांडणांत फाजील मन घालून त्यांनीं तें इतक्या विकोपास नेलें, ही गोष्ट कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स यांस मुळींच रुचली नाहीं. या प्रसंगाची समग्र हकीकत कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांच्या हुकुमावरून प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांत सविस्तर नमूद झालेली आहे. ती फार मनोरंजक व महत्त्वाची आहे. तिचा स्थलसंकोचास्तव येथें अधिक समावेश करितां येत नाहीं.*

मि० विंच हे पदच्युत झाल्यानंतर त्यांच्या मागून लॉर्ड पिगट हे मद्रासचे गव्हरनर झाले. त्यांनीं कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांच्या हुकुमाप्रमाणें तंजावरचे राजे तुळाजी यांस ता. ११ एप्रील इ. स १७७६ रोजीं मोठ्या समारंभानें पुनः सिंहासनारूढ केलें, व त्यांच्याशीं नवीन तह करून तंजावरचें राज्य व ब्रिटिश राजसत्ता यांचा पूर्ण मिलाफ केला. या तहाच्या योगानें तंजावरचा किल्ला इंग्रजांच्या ताब्यांत राहून, त्याच्या संरक्षणार्थ इंग्रजी सैन्य तंजावर येथें कायमचें राहावें, व त्याच्या खर्चासाठीं दरसाल १४ लक्ष रुपये राजानें इंग्रजांस द्यावे, आणि त्याशिवाय चार लक्ष रुपये खंडणी नबाबास द्यावी, असें ठरलें. अशा रीतीनें तंजावरचा राजा हा इंग्रजांच्या संरक्षणाखालीं येऊन त्यांचा पूर्ण मांडलिक बनला.

कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स यांनीं आपली न्यायबुद्धि व्यक्त करून तंजावरच्या राजास पुनः तख्तनशीन केलें, यामुळें तंजावरच्या तुळाजी राजास व त्याच्या प्रजेस इंग्रजांविषयीं फार कृतज्ञता व आदरबुद्धि उत्पन्न झाली. राजे तुळाजी यांनीं या प्रसंगीं लिहिलेल्या एका पत्रामध्यें असे उद्गार व्यक्त केले आहेत कीं, "ईस्ट इंडिया कंपनीनें या प्रसंगीं जी स्नेहबुद्धि आणि जी अलौकिक न्यायप्रीति दाखविली, त्याबद्दल मला जें समाधान वाटत आहे तें कितीही शब्दांनीं व्यक्त केलें, तरी तें अपूर्णच राहणार! मला एक हजार जिव्हा जरी असत्या, तरी देखील माझ्या अंतःकरणांतील कृतज्ञबुद्धि त्यांच्याकडून प्रदर्शित करितां आली नसती!! * * * तंजावरचें राज्य हें कंपनीसरकारचें आहे, आणि माझी एवढीच इच्छा आहे कीं, त्यांनीं माझा मान मरातब व दर्जा यांत कधींही अंतर पडूं देऊं नये." याप्रमाणें तंजावरच्या राजाचें अंतःकरण कृतज्ञतेनें उचंबळून जावें, यांत कांहीं नवल नाहीं. ह्या वेळीं जसा तंजावरच्या राजास आनंद झाला, त्याप्रमाणें त्याच्या प्रजेसही अत्यंत

*हे सर्व कागदपत्र " Rous' Restoration of the King Tanjore " ह्या ग्रंथांत नमूद आहेत. ज्यांस ते पाहण्याची इच्छा असेल त्यांनीं तो ग्रंथ पाहावा.



राजा सरफोजी.

संतोष झाला आणि इंग्रजांच्या न्यायबुद्धीबद्दल अतिशय कौतुक वाटलें, हें निराळें सांगावयास नकोच.*

इंग्रजांनीं तंजावरच्या राजास ता. १७ सप्टेंबर इ. स. १७७३ रोजीं कैद केलें, त्या दिवसापासून तों ता. ११ एप्रिल इ. स. १७७६ रोजीं त्यांस पुनः गादीवर बसवीपर्यंत, तंजावर प्रांत नबाब महंमदअल्ली याच्या ताब्यांत होता. या मुदतीमध्यें नबाबानें तंजावरच्या प्रजेवर अतिशय जुलूम व जबरदस्ती करून, तिच्याकडून जितका पैसा वसूल करितां आला, तितका पिळून घेतला. त्यानें एका १७७४

* तंजावरच्या राजानें ह्या प्रसंगीं लार्ड पिगट ह्यांस पुढील पत्र लिहिलें आहे:—

"The satisfaction I feel on occasion of such a friendship and extraordinary justice as the Company have displayed towards me is so great, that were I to begin to tell you what my mind conceives on the occasion, the subject would never have an end: had I a thousand tongues they could not express my gratitude. When I had an interview with your Lordship, I opened to you the sentiments of my heart; but as mere verbal declarations on the subject are not sufficient, I have thought it proper to write to you a letter. I shall ever consider myself as nourished and protected by the Company, and shall therefore never assist or succour their enemies. No measure shall ever proceed from me contrary to their interests, nor will I ever set on foot any connection with other powers without the Company's consent. This I have written as a means of increasing the friendship that is between us. In the present condition of my country, the placing of a garrison of English troops in the Fort and City of Tanjore is exceedingly necessary; but besides this garrison, if the Company allow some more troops also for the protection of my whole country, this also will be highly proper. If by the favour of Heaven this be put in execution, neither I nor any of my family will need to fear that the calamities of war will fall upon their country again, and if the Company only favour me thus far, I will with pleasure assign them out of my revenues the sum of four lakhs of pagodas per annum for their Military expenses. The mode of payment as follows:— November 20,000, December 40,000, January 40,000, February 1,00,000, March 1,00,000, April 1,00,000.

For my Body-Guard I shall keep a body of men from 100 to 500, and I want not one man either horse or foot, more than that number. As my finances are in the utmost disorder and the state of my country all in confusion, I must throw myself on the Company for my present support. I therefore wish them to buy of me at a reasonable rate all the grain of the present year, excepting what my country may be in need of. By this means the Company will not be burthened, and I shall be enabled to defray the expenses of my Government, without running into debt. The country of Tanjore is tbe Company's. I have only to beg they will preserve my honour."

–७५ या सालामध्यें ५२ लाख चक्रम ह्मणजे ८१ लक्ष रुपये वसूल केले! तंजावरच्या अतिशय शांततेच्या व भरभराटीच्या– ह्मणजे प्रतापसिंह राजाच्या कारकीर्दींत देखील–एवढी रक्कम वसूल झाली नाहीं. त्या वेळीं इ.स. १७६१ च्या सुमारास ५७॥ लक्ष रुपये वसूल झाल्याचा दाखला सांपडतो. यावरून नबाबानें तंजावरच्या प्रजेची कशी स्थिति केली होती, हें चांगलें दिसून येतें.*

तंजावरच्या गादीवर तुळाजी राजे यांची पुनः स्थापना होऊन तेथें पुनः स्थिर-स्थावर होण्यास सुरवात झाली,आणि लढाईमुळें व नबाबाच्या अंमलामुळें त्रस्त झालेली प्रजा पुनः शांततेनें नांदूं लागली, तोंच तंजावरच्या दुर्दैवानें पुनः एक परचक्र आलें व त्यानें तेथं अतिशय कहर उडवून सोडिला. हें परचक्र ह्मणजे हैदर-अल्लीची तंजावरावरील स्वारी हें होय. तंजावरच्या राजानें हैदराचे शत्रू जे इंग्रज त्यांसीं सलूख केला, ही गोष्ट त्यास रुचली नाहीं. ह्मणून त्यानें कर्नाटकांत उतरून तंजावर प्रांतांत मोठा धुमाकूळ उडवून दिला. इंग्रजांचें सैन्य सर ॲयर-कूट या सेनापतीच्या प्रमुखत्वाखालीं हैदराच्या पिच्छास तयार होतेंच. इंग्रज-सैन्यानें ता. १ जुलै इ. स. १७८१ रोजीं पोर्टोनोवो येथें हैदराचा पूर्ण पराभव केला. तेव्हां हैदराचें सैन्य तंजावर सोडून चालतें झालें, व कर्नल ब्रेथवेट यानें शत्रूनें काबीज केलेला प्रांत पुनः आपल्या अंमलांत घेतला. परंतु दुर्दैवानें त्याचा कोलेरून नदीच्या कांठीं पराभव होऊन त्यास शत्रूच्या हस्तगत व्हावें लागलें! इ. स. १७८२ मध्यें हैदर मृत्यु पावला व त्याचा पुत्र टिपू हा त्याच्या गादीवर बसला. त्याचें व इंग्रजांचें वैमनस्य एकसारखें चालू होतें. त्याचा प्रस्तुत विषयाशीं विशेष संबंध नाहीं. परंतु हैदराच्या मृत्यूनंतर तंजावर प्रांतास परशत्रूकडून फारशी पीडा झाली नाहीं, एवढें येथें नमूद करण्यास हरकत नाहीं. असो.

तुळाजी राजे यांनीं इंग्रजांच्या मदतीनें मरेपर्यंत राज्यकारभार चालविला. ते इ. स. १७८७ मध्यें मृत्यु पावले. त्यांस मोहनाबाईसाहेब, राजसबाईसाहेब आणि राजकुंवरबाईसाहेब अशा तीन स्त्रिया होत्या. ह्यांपैकीं पहिली स्त्री इ. स. १७७६ मध्यें मृत्यु पावली, व दुसऱ्या दोघींस पुत्रसंतान झालें नाहीं. सबब त्यांनीं सुलक्षणाबाई व मोहनाबाई अशा दोन नवीन बायका केल्या. त्यांपैकीं मोहनाबाईसाहेबांस एक पुत्र झाला. त्याचें नांव 'अबदुल प्रतापराव' (!) असें होतें. तो सहा वर्षांचा होऊन मृत्यु पावला. शेवटीं तुळाजी राजे ह्यांस पुत्रसंतती नस-

* तंजावरचा माहितगार रे० स्वार्झ साहेब लिहितोः— "In the year 1773 the Nawab found means to usurp the Tanjore countıy, which he received by inhuman exactions."

त्यामुळें त्यांनीं मरणाचे पूर्वीं, भोंसल्यांचे मूळपुरुष मालोजी राजे ह्यांचा बंधु विठोजी राजे यांचे वंशांतील एक पुत्र दत्तक घेतला, व त्याचें शरफोजी असें नामाभिधान ठेवून त्यांस तंजावरच्या गादीचा वारस केलें. हें दत्तविधान राजे तुळाजी ह्यांनीं तंजावरचे रेसिडेंट व तेथील मिशनरी रे० स्वार्झ ह्यांच्या संमतीनें करून, मि० स्वार्झ ह्यांस ह्या मुलाचें उत्तम रीतीनें पालग्रहण करावें असें सांगितलें. नंतर तुळाजी राजे ह्यांनीं परलोकवास केला.

तंजावरच्या तुळाजी राजास अमरसिंग या नांवाचा सापत्न बंधु होता. त्यानें हें शरफोजीचें दत्तविधान अशास्त्र आहे व आपण गादीचे रास्त वारस आहों, असें मद्रासचे गव्हरनर सर आर्चिबाल्ड क्यांबेल ह्यांस कळविलें. तेव्हां त्यांनीं विशेष वाद न करितां, अमरसिंग राजे ह्यांच्या बरोबर नवीन तह करून, त्यांस तंजावरच्या गादीचे अधिपति नेमिलें. हेच पुढें 'अमरसिंग महाराज' ह्या नांवानें प्रसिद्ध झाले. ह्यांच्या कारकीर्दींत शरफोजीच्या दत्तविधानाचा वादग्रस्त प्रश्न पुनः उत्पन्न होऊन अखेर त्यांस इ. स. १७९८ मध्यें पदच्युत व्हावें लागलें. तो वृत्तांत पुढील भागांत सादर करण्यांत येईल.

# भाग १० वा.

## राजे अमरसिंह ह्यांची कारकीर्द.

इ. स. १७८७ मध्यें तंजावरचे तुळाजी राजे मृत्यु पावल्यानंतर त्यांचे सापत्न बंधु अमरसिंह राजे हे तंजावरच्या गादीवर आपला हक्क सांगण्यास सिद्ध होऊन, ते तंजावर येथें येऊन दाखल झाले. तुळाजीराजे यांनीं भोंसल्याच्या कुळांतील सरफोजी नामक एका मुलास दत्तक घेऊन, त्यास तंजावरच्या गादीचा अधिपति करावें ह्मणून तंजावरचे रेसिडेंट मि० मॅक्लोड यांच्या मार्फत व्यवस्था केली व तेथील डेनिश मिशनरी मि० स्वार्त्झ यानें त्याचें पालग्रहण करावें, असें ठरविलें. ही हकीकत मागील भागांत निवेदन केलीच आहे. तुळाजी राजे मृत्यु पावल्याचें वर्तमान प्रसिद्ध होतांच, अमरसिंह राजे यांनीं तंजावरास येऊन व दत्तकपुत्र सरफोजी ह्यांस आपल्या ताब्यांत घेऊन, तुळाजी राजे यांची उत्तरक्रिया योग्य प्रकारें केली. आणि मद्रास येथील गव्हर्नर सर आर्चिबाल्ड कॅम्बेल यांसीं पत्रव्यवहार करून गादीचे खरे वारस आपण आहोंत आणि सरफोजीचें दत्तविधान अशास्त्र आहे, असें सिद्ध करून, दाखविण्याचा प्रयत्न केला. सर आर्चिबाल्ड कॅम्बेल यांनीं तंजावरास येऊन चौकशी केली व कांहीं विद्वान् पंडितांच्या साक्षी घेऊन अमरसिंह राजे ह्यांस तंजावरच्या गादीवर बसविण्याचा ठराव केला. या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीस विशेष वादविवादांत न पडतां तंजावर येथें शांतता राखणें राजकीय दृष्ट्या इष्ट होतें, ह्मणून त्यांनीं अमरसिंह राजे यांजबरोबर नवीन तह करून तंजावरचें राज्य त्याच्या स्वाधीन केलें. हा तह फार महत्त्वाचा असून त्या योगानें तंजावरचें राज्य बहुतेक ईस्ट इंडिया कंपनीच्या ताब्यांत आलें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या तहामध्यें जीं मुख्य कलमें होतीं, त्यांचा सारांश येणेंप्रमाणें:—

१. परस्परांनीं परस्परांचे शत्रु व मित्र यांस शत्रु व मित्र या नात्यानें वागवावें.

२. तंजावरच्या राजानें दरसाल चार लाख होन ( Star Pagodas ) ह्मणजे चवदा लाख रुपये तंजावरच्या संरक्षणार्थ ठेवलेल्या इंग्रजी सैन्याच्या खर्चासाठीं दरसाल किस्तबंदीनें देत जावें.

३. सदरहू चार लाख होनांची रक्कम, तंजावरचा वार्षिक वसूल दहा लाख



**तंजावरचे शेवटचे राजे शिवाजीमहाराज.**

[ कारकीर्द इ. स. १८२४—इ. स. १८५५. ]

होन होईल असें सरासरीचें प्रमाण घेऊन ठरविली आहे, तथापि वसुलाचें प्रमाण अधिक वाढलें तर त्या मानानें ही खर्चाची रक्कम अधिक द्यावी.

४. चार लाख होनांची हप्तेबंदीची रक्कम देण्यांत कसूर झाली, तर कंपनीनें तंजावर प्रांतांत प्रवेश करून आपल्या अधिकारानें वसूल करून घ्यावा.

५. अशा प्रसंगीं राजाचे अधिकारी व अंमलदार लोक हे कंपनीच्या इच्छेप्रमाणें वागून सुरळीत वसूल करून देतील. जर त्यांनीं हयगय केली तर कंपनीनें त्यांस कामावरून बडतर्फ करून त्या जागीं दुसरे लोक नेमावे.

६. कलम ४ व ५ प्रमाणें हप्तेबंदीच्या वसुलासाठीं ज्या वेळीं कंपनीस आपला अधिकार चालविण्याची गरज पडेल, त्या वेळीं तो अधिकार चालवितांना तंजावरच्या राजाच्या राज्यव्यवस्थेंत किंवा राजकीय मानमरातबांत ढवळाढवळ केली जाणार नाहीं.

७. कर्नाटक प्रांतामध्यें किंवा तंजावर संस्थानांत किंवा कारोमांडल किनाऱ्यावर लढाई सुरू झाली, तर तिच्या बद्दलची सर्व जबाबदारी कंपनीवर राहून, ती लढाई चालू असेपर्यंत, कर्नाटकांतील वसुलाचा $\frac{४}{५}$ भाग प्रतिवर्षीं लष्करी खर्चाकडे देण्यांत येईल.

८. त्याचप्रमाणें कर्नाटकांत अथवा कारोमांडल किनाऱ्यावर लढाई उद्भवली तर तंजावरच्या राजानें आपल्या राज्याच्या वसुलाचा $\frac{४}{५}$ भाग कंपनीस द्यावा.

९. तंजावरच्या राजाकडे कर्नाटकच्या नबाबाच्या पेशकशीबद्दलची मागील बाकी इ. स. १७७६ सालापासून इ. स. १७८७ पर्यंत १२,५७,१४२ होन निघत आहे. त्याचप्रमाणें ब्रिटिश प्रजेच्या देण्याची बाकी चार लाख रुपये आहे. त्याबद्दल दरसाल तीन लाख होन नबाब व सावकार यांना मिळून देण्यांत येतील व त्याबद्दलची जबाबदारी कंपनी आपल्याकडे घेईल.

याप्रमाणें ता. १० एप्रिल इ. स. १७८७ रोजीं राजे अमरसिंह यांच्या बरोबर तह होऊन मद्रासच्या गव्हर्नरच्या संमतीनें तंजावरचें राज्यपद त्यांस देण्यांत आलें. राजे अमरसिंह यांनीं गादीवर येतांच, कैलासवासी तुळाजी राजे यांच्या विधवा राण्या व दत्तकपुत्र सरफोजी ह्यांसीं सलोख्यानें वागून, त्यांचें प्रेम संपादन न करितां, त्यांचा छळ करण्यास प्रारंभ केला; आणि पूर्वींच्या धर्मभोळ्या समजुतींप्रमाणें मंत्रतंत्रावर विश्वास ठेवून मांत्रिकांच्या साह्यानें त्यांच्यावर अनेक प्रयोग चालविले. त्यामुळें गृहकलह उत्पन्न होऊन तंजावरच्या राजघराण्यांत अप्रेम व द्वेषबुद्धि ह्यांचें बीजारोपण झालें, व त्याचा परिणाम राजे अमरसिंह ह्यांस पुढें थोड्याच दिवसांत अनुभवास आला.

राजे अमरसिंह हे स्वच्छंदी व गर्विष्ठ स्वभावाचे होते. त्यांचें स्वातंत्र्य इ.स. १७८७ च्या तहानें बहुतेक संपुष्टांत आलें होतें. तथापि त्यांनीं पुणें येथील पेशव्यांकडे आपले मुत्सद्दी व वकील पाठवून, पेशव्यांच्या मार्फत इंग्रजांकडून तहाच्या कडक अटी कमी करण्याचा प्रयत्न केला, असें स्पष्ट दिसून येतें. अमरसिंह राजे यांनीं या संबंधानें पेशव्यांस लिहिलेली यादी आह्मांस उपलब्ध झाली आहे, ती येणेंप्रमाणेंः–

श्री.

"यादी चंदावर संस्थानचे प्रसंगाविषयीं इंग्रेजांसीं जबाबस्वाल करून वारून घ्यावयाच्या बाबतीः—

१. लाड पिकट विलायतेहून आल्यानंतर तुळजा महाराजास पट्टाभिषेक करून, कुंपणीची कितीक फौज किल्लयाचे व मुलकाचे संरक्षणार्थ ठेवावी, त्याचे खर्चास दरसालास फुली चार लाख होन संस्थानींतून देत यावे, ह्मणोन करार जाहला होता. त्याप्रमाणें सालदरसाल पैके पोहोंचवीत आलों. ऐसें असतां चेनापट्टणचे गौरनरांनीं कुंपणीस कांहीं जहागीर द्यावी ह्मणोन अपेक्षा केल्यावरून, नागूर बंदर व कांहीं मुलूख मिळून अडीच लाख रुपयांची जहागीर तुळजा महाराजांनीं कुंपनीस दिल्ही. याशिवाय इंग्रेजांस व फरासिसांस समाधान होतांना तंजाऊरचे मुलुकांत लाख रुपयांची जहागीर फरासीसांस द्यावी ह्मणोन वारावारी होऊन, विलायतेहून हुकूम आल्यावरून चिनापट्टणचे पहिले गव्हर्नर लार्ड मॅकर्टीन यांनीं सदरहूप्रमाणें जहागीर द्यावी ह्मणोन दरखास्त केल्यावरून, इंग्रेजी कुंपणीचे दोस्तीवरी दृष्ट देऊन देऊन, त्यांचे खुषीकरितां फरासीसास द्यावयानिमित्य एक लाख खर्चायाची जहागीर तुळजा महाराजांनीं दिल्ही. चंदावर संस्थानचा मुलूख सर्वस्वी आमचे स्वाधीन असल्यास, कुंपनीस दरसालास च्यार लाख होनप्रमाणें द्यावे ह्मणोन करार आहे. त्यांपैकीं कितीएक मुलूख बतरीक जहागीर घेतल्यावरून, दरसालास द्यावयाचे चारी लाख होनांपैकीं सदरहू दोन जहागीरेबाबत ऐवज मुजरा द्यावा ह्मणोन अनेक दफे विलायतीस लिहिल्यावरून कुंपनीवाल्यांनीं न्यायतः दरयाफ्त करून, चार लाख होनांपैकीं पन्नास हजार होन ढकलून (?) इतःपर कधींही दरसालास तीन लाख पन्नास हजार होन चंदावर संस्थानींतून घेत यावे ह्मणोन विलायतींत फैसला पावून, येणेंप्रमाणें चिनापट्टणचे गौरनरासही हुकूम सादर जाहला आहे. या फैसल्यास कधींही अंतर न पडतां, तीन लाख पन्नास हजार होनांशिवाय जास्ती कांहीं घेईनासे इंग्रेजांसीं जबाबस्वाल करून, याप्रमाणें करारमदारही

व्हावें. त्यावरी कुंपणीचे पैके बाकीटाकीनिसीं झाडीयांनसीं वायदेप्रमाणें कुंपणीस पावते करितों. कलम.

२. याशिवाय नबाब महमदअल्लीखानास दरसालास चारी लाख रुपये पेशकश द्यावयाचा करार आहे. त्याप्रमाणें चालती पेशकश सालदरसाल कुंपणीस पावते करावेयासी कबूल आहों.

३. याशिवाय तुळजामहाराजांनीं फिरंगी लोकांकडून कर्ज घेतलें होतें. त्यास पैके पावले नाहींत. त्यावरून फिरंग्यांनीं विलायतींत फिर्यादी केल्यावरून कर्ज घेतलें. पैके देऊन सर्व एकच दर्फे द्यावयासी संस्थानीं निर्वाह नाहीं. त्याकरितां दरसालास ऐशीं हजार होनप्रमाणें कर्जदारांस देत यावें ह्मणोन गौरनर केमलाचे दिवसांत जाहल्या करारनाम्यांत लिहिलें आहे. ऐशीं हजार होन प्रमाणें कर्जदारास दरसाल द्यावयासी शक्ति नाहीं. ऐसीयासी कर्जदारानिमित्य आह्मांकडून दरसालास पन्नास अथवा साठ हजार होन द्यावयासी कबूल आहों.

४. तुळजा महाराजास लॉर्ड पिकटांनीं पट्टाभिषेक केल्यानंतर आमचे इलाकेचे मुलुकापैकीं अरणी व हणमंतगुडी हे दोन्ही तालुके नबाब महमदअल्लीखानाकडून दिल्हे नाहींत. त्याकरितां नबाबांची पेशकसी दिली नाहीं. सदरहू दोन्ही तालुके आमचे आह्मांस सोडवून दिल्यास, दरसालास पेशकसीबाबत चारी लाख रुपये देत येऊं, नाहींतरी देणार नाहीं, ह्मणोन तुळजा महाराजांहीं विलायतीचे कुंपणीवाल्यास अनेकदर्फे लिहिलें होतें. त्यासी त्वरेनें वारावारी न करितां, आळसावरी घालून, तदनंतर गौरनर केमल चिन्नापट्टणांत अधिकार करीत असतां, विलायेतीहून काय हुकूम आला कीं कळेना. तुळजामहाराजांचा काळ जाहल्यानंतर चंदावरास गौरनर मजकूर येऊन आह्मांस पट्टाभिषेक करीत ना. लार्ड पिकटानें तुळजामहाराजांस पट्टाभिषेक केल्यापासून महमदअल्लीखानाची पेशकशी किती सालची देणें बाकी होती, त्याचा हिशेब करून, त्यापैकीं दरसालास एक लाख चुंगडी हजार होन द्यावेसें हट्ट धरून, जोरावारीनें आह्मांकडून करारमदार करून घेतले असतां, आमचे दोन तालुके महमदअल्लीखानांनीं हाताखालें ठेऊन पैकीं वसूल करीत आले. करितां पेशकशीनें आमचे संस्थानींतून दिल्हे नाहींत. मागील बाकीचे पैके द्यावयासी शक्ति नाहीं. त्याकरितां इंग्रेजांसीं जबाबस्वाल करून, महमदअल्लीखानास बाकी देणें आहे ते पेशकशीचे पैके आह्मांकडून न घेत, असा फैसला करावा.

५. इंग्रेजांस व आणखी कोण्ही जातवाल्यास, मसलतीचा प्रसंग पडल्यास, कुंपणीचे तर्फेनें आमचे संस्थानीं एक कारकून ठेऊन, मुलखांत जाहल्या वसु-

लाचे पांच हिस्से करून, मसलती वारे पावेतों चारी हिस्से कुंपणीस द्यावे व आमचे खर्चास एक हिस्सा द्यावा. मसलती वारल्यानंतर, मसलतीकारणें फौजेच्या खर्चास लागल्या खर्चाबाबत, खर्च फरीद होतपावेतों, आमचे मुलुखाचे महसुलापैकीं कुंपणीस च्यारी हिस्से आह्मीं देत यावे, ह्मणोन गौरनर केमलाचे दिवसांत जाहल्या करारनाम्यांत लिहिलें आहे. आह्मांस व इतर जातवाल्यांस संबंध नाहीं. त्याकरितां मसलतीचा प्रसंग कांहीं व्हावयासी .... .... ....दिल्ही. हरएक मसलतीचे समयीं कुंपणीवाले जे जे मुलूक घेतात, त्यापैकीं हो, अथवा लुटींत हो, आह्मांस एके तृणाची आशा नाहीं व प्राप्तीही नाहीं. त्याकरितां आह्मांस कांहींच नफा नसतां, व्यर्थ नष्टीस मात्र आह्मीं पात्र होणें न्याय नाहीं. ऐसीयासीं इंग्रेजांसीं जाबस्वाल करून, मसलतीचे वेळेस, मसलती वारल्यानंतरही, मुलुकाचे वसुलांत चारी हिस्से पांच हिस्से ह्मणून वाटावाटी न करितां, इतःपर जो तह ठरेल त्याप्रमाणें पैके घेत येतील, अशी बंदोबस्ती करून द्यावी.

६. तीन वर्षां चार वर्षां, एकदा नूतन गौरनर विलायतींहून यावयाचा दंडक आहे. कुंपणीवाल्याची दया संपादावी ह्मणोन गौरनराचे चित्तीं असल्यास कुंपणीचे इलाकेंत कोणकोण आहेत त्यावर जास्ती ओझें घालून, जोरावारीनें पैकेही जास्त वसूल करून, कुंपणीस या प्रकारेंकडून नफा होईलसें केलें ह्मणोन विलायतीस लिहितातीः एखादे गौरनराचे चित्तीं कुंपणीस नफा न करितां, स्वकार्यावरील अपेक्षा असलिया, आपल्या गरजानिमित्य दबावणी देऊन कामाची खराबी करितातीः त्याकरितां आह्मांस कांहीं संकट प्राप्त होईनासें असावयाजोगें त्यास कांहीं देऊं करून हाताखालें घेऊन, कार्याची अनुकूलता होई जैसें करून घ्यावें लागतें. केव्हांही ऐसें संकटांत पडून नानाविधेंकरून बहुत श्रम पावतों. इतःपर ऐसें संकट प्राप्त होईनासें एक तह ठरावानें करणें ह्मणजे कुंपणीस दरसालास अमका ऐवज व जबाबाची पेशकसी अमकी ह्मणून प्रत्येक प्रत्येक आह्मांकडून घेईनासें दरसालास बिलमख्त अमके पैके आह्मीं कुंपणीस देत यावे ह्मणून वारावारी जाहली असल्या फार बरें. सदरहू कार्य श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे मध्यस्तीनें अथवा कुंपणीचे आज्ञेवरून फैसला पावला तरी, चेनापट्टणचे गौरनर कौंसील कुंपणी आज्ञेशिवाय त्यांचे इच्छेनुसार हरएक काम करूं सकणार नाहींत. त्याकरितां श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे मध्यस्तीनेंच या प्रकारें फैसला पावावा ह्मणोन आमचें मानस फार आहे.

७. या देशांत इंग्रेजांची प्राबल्यता जाहलीया अगोदरी, नबाब महमदअल्लीखानाचे इलाकेंत आह्मी होतों. अरकाटचे सुभेदार, नबाब निजामनमुल्क याचे



**श्री० महाराणी कामाक्षीबाईसाहेब.**

[ तंजावरचे शेवटचे राजे शिवाजीमहाराज ह्यांच्या पत्नी. ]

आलीं आहेत कीं, कच्चे आकाराचा हिसा द्यावा. येथें कमपेष करून ठराव कमाविसदाराचे लिहिणेवरून करावा तर, येथें असमंजस कारभार आहे ह्मणोन जाबसाल होत नाहीं. कलम १.

नवाबाकडून वकील, आबाराव करमाळेकर राजश्री पाटीलबावांजवळ आहेत. त्यांचे तर्फेनें कारकून दिल्लीस पातशाहाकडे नजर गुजरण्यास गेले होते. ते फिरून जाब घेऊन माघारे महेश्वरीं येऊन भागानगरास गेले. त्यांचे जबानीचें वर्तमान, नवाबाकडून अशरेफी पांच हजार नजर केली. शिवाय जवाहीर, हत्ती, घोडे, वस्त्रें, देऊन त्यांनीं नवाबास वस्त्रें देऊन बिदा केलें. तेथें शहाजी नामें पीरजादा आहेत, ते सारें कामकाज करितात. परवानगी रसानगी, बावांपासोन फर्द दसकत होऊन जाईल, त्याप्रमाणें तेथें अमलांत येईल. याप्रमाणें बंदोबस्त पाटीलबावांचा तेथें आहे. कलम १.

राजश्री मल्हारराव सोमवंशी सितुराव यांचा मोकासा चांदवडचा आहे. त्याजविषयीं त्यांजकडून कारकून व पत्रें सरकारचीं व मल्हारराव सोमवंशी यांचीं घेऊन आले आहेत. त्यास दोन महिने जाले आहेत. त्याचा जाबसाल वाजवी असतां निकाल करून देत नाहींत. वाजवी गैरवाजवी मनास आणून निर्गम होत नाहीं; असा प्रकार आहे. अखत्यार एकाचा नाहीं. बहुनायकी जाली आहे. कलम १.

सेवकाचे खर्चाविषयीं विनंति करावी, त्यास स्वामी कृपा करून समाचार घेणार आपण धणी आहेत. कलम १.

एकूण सात कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३४.

श्री. १९ दिसेंबर इ. स. १७९१.

" सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र ५ व चंद्र ७ व चंद्र १२ माहे मिनहूस विनंतिपत्रें सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यावरून येथील वृत्त श्रवण जालें असेल. त्याउपर इकडील वर्तमानः–बाईनीं राजश्री सुभेदार यांस निकडीनें बोलाऊन पाठविलें होतें. पय दर पय पांच सात पत्रें पाठविलीं होतीं. त्यास यशवंतराव फणशे व सौभाग्यवती मुक्ताबाई यांचें वर्तमान तेथें केलियावर, समाधानाचें पत्र बाई यांस लिहून पाठविलें; आणि आज्ञेप्रमाणें मीही लौकर येतों ह्मणोन, काल चंद्र २० रविलाखरीं पत्रें आलीं. फणशे यांजकडील धर्म, क्रिया केली ते समयीं

जाला. दोन हत्ती जुन्नरकर ब्राह्मणांस दिले. दक्षणा दोन हजार एक एकास, वगैरे साहित्य दोन हत्तींवर व ब्राह्मणांस शिरपेंच व कुडक्या, पवित्रें दिधलीं. दोन घोडे खाशाचे स्वारीचे चांगले दोघां ब्राह्मणांस दिल्हे. त्यांजवर उभयतां मिळोन वित्त, सहस्र रुपयांचें दक्षणेसुद्धां दिल्हें. एक पालखी व एक शय्या दिधली. त्याजवर उभयतांस पांचा सहस्रांचें वित्त दिल्हें. किरकोळ दानें व भूयसी, सारा आकार पन्नास सहस्रपर्यंत धर्म जाला. वाडे दोन नवे बांधले, ते ब्राह्मणांस देणार. वेदशास्त्रसंपन्न राजश्री खंडऋषि कायगांवकर यांजला वेरूळ परगणीयाचा एक गांव बाराशां रुपयांचा व जामगांवांत जमीन साठ बिघे, नवी विहीर बांधून पांच सहस्र रुपये विहिरीस लाविले त्यासुद्धां देऊन, पांच सहस्र रुपयांचें वित्त व नक्त मिळोन दिलें. पुढें द्रव्य श्रीस व क्षेत्रोक्षेत्रीं पाठवावयाचे तजवीज करीत आहेत. तूर्त पंधरा दिवस जाले नवा कारभार कांहीं नाहीं. कमाविसदार जमा आहेत. कोणाचा जाबसाल पार पडून निर्गम जाला नाहीं. उदासवृत्ति धरली आहे. राजश्री सुभेदार आल्यावर काय निश्चय होईल तो पहावा. तोंवर कांहीं कामकाजें होत नाहींत. सौभाग्यवती रखमाबाई होळकर जामेच्या घाटास येऊन राहेली. राजश्री बाळाजी लक्ष्मण दिवाण येथें येऊन रदबदली केली. त्यास येऊं द्यावें परंतु, मर्जीस आलें नाहीं. राजश्री संताजी होळकर यांस मागती पाठवून, त्यांस माघारे इंदुरास वाटें लाविलें. रखमाबाई फार खिन्न जाली. माघारे परंतु न गेली. असा निग्रह तिचे ठिकाणीं. कारण, पूर्वीं गतवर्षीं धोंडिबा फणशे मृत्यु पावले त्या समयीं सौभाग्यवती रखमाबाई आली नाहीं. आतां सर्वस्वनाश जाला ह्मणोन संतोष मानून येत आहे, तर मी तोंड पहात नाहीं. अशीं भाषणें सांगून पाठवून माघारे फिरविली. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३५.

पो। छ २० रजब सन इसने तिसेन **श्री.** ४ मार्च इ. स. १७९२.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १० माहे रजबपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ १ रजबचीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्याअलीकडील वर्तमानः— राजश्री पाटीलबावा इकडे न येतां, परभारें पानीच्या घाटानें नर्मदा उतरून पिंपळोदास छ ७ रजबीं आले, ह्मणोन वर्तमान. येथून बाईनीं नारो विश्वनाथ पाठविले होते, ते माघारे आले. त्यांचें दर्शन मात्र जालें. बोलणें जालें नाहीं. पाटीलबावा या घाटानें आले नाहींत. याचें कारण, रघू

खिजमतगार त्यांचा आहे, त्याची वस्तभाव बैल व ह्मशी जांबेच्या घाटानें आल्या. त्याजपासोन ·शें दोनशें रुपये हशिलाचे घेतले. त्याजकडून कोणी भला माणूस बाई यांजकडे आला होता कीं, हशील माफ करावा. यांणीं ऐकिलें नाहीं. हें वर्तमान रघू खिजमतगार यांणीं बावांस सांगितलें. त्याजवरून बावांनीं घाट नवाच उत्पन्न करून, तोच घाट चालवावा, असेंही वर्तमान ऐकिलें. नेमावर महाल समाईक होळकर शिंदे यांजकडे. त्यास भुम्याची जागा, महाल मोठा. त्याच जाग्यापैकीं सत्वास जागा उजाड बहुत दिवस पडली होती. तेथें ठाणें बाईनीं ठेऊन, त्या परगणीयांची लावणी दोन्हींकडील मामलेदार करीत होते. सत्वास तेथें निमें ठाणें बावांचें असावें. तें ठाणें हें ठेऊं न देत. ह्मणत कीं, खर्च पडला तो देणें. असेंच एक वर्ष लोटलें. सांप्रत बावा त्याच मार्गें आले. त्यांनीं ते जागा खालीं करून घेतली. त्याचे बदला दुसरें स्थल यांस लावून दिल्हें, ह्मणोन वर्तमान आलें. त्यावरून येथेंही श्रमीच आहेत. कलम १.

राजश्री सुभेदार जयपूर प्रांतींहून निघोन टोंकेकडे आले. एक दोन गढ्या घेतल्या. पुढें दोन गढ्या मातबर आहेत, त्यांस मोर्चे लावणार. त्या फत्ते जाल्यावर कोट्याकडून लौकरच येतात, ह्मणोन वर्तमान आलें. कलम १.

राजश्री बापुजी होळकर व जयनगरकर खुशाली राम बोहरा, उभयतां एकत्र होऊन माचेहेडीकडे गेले. मध्यें एक गढी चांगली, तेथें ठाणें रावराजांकडील होतें. त्यास एक दिवस गोळागोळी होऊन, दुसरे दिवशीं हल्ला करून, तें स्थल घेतलें, ह्मणून वर्तमान आलें. कलम १.

डाक येथें उज्जनीपावेतों होती, ते कासद उठवून नेले. ब-हाणपुरीं राजेश्री विठल त्रिंबक कारकून आहेत. तेथें कागद पावते करितों. मजपाशीं एक जोडी आहे. कलम १.

राजश्री आनंदराव गंगाधर यांचा लाखोटा एक आला आहे, तो सेवेसीं पाठविला असे. कलम १.

महेश्वरचे धोतरजोडे चांगले पूर्वीं पाठविले, त्या पद्धतीचे करून पाठविणें ह्मणोन आज्ञा जाली. त्यावरून कांठकिनारा गुदस्तांप्रमाणेंच करविले. तूर्त पांच धोतरजोडे करविले आहेत. त्याच पद्धतीचे कांठ करावे किंवा दुसरे त-हेचे, याची आज्ञा सेवकास जालीयाप्रमाणें करून पाठवितों. कलम १.

एकूण कलमें सहा असेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २३६.

श्री. १२ एप्रील इ. स. १७९२.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १९ माहे साबानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ २७ रजबचें आज्ञापत्र सादर जालें, तें छ १२ माहे मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, राजश्री हरीपंततात्या व नबाबाचे पुत्र पोलादजंग व इंग्रज मिळोन फौजेसुद्धां पट्टणानजीक तीन कोसांवर गेले. तेथून इंग्रजांनीं सडी पंधरा पलटणें घेऊन, पुढें चालून गेले. टिपूची व इंग्रजांची लढाई सुरू जाली, ती दुसरे दिवशीं प्रहर दिवसपर्यंत होत होती. दोन्हींकडील माणूस ठार व जखमी तीन चार हजार जाले. इतक्यांत सरकारची व नवाबाकडील फौज जाऊन पोंहोचली. टिपू हटून माघारा गेला. नंतर टिपूनें सलूखाचा पैगाम लावून वकील पाठविले. त्यांसीं बोलणें होऊन, तहाचा जाबसाल ठरला. टिपूकडील मुलुखांपैकीं निमे मुलूख व तीन करोड रुपये तिन्ही सरकारांस द्यावे. याप्रमाणें ठरोन सदरहू जाबसालाचा फडशा होय तोंपर्यंत टिपूचे दोघे पुत्र ओलीस आले. येऊन भेटले. येविशींचे वर्तमानाचीं पत्रें गंगाजलनिर्मळ अहल्याबाई होळकर यांस पाठविलीं आहेत. तीं प्रविष्ट करून उत्तरें घेऊन पाठवावीं ह्मणोन आज्ञा. हें वर्तमान श्रवण होऊन परम संतोष जाला. स्वामींस मोठें यश या मसलतीचें आलें. मसलत बहुत पेंचाची होती. परंतु पुण्यप्रतापेंकरून निर्गम जाला, त्याप्रमाणें अमलांत येईल. आज्ञेप्रमाणें पत्रें बाई यांस प्रविष्ट करून, त्यांचे जाब घेऊन पाठविले आहेत. राजश्री सुभेदार यांचे नांवें लाखोटे दोन व राजश्री आनंदराव गंगाधर यांचा लाखोटा एक, एकूण तीन लाखोटे छ १२ साबानीं पावतांच, त्यांजकडील डांक आहे, त्या डांकेसमागमें त्यांजकडे रवाना केले. ते आनंदराव गंगाधर यांजपाशीं पावतील. ते प्रविष्ट करून उत्तर घेऊन पाठवितील. त्यांस मीं पत्र लिहिलें आहे. तेथील उत्तरें आलीं ह्मणजे सेवेसीं रवाना करून देऊं. येथें डांक सरकारची नाहीं, व जासूदजोड्या आह्मांपाशीं नाहींत. एक जोडी आहे. बातमी आनंदराव यांजकडील येते. लाखोटे जमा जाले ते हल्लीं दोन लाखोटे पाठविले आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३७.

श्री. २५ एप्रील इ. स. १७९२.

"सेवेसीं केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ रमजानपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– गुजराथप्रांतीं

जुनागडाकडील मजकूर ऐसाजेः—गड मजकूर येथील सुभा अविंध. त्याचा दिवाण आमरजी मेहता याचा व सुभा मजकूर, उभयतांचा कलह होऊन बेबनाव जाला. नंतर आमरजी मेहता दंगा करून मारिला. हल्लीं आमरजी मेहता याचा भाऊ दुल्लभजी व गोविंदजी मेहेते हे उभयतां आहेत. ते कारभार टाकून तीन वर्षें घरीं बसले. तों संस्थानांत दंगा होऊन किल्ले वगैरे येथें फितुर जाला. तेव्हां सुभ्यानें मेहतामजकूर याची समजावीष करून, मागतीं दिवाणगिरीचीं वस्त्रें देऊन, कारभारास लाविलें. संस्थानाचा बंदोबस्त, किल्ले वगैरे हस्तगत करून यथापूर्व केला. परंतु मेहतामजकूर याची खातरजमा सुभ्याकडून नाहीं. ह्मणून त्याचा मनोदय जे, श्रीमंतांचे सेवेसीं विनंति करून, सुभा आमदाबाद आपल्याकडे करून द्यावा. प्रस्तुत सुभे मजकूरचा आकार जो सरकारांत होत आहे त्याचा इस्तावा दरसाल करून, सहावे वर्षीं पन्नास लक्ष रुपये आकार करून सरकारांत द्यावा. याची निशा सावकारी करून द्यावी. येणेंप्रमाणें करार करीत आहे. गुजराथ प्रांतीं गाईकवाड यांचा पगडा विशेष. प्रांत मजकूरचा श्रम राखून सरकारांत माहितगिरी होऊं देत नाहींत. येणेंकरून सुभ्याचा परिश्रम पुढें होत नाहीं. परिश्रम केल्यास नानाप्रकारचे उपद्व्याप उभे करितात. ह्मणून दुल्लभजी मेहता याजकडेस सुभा जिंमेस जाल्यास कच्छ संस्थान, कांबे, काटे, कोळी वगैरे यांचें पारिपत्य होऊन, अंमल सुरळीत चालवावा. जुने किल्ले व नवे किल्ले सुटतील, त्यांत अंमल हुजूरचा. नेमणूक सरकारची. याचें कारण कीं, मेहता मजकूर परराज्यांतील राहणार. याजकडील किल्ल्याविषयीं सरकारांत खातरजमा पडणार नाहीं. ह्मणून, व मामलत जिंमेस करावयाविषयीं खातरजमा सरकारची पाहिजे. सबब त्यांचा भाऊ अथवा पुत्र पुण्यांत असावा. येणेंप्रमाणें करार करून साहेबचाकरीस उमेद्वार आहे. संस्थान खंबाईताचा उद्योग सरकार अंमल करावयाचा करील. कर्तेपणामुळें त्या प्रांतीं जरब सर्वांवर आहे. मशारनिल्हे सरकारचाकरीस बहुत उपयोगी आहे. एक आश्रय मात्र धन्याचा इच्छित आहे. दरबारखर्च जो लागेल, त्याची ही निशा, पत्रीं जैसी ठरेल तैसी करून देतील. दुल्लभजी मेहतांनीं पत्र मजला पाठविलें, तेंच बजिन्नस सेवेसीं पाठविलें आहे. मेहताचें बोलणें कीं, सरकार अंमलचा हुकूम व सनद माझे नांवें करून द्यावी. किल्लेदार सरकारचे व दरकदार सरकारचे. याप्रमाणें जालीयास अंमल सिंधपावतों करून देईन. बंदरें समुद्रतीरीचीं सर्व सरकारांत घेऊन देईन. याप्रमाणें त्याची निशा सावकारी मध्यस्थ देतात. भावनगरचें बंदर सरकारांत घेऊन देतात. खंबाइताचा सरकारांत अंमल करून देऊं, अशी त्यांची जबानी आहे. येविषयींचें बोलणें येथें गुजराथी

ब्राह्मण येऊन, पत्र आमचे नांवें आणिलें तें देऊन, ही जबानी त्यांणीं लिहून दिल्ही; त्यावरून सेवेसीं लिहिलें. याची खातरजमा सरकारांतून पाहिजे तशी करून घ्यावी. ते करून देतील. पत्राची अपेक्षा आहे. त्याचें कोणी बोलावयास येईल. गुजराथी ब्राह्मण येथें ठेऊन घेतला आहे. जैसी आज्ञा होईल तैसें त्यासीं बोलोन रवानगी करून देऊं. किल्लेजात जे येतील, त्याची रखवाली शिबंदी जे पडेल ते सरकारची व किल्ले आहेत सरकारांत, त्याची शिबंदी सरकारची. बाहेरील अंमल आमदाबादचा करावयास शिबंदी सा वर्षें जी पडेल, ती मेहतांनीं कबूल केली. सहा वर्षांत रुपये पन्नास लक्ष द्यावे. याप्रमाणें हामी निशा सावकारी देतात. घोगा बंदर सरकारचें आहे, तेथें माल वगैरे येत नाहीं. त्याची उजाडी करून भावनगर वस्ती केलें. घोगा बंदरचे सावकार, उदमी, कमाविसदार नाकाबिल; सबब येथून उठोन भावनगरास गेले. यास्तव मेहताकडे अंमल सांगितल्यास सारे मुलखाचा बंदोबस्त होऊन, सरकार अंमल चांगला आणि किफायत. यावर खावंदांची मर्जी. आज्ञापत्र येईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २३८.

श्री. १४ जून इ. स. १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजेः—जयपूरचा सलूख जाला ह्मणोन पूर्वीं लिहिलें होतें. सांप्रत ऐकिलें कीं, सलूख जाल्याप्रमाणें ऐवजाची सरबरा जाली नाहीं ह्मणोन जयपूरचे नजीक फौजा, खासेसुद्धां गेले आहेत. मारवाडचा राजा त्यांजकडे पातशाही आहिदी गेले आहेत. पंधराशें रुपये रोज, शिवाय खुराख घेतात. फौजसुद्धां चाकरीस येणें अशीं पत्रें पातशाहाचीं गेलीं आहेत. हें ऐकिलें तें सेवेसीं लिहिलें असे. विद्यार्णव संन्यासी येथून कुच करून गेले. बडोद्यास जाऊन चार मास राहणार. राजश्री खंडेराव हरी व आबाजी नाईक वानवळे लग्नासाठीं सुजालपुरीं येणार होते. परंतु त्यांचें येणें जालें नाहीं. आबाजी नाईकाचे चिरंजीवास खंडेराव हरीची भाची दिधली. उभयतांचीं कुटुंबें सुजालपुरीं आलीं आहेत. लग्न ज्येष्ठमासीं होणार. याप्रमाणें येथें मूळचिठ्या आल्या. सेवेसीं कळावें. राजश्री शिवाजी विठ्ठल यांजकडून अष्टे वगैरे महाल चार, राजश्री लक्ष्मुमणराव कृष्ण परांजपे यांजकडे होते, ते महाल चार, साला इजाफा पन्नास हजार रुपये

जास्ती करून, इजारा राजेश्री खंडेराव हरी यांणीं केला. वर्तमान ऐकिलें तें सेवेसीं लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय. मिती ज्येष्ठ शुद्ध ६ शुक्रवार हे विज्ञापना."

[ ह्याच पत्रासोबत पुढील यादी आहे. ]

यादी सावकाराकडे ऐवज येणें प्रो करार रुपये पांच लक्ष ५०००००
———पो नेमणूक जाली.

५०००० शार्गीद पेशाकडे प्रो नागोपंत.
५०००० फिरंगी मेस्तर बाईट व दुदरनेक.
५०००० कोटोल्याकडे होगाडे माहाजन यांजकडे.
५०००० किरकोळी बापु होळकर वगैरे.
१००००० पागेकडे बारगीर पोरगे वगैरे.
२००००० सिलेदाराकडे मो पाराजीपंत.
———
५०००००

---

## लेखांक २३९.

श्री. २६ जुलई इ. स. १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ माहे जिल्हेज शुक्रवारपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान, चंद्र ८ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलीं आहेत. त्याउपरी इकडील वर्तमान, राजश्री पाराशर दादाजी येथें चंद्र ७ मिनहूस मंगळवारीं आले. हें वर्तमान पेशजीं विनंतिपत्रीं लिहिलें आहे. अलीकडील वर्तमान येणेंप्रमाणें कलमें:—

चंद्र ८ रोज बुधवारीं बाई व पाराजीपंत व शिवाजी गोपाळ त्रिवर्ग खलबतींत बसून बोलणें जालें कीं, नारोपंतास जिवें मारलें हें काय? आह्मीं तुह्मांस कधीं लिहिलें कीं, त्याची अब्रू घ्यावी? असें नसतां, चांगलें माणूस पदरचें गमावलें. त्याचें उत्तर पाराशरपंत यांनीं दिल्हें कीं, या प्रयोजनांत मी नाहीं. पायांवर हात ठेवितों, मीं सुभेदारांस सांगितलें कीं, पंधरा लक्ष तुह्मीं घेतले; आणिख दहा पांच लक्ष देवितों, यास मुक्त करावें. न ऐकिलें. मग उपाय काय? दुसरें बोलणें, लढाईंत कमी बापू होळकर यांनीं केली, अपकीर्त जाली. तुह्मीं शहाणे असतां अशी गोष्ट कशी जाली? त्याचें उत्तर पाराजीपंतीं दिल्हें कीं, आह्मीं व बापूंनीं अंतर केलें नाहीं, वचनासही गुंतलों नाहींत. जें जालें तें मल्हारराव यांजकडून

कमी जाली. सलूख केला त्यांत उणी कोणती गोष्ट सरदारचे मर्जीस न येऊन, चिरंजिवाचे मसलतीवर हें काम केलें; तसें फळ प्राप्त. आह्मांकडे दोष ठेवणें हें ठीक नाहीं. चिरंजीव कोणतेही उपयोगीं नाहींत. याचा जाबताच असावा असें स्पष्ट सांगितलें, येणेंप्रमाणें. कलम १.

राजश्री व्यंकाजी रामचंद्र, त्याजकडे पागा बाईनीं सांगितली. तो गृहस्थ हजारांत एक. खरें तें खोटें करणार, खोटें तें खरें करणार. त्यास मसलतींत घेतात. त्याचे मार्फतीनें पत्रें राजश्री सदाशिव मल्हार यांजकडे जातात. नेहमीं कारकून उज्जनींत त्यांनीं ठेविला आहे. दिवाणगिरी अंताजी नागेश यांचे चिरंजिवास सांगावी. ते पैसाही देतील, दौलतीचा बंदोबस्तही करतील. मी राजश्री पाटीलबावांजवळ जाऊन तुमची त्यांची सफाई करून देतों ह्मणून बाईशीं बोलणें जालें. बाईनींही मान्य केलें. श्रीमंतांकडून सलूख करावा त्यापेक्षां, तो आपला भाऊ आहे, आपलें त्याचें एकचित्त असावें, परभारां करून घ्यावें, असें बोलणें पडतें. त्या मसलतींत बाजी व पाराशरपंतही घेतले आहेत. व्यंकाजी रामचंद्र यांची रवानगी पुण्यास करणार असें ऐकिलें, त्यावरून लिहिलें असे. कलम १.

चंद्र ९ रोज गुरुवारीं एकांतींचें बोलणें. त्यांतील अर्थ कीं, राजश्री सुभेदारांचें वृद्धपण, महेश्वरीं बोलाविलें पाहिजे. शरीरीं ज्वर येतो. आराम नाहीं. ह्मणून ग्रहाचें फळ कसें काय, हें पाहून तीन हजार रुपयांची चिटी व हत्ती वगैरे दानें करावीं ह्मणोन, व दुसरें बोलणें, फौज फार आहे त्यास पैसा पाहिजे. येणेंप्रमाणें:—

१ तीन लाख रुपये दर रोजमुऱ्यास पाहिजेत. चौदा रोजमुरे चढले. बेचाळीस लाख रुपये पाहिजेत तेव्हां समजावीस होईल. कलम १.
१ शिलेदार अठरा हजार आहेत. कलम १.
१ शागीर्दपेशा तीन हजार माणूस आहे. कलम १.
१ तोफखाना. कलम १.
१ पिलखाना व सुतरखाना व पागा वगैरे कलम १.
१ बारगीर तेहेत्तीशें आहेत. कलम १.
—
६

चार कारखानेसुद्धां रोजमुरा लागतो. त्याचें उत्तर बाईनीं केलें कीं, सरदारांनीं येथें येऊं नये. सलूख होय तोंपर्यंत इंदुरीं असावें. पैसा पाहिजे तर महालाचा

पैसा राहिला नाहीं. कर्ज कोणीही देत नाहींत. तत्रापि सलूख जाल्यावर सरदारांनीं येथें राहून, बापू होळकर यांनीं पागा व बारगीर घेऊन रामपुऱ्याकडे असावें; पैसा थोडा बहुत देईन ह्मणून बोलणें जालें. कलम १.

चंद्र १० ता। चंद्र १५ पावेतों आषाढी उत्सव. फारसें बोलणें जालें नाहीं. येथील मुत्सद्दी यांनी पाराजीपंतास मेजवानीस आरंभ केला, तो कालपर्यंत जाला. पाराशरपंत येथें राहतात, तूर्त जात नाहींत. दोन तीन लाख रुपये घेऊन जाणार. आपले मार्फतचें देणें घेणें उरकून मोकळें व्हावें या विचारांत आहेत. पुढें खटल्यांत पडूं नये, मोकळें असावें. मल्हारराव यांचा त्रास फार. त्याविषयीं वारंवार सांगणें पडतें कीं, तो शनिश्चर आहे, जाबत्यानें ठेवणें चांगलें आहे ह्मणून बोलणें. कलम १.

पूर्वीं सुभेदारांनीं पांडबा शेणवई यांस दिवाणगिरी सांगितली होती. त्यांचे चिरंजीव बडोद्यांत आहेत. त्यांचें नांव व्यंकाजी रामचंद्र, यांनीं घेतलें, त्यास रुकार बाईनीं दिल्हा. त्यांस पत्र पाठविलें आहे. त्याचे गळां माळ घालावी असा विचार आहे. कलम १.

एकूण कलमें पांच सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## लेखांक २४०.

श्री. २६ आगस्ट इ. स. १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १८ माहे मोहरमपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान चंद्र ९ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलीं आहेत. त्याउपरी इकडील वर्तमान कलमबंदी येणेंप्रमाणेः—

राजश्री सुभेदारांनीं पत्र बाईस पाठविलें कीं, माझें शरीर बहुत श्रमी. एक वेळ पाय आपले पहावे. माझे शरीराचा भरंवसा नाहीं. महिन्या दोन महिन्यांचा प्रांत दिसतो. याप्रमाणें पत्र आलें. तत्रापि परवानगी खचित नाहीं. वरपंगीं परवानगी. राजश्री आनंदराव होळकर यांजसमागमें सांगून पाठविलें होतें. त्याउपर असें पत्र आलें. कलम १.

राजश्री काशीराव होळकर यांस सरदारी द्यावी, बापू होळकर यास फौजेची बक्षीगिरी सांगावी, मल्हारराव यांस घरीं ठेवावें. असें मानस येथें मुख्याचें व पाराशर दादाजी यांचें आहे. याप्रमाणें करार करावे ह्मणून दादाजीस येथून पत्रें गेलीं आहेत, असें ऐकिलें, व सुभेदारांचें मानस कीं, सरदारी काशीबांस द्यावी.

परंतु लिहितां येत नाहीं. मल्हारराव यास लिहितां येत आहे, कारभार करील, कागदपत्र समजेल. बक्षीगिरी बापूस सांगणें, याप्रमाणें सरदारांचें मानस. परंतु पाराशरपंताचे मनास येत नाहीं. ह्मणतात कीं, मल्हारराव घरींच असावा. असें कोणतेही कारभारांत नसावें. असें जालें तर आह्मी स्वारीस जाऊं. नाहीं तर महेश्वरीं स्वस्थ बाईचे जवळ राहूं. येणेंप्रमाणें बोलणीं होतात. कलम १.

पन्नास हजार रुपये पाराजीपंत यांस दिल्हे होते. आणखी पन्नास हजार दिल्हे. एकूण एक लक्ष रुपये येथून दिल्हे. ते सरदारांचे मनास आले नाहींत. ऐवज आमचेकडे द्यावा, ते परभारें पाराशरपंताकडे दिल्हा ह्मणून पत्र आलें होतें. त्यावरून संशय जाला. ऐवज पाराजीपंतीं घेऊन आपले मार्फतीचे देणें घेणें करून, कांहीं ऐवज गोसावी यांस दिल्हा, कांहीं मुसा दुदरनेक फिरंगी यास दिल्हा. पुढें देण्यास रखणा पडला. याप्रमाणें कारभारी यांचें लक्ष आहे. कलम १.

सरकारचीं पत्रें गंगाजलनिर्मल अहल्याबाई यांस चंद्र २० जिलकादचीं आलीं, तीं चंद्र ४ जिल्हेजीं पावलीं होतीं. त्यांचे जाब त्यांनीं आतां दिल्हे, ते घेऊन पाठविले आहेत. कलम १.

नारो गणेश यांची सून येथें बाईनीं आणली, तीस ऋतु प्राप्त जाला. त्यामुळें त्यांचे चिरंजिवास बोलावूं पाठविलें आहे. येथें फलशोभनाचे साहित्यास चारशें रुपये दिले आहेत. ऋतुशांत येथेंच होईल. चिरंजीव दो चौ रोजांत येतील. कलम १.

राजश्री दादाजी गंगाधर यांनीं पांच लक्ष रुपये अंतस्थ व दरबारखर्च रुपये दोन लक्ष, एकूण सात लक्ष रुपये करार करून, सफाई राजश्री पाटीलबावांशीं केली. पुढें दिवाणगिरी त्यांचे विद्यमानें करून घ्यावी, असें वर्तमान येथें आलें. व्यंकाजी रामचंद्र यांनीं राजश्री बाळोबा पागनीस यांस पत्र लिहिलें होतें कीं, होळकरसंबंधीं बावांशीं बोलून सफाई करावी. त्याचें उत्तर, व्यंकाजी रामचंद्र यांस आलें कीं, आह्मी होळकराचें तेज सांगून बावांस दाबीत होतों. परंतु होळकरांकडील कारभारी येथें आहेत, त्यांनीं अंतस्थ ५ लक्ष रुपये कबूल करून सफाई केली. तेव्हां आह्मांस बावांनीं फजीत केलें कीं, तुह्मीं आमचें नुकसान करून होळकरांचें वर्णन करितां, हें काय? असें पत्र आलें. हेंही बाईस कळलें. त्यावरून येथील कारभारी यांस निषेध केला, असें वर्तमान ऐकिलें. दोन्हीं खरीं किंवा लटकीं ही बातमी बाईनीं काढावी. तें आंतून काय बोलणें असेल तें खरें. कलम १.

पिंढावे येथील खंडणी घेऊन, गोपाळराव रामपुऱ्यास गेले. तेथें लाख रुपये लाविले. पैकीं साठ हजार रुपये ठरविले. पन्नास हजार खंडणी व दहा

हजार रुपये दरबारखर्च, एकूण साठ हजार रुपये करार होऊन, ऐवज पटला ह्मणजे कूच होईल. अशीं पत्रें कमाविसदारांचीं आलीं. कलम १.

प्रतापगड देवळें संस्थान होळकरांचें. तेथील सालाबादी पस्तीस हजार रुपये खंडणी येणें. दोन सालां मिळून रुपये सत्तर हजार येणें. त्याची वरात सावकारास दिधली. पदमसी तिलोकसी यांनीं आपला गुमास्ता वसुलास पाठविला. ऐवज वायद्याप्रमाणें देत होते. दरम्यान बाळोजी इंगळे फौज घेऊन प्रतापगडास गेले. ते खंडणी मागतात. यांचे रुपयास अडथळा जाला. येथून मदत होत नाहीं. तेव्हां बाळोजी इंगळे लाख रुपये घेणार, ह्मणोन वर्तमान आलें. कलम १.

राजश्री देवराव हिंगणे मालेगांवास आले, तेथें शेगडीवर पडले. त्यानें आंग पोळलें ह्मणोन वर्तमान येथें आलें. त्यावरून बाई बोलली कीं, आतां कशास येतात? व्हावयाचें तें जालें. तेव्हां मीं उत्तर केलें कीं, सफाई जाली कीं काय? त्याचें उत्तर बाईनीं दिल्हें कीं, नवरा नवरी दोन्ही........चुकले. पुढें बोलावें तर दुसरीकडे बोलूं लागली. मग इतकेंच राहिलें. यांत काय अर्थ असेल तो न कळे. कलम १.

एकूण कलमें नऊ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४१.

श्री. ४ सप्टेंबर इ. स. १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २७ मोहरमपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः-इकडील वर्तमान छ १८ मोहरमीं विनंतिपत्रें लेहून सेवेसीं रवाना केलीं. त्यानंतर येथील वर्तमान येणेंप्रमाणें कलमबंदीः—

छ १९ मोहरमीं मंगळवारीं मुसा दुदरनेक फिरंगी व गोरे असामी दोन, एकूण तिघे गोरे, व जमादार असामी दाहा, यांची भेट जाली. खांसा, त्यानें नजर चार मोहोरा व शालजोडी ठेविली. दोन गोरे त्यांनीं एक मोहर ठेविली, व जमादार, त्यांनीं रुपये तेहेतीस ठेवले. एकून नजर सहा मोहोरा व रोख रुपये तेहेतीस ठेविले. नंतर भाषणें जालीं कीं, तुह्मीं लढाई चांगली केली. परंतु पाराजीपंतीं तुमची मदत न केली. त्याचें उत्तर मुसा दुदरनेक यांणीं केलें कीं, मदत त्यांनीं करावी तर हे जवळ नव्हते. आमच्या तोफा पांच सा, जवळ दारूगोळा होता तोंवर मार जाली. त्याचा सरंजाम भारी. यामुळें कमी पडली. आमचीं माणसें आठशें नउशें पडलीं. होणार तें जालें. पुढें बाईनीं उत्तर केलें कीं, जाली ती येत नाहीं.

आतां पैसा देणार मी आहें. तुह्मी हिंमत धरून बदला कराल तर चांगलें. त्याचें उत्तर मुसानें दिल्हें कीं, पाठीवर खावंद, करून घ्यावी. आह्मी चाकरी करूं. नंतर पान दान, अत्तर दान देऊन बिदा केलें. शंभर रुपये रोख मेजवानी पाठविली, व भोजनाचें साहित्य पांच कावडी भरुन पाठविल्या. पाराशर दादाजी, शिवबा बाजी वगैरे मंडळी होती, त्यांची तारीफच करीत होते. कलम १.

बाबाजी निंबाजी मुरादखानी, सुभेदाराजवळ होते. त्यांस बोलावून आणिलें. राजश्री बावांकडे पाठवावे, त्यांची रवानगी करावी, तों सफाईचें वर्तमान आलें; ह्मणोन राहिलें. कलम १.

राजश्री पाटीलबावांचीं पत्रें, राजश्री दादाजींनीं राजश्री गोपाळराव रघुनाथ यांस पाठविलें कीं, होळकरसंबंधीं कोठें महालास उपसर्ग देऊं नये, व ऐवज घेतला तो माघारा द्यावा. तें पत्र येथें आलें. त्यांणीं आपले कासिदासमागमें मुजरद गोपाळराव यांजकडे पाठविलें. आणि लिहिलें कीं, तुमचे धन्याचें पत्र तुह्मांस पाठविलें. याउपर महालास उपद्रव देऊन पैसा घेतला, तर तुह्मांस जाबसाल करावा लागेल. त्याचें उत्तर आलें नाहीं. कलम १.

येथें कारभारी पूर्वीं मुकुंदराव हरी होते. त्यांचे मसलतीवेगळें कांहीं होत नव्हतें. आतां भगवंतराव बल्लाळ निा दादाजी व बाळाजी कृष्ण निा जयराम रावजी हे मुख्यत्वें आहेत. शिवजी गोपाळ व पाराशर दादाजी यांची मसलत जाली, ह्मणजे त्या उभयतांस घेऊन करारांत आणावें; तेही ठेवून आपले मर्जीनें शेवटीं करावें. येणेंप्रमाणें कारभार चालत आहे. कलम १.

चांदवड, आंबड, सुलतानपूर व नंदुरबार, थालनेर वगैरे महालकऱ्यांस बोलावूं राउत पाठविले आहेत. भाद्रपदमासीं येतील. त्यांजपासून दुसाला ऐवज घेणार. कलम १.

राजश्री बाळाजी काशी कात्रे व नारो कृष्ण शेणवई येथें छ २१ मोहरमीं आले. छ २२ मिनहूस शुक्रवारीं भेट जाली. मार्गाचें वर्तमान कारभारी यांणीं पुसलें. बाईनीं कांहीं भाषण केलें नाहीं. दोन घटकांनंतर विडे देऊन बिदा केलें. मेजवानी, दाणा, चंदी वगैरे, असामी पाऊणशें खाशासुद्धां साहित्य पाठविलें. कलम १.

सदरहू सहा कलमें. काल रात्रीं राजश्री लक्ष्मण मल्हार निा पारनेरकर व नागोपंत तोफखान्याकडील निा सुभेदार यां उभयतांस बाईनीं सांगितलें कीं, तुह्मीं जाऊन सुभेदारांस साफ सांगावें कीं, कोणी सरदार करा. चिरंजीव मल्हारराव अथवा काशीबा. कारभारी कोणता करणें तो करा. दादाजी गंगाधर व पाराशर

दादाजी अथवा तिसरा कोणी करा. दौलत चालवावी. मजला ह्मणाल तर, मी तीर्थास हर कोठें जाईन. याप्रमाणें सांगून पाठविलें. ते काल आज्ञा घेऊन, आज इंदुरास जाणार. याप्रमाणें ऐकिलें, तें खरेंच ऐकिलें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४२.

श्री. १५ सप्टेंबर इ. स. १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ८ माहे सफर रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–येथील वर्तमान चंद्र २७ मोहरम बुधवारीं, विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं. त्यानंतर इकडील वर्तमानः–राजश्री बाळाजी काशी व बाई व बाईकडील कारभारी शिवाजी गोपाळ व पाराशर दादाजी इतके एकत्र बसून बोलणें जालें. त्यांतील अर्थ, होळकरांनीं पटाल्याची मोहीम करावी. अथवा गुजराथ प्रांतीं जावें. हें नाहीं तर, श्रीमंतांजवळ असावें. या तीन गोष्टी बाळाजी काशी यांनीं सांगितल्या. दुसरे, सलुखाचा प्रकार जसा ठरेल तसें वर्तत असावें. त्याचें उत्तर बाईनीं केलें कीं, आह्मी पटाल्याची मोहीम करूं. परंतु आह्मांस मागें मुलूख कोठें आहे? रसद कशी येईल? पाय ठेवावयास जागा नाहीं. त्यांत आमची बापुती वडिलोपार्जित. हिंदुस्थान माळवा तर वतन आहे. तेथील जाबसाल वाजवी आहेत. पुढील हिंदुस्थान तेथील बंदोबस्त कसा करून देतात, तशी मोहीम करूं. ह्मणून वगैरे बोलणें जालें. तें सविस्तर वर्तमान माहीतगारीनें राजश्री बाळाजी काशी यांनीं विनंतिपत्रें लिहिलीं आहेत, त्यावरून श्रुत होईल. मुसा दुदरनेक यास वीस हजार रुपये दिल्हे. पुढें ऐवज लाऊन देणार. येथेंच आहेत. गोसावी पांचशें आले. त्यांनीं एक दिवस धरणें, पाराजीपंताचे घरीं दिल्हें. त्यांस पंधरा हजार रुपये देऊन तूर्त ठेऊन घेतलें आहे. राजश्री मल्हारराव होळकर याजसमागमें फौज दिल्ही होती. त्यापैकीं दोन हजार लोक विडे देऊन बिदा केले. बाकी तीन चार हजार फौज आहे. त्याची तोड पडेल तशी करून बिदा करणार. राजश्री लक्ष्मण मल्हार व नागोपंत, येथून सरदाराकडे पाठविले होते. हें वर्तमान चंद्र २७ मोहरमीं लिहिलें आहे. त्यास ते सरदारांपासून उत्तर घेऊन काल रात्रीस आले. त्यांतील मजकूर सरदार यांनीं सांगितला कीं, मजकडे गुंता काय आहे? सर्वस्वीं वडीऊ मातुश्री आहेत. ते बरें करोत, वाईट करोत. चित्तास येईल त्यांस सरदारी सांगोत. कारभार कोणास

तरी सांगावा. सोबत्याचें पारपत्य करणें न करणें हें सर्व, वडिलांचे मर्जीस येईल तसें करावें. मजविषयीं तिलप्राय संशय नसावा. याप्रमाणें उत्तर दिल्हें. राजश्री पाटीलबावांकडील फौजेचा उपद्रव हा कालवर दूर होत नाहीं. काल त्यांजकडील वकिलास बोभाट आलियाचीं पत्रें दाखविलीं. त्यास निक्षून ताकीद केली कीं, तुह्मी येऊन, बोभाट आहे तोच आहे. तेव्हां आह्मीही तसेंच करूं. अशीं भयप्रीतीचीं बोलणीं दाखवून विडे देऊन मार्गस्थ केलें. अंत्री कुलांडेश्वरचें ठाणें दरवाजा गढीचा जाळून गांव लुटला. मल्हारगडकर कमाविसदाराचें पत्र आलें, तेंच नारो कृष्ण यांस दाखविलें. या चालीवरून सलूख कसा घडतो ह्मणून त्यांस सांगितलें. त्यांनीं उत्तर दिल्हें कीं, मी आज्ञेप्रमाणें हें वर्तमान राजश्री पाटीलबावांस लिहितों, व राजश्री गोपाळराव यांस व जिवाजी बल्लाळ यांस पत्रें लिहून बंदोबस्त करितों. ह्मणून बोललें. घडेल तें खरें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक २४३.

श्री. २९ सप्टेंबर इ. स. १७९३.

''सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ ३ माहे रविलावल बुधवार प्रातःकाळपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ २२ सफर रविवारपावेतों विनंतिपत्रें लिहून सेवेसीं पाठविलीं आहेत. त्याअलीकडील वर्तमानः–राजश्री देवराव महादेव यांस छ २२ सफरीं पत्र गेलें कीं, तुह्मीं इकडे न येतां परभारा इंदुरास जावें. तें पत्र त्यांजला छ २३ सोमवारीं पावलें. ते दिवशींच ते पार येऊन उतरले. यांस सांगून पाठविलें कीं, नावेची परवानगी पाठवावी. त्यावरून नावेची परवानगी दिधली. सोमवारीं पार होते. ते तेथून मंगळवारीं भोजनें पार करून, सायंकाळपर्यंत सारा खटला उतरून, इकडे आले. ते गांवांतच येऊन राहिले. समागमें राजश्री कृष्णराव रामचंद्र आंबीकर हे पागासुद्धां आहेत; व मशारनिल्हेचा खाजगी कारखाना, पागा, हत्ती, उंट वगैरे आहेत. समागमें कुटुंब व चिरंजीव व पुतणे आहेत. ते दिवशीं रात्रीस, चोळी पातळ घेऊन, बाईकडे येऊन, भेट घेतली. राजश्री शिवाजी गोपाळ यांचे विद्यमानें भेट जाली. चोळी पातळ घेत नवती. मग यांचा आग्रह जाणोन घेतलें. शिष्टाचार बोलणें जालें. निरोप दिल्हा. बुधवारीं आले नाहींत. गुरुवारीं बाईकडे आले. शिवाजी गोपाळ यांचे विद्यमानें बोलणें जालें. सरकारचीं पत्रें दिल्हीं. तीं वाचून दाखविलीं. ह्मणोन ऐकिलें. शुक्रवारीं आमावास्या, आले

नाहींत. शनवारीं एक बैठक. एक सोमवारीं. काल मंगळवारीं आले नाहींत. राजश्री शिवाजी गोपाळ यांचे घरीं आले होते. वेदमूर्ति राजश्री धोंड दीक्षित यांचे घरीं कुटुंबसुद्धां भेटीस गेले होते. बाईजवळ तीन बैठकी जाल्या, परंतु यांचें सांगणें रुचीस पडत नाहीं. खलबतींत चौघे असतात. मुख्य बाई, दादाजीकडील कारकून भगवंतराव, व शिवाजी गोपाळ हे त्रिवर्ग. चौथे देवराव. यांचें सांगणें कीं, घरचा बंदोबस्त करावा. पागा व सरंजामी इतकें ठेऊन, खर्च तोडावा. दाहा पंधरा हजारानसीं राहून, कारभारी कोण करणें तो करावा. सोबत्यासीं विरुद्ध दाखवूं नये. सरकारलक्ष असावें. असें सांगणें ह्मणोन ऐकिलें. यांत बारीक मोठें तें राजश्री देवराव लिहितील. राजश्री बाळाजी काशी व नारो कृष्ण नि॥ बावा हे छ २२ रविवारीं दोन प्रहरांनंतर निरोप घेऊन गेले. जातेसमयीं वस्त्रें दिधलीं. तेथें पावले. भेटी जाल्या. सरदारांनीं त्यांस मेजवानी दिधली. जागा देऊन ठेविले आहेत. राजश्री देवराव यांस पागेसुद्धां व आंबीकरासुद्धां पांचशें मनुष्यांचा शिधा व दाणा पावणेदोंशा घोड्यांचा व हत्ती नग दोन यांजसुद्धां मेजवानी दिल्ही. खाशांस साहित्य चांगलें निराळें पाठविलें. तूर्त जाण्याविशीं त्वरा नाहीं. येथेंच आहेत. राजश्री पाराशर दादाजीस सरदारांचें पत्र आलें कीं, तुह्मीं लौकर यावें. परंतु पाराशर दादाजी येथून जात नाहींत. तेथें गेलीयानें, बारगीर शिलेदार यांचा हंगामा होईल. याकरितां जात नाहींत. तेव्हां सरदार एखादे दिवशीं उठून येतील. लोक हंगामा करणार. बाईचा विचार आपण जांबेपावेतों जावें. तेथून चिरंजीवांस एकलें बोलावून घ्यावें. नाहींतर जाऊंच नये. त्यांसही बोलावूं नये. असा क्षणक्षणा विचार. परिणाम, दसरा जालीयावर लोक सरदारांस पुढें घालून येथें आणतील, शिबंदीचा बखेडा पडेल. पैसा तर नाहीं. कोणी आंगावर घेऊन पार पाडी असा नाहीं. यांची चाल ठीक नाहीं. त्यावरून गोष्ट ठीक दिसत नाहीं. राजश्री गोपाळराव यांणीं रोखे, नारायणगडास व पाटणास केले. त्यावरून नारो कृष्ण यांचें पत्र, पुन्हां गोपाळराव यांस घेऊन पाठविलें कीं, तुह्मी फौजेसुद्धां मागतीं, यांचे महालास येऊन उपद्रव देतां, हें चांगलें नाहीं. एक वेळ तुमचें पत्र आलें कीं, याउपर होळकराचे महालास तोशीस लागणार नाहीं. ऐसें असतां, मागतीं तुमचा करण्याचा बोभाट येतो, हें ठीक नाहीं. ऐशा गोष्टीनें बावांची मर्जी राहणार नाहीं. ह्मणोन पत्र दिल्हें. याउपर ते काय वर्तणूक करितात हें कळेल. तैसें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

# लेखांक २४४.

श्री. २५ आक्टोबर इ. स. १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १९ माहे रविलावल शुक्रवारपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र ३ माहे मिनहू बुधवारीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्याउपर राजश्री देवराव यांचें बोलणें पेशजीं लिहिलें आहे. पुढें दोन चार बैठकी जाल्या. त्यांत राजश्री पाराशर दादाजीस घेऊन बोलणें केलें. बाईसुद्धां बोलण्यांत कुंठित करून, उत्तर न सुचे ऐसें स्पष्ट केलें. निक्षून सांगतां साफ सांगितलें कीं, घरचा विचार पाहून, विरुद्ध वाढवणें तर वाढवावें. तुमची जमीयत किती, सरदार कोण, हें घरीं शोधा, तशी वर्तणूक करा. सरकारचें लक्ष सोडून कराल तर कठीण पडेल. बहुतां दिवसांची दौलत आहे हें बुडतें. तें तुमचें नाकर्तेपणें बुडत आहे. तरी विचार करून दौलतीस अपाय न होय. प्रसंग पाहून वर्तणूक करावी. त्यावरून सुभेदारांस राजश्री बाईनीं पत्रें लिहून, राजश्री बाबाजी निंबाजी इंदुरास पाठविलें कीं, सरकारचीं पत्रें आलीं आहेत, त्यांचें उत्तर लिहून द्यावें, व त्यांतील अर्थ बारीक मोठे, राजश्री देवराव यांनीं सांगितले. ते बाबाजीपंतांस श्रवण केले व आह्मांकडूनही सांगावयाचें तें सांगितलें. त्याप्रमाणें तुह्मीं राजश्री सुभेदारांपाशीं बोलून तथा न ठेवितां उत्तर घेऊन येणें. त्यावरून बाबाजी निंबाजी चंद्र १२ रविलावलीं इंदुरास जाऊन, सरदारांसीं बोलून, उत्तरें सरकारचीं घेऊन, चंद्र १७ रविलावल बुधवारीं आले. तेच दिवशीं राजश्री देवरावजीस बोलावून, खलबत करून, सरकारचीं पत्रें आलीं होतीं. त्यांचीं उत्तरें सरदारांनीं पाठविलीं तीं, त्यांस दाखविलीं. बोलणें जालें. सविस्तर माहितगारीनें राजश्री देवरावजींनीं लिहिलें आहे. वरकड राजश्री पाराशर दादाजीचें खातरजमेकरितां आनंदराव होळकर सरदारांनीं पाठविलें कीं, तुह्मीं येथें यावें व आंदेशा करूं नये. लोकांचें देणें त्याची तोड पाडूं. जो ऐवज बाई देतील, तोच घेऊन येणें. याप्रमाणें आनंदराव होळकर यांनीं येथें येऊन बाईचे समक्ष त्यांची खातरजमा केली आहे. आनंदराव यांस घेऊन जाणार. हे जाण्यास आंग काढितात. राजश्री रघुनाथपंत खंडेराव यांस एक वेळ येथून दौलतीचे बंदोबस्ताविषयीं सरदारांकडे पाठविलें, व बापू होळकर व काशीबा, मल्हारराव यांस एकत्र करून, सरदारांचे समक्ष बोलणें करून, शफतक्रिया घेऊन येणें कीं, कोणेविषयीं दुसरें करणें नाहीं. मातुश्री सांगतील त्याप्रमाणें वर्तणूक करूं. ऐसें सांगून पाठविलें, व सरदारांस सांगून पाठविलें कीं, सरदार कोण व कारभार

कोणें करावा? याप्रमाणें येथून रघुपतराव रवाना केले. त्याचें उत्तर सरदारांनीं दिल्हें कीं, सरदारी काशीबा यांस व कारभार मल्हारराव यांस सांगावा, हें मानस माझें आहे. याप्रमाणें करावें. त्रिवर्ग बंधू सरदारांचे रुबरू करून त्यांचीं बोलणीं कीं, सरदारांचे अनुमतें वर्तणूक करावी. चाकरी कारभारी यांचे आज्ञेप्रमाणें बापू व काशीबा यांनीं चालावें. ह्मणून त्रिवर्ग यांनीं आपलें वचनप्रमाण करून, त्रिवर्गाचे तर्फेनें निराळे निराळे कारकून येथें बाईकडे पाठविले. त्यास आठ दहा दिवस जाले आहेत. रघुपतराव यांनीं जाऊन, याप्रमाणें करारांत आणून, त्यांचीं पत्रें घेऊन, बाईस दिधलीं. पुढें याप्रमाणें किंवा दुसरे प्रकारें घडेल हें न कळे. राजश्री गोपाळराव राघोगडानजीक आहेत, व राजश्री जिवाजी वल्लाळ दरकूच मारवाड प्रांतीं जातात. इंदुरीं बारगीर चार हजार जमा होऊन, मलई करून घर घेतलें आहे, ह्मणून वर्तमान आलें. हिशेब पागेकडील व बारगीर यांचे, येथें करितात. रुमालदस्तरें काल येथें आलीं. राजश्री पाराजीपंत येथून जात नाहींत. सरदार दिपवाळी जाल्यावर येथें येणार आहेत. सुलतानपूर व नंदुरबार व चांदवड येथील मामलेदार आले. हिशेब होऊन पुढें ऐवजाचें बोलणें लागलें आहे. दुसाला रसद मागतात. त्याप्रमाणें मामलेदार राजी आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४५.

**श्री.** २९ अक्टोबर १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ माहे सफर रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान चंद्र १५ सफर रविवारीं विनंतिपत्रें लिहून रवाना केलीं आहेत, व राजश्री बाळाजी काशी यांजकडील पत्रें त्यांनीं दिधलीं तीं पाठविलीं आहेत. तीं सेवेसीं पावलीं असतील. सांप्रतचें वर्तमान राजश्री बाळाजी काशी व नारो कृष्ण यांस चंद्र १६ रोजीं बोलावून सांगितलें कीं, तुह्मीं इंदुरास जावें. येथें राहून जाबसाल होत नाहीं. एक वेळ सरदारांकडे जावें. त्यावरून त्यांनीं मान्य केलें. मध्यें दोन तीन दिवस गुंता जाला. मुहूर्त नव्हते. आज रविवारीं स्वार होऊन जातील. याप्रमाणें करार जाला आहे. पंचमहाल वगैरे किरकोळ महाल सुभेदारांकडील होते; तेथें घांसदाणा घेतला. कोणी महाल रिकामा राहिला नाहीं. राजगडचे रुपये पावणे दोन लक्ष गोपाळराव रघुनाथ यांनीं घेतले. पाटणास रोखा दहा हजारांचा केला. तेथें राऊत बसले आहेत. शिरोंज महाल मोठा,

तिकडे राऊत पेंढारी जाऊन महाल खराब केला. कोठें स्थळ रिकामें ठेविलें नाहीं. यामुळें बावांकडील कारकून आले. त्यांस बोभाट येतो तो सांगतात. तुह्मी येऊन महालाचा खराबा न व्हावा तो होत आहे. तेव्हां तुमचें करणें एक व सांगणें एक असें पडतें. स्नेह कसा घडेल अशीं भाषणें होतात. येथून तोफा पंचवीस इंदुरास रवाना केल्या. त्याचे गाडे करावयास कारखाना लाविला आहे. जातीनिशीं सरदार जाऊन रुबरू कारखान्याचें काम करवीत आहेत. राजश्री बापूजी होळकर यांजसमागमें तोफा व फिरंगी व दहा हजार फौज देऊन, बावांचे महालीं उपद्रव द्यावा असा बेत आहे. लोकांस निरोप दिल्हा. मागील फडशा करून पुढें करार करून ठेवितात. कलह करावा असा मनसोबा आहे. राजश्री दादाजी गंगाधर यांनीं लवकर यावें ह्मणून सरदारांनीं लिहिलें व येथूनही लिहिलें गेलें आहे. पांडोबा शेणवई यांचे नातू आले. शालजोडी व पातळ भेट केली. त्यांजकडे दिवाणगिरी सांगावी ह्मणून त्यांस पूर्वीं पत्र लिहिलें होतें, ते समयीं आले नाहींत. हल्लीं आले, भेट जाली. त्यांचा प्रकार मोठें काम करून पार पाडावें असा दिसत नाहीं. मुख्यत्वें कारभारी कोणी होत नाहीं. पैसा कोण देतो? पैशाखेरीज दौलत चालत नाहीं. मुसा नारज यांचे चिरंजीव येथें येऊन चाकरीस राहिले. त्यांची चाल शुद्ध नाहीं. दोन तीन वेळां येथील लोकांशीं कज्जा जाला. चंद्र १८ सफरीं पांच खून जाले. तीन शिपाई बाईकडील ठार जाले; दोन शिपाई त्यांचे ठार जाले. कज्जा मातबर, कामावरही जाला नाहीं. सहज बोलाचाली शिपायांशीं जाली. त्यामुळें पांच खून जाले. त्यास निरोप देऊं ह्मणतात. दोन रोजमुरे पावले. दोन रोजमुरे त्यांचेच आडले ते द्यावे न द्यावे असें मानस. परंतु ते खंदे आहेत. वर्तणूक चांगली नाहीं व समागमें कारभारी चांगला नाहीं. कसें घडेल तें न कळे. राजश्री देवराव महादेव चंद्र १८ सफरीं सुळकोट येथें येऊन, पत्र गंगाजलनिर्मळ अहल्याबाई यांस पाठविलें कीं, आह्मीं श्रीमंतांचे आज्ञेवरून मजलदरमजल मुक्काम मजकुरास आलों. लवकरच महेश्वरीं येतों. त्याचें उत्तर बाईनीं काल चंद्र २१ मिनहूस लिहून पाठविलें कीं, तुह्मीं महेश्वरीं न यावें. परभारें मर्दान्याच्या घांटानें उतरून, राजश्री सुभेदार यांजकडे जाणें. राजश्री बाळाजी काशी व नारो कृष्ण यांस तेथेंच पाठविलें आहे. तर तुह्मींही तिकडे जाणें. असें उत्तर पाठविलें. मजला त्यांनीं पत्र लिहिलें होतें कीं, बाईचें उत्तर घेऊन पाठविणें. त्याप्रमाणें मीं उत्तर लिहून दिल्हें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४६.

**श्री.** २३ नोव्हेंबर १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १८ रविलाखर शनिवार मुक्काम कसरावद पर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र ५ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं होतीं. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री देवराव इंदुरास गेले. त्यांचें येणें न जालें. राजश्री सुभेदार यांनीं ठेऊन घेतलें. राजश्री पाराशर दादाजी आज मुहूर्तेंकरून इंदुरास गेले. जावयाचें कारण, जाबसाल दों ठिकाणीं नीट होत नाहींत, तर राजश्री सुभेदार यांस येथें आणावें. ह्मणोन बाई यांनीं मशारनिल्हेस पाठविलें आहे. हे त्यांस येथें घेऊन येतील. उभयतां एकत्र जाल्यावर पक्का विचार करून, मग सरकारांत लिहिणें तें पक्केपणें लिहावें असा बेत आहे. दुसरें, फौजेचा गवगवा आहे, याजकरितां पांच लक्ष रुपयांची तजवीज करून दिल्ही, त्यांत लोकांची समजूत थोड्या बहुतांनीं करून सरदार येथें येतील. आह्मीं देशीं यावयाकरितां बाईचा निरोप घेऊन, रेवा उतरून, मुक्काम मजकुरीं आलोंत. येथें आज्ञेप्रमाणें कारकून राजश्री कचो जनार्दन ठेविले आहेत. हे बातमी वरचेवर सेवेसीं लिहीत जातील. मी बऱ्हाणपूरचे मार्गें मजलदरमजल घरीं कांहीं एक दिवस राहून, सेवेसीं लौकरच येतों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४७.

**श्री.** ६ डिसेंबर १७९३.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २ माहे जमादिलावलपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– छ ७ रविलाखरचें आज्ञापत्र सादर जालें तें छ २२ मिनहूस आह्मांस मुक्काम खिर्डी नजीक आशेर येथें डांक चौकीस पावलें. पत्रीं आज्ञा कीं तुह्मीं छ १८ व छ २७ मोहरम व छ ८ व १५ सफरचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. दिनचर्येचे बातमीचा वगैरे मजकूर व राजश्री बाळाजी काशी व गंगाजळ-निर्मळ अहिल्याबाई यांचें बोलणें जालें, त्याचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास, याप्रमाणें पुढें होत जाईल तें बरचेवर लिहित जावें ह्मणोन आज्ञा. ऐसीयास येथील वर्तमान अलाहिदा पत्रें लिहिलीं आहेत, त्यांवरून श्रवणांत येईल. मी बाई यांचा निरोप घेऊन निघालों ते मुकाम मजकूरपर्यंत सुखरूप पोंचलों. येथून दर कूच घरीं जाऊन सेवेसीं लवकरच येऊन पोहोंचतों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."



---

## लेखांक २४८.

**श्री.** १५ फेब्रुवारी १७९४.

"पुरवणी सेवेसीं विनंति सेवकाचा साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १४ रजबपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः– राजश्री काशीराव होळकर यांनीं सरदारांकडे व कारभारी यांजकडे येथील हरिद्र सांगावयाकरितां कारकून, राजश्री सखाराम राजाराम निसबत बाळाजी लक्ष्मण यांस पाठविलें आहे; व पत्रेंही लिहून दिधलीं कीं, मशारनिल्हे जबानीं कच्ची हकीकत सांगतील ती मनन करून, बंदोबस्त करून देविला पाहिजे; असें लिहिलें आहे. कारकून मजकुरास वस्त्रें व दोनशें रुपये खर्चास व घोडीं पागेचीं देऊन छ ११ मिनहूस रवाना केलें. कारण सारांश, येथील लोकांचा गवगवा हा वारला पाहिजे, व पुढील बंदोबस्त व्हावयास ऐवजाची तजवीज कशी काय करावी. पहिले यादीस ऐवज लाऊन दिल्हा तो खटल्याचा तूर्त वसूल कसा होतो, या प्रकारें एकांतीं बसून सांगितलें. दुसरें, तेथें कारभारी मुख्यत्वेंकरून तेच त्या पक्षींचे, हें कारकून यांनीं सांगितलें. तें त्यांचे पथ्यास पडलें. साधनही ठेवावें. आणखी येथें बसून काय काम करितात, लटक्या बातम्या लिहितां, असें अंदेशे आंतील खुलासा. असें जाणोन पाठविलें आहे. येथें कारभार लहान मोठा करायाचा तो करीतच आहेत. राजश्री सुभेदार यांचींही पत्रें आलीं कीं, तुह्मी चार दिवस स्थिर राहून तिकडील बंदोबस्त भिलाभामराचा वगैरे करून, लोकांची समजाविशीची वगैरे पेशजीं लिहिल्याअन्वयें तोडजोड पाडावी. पुढें आह्मी लिहूं तसें येण्याचें करावें. त्यावरून हेही चार दिवस स्थीरच आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २४९.

**श्री.** २४ फेब्रुवारी १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन निा केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २२ रजबपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान चंद्र २० मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमानः–पेंढारी, शिंदे व होळकराकडील माळवे प्रांतीं होते. त्यास राजश्री यशवंतराव शिवाजी हे शिंद्याकडील कमाविसदार, यांस भोंसल्यांनीं आपले सरदारींत ठेऊन त्यांजकडे सुभ्याचें काम सांगून बरोबर फौज दहा हजारपर्यंत हत्ती वगैरे लवाजमा देऊन, हुसंगाबादेवर स्वारी करावी ह्मणोन रवाना केलें आहे. त्यांनीं पेंढारी यांस बोलावून घेतलें. पेंढारी जाऊं

लागले, हें वर्तमान राजश्री काशीराव यांस कळलें. त्यावरून येथून यांनीं इंदुरास, राजश्री भारमल होळकर यांस लिहिलें कीं, पेंढारी जाऊं न द्यावे. त्यांनीं मना केलें. परंतु कोण ऐकतो? पेंढार तमाम कबिले सुद्धां सत्वासचा घाट उतरून गेले. कबिले त्यांचे नेमावरचे परगण्यांत ठेविले. तेथून सडे होऊन, यशवंतराव यांजवळ जाऊन पोहोंचले. त्यांची स्वारी हांड्यापलीकडे दों मजलींवर आहे. हुसंगाबादेवर जातात. राजश्री बाळोजी इंगळे यांनीं मारवाडचा शह सोडून, मेवाड प्रांतीं शहापुरानजीक आले. तूर्त पोट भरितात. गिलच्यांची खबर दाट आहे. शिखांची फौज यांस आडवी जाली होती. परंतु शिखांची व गिलच्यांची लढाई होऊन, शिखांनीं शिकस्त खाल्ली; असें वर्तमान जयपूरचें कलमीं आहे. जयपूरकर राजांनीं त्यांचे बातमीस डांक बसविली आहे. गिलच्याचें वर्तमान चंद्र २० मिनहूस सेवेसीं विनंतिपत्र लिहिलें आहे. शिंदे यांचें कूच जामगांवींहून होऊन हिंदुस्थानांत येतात ही आवई दाट आहे. राजश्री अल्लीबहाद्दर यांचा मुक्काम मुरागडनजीक आहे. जेतपुरास फौज गनीबेगाची, मोर्चे लावून आहेत. हा कालवर गड हस्तगत जाला नाहीं. पुढें आजेगडास मोर्चे लावणार, हें वर्तमान आहे. शिंदे यांकडील सरदार झांशी प्रांतींच आहे. जिऊबादादा यांचें वर्तमान, तेथें गेलें त्यावरून बेदील आहेत. येथील लोकांचीं समजाविशीचीं बोलणीं होतात. तूर्त निमे ऐवज द्यावा हें मानस लोक समजत नाहींत; घोळ पडला आहे. दुदरनेक फरासीस बिथरून आहे. ऐवजाची निकड लावली आहे. काशीराव व कारभारी तजविजींत आहेत. पुढें घडेल तसें लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २५०.

**श्री.** ७ एप्रील १७९४.

"सेवेसीं विनंती सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र माहे इंदुवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान चंद्र २५ साबानीं विनंतिपत्र लिहून व राजश्री देवराव यांजकडील लाखोटे सेवेसीं रवाना केले. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री विनायक बाजीराव चंद्र २६ साबानीं येथें येऊन दाखल जाले. गंगाजलनिर्मल बाई व राजश्री सुभेदार यांच्या भेटी जाल्या. वर्तमान सविस्तर निवेदन केलें. तीन दिवसपर्यंत बोलणें जालें. सरकारचीं पत्रें होतीं, तीं वाचून दाखविलीं. राजश्री दादाजी यांचीं पत्रें दिल्हीं. सरकारची आज्ञा कीं, हुजूर यावें.

त्यावरून यांनीं विचार केला कीं, देशीं जाणें हे सला चांगली. बाईनींही रुकार दिल्हा. कारभारी व सरदार एक जागां बसवून, बोलणें करून बाईकडे गेले. बाई त्यांसीं बोलली कीं, श्रीमंतांची आज्ञा कीं, हुजूर यावें त्यापक्षीं चांगलें. जावें, विलंब करूं नये. लौकर सिद्धता करून जावें. दिवसगतीवर न टाकावें. शिंदे तेथें आहेत तोंच जाऊन पोहोंचावें; ह्मणजे नीट पडेल. बाईचें व सरदारांचें बोलणें जालें. ते समयीं सरदारांचीं भाषणें कीं, कारभारी पुण्यास नेतात हे सल्ला चांगली कीं काय? माझें शरीर अशक्त, जीव नाहीं. पुन्हां रेवादर्शन होऊन, वडिलांचे पाय दृष्टीस पडतील असें नाहीं. मनुष्य कोणी जवळ मातबर नाहीं. जाऊन काय करावें? पुण्याची वस्ती, महागाईचा प्रकार, खर्चास पाहिजे. येथें एक एका दिवसाची येऊन पडली आहे, तेव्हां पुढें परिणाम कोणता? चमेलीहून निघून आलों, ते आपले भरंवशावर आलों. आपलेमुळें बचाव जाला. जाणें, हे सल्ला चांगली दिसत नाहीं. त्याचें उत्तर त्यांस बाईनीं केलें कीं, तुह्मीं आपला विचार पुर्ता ध्यानास आणून, कर्तव्य तें करावें. सुभेदारासीं रुकार असा दिल्हा. कारभारी यांचे रुबरू बोलली कीं, सत्वर जावें. आंतील बोलणें, जावें न जावें. असें बोलतात. बाह्यात्कारी बोलतात कीं, जावें. सरकारचीं पत्रांचीं उत्तरें व राजश्री दादाजीस पत्रें कारकुनांनीं लिहिलीं. मराठा दरबार, बाईस वाचून दाखविणें तें दाखवून रवाना केलीं. त्यांतील अर्थ, चार कलमें लिहिलीं आहेत. सावकाराचा उपद्रव लागूं न द्यावा, व सरकारांत कांहीं मागूं नये. तेथून लौकर बिदा करावें. खर्चाखालीं आणून गोऊन पाडूं नये. सोबत्याकडील बंदोबस्त, वांटणीचा वगैरे करून द्यावा. आह्मीं सरकारआज्ञेप्रमाणें अविलंबें लवकरच सेवेसीं येतों. याप्रमाणें पत्रें लिहिलीं आहेत, ह्मणोन कळलें. या विचारांत दादाजीकडील कारकून विनायक बाजी व पारनेरकर राजश्री शिवाजी गोपाळ वगैरे इतकेच. राजश्री पाराशर दादाजी या बोलण्यांत नाहींत. नारो गणेशाकडीलही मंडळी कोणी नाहींत. नारो गणेशाकडील मंडळी बाईस भय घालितात कीं, पुण्यास जाणें हे सल्ला ठीक नाहीं. तेथें गेल्यावर विघ्नें फार. त्यावरून जाण्याविषयीं कच्चें पक्केंही होतात. परंतु पारनेरकर मसलत बहकूं देत नाहींत. यांचे चित्तांत कीं, कोणेही प्रकारें यांस हुजूर घेऊन जावें. तेथे गेल्यावर सरकारनेटानें जें करणें तें करावें. येथें बाईपुढें कांहीं चालत नाहीं. देशीं जाणें तेव्हां खर्चास पाहिजे. त्याची तजवीज बाई पैसा देत नाहींत. बोलतात कीं, महाली हिशेब आपला पहावा. पैसा आला काय आणि पावला किती, हें ध्यानास आणावें. मी तुमचे कर्मास लिप्त नाहीं. फौजेचा गवगवा आहे तसाच

आहे. धरणींपारणीं होतात. पेशकसीच्या ऐवजावर वराता होतात. उमरपट्टीचे वसुलास कारकून पाठवावे, हा विचार होता. परंतु बाईंनीं सालमजकुरीं राहविला. पुढें कमाविसदारांकडेच लाऊन वसूल घ्यावा व महालचा ऐवज दुसालापैकीं रसदा घेतल्या त्या, खर्चाखालें पडल्या. याउपर महाल सिरोंज व कोच या दों महालांची घालमेल करून ऐवज घ्यावा हा विचार आहे. हाकालवर मामलेदार कोणी उभे नाहींत. दुसरी तजवीज, कोटेकराकडील वकील येथें आहेत. त्यांजकडून सालाबादी ऐवज येणें तो वसूल घ्यावा. ऐसीयास हा ऐवज वसुलांत येऊन, देशीं जाणें कसे घडेल पहावें. सावकार कोणी पैसा देत नाहीं. बाई कोणाची खातरजमा आंतून करीत नाहीं. त्यापक्षीं कर्जही मिळत नाहीं. देशीं जाण्याची मसलत सारी दादाजींवर आहे. सरकारांत व दादाजीस पत्रें लिहिलीं आहेत. त्यांचीं उत्तरें आलीं ह्मणजे, येथून कूच करून रेवापार व्हावें. चैत्र वद्यपक्षीं अथवा अक्षदतृतीयेचे मुहूर्तें येथून निघावें, असें बोलतात. परंतु अमलांत येणें कठीण. विचार मात्र करितात. भरंवसा एकाही कामाचा नाहीं. राजश्री काशीराव होळकर यास वस्त्रें द्यावीं हा पहिला बेत होता, परंतु हल्लीं मल्हारराव होळकर बिघडून आहे. त्यांचें बोलणें परस्परें व सांगूनही पाठवणें कीं, काशीराव यास वस्त्रें कशीं देतां? माझी वाट काय? माझा मजला हिस्सा द्यावा, पुढें कर्तव्य तें करावें. असें न करितां, एखादी गोष्ट केली तर, मी एखादा अनर्थ करून उठून जाईन. या प्रकारचीं भाषणें ऐकून तूर्त वस्त्रें देणें राहिलें. पुढें घडेल तें खरें. सांप्रत देशीं जाण्याचा विचार, त्यापक्षीं उभयतांस समागमें न्यावें हा मानस आहे. याप्रमाणें येथील प्रसंग आहे, तो सेवेसीं लेखन केला. पुढें निदर्शनास येईल तें सेवेसीं लिहीन. वरकड मजकूर, राजश्री देवराव यांचीं व बाईचीं व सरदारांचीं व कारभारी यांचीं वेगळालीं बोलणीं जालीं आहेत, त्यावरून त्यांनीं सविस्तर अर्थ सेवेसीं लेखन केले आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

९५

---

## लेखांक २५१.

**श्री.** ता. ८ एप्रील १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ७ माहे रमजानपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः— राजश्री सुभेदार यांचे डेऱ्याचे चौकीस मुसा दुदरनेक फरासीस याचें पलटण आहे. त्याचे रोजमुरे चढले आहेत, ते दरमाहा पावत नाहीं. खर्चाची तंगचाई ह्मणून

कब्जा करून रुसून, तीन कोसपर्यंत गेले. इकडे बाईस वर्तमान कळल्यावर राजश्री भगवंतराव, दादाजीकडील कारकून यांस समजुतीस पाठविलें. समजावीस करून घेऊन आले. पैसा द्यावा असा करार आहे, त्याची तजवीज नाहीं. मेस्तर बाईट फिरंगी बाईकडील, यांचे रोजमुरे चढले आहेत. त्यास खर्चास पावत नाहीं. दोन दिवस धरणें केलें. शेवटीं बोली होऊन, बाईनीं त्यांस निरोपाचे विडे दिल्हे. तीन दिवस रुसून होता. मागती समजाऊन ठेविला. सुभेदाराचे चौकीचे लोक गेल्यावर, बारगीर व शिलेदार मलई करून आडून बसले आहेत. चंद्र ६ रमजानीं संध्याकाळपर्यंत धरणें होतें. सरदारासुद्धां उपाशीं मारले. त्याची समजुती हा कालवर नाहीं. याप्रमाणें फौजेचा हंगाम आहे. सरदारांचे निरोप बाईकडे येतात. बाईचें बोलणें कीं, मजजवळ कांहीं गाठोडें ठेविलें आहे, जें काढून देऊं? तुह्मीं देशीं जाण्याची तयारी करावी. विना देशीचा सावकार एखादा मिळाल्याखेरीज पैसा मिळत नाहीं. तूर्त लोकांची समजुती पाडावी. थोडे बहुत खर्चास देऊं, असें बोलावें. याप्रमाणें निरोप जातात. बाईनीं जोशी बोलावून, मुहूर्त कालचे सायंकालचे पाहिले होते. सांगून पाठविलें कीं, ढाला रेवापार द्याव्या ह्मणजे सोहोरत पडेल. देशीं आवई जाईल. येणेंकरून शिंदे यांस निरोप श्रीमंत देणार नाहींत. मग आठ पंधरा दिवस लागले तर चिंता नाहीं. तुमचे शरीरप्रकृति पाहून जावें. नाहींतर चिरंजीव काशीराव यास पाठवावें. कारभारी बरोबर द्यावे. तेथें काम कोणतें? भाऊपण्याचे लढे आहेत त्यांची तोड पाडून, श्रीमंत एकमेकांचे हातांत हात देऊन बिदा करितील. कालचे मुहूर्त लोकांचे धरण्यामुळे राहिले. पुढें मुहूर्त नाहीं. वैशाख शुद्धपक्षीं आहे, तेव्हां निघणार. सुभेदारांचें ह्मणणें जें, दादाजीकडून विनायकपंत आले आहेत, त्यांनीं आमची खातरजमा करावी कीं, देशीं तुह्मांस घेऊन जातों. त्यास कोणतेही गोष्टीविषयीं उणें पडूं देणार नाहीं. पैसा लागेल तो देऊं. तेथील गुंता महिना पंधरा दिवसांत उरकूं व सत्वर बिदा करूं. याप्रमाणें वचन द्यावें. ह्मणजे लवकर निघतों. याची खातरजमा पुरती नाहीं. सरकारचे पत्राचे जाब आल्यावर येथून निघतील. पुढें होईल तसें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २५२.

**श्री.** ११ एप्रिल इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी दातार कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। चंद्र १० माहे रमजान भृगुवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– चंद्र ७ मिनहूस विनंतिपत्रें लिहून राजश्री देवराव यांजकडील लखोटे सेवेसीं रवाना केले. त्यानंतर येथील वर्तमान, चंद्र ६ मिनहूस सोमवारीं शिलेदार यांनीं मलई करून, राजश्री सुभेदार यांचे डेऱ्यास धरणें देऊन बसले. राजश्री काशीराव होळकर व राजश्री पाराशर दादाजी व खंडो महादेव यांस घेऊन बसले. ते आवग्र तीन दिवस निकड करूनच बसले. कोणास भोजन करूं दिलें नाहीं. बाईकडे घाटाचें पाणी बंद करावें ह्मणून बोलवा होती, त्यावरून वस्तीचे लोक देखील गलबले होते. निदान चंद्र ८ रोजीं बुधवारीं तोड पडली. मध्यस्त राजश्री आनंदराव होळकर व नागोपंत कारकून नि॥ तोफखाना व आणखी भले लोक पडून तोड पाडली कीं, साडेआठ रोजमुरे सालाचे घ्यावे, लोकांचे मतें दहा घ्यावे, परंतु साडेआठांवर ठरलें. मागील पांच सालचा हिशेब आकारून, वसूल पावला असेल तो वजा देऊन, बाकीचे रुपये एका महिन्यांत फडशा करून घ्यावा. त्यांत कांहीं नगदी, कांहीं कापड, कांहीं वराता, याप्रमाणें भरणा करावा. येविषयीं कारभारी यांनीं लोकांशीं वचनप्रमाण केलें. अलिकडे तेरीख बंद जाल्यापासून, दहा महिन्यांचे तीन रोजमुरे घ्यावे, रुपये लष्कर चलणी. समजोती, लहान मोठ्याची खर्चाची पाडावी. असें बोलणें होऊन, बुधवारीं दीढ प्रहर रात्रीस धरणें उठलें. सरदार यांचें व कारभारी यांचें मानस कीं, बाईनीं कोणास मध्यस्तीस पाठवून तोड पाडावी; कांहीं ऐवज द्यावा. परंतु बाई सावध. एकाही गोष्टींत न येतां साफच उत्तर करीत गेली कीं, मजजवळ पैसा नाहीं. तशांत चाकरी कोणती करून आलांत? द्यावें तें काय? तुह्मीं आपलें कसेंही करावें. लोकांस मात्र दबावाच्या गोष्टी सांगून पाठवीत गेली कीं, धरण्याची रीत संध्याकालपर्यंत असती; तुह्मीं निग्रह मांडला आहे. त्यास कोणास कांहीं बरें वाईट जाल्यास, तुमचा मुलाजा ठेवणार नाहीं. याप्रमाणें बाईकडून उपराळा जाला. तूर्त याप्रमाणें तोड पडली. परंतु पुढें हंगामा याच प्रकारें होईल. एका महिन्यांत ऐवजाची तजवीज होऊन, लोकांचे पदरीं ऐवज पडतो असा अर्थ नाहीं. आजचें उद्यांवर मात्र टाकलें आहे. दुसरें, लोकांचें बोलणें कीं, आमचे फडशे करून निरोप द्यावा. त्याचें उत्तर कारभारी यांनीं केलें कीं, देशीं जातच आहोंत, तुमचीही वाट करूं. चंद्र ७ मंगळवारीं पुष्य नक्षत्रावर

आभिजित् मुहूर्तें दों प्रहरीं ढाल व डेरा रेवा दक्षिणतीरीं दिल्हा. पुढें खर्चाची तजवीज होऊन, लोकांची समजूत पडून रेवापार होतील. घडून येईल तसें सेवेसीं लिहीन. चंद्र ९ रमजानीं गुरुवारीं तृतीय प्रहरीं, कारभारी आनंदराव होळकरासुद्धां, बाईकडे येऊन खलबत केलें. त्यांतील अर्थ, खर्चाची तजवीज व लोकांचें वर्तमान व पुढें येथून लौकर निघावें, हें बोलोन लष्करांत गेले. निश्चयांत आलें नाहीं. रावेरकर यांचा हिशेब होऊन फडशा जाला. हिशेबाचीं व निरोपाचीं वस्त्रें जालीं. दीड लक्ष फाजील, त्याचें निमें ठरलें. वरकड महालचे याच अन्वयें हिशेब जाले. इंदूर व पिंढावे तेथील हिशेब देतात. सिरोंज व कोच हे महाल निस्तुक राहिले आहेत; त्यांचे विचारांत आहेत. राजश्री नारो कृष्ण वकील नि॥ पाटीलबावा हे, पहिले राजश्री बाळाजी काशीबरोबर आले होते, त्यास निरोप होऊन चंद्र ७ मंगळवारीं स्वार होऊन गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २५३.

**श्री.** १३ एप्रील इ. स. १७९४.

"विज्ञापना तागाईत छ १३ माहे सवाल बुधवार प्रातःकाळपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः—राजश्री मल्हारराव होळकर यांस बातमी लागली कीं, मजला दगा होतो. त्यावरून छ ११ मिनहू सोमवारीं प्रहर रात्रीस जीनबंदी करून, सडे शंभर स्वारांनशीं व पायदळ माणसें शंभर याप्रमाणें कूच करून, जांबेचा घाट चढून गेले. बुणगे व डेरे राहोव्या तळावरच ठेविल्या. बोलवा दाखविली कीं, चोळीस भैरवाची यात्रेस तेथें जातों. हें वर्तमान सरदारास व बाईस तेच घटकेस कळलें कीं, मल्हारराव उठून गेले. त्यावरून बाईनीं राजश्री बापू होळकर यांस सांगून पाठविलें कीं, मल्हारराव उठोन गेले. त्यांस समजावून घेऊन यावें. न ये तर धरून आणावा. बळास आला तर लढाई करावी. त्यांत जाया जाले तर होत. परंतु कसें करून घेऊन यावें. गेला तो तुमचे विचारावेगळा गेला नाहीं. तुह्मीं जाऊन त्यास धरून आणावें. अथवा तुह्मीं त्याचे मागें काळें करावें. त्यावरून बापू होळकर यांनीं आपली जमीयत सिद्ध करून बातमी मागविली. मल्हारराव चोळीपलिकडे गेले, असें समजल्यावर बापू मागोमाग कूच करून गेले. मल्हारराव थेट इंदुरास छ १२ मंगळवारीं प्रहर दिवसां जाऊन पोहोंचले. मागून बापूही जाऊन पावले. अशी बातमी काल सायंकाळीं येथें आली. सरदारांनीं मागोमाग पांचशें स्वार, हुजरात व शिलेदार यांचे, पाठविले आहेत. मंगळवारीं तृतीय प्रहरीं, सरदार बाईकडे

येऊन, कारभारीसुद्धां एकांत करून इंदुरास पत्रें पाठविलीं. कमाविसदार यांस व सावकार यांस कीं, तुह्मीं सावध असावें, दुकानें आटपावीं, घोडीं लपवावीं. मल्हारराव तिकडे आला, याचे हातीं न पडावें. दुदरनेक फिरंगी इंदुरीं आहे; त्यास पत्र पाठविलें कीं, तुह्मी व बापू एक होऊन, मल्हारराव यास घेरा घालून, आटोपून आणावें; अथवा धरून आणावें. पुढें जाऊं न द्यावा. याप्रमाणें पत्रें गेलीं आहेत. याउपर बापू होळकर, मल्हारराव यास कसे घेऊन येतात, घडून येईल तसें लिहीन. बापू घेऊन येतील, अशी खातरजमा येथली आहे. तेथून निघून गेले तर खूळ होईल. पेंढारी व गारदी वगैरे मल्हारराव यास सामील होणार. सरदाराची मिजाज कायम नाहीं. पुण्यास जावें हें लक्ष अंतःकरणापासून नाहीं. बाह्यात्कार दाखवितात एक, आंतून चिरंजीवासीं सूत्र खेळवितात एक! असा कांहीं प्रकार आहे. दौलतींत मनुष्य कोणी नाहींसा जाला आहे. दहशत कोणी कोणास नाहीं. तूर्त हेच गडबड आहे. रेवापार व्हावें हा विचार तूर्त राहिलासा दिसतो. पुढें होईल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २५४.

श्री. १३ एप्रील इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १३ माहे सवाल बुधवारपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ ३ माहे मिनहून विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान येणेंप्रमाणें कलमबंदीः—

वैशाख शुद्ध ७ चे मुहूर्तें रेवापार व्हावें असें होतें, तें राहिलें. काशीराव याचा डेरा मात्र फक्त रेवापार दिला आहे. त्याजवळ मनुष्य देखील कोणी नाहीं. खासा डेरा तोही उभा आहे. कलम १.

सांवतमल कोठारी, लष्करचा सावकार, त्याचा धनी उज्जनीस आहे. त्यास खातरजमेचें पत्र बाईचे नांवें, कारभारी यानें घेऊन पाठविलें आहे. गुमास्त्याशीं करार केला आहे कीं, पांच लक्ष रुपयांचा ऐवज लावून देतों. रोकडी ऐवज घ्यावा. ऐवजाची तजवीज कोटेकर राजे यांजकडून चार लक्ष रुपये घ्यावे, असें ठरल्यांत आलें. त्यास, दोन लक्ष रुपये सध्यां द्यावे. हा ऐवज तीन लक्षपर्यंत. महालीं ऐवज, टोंक शिरोंज मिळून आहे. एकूण असे पांच लक्ष रुपये लाऊन देऊन सध्यां ऐवज घेणार. ऐवज हातास आल्यावर येथून रेवापार व्हावें असें ठरलें आहे. सावकार येथें आलियावर घडेल तें खरें. कलम १.

छ १० रोजीं रविवारीं लोकांनीं खर्चाकरितां लष्करांत गवगवा केला. छ ११ सोमवारीं धरणीं राजश्री पाराजीपंत यांजकडे. निंबाळकराचे व बापू होळकर यांचे दिवाण, राजश्री रघुपत खंडेराव, याजकडे खांसे बापू होळकरच जाऊन बारगीर-सुद्धां बसले, व नागोबा कारकून तोफखान्याचा, त्याजकडे फिरंगी याचे मार्फत संध्याकाळपर्यंत धरणीं होतीं. पाराजीपंत तोंडचे फडसूल, याजकरितां लोकांनीं स्थित ठेविली नाहीं. निदान सायंकाळीं बाईनीं ताकीद करून सांगून पाठविलें कीं, लोकांची वाट होईल त्याप्रमाणें तुमची. बापू होळकर याची हमी छत्तीस हजार निघाली. परंतु कारकुनाची अब्रू घ्यावी हें चित्तांत. बाईचे ताकिदीनें धरणीं उठलीं. धरणीं होतात तीं, कारभारी यांचेच अंगभूत होतात, कीं कसाही गवगवा दाखवून बाईकडून ऐवज घ्यावा. परंतु बाई पैसा देत नाहींत. कोठारे माहाजन यांजकडून चंदी बंद करविणार कीं, लौकर लोकांचा बंदोबस्त करून येथून कां जात नाहींत? मजभंवतें हंगामे कां करितात? निदान मीच उठून इंदुरास जाईन असेंही बोलतात. प्रमाण नाहीं! त्रयोदशीचे मुहूर्त तेही राहिले. पुढें मुहूर्त पाहून येथून निघतील अशी तजवीज कांहींएक दिसून येत नाहीं. घडेल तसें सेवेसीं लिहीन. कलम १.

छ ४ तागाईत छ ६ रोजपर्यंत लष्कराचे कारभारी बाईकडे येऊन बोलणें बोलत गेले. त्यांतील सारांश अर्थ कीं, खर्चाची तजवीज आह्मीं पांच लक्षां-पर्यंत केली आहे. आपण सावकाराची खातरजमा करावी. ह्मणजे त्यांस ऐवज लावून देऊन रोकड लोकांचे समजुतीस घेऊं. त्यावरून बाईनीं येथील साव-कारांस बोलावून सांगितलें कीं, चिरंजीव तुकोबा व कारभारी बोलतात, हें मीच बोलतें; दुसरा विचार नाहीं. तुह्मांस ऐवज लाऊन देतात, तो घेऊन तूर्त काम करावें. त्यास असें बोलण्यावर सावकाराची खातरजमा होईना. बाईनीं निखालसपणें सांगितल्यास घडेल. बाईचें बोलणें मोघम होत आहे. कलम १.

राजश्री मल्हारराव होळकर यांची समजोती पाडली, ते समयीं बोलण्यांत कीं त्रेसष्ट हजार रुपये द्यावे. तो ऐवज लौकर त्यास पावेनासा जाला, ह्मणून मागतीं अनावली(?) करूं लागले. छ ७ सवालीं कहीवरून राजश्री काशीराव होळ-कराचे माणसाशीं कजीया जाला. मल्हारराव याची वगैरे कही महेश्वर परगण्याचे गांवावर जाली. तो बोभाट बाईकडे आला. बाईनीं काशीराव यांस सांगून माणसें पाठविलीं. कही झाडून पाडली. तेव्हां मल्हारराव याचे लोकांनीं काशीराव यांज-कडील लोकांस मार देऊन, कही घेऊन गेले. त्यावरून बाईनीं सुभेदारांकडे सांगून पाठविलें. सुभेदारांनीं मल्हारराव याजकडे जासूद पाठविला कीं, हें काय? आप-

समध्यें कजीये करणें हें काय? त्याचें उत्तर सांगून पाठविलें कीं, माणसामाणशीं जाली. पुढें ताकीद करूं. याप्रमाणें. कलम १.

छ ८ सवालीं मल्हारराव याजकडील माणसें शिंपी यांनीं, बाजारांत जानकीदास याचे गुमास्त्यासीं कजीया देण्याघेण्यावरून केला. दहा हजार रुपये मल्हारराव त्या सावकारास मागूं लागले. तेव्हां बोभाट बाईकडे आला. बाईनीं पंचवीस कर्नाटकी प्यादे पाठवून, माणसें धरून आणलीं. आणि मल्हारराव याजकडे कारकून पाठविला कीं, अशी बेकैदी वर्तणूक करणें हें काय? त्याचें उत्तर सांगून पाठविलें कीं, मीं माणसास असें सांगितलें नवतें. आपण शिक्षा माणसांस केली, उत्तम जालें. अतःपर अशी गोष्ट होणार नाहीं. मी ताकीद करितों. त्यावरून त्याचीं माणसें सोडून दिलीं. ते दिवशीं बाजारांत मोठा गवगवा जाला. कलम १.

छ ९ रोज शनवारीं एकादशीचें श्राद्ध थोरले सुभेदारांचें, बाईकडे वाड्यांत येऊन केलें. भोजनास मंडळीस चिरंजीव आदिकरून आले होते. बाईस मौन होतें. कारभार जाला नाहीं. कलम १.

सदरहू सात कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २५५.

श्री. २४ एप्रील १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २३ माहे रमजान गुरुवासरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ १० माहे मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर येथील वर्तमान येणेंप्रमाणें कलमबंदीः—

छ १७ मिनहूस शुक्रवारीं धरणीं राजश्री बापू होळकर यांचे येथें त्यांचे लोकांचें होतें, व मल्हारराव याजकडे त्यांचें लोकाचें होतें. कारभारी राजश्री खंडो महादेव व पाराशर दादाजी लष्करांत राजश्री सुभेदारांजवळ होते. मल्हारराव यांनीं निरोप पाठविला कीं, साठ हजार रुपये आज देतात तर माझी स्थिति राहाती, नाहीं तर मजला कळेल तसें करीन. तेव्हां उत्तर कारभारी यांनीं सांगून पाठविलें कीं, ऐवजाची तजवीज करितों. जाली ह्मणजे थोडेबहुत देऊं. याउपर मल्हारराव यांनीं बातमी लाविली कीं, पाराजीपंत लष्करचे बाहेर निघून घरास जातील, तेव्हां धरून आणून पैसा घ्यावा. हें वर्तमान त्यांस

कळल्यावर सुभेदारांनीं पलटणचीं माणसें, व बापू होळकर यांनीं आपले बारगीर, समागमें देऊन घरास पावतें केलें. कलम १.

शिलेदारांनीं धरणें घेतलें होतें, त्यांसीं महिन्याचा करार करून उठविलें कीं, ऐवज द्यावा. त्यास हा कालवर ऐवजाची तजवीज नाहीं. त्यांची मुदत भरत आली. पुढें शिलेदार व मल्हारराव वगैरे एक होऊन, धरणें घेणार. याप्रमाणें ऐकितों. कलम १.

बाईनीं विनायक बाजीराव यांजबरोबर देवराव यांस सांगून पाठविलें कीं, तुह्मीं सरकारतर्फेनें सरदारांकडे जाऊन बोलावें कीं, चिरंजीवाचा बंदोबस्त लौकर करावा; नाहींतर एकादा अनर्थ करील. त्यावरून देवराव बाईकडे येऊन, बाईशीं बोलून, छ २१ मंगळवारीं लष्करांत सुभेदारांकडे गेले होते. बोलून आले. हें वर्तमान त्यांनीं आपले पत्रीं लिहिलें असेल. सुभेदारांस पुत्रमोह सुटत नाहीं, त्याचा अन्यायही वाटत नाहीं. त्यांनींच पोसविलें आहे! राधी, सुभेदारांची राख, तिचा कारकून मल्हारराव याजकडे येत असतो. मल्हारराव याचें सूत्र राधीकडून आहे. बाई अंगावेगळें टाकून बोलतात कीं, ज्याचा पुत्र त्यांनीं बंदोबस्त करावा. मी कशास करूं? उभयतांच्यांनींही मल्हारराव याचा बंदोबस्त होत नाहीं. कलम १.

पेंढारी घांटावर ठेविले आहेत, ते उठून जातात. बोलतात कीं, आह्मीं येथें बसून काय खावें? चार दिवस जाऊन पोट भरूं; मागतीं येऊन हजर होऊं. जिऊबा बर्वे यांचे लष्करांत जातात. हें वर्तमान येथें कळलियावर समजोतीस पाठविलें असे. कलम १.

राजश्री चिमणाजी जयराम पारनेरकर पुत्राचे लग्नाकरितां येथून निरोप घेऊन छ २२ रोजीं गेले. बाईनीं पांच हजार रुपये खर्चास दिल्हे. मुकुंदराव हरी यांचे चिरंजीवाचे मुंजीसही हजार रुपये खर्चास दिल्हे. कलम १.

लष्करचे कहीचा उपद्रव आपले महालचा बचाव करून, शिंदे व पवार यांचे महालांत कही धाडितात. कमाविसदार बोभाट घेऊन येतात. त्यास वतनदार राऊत रखवालीस देतात, आणि कही व्हावयाची ती होती. कलम १.

छ १८ मिनहू शनवारीं दीडा प्रहरा उपरांत, मल्हारराव आपली जमीयत शेंदीडशें माणसें घेऊन, बाईचे घाटावर स्नानास आले. स्नान करून श्रीकाशी-विश्वेश्वराचें दर्शन घेतलें, आणि देवळांत घटकाभर ठरलें. हें वर्तमान बाईस, मुकुंदराव हरि यांचे घरीं दत्तपुत्राची मुंजी ते दिवशीं होती, तेथें अहेरास गेली होती, तेथें कळलें. त्यावरून बाईनीं दरवाजावर जागा जागा माणसें पाठविलीं कीं, मल्हारराव यास किल्ल्याचे आंत येऊं न द्यावें. आणि

मल्हारराव याजकडे शागीर्द पाठविला कीं, तुह्मीं भोजनास यावें. यांनीं बहाणा केला कीं, मी आज येत नाहीं. असें बोलून देवळांतून किल्ल्यास डावें घेऊन, श्रीमंत दादासाहेब यांचे घाटावरून, राजश्री पाराजीपंत यांचे घरावरून गेले. हें वर्तमान अगोदरच पाराजीपंतांस बाईनीं सांगून पाठविलें होतें कीं, सावध असावें. त्यावरून ते सावधच होते. हें पाहून मल्हारराव आपले गोटास गेले. कलम १.

पाराजीपंत मनस्वी बोलतात कीं, मल्हारराव यास धरून कैद करावे तेव्हां ठीक पडेल. बोलल्याप्रमाणें घडत नाहीं. परंतु या गोष्टी त्याच्या कानास गेल्या. त्यावरून डाव धरिला आहे कीं जेथें सांपडेल तेथें धरून नाहींसा करावा. हे आपले ठिकाणीं सावध आहेत. सुभेदारांनीं त्यांचे घराभोंवतीं पलटणचीं माणसें रखवालीस दिलीं आहेत. बारगीर शेंपन्नास नेहमीं असतात. कलम १.

पुण्यास जावयाची बाईकडून ताकीद वरचेवर होती कीं, तुह्मीं रेवापार लौकर व्हावें. कामें राहिलीं तीं पार जाऊन करावीं. अशीं बोलणीं होतात. परंतु कोणाचे लक्षांत नाहीं. लोकांचा बहाणा करितात. पाराजीपंत बोलतात कीं, लोक कसे उतरूं देतात? त्यांस कांहीं ऐवज पोहोंचला ह्मणजे पार उतरूं. असें कारभारी बोलतात. काळजी कोणास नाहीं. आपआपले मतलबावर आहेत. अक्षतृतीयेचे मुहूर्तें रेवापार होणार अशी आवई मात्र आहे. पार उतरून दरकूच जातील असें नाहीं. घोळ घालितात. पुढें घडेल तसें लिहीन. कलम १.

शिंदियाचीं माणसें दोनशेंपर्यंत सुभेदार येथें आल्यापासून बाईकडे किल्ल्याचे चौकीस होतीं. त्यांचे रोजमुरे चढले होते. त्यावरून त्यांनीं एके दिवशीं धरणें, कलह करून, तोडे शिलगावून, दरवाजाजवळ आडून बसले. दप्तरचा कारकून बसविला होता. त्यावरून त्याची तोड पाडून, रोजमुऱ्याचा ऐवज देऊन त्यांस निरोप दिला. कारण कीं, मल्हारराव याजकडेही सनदी आहेत, ते व हे एक होऊन दगा करील. ह्मणोन दूर केलें. ते इकडून सुटून मल्हारराव याजकडे जाऊन राहिले. कलम १.

सुभेदार येथें आल्यापासून चंदी रतीब वगैरे बाईकडून देतात. त्यास बाईचें बोलणें कीं, मनस्वी चंदी लागती. हजरी घेऊन मग चंदी द्यावी. नाहीं तर मी चंदी बंद करीन. त्यावरून सरदार पागेची हजरी घेत असतात. कलम १.

सदरहू अकरा कलमें सेवेसीं श्रुत होतील हे विज्ञापना."

---

## लेखांक २५६.

श्री. ३ मे इ. स. १७९४.

“ सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ३ माहे सवाल रविवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—चंद्र २३ माहे रमजानीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर येथील वर्तमान, राजश्री मल्हारराव होळकर याचा गवगवा होता. त्याची समजोती राजश्री बापू होळकर यांचे विद्यमानें व हात्तीचा दरोगा मीठाराम ह्मणोन आहे, त्याचे हातें केली. राजश्री पाराशर दादाजी व खंडो महादेव व रामराव आपाजी हे त्यांचे गोटांत जाऊन त्यांशीं बोलून, दोन हजार रुपये तूर्त खर्चास देऊन, हमी त्रेसष्ट हजार रुपये देतों याचा वायदा मुदत करून, राजश्री सुभेदार यांजकडे घेऊन आले. बाईस मुजरा करून आपले गोटास गेले. बापू होळकर यांसीं बोलण्यांत कीं, मजला तुह्मीं सामील असावें. याचें प्रमाण करून घेतलें. बापूंनीं उत्तर केलें कीं, तुह्मीं लोक ठेविले आहेत ते दूर करावे, ह्मणजे मी तुह्मांस सामील आहें. लोक दूर करणें हें, मल्हारराव यांचे खातरेस येत नाहीं. लोकांची फूट पाडावी हें कारभारी यांचें मानस आहे. सरदारांनीं कारभारी यांसीं बोलण्यांत आणलें आहे कीं, तुह्मीं मल्हारराव याचा बंदोबस्त कसा तरी करून खूळ तोडावें. मीं लेंकाची आशा सोडली. त्यावरून कारभारी या विचारांत आहेत. परंतु सरदारांस ममता सुटत नाहीं. आंतून सूत्र आहे. असें करून पोसविला आहे. चंद्र १ सवालीं शुक्रवारीं अक्षतृतीयेस राजश्री सुभेदार बाईकडे वाड्यांत भोजनास व पितर घालावयास आले होते. चिरंजीवसुद्धां मंडळी सारी होती. तृतीय प्रहरीं मसलत जाली. राजश्री देवराव व कारभारी सारे होते. पुण्यास जावयाविषयीं बोलणें, सरकारतर्फेनें देवराव बोलले. त्यावरून निश्चयांत आलें. राजश्री काशीराव होळकर यांस बोलावून ताकीद केली कीं, आजचे मुहूर्त चांगले. तुह्मी आपले डेरे व ढाल बाहेर द्यावी; उदईक पागा सरंजामसुद्धां रेवापार व्हावें. त्यावरून त्यांनीं डेरे बाहेर केले होते. काल शनवारीं रेवापार डेरे दिले. पहिले, सरदाराची ढाल व डेरा मुहूर्तें करून दिला तो उभा आहे. आज पागा सरंजाम काशीराव याजकडील उतरणार. खर्चास नाहीं ह्मणोन काशीरावही आपले जागां श्रमीच आहेत. तीर्थरूपासीं बोलून आले कीं, लोकांस खर्चास नाहीं; ते कसे उतरतात? मी मात्र सडा पार जातों. असें बोलून, बुणगे उतरावयास लावले आहेत. सरदार यांचे मुहूर्त वैशाख शुद्ध ७ चे आहेत. ते टळले तर एकादशीचें श्राद्ध आहे, तें करून

त्रयोदशीस उतरावें, असें निश्चयांत आणून देवराव यांसीं उत्तर केलें कीं, श्रीमंतांसही पत्रें लिहून देतों कीं, फलाणे मितीस येऊन पोहोंचतों. राजश्री दौलतराव शिंदे यास आज्ञा न व्हावी. असा करार ठरून पत्रें लिहावयास कारकुनास सांगितलें आहे. एका दों दिवशीं पत्रें घेऊन, देवराव आपलीं पत्रें लिहून रवानगीस देतील, ती रवानगी करीन. याउपर सरदार रेवापार होऊन कूच मुक्काम समजल्यासारखें सेवेसीं लिहीन. ऐवजाची तजवीज कारभारी यांनीं केली होती. पदमसी सावकार यास बोलावून टिका केले होते कीं, दहा लक्ष रुपयांचा ऐवज महालीं वगैरे लावून देतों, तुह्मीं खर्चाचें काम चालवावें. त्यावरून सावकारानें कबूल केलें होतें कीं, याविषयीं बाईनीं खातरजमा करावी, ह्मणजे घडेल. त्यावरून कारभारी सावकारास बाईकडे घेऊन आले. बाईनीं अंगावेगळी गोष्ट टाकून बोलली कीं, मी कोणास दे ह्मणेना व नका देऊं अशीही बोलेना. तुमचें तुह्मीं चित्तास येईल तसें करावें. त्यावरून सावकार मागें सरला. विना बाईचे खातरजमेशिवाय पैसा कोणी देत नाहीं. पुढें तजवीज कशी करितात पहावें. शिलेदारांपैकीं मोठे मोठे लोकांस कांहीं वराता पेशकसी व दहकपट्टी या ऐवजापैकीं कमाविसदारावर देतात. लोकांची गलबल मिटली नाहीं. काल शनिवारीं सारवान शेंपन्नास जमा होऊन पाराजीपंत यांची पालखी घेऊन बसले होते, तेव्हां मोठे दिकतीनें त्यांशीं चार गोष्टी बोलून आपले घरास गेले. लोकांस आंगही पाराजीपंताचें आहे. कारण, त्यांजकडील आणीख कारभारी यांजकडील खाजगत ऐवज लोकांकडे फसला आहे. तो व्याज मनोतीसुद्धां उगवला पाहिजे. त्यास ऐवज लावून उगवून घ्यावा. या मनसुभ्यांत आहेत. आपले आपले स्वार्थावर आहेत. दौलतीची चिंता कोणास नाहीं. राजश्री विनायक बाजी व शिवबा बाजी यांजकडील जलदी, पुण्यास लौकर जावें ही आहे. अशी अवस्था येथील. पुढें घडेल तसें सेवेसीं लिहीन हे विज्ञापना."

---

## लेखांक २५७.

**श्री.** १३ मे इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १३ माहे सवाल बुधवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— छ ७ रमजानचें आज्ञापत्र सेवकाचे नांवें सादर जालें, तें छ २ माहे मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, तुह्मीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री देवराव यांचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. उत्तर पाठविलें आहे. प्रविष्ट करणें.

बातमीचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास त्याप्रमाणें पुढें होईल तें वरचेवर लिहीत जाणें, ह्मणोन आज्ञा. ऐशियास, येथील बातमीचा मजकूर आलादा पत्रीं लिहिला आहे. राजश्री देवराव यांचे लाखोटे त्यांस प्रविष्ट केले. सांप्रत देवराव यांचे येथें चिरंजीवाचे मुंजीचा समारंभ आहे. वैशाख वद्य ५ निश्चय केला आहे. पुढें लग्न बापूजी महादेव यांचे चिरंजीव कनिष्ठ, त्यांचें करणार आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक २५८.

श्री. १७ मे इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ माहे सवाल रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र १३ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमानः–राजश्री मल्हारराव होळकर चंद्र ११ सवालीं प्रहररात्रीं उपरांतिक येथून निघून रातोरात इंदुरास गेले. मागोमाग राजश्री बापू होळकर जमीयतीनिशीं जाऊन पोहोंचले. दुदरनेक फिरंगी तेथेंच पलटण-सुद्धां होते. त्यांसही येथून आज्ञा गेली होती कीं, कसेंही करून धरून घ्यावें. त्यावरून दोन दिवस बोलाचाली जाली. परंतु सुधे रीतीनें वाटेवर येईनात. घोड्यांस नालबंदी करून तयार होऊन, इंदुरींहून निघून जावें या विचारांत होते. हें चिन्ह पाहून, चंद्र १४ गुरुवारीं दुदरनेक फिरंगी यांनीं, याचे गोटास पलटणाचा वेढा घालून बसले. यांची जमीयत पाहून मल्हारराव बेहिंमत होऊन बापूचे गळां जाऊन पडले कीं, मजला काय करणें तें करावें. तरवार बापूपुढें ठेविली. त्यावरून बापू होळकर यांनीं मार्गाच्या बाहेरी सांगून खातरजमा केली. त्यावर उभयतांनीं भोजन एक ठिकाणीं करून, पानादिक दुराचरण करून रात्रीस नाच केला. मागील रात्रपर्यंत नाच होऊन उभयतांही निजले. त्यांत बापू होळकर बेसावध होऊन निजले. मल्हारराव सावधच होते. निजले. उठून पाहतात तों, फिरंगी याचे पाहाऱ्यापैकीं एकजण उभा होता. त्याजवर वार चालविला. मल्हारराव याचे चित्तांत कीं, पाहारा ठोकून व बापूस चीत करून आपण निघून जावें. परंतु फिरंगी याचे माणसावर वार चालवितांच सारे जागे होऊन गलबल जाली. तेव्हां दुदरनेक यांनीं जलदी करून, मल्हारराव यास धरून घेतलें. ते समयीं मल्हारराव यांची तरवार त्यांची त्यास लागली. ती छातीवर थोडीशी जखम जाली. जसे मल्हारराव सांपडले

तसे त्यांजकडील बारगीर व फिरंगी यांचे माणसांशीं आपसामध्यें तरवार चालली. मल्हारराव यांचे चार बारगीर ठार जाले. फिरंगी याचीं माणसें जाया जाहलीं. बापू होळकर याजकडील बारगीर जखमी जाले. उपरांतिक दुदरनेक यानें आपले म्यान्यांत मल्हारराव यास घालून, कुलूप जडून, आपले गोटास घेऊन गेले. आणि इकडे पत्रें पाठविलीं कीं, मल्हारराव यास धरून घेतलें, पुढें काय आज्ञा? हें वर्तमान पहिलें बाईकडे आलें. तेव्हां बाईनीं सरदाराकडे राजश्री रामराव आपाजीस व नागोपंत यांजबरोबर सांगून पाठविलें कीं, मल्हारराव यास येथें आणावें, हा सल्ला ठीक नाहीं. मागतीं पुत्रमोह तुह्मांस व आह्मांस होईल. तीन वेळ याप्रमाणें वर्तणूक जाली. लोकांत छी थू दुर्दशा! स्थिति राहिली नाहीं. त्यास आतां तूर्त कुसलगडचे किल्ल्यांत जाऊं द्यावें. त्यावरून बाईच्या बोलण्याचा आग्रह पाहून सरदारांनीं मान्य केलें. उपरांतिक सरदाराचें पत्र घेऊन व बाईनीं आपलें पत्र फिरंगी याचे नांवें पाठविलें कीं, जसें मल्हारराव यास धरून घेतलें, तसेंच कुसलगडचे किल्ल्यास पोहोंचावून किल्लेदाराची पावती घेऊन पाठवावी. याप्रमाणें पत्रें गेलीं. त्यावरून दुदरनेक व बापू काल चंद्र १६ शनिवारीं जांबेस आले. हें वर्तमान सरदारांस कळल्यावर, सरदारांस मागतीं पुत्रमोह उत्पन्न जाला कीं, आपले हातें अशी गोष्ट करणें ठीक नाहीं; श्रमी होऊन अश्रुपतन केलें. 'मी आपले डेऱ्याजवळ राहुटी देऊन ठेवीन, भोंवताला पाहारा बसवीन, दुसरी गोष्ट होणार नाहीं, हा जिमा आमचा आहे;' असें बोलूं लागले. हें वर्तमान बाईकडे समजल्यावर, कारभारी राजश्री पाराजीपंत व खंडो महादेव हे बाईशीं बोलून, बाईचा निरोप घेऊन सरदारांकडे गेले. कीं मल्हारराव यास येथें आणावें हीं तुमचीं बोलणीं, परंतु ठीक नव्हे. तीन वेळ याप्रमाणें जालें. अशी गोष्ट जाल्यास दहशत जाईल. मागतीं हेच गत. त्यास दोन महिने किल्ल्यांत राहूं द्यावें. शिक्षा लागेल. दुसरें, त्याजकडील लोकांचा गवगवा तुटेल; नाहीं तर कंपेस त्यास लाख रुपये द्यावे लागतील. तूर्त ही किफायत आहे. दुसरें, लौकिकांत चागलें. पुढें सोईवार आल्यास कुसलगड कांहीं दूर नाहीं. मागतीं आणून घेऊं, तूर्त जाऊं द्यावें. असा आग्रह बाईचा व कारभारी यांचा पाहून, सरदारांनीं कबूल केलें. त्यावरून तेथें राहण्याची स्वस्थता बाईनीं केली. कारकून त्याजवळ राहावयास, राजश्री जीवनराव अण्णा पागनीस यांस नेमलें आहे. मल्हारराव यास आज कुसलगडास घेऊन जाणार आहेत. त्यांनीं उपोषणें मांडलीं आहेत. अन्न घेत नाहींत. याप्रमाणें वर्तमान आजपर्यंत जालें. पुढें होईल तसें सेवेसीं लिहीन. येथील वर्तमान, खर्चाची तजवीज सावकाराशीं बोलून ठीक केलें आहे, यादी जाल्या आहेत. खतपत्र

जाल्यावर ऐवज घेतील. घरणीं लोकांचीं नित्य होतात, तशींच होत आहेत. चंद्र १५ शुक्रवारीं एका बारगिरानें कटार पाराजीपंतावर चालविली होती, परंतु बचाव जाला. पुढें होईल तसें लिहीन. सेवसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २५९.

श्री. २४ मे इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २४ माहे सवाल रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र १७ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री मल्हारराव होळकर यास चंद्र १८ सवालीं दुदरनेक फिरंगी यांनीं कुसलगडास दाखल करून, किल्लेदाराचें पत्र घेऊन इकडे पाठविलें; आणि आपण माघारे फिरून इंदुरास गेले. राजश्री बापू होळकर जांबेहून येथें आले. मल्हारराव यांचा क्रोध बापूवर भारी. जांबेहून जातांना बोलून गेले कीं, वांचलों तर हात दाखवीन. त्यांचा सरंजाम वस्त्रादिक सर्व नेमणूक करून, येथून पोहोंचता केला. पत्रें वरचेवर जातात. त्यांचे बंदोबस्ताविषयीं व खाण्यापिण्याविषयीं जातात. अन्न पुरतें खात नाहींत, उपास करितात. जखम लागली त्यास शेकूं देत नाहींत. अशी अवस्था त्यांची! इकडे त्यांची स्त्री सौभाग्यवती गौतमाबाई फार आक्रोश करते, अन्न खात नाहीं. सरदारांची प्रकृति ठीक नाहीं. पुत्रमोहेंकरून श्रमी आहेत. गंगाजलनिर्मल हरकूबाई यांस बोलावून सांगितलें कीं, तुह्मीं बाईकडे जाऊन बाईशीं बोलून चिरंजिवाचा जिमा, तुह्मीं आपला जिमा करून घेऊन, त्यास येथें आणवावें. उभयतां स्त्रीपुरुष उपास करितात, उष्णकाल, दिवस ठीक नाहीं. अथवा मुलीस तरी तेथें पाठवावें. याप्रमाणें सुभेदार मावशीशीं बोलले. परंतु मल्हारराव यांचे वर्तणुकीचें सुख कोणास नाहीं. बाईची मर्जी पाहून, हरकूबाईनीं गोष्ट टाळली. बाईचें व कारभारी यांचें बोलणें कीं, तूर्त दोन महिने आणावयाचें नाहीं; पुढें आणून घेऊं. याप्रमाणें आग्रह पाहून सरदार आपले ठिकाणीं खिन्न आहेत. मागें पुढें बोलतात कीं, ब्राह्मणास चिरंजीव देखूं साईना; इतका प्रकार यांनींच केला. चिरंजिवास कारागृहीं घातलें; पुत्राचा अन्याय वाटत नाहीं. पथकांपैकीं शिलेदार व हशमी लोक शिंदे वगैरे येथें होते, त्यांजभोंवतीं चौकी होती. तेव्हां लोकांपासून जबरदस्ती फारखतीया लिहून घेऊन, येथून काढून दिलें. मल्हारराव यांचे निसबतीचें माणूस कोणी ठेवलें नाहीं. बुणगे, चीजबस्त, डेरे राहोट्या,

हत्ती उंट वगैरे होते, ते सर्व जिकडील तिकडे कारखान्यांत लावून घेतले. याप्रमाणें सांप्रतकाळीं खूळ मोडलें आहे. चंद्र २० सवालीं राजश्री दादाजी गंगाधर यांचीं पत्रें पुण्याहून आलीं. त्यांतील अर्थ कीं, श्रीमंतांनीं चौ कलमांस रुकार दिल्हा, सत्वर हुजूर बोलावलें आहे ह्मणून, व शिंदे यांजकडील वर्तमान सरकारांतून वस्त्रें मुतालकीचीं वगैरे जालीं; निरोप होणार. हें वर्तमान ऐकून, बहुतच खिन्न हे आपले ठिकाणीं जाले. राजश्री रामजी पाटील निसबत शिंदे यांचेंही पत्र आलें होतें. त्यावरून पुण्यास जावयाची जलदी बाईकडून फार आहे. वरचेवर ताकीद सरदारांस फार होती. कारभारी यास दोन वेळां बाईनीं सरदारांकडे पाठवून, देशीं जाण्याचा निश्चय ठरविला. जोशी बोलावून मुहूर्त विचारले. ज्येष्ठ शुद्ध पक्षीं द्वितीया, पंचमी, सप्तमी याप्रमाणें बोलतात. निश्चयांत एक मुहूर्त येऊन, येथून रेवा दक्षिणतीरीं जातील तसें वर्तमान सेवेसीं लिहीन. ऐवजाची तजवीज तूर्त पांच लक्ष रुपयांची केली आहे. लष्करचे सावकार दोघे व येथील पदमसी याजकडे कर्जाऊ ऐवज टिका करून, खतें लिहून, सदरहूची दिधली. यास ऐवज महालीं वगैरे लावून दिल्हा. आणि तूर्त सावकारापासून नगदी ऐवज घेतला. याची फेड जाली ह्मणजे पुढें आणखी ऐवज घ्यावा असा करार सावकाराचा आहे. लोकांचें देणें त्यापैकीं, कार्याकारण पाहून चिठ्या देतात आणि कबजे घेतात. राजश्री पाराशर दादाजी यांस सुभेदारांनीं सांगितलें कीं, पांच लक्ष रुपयांची तजवीज केली. इतक्यांत लोकांची समजावीस पाडावी. त्यावरून पाराजीपंतीं उत्तर केलें कीं, इतका ऐवज कसा पुरतो? तेरा लक्ष रुपये पाहिजेत. तेव्हां लोकांची समजोती पडोन तुमचें निघणें होईल. हें उत्तर सुभेदारांनीं ऐकून, पाराजीपंतावर राग केला. बोलले कीं, तुमचे चित्तांत दौलत बुडावी असें आहे. नारोपंताची गोष्ट विलग पाडून आजपर्यंत या थरास आणली. त्यावरून पाराजीपंत रुसून जात होते. तेव्हां राजश्री शिवाजी गोपाळ वगैरे यांनीं समजाऊन आणले. त्यांचें लक्ष पुण्यास जावयाचें नाहीं. लोकांकडून मलई करऊन ऐवज उगवावा, आणि आपण बाईजवळ असावें असें आहे. पारनेरकर मंडळी दादाजीचे बोलण्याप्रमाणें सरदारांस येथून काढून पुण्यास येतात. वरकड मजकूर बारीक मोठा, राजश्री देवराव यांनीं आपले पत्रीं लिहून लाखोटे दिल्हे, ते सेवेसीं रवाना केले आहेत. सविस्तर श्रवणांत येईल. देवराव यांचे पुत्राची मुंज वैशाख वद्य ५ होऊन पुतण्याचें लग्न वा। १० स लागलें. उदईक साडे होतील. शरीरसंबंध राजश्री आत्माराम नारायण भडगांवकर सत्पुरुष, श्रीपंढरपुरीं वास्तव्य होतें, यांचे कन्येशीं केला. इकडील समारंभ बाईनींच केला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६०.

श्री. १४ जून इ. स. १७९४.

“सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ माहे जिलकाद मंदवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान, चंद्र २४ माहे सवालीं विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमानः—राजश्री सुभेदार यांची पुण्यास जावयाची जलदी होती. मुहूर्त विचारून ठेविले होते. ज्येष्ठ शुद्धपक्षीं द्वितीया, पंचमी, त्रयोदशी तितकेही राहिले. मागतीं, विचारांत पडून दिवसगतीवर टाकलें आहे. पेशजीं मुहूर्तेंकरून रेवापार डेरे दिल्हे होते, ते वाऱ्यांनीं पडले होते, ह्मणून माघारे आणविले. लोकांचा गवगवा मिटत नाहीं. नित्य उठून धरणीं बसतात; तशीं चाललींच आहेत. राजश्री बापूजी होळकर यांजकडील लोकांचा हंगामा. एक दिवस उन्हांत देखील बसविले होते. राजश्री काशीराव होळकर यांजकडील लोकांचीं धरणीं आहेत. वरकड शिलेदारांचीं धरणीं राजश्री पाराशर दादाजी यांजकडे, नित्य उठून सायंकाळपर्यंत बसतात, मागतीं उठतात. याप्रमाणें गवगवा नित्य आहे. पैशास ठिकाण नाहीं. ऐवज लोकांचे पदरीं पडत नाहींत. सावकाराकडे पांच लक्षांची तजवीज केली होती. खतें लिहून देऊन लोकांच्या चिट्ट्या देखील केल्या होत्या. परंतु सावकाराची खातरजमा बाईकडून पक्केपणें न होय ह्मणून नकार करून चिट्ट्या फिरल्या. याचें कारण, पेशजीचें देणें सावकाराचें सात लक्षपर्यंत आहे. त्याची फेड, पेस्तरसालीं महाली ऐवजावर वराता लावून द्याव्या, हा करार होता. येविषयीं बाईचें बोलणें पडलें कीं, पुढें ऐवज लागेल तो सावकारांनीं द्यावा, असें कबूल करावें तेव्हां सात लक्षांची फेड होईल. त्यास पुढील करार सावकाराकडून बोलण्यांत न ये. पांच लक्ष रुपये देणें कबूल केलें. त्यास ऐवज तथा लावून द्यावा असें होतें. परंतु मागील बोलण्याकरितां ही गोष्ट फिरली. याजकरितां पुण्याचे रवानगीस अडथळा पडला. लोक-बदलले तेव्हां येथून निघणें कसें होतें? सरंजामी यांजवर पट्टी करावी, एकसाल ऐवज त्यांजकडून घेऊन सावकारास द्यावा, असा विचार कारभारी यांनीं सरदारांशीं करून बाईकडे आले. या गोष्टीचा सल्ला बाईस विचारतांच, बाईची मर्जी रुष्ट होऊन उत्तरें जालीं कीं, तुमचे चित्तास पडेल तसें करावें. मजला काय पुसतां? तुह्मी जाणे, तुमची दौलत जाणे. बुडवा अथवा तारा. बुडाली तर आहेच. सरंजामी पैसा कोठून देतील? ते तुह्मांबरोबर चाकरीस नव्हते कीं काय? आपले घरीं बसले असते, आणि तुह्मी तरवार गाजवून आलां असतां,

तर त्यांजपासून पैसा घ्यावयास ठीक पडतें. या गोष्टीचा सल्ला मजला पुसूं नका. तथापि एखादी गोष्ट तुह्मांस करणें तर फणशे निराळे करून करा. असें बोलून तीन दिवस मर्जी दिक होती. कारभारी यांशीं भाषणें नीट केलीं नाहींत. शरीरप्रकृतीवर टाकून, मस्तक दुखतें ह्मणून गैरराबता करून होती. मागतीं कारभारी यांनीं या गोष्टीचें लक्ष सोडून, येऊं जाऊं लागले. राजश्री देवराव हिंगणे यांजकडील लग्नाची समाप्ति होऊन सर्वांस मेजवान्या जाल्या. सरदारां-कडील जाण्याचा विचार मंद पाहून, देवराव चंद्र ३ जिलकादीं बाईकडे येऊन बोलले कीं, सरकारचें पत्र मजला आलें आहे कीं, राजश्री सुभेदार यांचे येण्यास विलंब असल्यास तुह्मीं उठून यावें त्यास येविषयींची काय आज्ञा? पुण्यास जाण्याची तजवीज कांहींएक नाहीं. पुढें विचार तो कोणता? आह्मांस निरोप द्यावा. याप्रमाणें बोलणीं कित्येकां प्रकारें जालीं. त्यावरून बाईनीं सांगितलें कीं, "तुह्मीं लष्करांत चिरंजीवाकडे जाऊन, त्याशीं चार गोष्टी निक्षून बोलाव्या कीं, असें बसल्यानें परिणाम शुद्ध नाहीं." त्यावरून, देवराव दुसरे दिवशीं सरदारांकडे जाऊन, त्यांशीं एकल्याशींच खलबत केलें. चार गोष्टी बऱ्याच बोलावयाच्या त्या बोलले कीं, "सुभेदार असे बसल्यांत परिणाम नीट नाहीं. दौलत बुडती. लौकिक मिळविला तितका गेला. तुह्मी सरदार असून, सरंजामी याचे पदावर आलांत. त्यास सरंजाम तरी राखावा. लोकांचे हांगामें नित्य उठून ते काय? कारभारी यांकडून त्यांचा बंदोबस्त पुरता न होय. तुह्मी सरदार असतां, दोनशें लोक जिवाचे कलबिकल पडल्यास जवळ नाहींत. त्यास, याचा सल्ला आह्मी सांगतों याप्रमाणें तरी करावी. बाईनीं वीस लक्ष रुपये आज-पर्यंत तुह्मांकडे पाठविले. त्याचा खर्च विचाराचे वाटेनें जाला. एकाचेंही कोणाचें देणें वारून जवळ लावून ठेविलें नाहीं. चहूंकडून सर्वांचे हांगामे एकदांच होतात. त्यास, हल्लीं फिरंग्याचें पलटण जवळ आपलें बोलावून ठेवावें. हुजुरात व सरंजामी यांची खातरजमा करून, व बारगिरांची व शागीर्दपेशाची समजुती दोन लक्षांत करून, येथून झडाडून निघावें. याउपर शिलेदार वगैरे कोणी गवगवा करितील, त्यांस दाबून चालावें. ज्यास देणें त्यास मनुष्य पाहून थोडे बहुत देऊन, लगामीं लावून घ्यावें. बाकी शिलेदार येथें ठेवावे. राजश्री पाराजीपंत यांचें मानस यावयाचें नाहीं. त्यापक्षीं येथेंच राहूं द्यावें. लोकांची समजुती विचारें विचारें बाई काढतील. तूर्त प्रसंग रक्षावा हें चांगलें. सरकारआज्ञेस येथून निघावयास विलंब नसावा. आह्मांस बोलाविलें. उठून या ह्मणून पत्रीं लेख. त्यास या गोष्टीचा विचार पुरतेपणें ध्यानास आणावा.

आह्मीं येथून गेल्यावर कठीण पडेल. अस्तु. आपणास विलंब असल्यास आह्मांस निरोप द्यावा. सरकारआज्ञेप्रमाणें केलें पाहिजे." त्यावरून सुभेदाराचीं उत्तरें कीं, "तुह्मी बोललां, याप्रमाणें करून आह्मी लवकरच येथून निघतों. तुह्मीं न जावें. समागमेंच जाऊं. याप्रमाणें श्रीमंतांसही पत्रें लिहून देतों कीं, राजश्री देवराव यांस सरकारचें पत्र बोलावण्याविषयीं आलें. त्यास मशारनिल्हेंनीं निरोप मागितला, परंतु आह्मीं चार दिवस ठेऊन घेतलें. आमची येण्याची जलदीच होती, परंतु लोकांचे समजाविसीचा गवगवा सहा वर्षांचा. ह्मणून ऐवजाची तजवीज करावयास व तोड लोकांची पडावयास दिवसगत लागले. याउपर देवराव व आह्मी समागमेंच लवकर येतों." याप्रमाणें पत्रें लिहून देणार. देवराव यांचे बोलण्यावरून सरदारांस व कारभारी यांस कळकळ लागून नित्य उठून सहा रोज लागोपाठ बाईकडे सरदार येत होते. सावकाराची खातरजमा करावयाविषयींचें बोलणें होऊन, बाईनीं सावकाराची खातरजमा केली कीं, चिंता नाहीं. तुमचा ऐवज उगवून देईन. त्यावरून पांच लक्ष रुपये सध्यां द्यावे असें ठरलें. त्यास ऐवज लवकर पदरीं पडे असा लावून दिल्हा. पेशजीचें देणें त्याच्या वराता, पेस्तरसालावर महालीं कमाविसदारांकडे लावून द्याव्या, असा करार ठरला. ते दिवशीं बोलणें बाईचें सुभेदाराशीं पडलें कीं, पुण्यास जावयाकरितां लवकर रेवापार उतराल, तर सावकाराची खातरजमा करिते. पुढेंही लाख पन्नास हजार रुपये देईन; परंतु लवकर जावें. तथापि, सुभेदारांचें उत्तर, दोन घटकांपर्यंत तोंडांतून निघालें नाहीं. तेव्हां कारभारी राजश्री शिवाजी गोपाळ व खंडो महादेव यांनीं गडबड करून 'हो' ह्मणविलें. असे भयभीत आहेत. दुसरें, बाईचें बोलणें कीं, हे येथें राहिले तर मी उठून इंदुरास जाईन. बाईकडे गुंता राहिला नाहीं. परगणे शिरोंज येथील मामलत राजश्री रामराव कासी कवठेकर यांजकडे सांगितली. सनद, शिरपाव चंद्र ९ जिलकादीं दिल्हे. रसदेचा भरणा अडीच लक्ष रुपये ठरावून सावकाराकडे परभारां पांच लक्षांऐवजीं करविला. माजी मामलेदार, राजश्री शंकराजी सदाशिव येथेंच आहेत. त्यांचें फाजिल, दीड लक्षपर्यंत हिशेबीं आहे. रामराव यांजकडे, सिरोंज पहिलें वांकडे यांजकडून गुमास्तगिरीनें होती, हल्लीं पैशाचें कूळ पाहून मामलत सांगितली. मक्ता करून दिल्याप्रमाणें कोंच येथीलही घालमेल करणार. एक दोघे मामलेदार उभे आहेत. पहावें कोणाकडे सांगतील. बोलणें होत आहे. टोंक व बुंदी पंचपहाड मिळून सात लक्षपर्यंत तजवीज आहे. सांप्रत पांच लक्ष रुपयांपैकीं लोकांस चिठ्या देऊं लागले. हुजुरात पागेचे बारगीर व

शागीर्दपेशा व पलटणचे लोकांस व कांहीं शिलेदार. याप्रमाणें लोकांचे हिशेब आकारून, बाईस देणें दाखविलें; त्याअन्वयें देतात. कांहीं शिलेदार राहिले त्यांस, वराता दहकपट्टी व पेशकसी व कोव्याचा ऐवज हाही सात लक्षपर्यंत ऐवज याजवर लावून देतील. होगाडे महाजन यांस पैसा पावता नव्हता. ह्मणून पागेचे घोड्यांची चंदी एक मास होत आला, बंद आहे. खांसे घोड्यास मात्र चंदी पावत होती. हल्लीं ऐवज दिल्हा; चंदी सुरू होईल. कही कबाडाचा उपद्रव आसपास महालास फार जाला. सरकारी महाल परगणे कसरावद येथील गांवची कही तमाम करून कडबी आणली. लावणीचे दिवसांत लोकांचें नुकसान फार जालें. कमाविसदारांचे बोभाट वरचेवर येतात. त्यास रखवालीस स्वार, प्यादे देतात. परंतु कही व्हावयाची ती होती. लोक मानित नाहींत. बेबंद कारभार आहे. लोकांस दहशत काडीमात्र नाहीं. भिल्लांनीं उपद्रव खानदेशांत व खरगोण वगैरेयांचे महालांत अतिशय मांडला आहे. सेंदव्याचे घाटाखालील करवंदी मातबर गांव मारून नेला. त्याचा बोभाट येथें आला. त्यावरून चार पागा भिल्लांचे पारिपत्यास्तव रवाना केल्या आहेत. पेशजीं राजश्री आनंदराव बनाजीस, शिरपांव व खर्चास पागा सरंजाम देऊन, भिल्लांवर बिदा केलें. ते हा कालवर येथेंच आहेत. हल्लीं त्यांस ताकीद जावयाविषयीं जाली आहे. दुदरनेक फरासीस यास इंदुरींहून पलटणसुद्धां बोलाविलें आहे. ज्येष्ठ वद्य ५ श्रवणावर मुहूर्त काढला आहे. या मुहूर्तास पार जातील असें दिसत नाहीं. बेसरंजाम! घोड्यास बारगीर पोरगे पुरते नाहींत, रिसाल्यास उंट नाहींत! हांगामे मात्र होतात, अशी अवस्था आहे. एक मुहूर्त टळला ह्मणजे एक काढितात. प्रमाण नाहीं. राजश्री व्यंकाजी रामचंद्र शेणवई यांजकडील पागा त्यांस आहे, त्यांचे विद्यमानेंकरून राजश्री बाळोबा पागनीस व सरदार दौलतराव शिंदे यांस पत्रें सरदारांनीं, मिळवून घेण्याविषयीं लिहिलीं आहेत. बाईकडेही पत्रें लिहून देण्याविषयीं आग्रह केला. परंतु बाईनीं पत्रें देण्याविषयीं परवानगी दिल्ही नाहीं. येथून कूच जालें ह्मणजे व्यंकाजी रामचंद्र यांस पुढें रवाना करणार. याप्रमाणें निदर्शनास आलें, तें सेवेसीं लिहिलें आहे. पुढें होईल तें लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६१.

श्री. १८ जून इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १९ माहे जिल्काद बुधवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान छ १५ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री देवराव तात्या हे आपलें कुटुंब व चिरंजीवसुद्धां मंडळी, पुढें चांदोरीस रवाना करणार ह्मणोन, बाईनीं वाड्यांत बोलावून मेजवानी छ १५ रोज रविवारीं केली. वस्त्रें सर्वांस दिल्हीं. राजश्री सुभेदार ते दिवशीं वाड्यांत आले होते. भोजनानंतर जाण्याविषयींचें खलबत जालें. जोशी बोलावून मुहूर्ताचा निश्चय केला. पंचमीचे मुहूर्त राहेले. आषाढ शुद्धपक्षीं द्वितीया, सप्तमी, दोन मुहूर्त पाहिले. निश्चय ठरविला कीं, द्वितीयेस काशीराव यांनीं नर्मदा उतरावी, सप्तमीस खाशांनीं उतरावें. याप्रमाणें बोलून निरोप घेतला. किरकोळी सरंजाम छकडे व गुरें ढोरें वगैरे उतरावयास लावलीं आहेत. तीं पुढें सेंदव्यास जाऊन ठेपतील. इतर जाण्याची तजवीज कांहीं एक नाहीं. पहावें, घडून येईल तसें सेवेसीं लिहीन. राजश्री देवराव यांस राहून घेतलें. याजकरितां सरकारांत पत्रें लिहून दिल्हीं तीं, व देवराव यांनीं बोलणें केलें तो मजकूर बारीक मोठा, त्यांनीं आपले पत्रीं लिहून लाखोटे डांकेस रवाना करावयास दिल्हे ते, सेवेसीं पाठविले आहेत; प्रविष्ट होतील. वरकड कारभार, लोकांचे देणेंयाच्या चिठ्ठयापत्र्या सावकारांकडे देतात. पांच लक्ष रुपये सावकारांकडे केले, त्याची नेमणूक जाली. त्याची याद आलाहिदा लिहिली आहे. शिलेदाराचें देणें झाडून द्यावें ह्मणोन, सरदारांचा व पाराजीपंत यांचा फुट पडला आहे. सरदारांचें बोलणें कीं, ज्याचें शंभर राऊत, त्यास दोन हजार रुपये तूर्त द्यावे. नाहींतर दुसरे, ज्याचें देणें यादीस काढलें, त्यापैकीं दोन हिशे द्यावे. बाकी चांदोडास गेल्यावर देऊं. ज्याचे शंभर राऊत त्यांनीं, पंचवीसां रावतानशीं तूर्त जवळ रहावें. पुढें काम लागेल तसें ठेऊं. याप्रमाणें सरदार बोलतात. परंतु हजरी गणती कांहींएक नाहीं. सर्व यादीवरून बोलतात. असा चोरकारभार आहे. हंगामे मात्र भारी होतात. शिलेदाराकडे दोन लक्ष रुपये नेमले, त्यापैकीं पाराजीपंत कळेल तसें देतात. पांच लक्ष रुपये सरले. पुढें जाण्याचे खर्चाची तजवीज दुसरी करतील. पुढें घडेल तें सेवेसीं लेखन करीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २६२.

श्री. १० जुलई इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १२ माहे जिल्हेज गुरुवासरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान छ ८ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री तुकोजी होळकर यांचा मुहूर्त आषाढ शुद्ध १२ बुधवारीं बारा घटके होत होता, त्याप्रमाणें तजवीज केली. कारभाराचीं वस्त्रें कोणास द्यावीं, त्यांजपासून पांच सात लक्ष रुपये तूर्त खर्चीस घेऊन, लोकांचें देणें देऊन, येथून निघावें. त्यावरून गंगाजल-निर्मल अहिल्याबाई यांनीं विचार करून दिवाणगिरीचें काम, नारो गणेश यांचें, त्यांचे चिरंजीवाकडे सांगावें. त्यांचे भाचे राजश्री बाळाजी लक्ष्मण यांस बोलावून सांगितलें कीं, तुमचें काम तुह्मीं सांभाळावें. त्यांनीं उत्तर केलें कीं, धन्याचा हात मस्तकीं असला पाहिजे, कबूल आहे. त्यास, या जाबसालांत बाईनीं राजश्री देवराव यांस घातलें. पहिलें बोलणें देवराव यांसीं व बाईशीं जालें. देवराव यांनीं बाळाजी लक्ष्मण यांजकडील जाबसाल ध्यानास आणिले. त्यास बाळाजी लक्ष्मण यांचें बोलणें पडलें कीं, काम करितों; कबूल आहे. तूर्त सावकार येथें आह्मांस कोण होतो? पुण्यास गेल्यावर श्रीमंतांचे समक्ष बंदोबस्त करून द्यावा. तेथें सावकार आहेत. एखादी गोष्ट घडेल. बाईचें बोलणें कीं, येथेंच करावें. त्यास फौजेचा गवगवा, आह्मी काम करितों, यामागील खरकटें पारनेर-कर व राजश्री पाराशर दादाजी यांनीं आपलें वारावें. पुढील आमचें आह्मी सांभाळून घेऊं. असें घडत असल्यास सिद्ध आहोंत. तेव्हां बाईनीं देवराव यांचे समक्ष राजश्री शिवाजी गोपाळ यांस बोलावून पुसलें कीं, दौलतीचा बंदोबस्त तुमच्यानें होत असल्यास करावा. वीसां लक्षांची तजवीज करावी. तेव्हां येथून निघणें, व पुढील स्वारीचा विचार घडतो. याचें उत्तर काय तें सांगावें. त्याचें उत्तर त्यांनीं केलें कीं, आह्मांकडून ऐवजाचें काम होत नाहीं. लिहिण्याचें काम, पदरीं आहोंत त्यापक्षीं चाकरी सांगाल ती करूं. दुसरा विचार घडत नाहीं. असें साफ उत्तर केलें. कारभार कोणास तरी सांगावा. तेव्हां पाराशर दादाजी व खंडो महादेव यांस बोलावून सांगितलें कीं, फौजेचा गवगवा हा तुमचे हातचा तुह्मीं वारावा. पुढील स्वारीखर्च वगैरे नवा कारभारी उभा राहील तो करील. असें बोलतांच यांचीं उत्तरें निघालीं कीं, आह्मीं कोठून मागील गवगवा वारावा? जो कारभारी होईल तो सारेंच खटलें आटोपील. आह्मांजवळ

काय वस्त असेल ती घ्यावी. या प्रकारें अपत्याईच्या गोष्टी सांगितल्या; आणि लोकांस चिथाऊन दिल्हें कीं, तुह्मीं धरणें करून ऐवज मागावा. याउपर छ ९ जिल्हेजीं सोमवारीं, बाईनीं देवराव यांस बोलावून सरदारांस बोलाऊं पाठविलें कीं, बाळाजी लक्ष्मण यांची गोष्ट सिद्ध करून वस्त्रें द्यावीं. तेव्हां हें वर्तमान लष्करचे कारभारी यांस समजलें. बाईचें बोलावणें गेलें. सरदारांची स्वारी सिद्ध जाली, तों ........, शिलेदार पन्नास रावतांचे पथकाचे धनी आडून बसले. स्वारीस गुंता पडला. हें वर्तमान बाईकडे समजलें कीं, शिलेदारांचें धरणें बसलें. उपरांतिक दोन तीन जासूद बोलाऊं पाठविले. तेव्हां कारभारी यांनीं सांगून पाठविलें कीं, शिलेदारांची समजूत पाडून, दोन घटका रातपर्यंत सरदारास घेऊन येतों. यावर देवराव यांचें बोलणें बाईशीं होऊन, बाई स्नानास गेली. देवराव यांनीं सांगितलें कीं, सरदारांची स्वारी येथें आल्यावर, त्यांस रात्रीचें येथें ठेऊन घ्यावें. दुसरे दिवशीं एकादशी मंगळवारीं तुह्मांजवळ रहातील. द्वादशी बुधवारीं निरोप देऊन पार उतरावें. उपरांत सायंकाळीं सरदारांची स्वारी वाड्यांत आली. सोमवाराचे भोजनानंतर खलबत दीडप्रहररात्रपर्यंत, कारभारी पाराजीपंत, खंडो महादेव, नागोपंत, सुभेदार, बाई व देवराव, मागून बाळाजी लक्ष्मण यांसही बोलाविलें. भवति न भवति जाली. शिलेदारांचें खरकटें वारावयास कोणी उभा राहीना. ते दिवशीं रात्रीं सुभेदार तेथेंच राहिले. मंगळवारीं एकादशी, बाईस दिवसाचें मौन. सुभेदारांकडेच कारभारी यांची व देवराव यांचीं बोलणीं जालीं. शेवटीं रात्रीं बाई बोलूं लागलीयावर राजश्री खंडोपंत व नागोपंत व देवराव व बाई व सुभेदार यांचीं बोलणीं एकांतांत जालीं. उपरांत दीड प्रहर रात्रीस पाराजीपंत यास बोलाऊं पाठविलें. जावयाचा विचार केला. त्यास लोकांचा गवगवा, मुहूर्ताचे संधीस लोक येऊन पालखी घेरणार, तेव्हां रेवापार जाणें कसें होतें? हा मुहूर्त टाळावा असें कारभारी यांचे मनांत. तेव्हां देवराव यांनीं नेट दिल्हे कीं, असें करितां तर आह्मांस निरोप द्यावा; नाहीं तर उदईक बारा घटकेंत निघावें. आह्मी तुमचे बरोबर चालून पार नेऊन घालितों. पलटण•आणून उभें दुतर्फा करावें. कोणता शिलेदार येतो आणि आडवितो, त्यासीं आह्मी जाबसाल करूं. श्रीमंतांची दाही देऊं. याप्रमाणें अडीच प्रहर रात्रीस बोलून निश्चय केला कीं, उदईक बारा घटकेंत पार उतरावें. उपरांतिक कारभारी वगैरे पावणे तीन प्रहर रात्रीस आपले घरोघर गेले. दुसरे दिवशीं प्रातःकाळींच देवराव वगैरे कारभारी वाड्यांत जमा जाले. जोशी यांनीं घटका घातली होती. दहा घटका दिवस आल्यानंतर, सुभेदारांनीं बाईचा निरोप घेतला. बाईनीं, सुभेदारांस वस्त्रें, सफेत

शालजोडी, व चंदेरी शेला, पागोटें, किनखापी ठाण, महमुद्या चंदेरी दोन, याप्रमाणें वस्त्रें देऊन बिदा केलें. उत्तरेचा सन्मुख चंद्र घेऊन नाव घाटावर आले. निशाणाचा हत्ती पुढें व नगाऱ्याचा हत्ती मागें. देवराव, पाराजीपंत बरोबर जाऊन रेवापार नावेंत बसून उतरले. पर्जन्य थुई थुई येत होता. अकरा घटका जाल्यानंतर बाईचे पायांवर डोई ठेविली, व देवास श्रीमार्तंडास नमस्कार करून रेवा उतरले. दक्षणतीरीं डेरेदाखल पावसांतच जाले. तेथें देवराव यांनीं दोन मोहोरा नजर केल्या. पाराजीपंत व नागोपंत वगैरे यांनीं एक एक मोहोर, एकूण सात मोहोरा नजर जाली. उपरांत दों प्रहरांचे अमलांत, देवराव, पाराजीपंत, रामराव आपाजी, नागोपंत, असे अलिकडे उतरून आले. सुभेदार जातांनीं हुषारीनेंच गेले. जातांनीं बोलले कीं, श्रीमंतांपुढेंच मरून जाईन. ब्राह्मणांनीं बुडविलें. आतां इकडे तिकडे काय मरावें? श्रीमंतांचे समक्षच जें होणें तें होईल. सारांश, देवराव यांचे नेटानें पार जाणें जालें. पुढें शुक्रवारीं दों कोसांवर जाऊन मुक्काम करावा, असें बाईचें बोलणें जालें आहे. आठ पंधरा दिवस आणखी लागतील. खर्चाची तजवीज जाली पाहिजे. लोकांचे देण्याची तोड पाडली पाहिजे; तेव्हां पुढें कूच होईल. नारो गणेश यांचे मुलाकडीलही बोलणें तुटलें नाहीं. येथून पुढें घडेल तसें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६३.

**श्री.** १५ जुलई इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १७ माहे जिल्हेज भौमवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान चंद्र १३ माहे मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर येथील वर्तमान, राजश्री तुकोजी होळकर सुभेदार चंद्र ११ माहे मिनहू बुधवारीं मुहूर्तेंकरून बाईचा निरोप घेऊन रेवापार उतरले. त्या मुहूर्तास शकुन चांगले जाले नाहींत. प्रथम नावेंत बसतां, शिक्केकटार धरणार नावेंत चढतां पडला. दुसरें, नगारे नावेंत चढवितां, एक नगारा फुटला. तिसरें, पर्जन्य येत होता, तो पांच दिवस झड लागूनच राहिला. त्यांत दोन दिवस रात्रंदिवस एकसारखा पडला. त्या थंडीमुळें हत्तीस सर्दी जाली. आधींच रातब मसाले पुरते पोंहचत नव्हते. त्यांत पर्जन्याचे हवेमुळें दोन हत्ती नग चांगले चंद्र १६ रोजीं मृत्यु पावले. इकडे मातुश्री अहल्याबाईच प्रातःकाळीं

पायीं खडाव घालून गौतमीचे दर्शनास जात होती. त्यांत खडावसुद्धां पाय खरकला. त्यामुळें पाऊल जरबेंत येऊन मोचलें. दुखापत जाली. यावरून सरदारांचे चित्तांत खतरा गेला. चंद्र १३ शुक्रवारीं कूच करावेंसें होतें, तें केलें नाहीं. खासे डेरे व जामदारखान्याच्या राहोव्या मात्र टाळून, अघाडीचे पिछाडीस बनाचे पल्यावर मार्ग सरून रेवातीरीं पश्चिमेकडे दिल्हे. ते दिवशीं सारवान उंटें घेऊन येईनात. डेरे खोलीनात. खर्चीस नाहीं ह्मणून अडून बसले. तेव्हां सरदारांनीं कपाळावर हाणून, बाईकडे सांगून पाठविलें. तेव्हां बाईनीं आपले खिजमतगार, जासूद पाठवून डेरे देविले. या प्रकारें पैसा देऊन लोकांची आवस्था! दिवाणगिरीचा कारभार नारो गणेश यांचे मुलाकडे सांगावा हें बोलणें लागलें होतें. मागील फौजेचें देणें, त्याची आड पडली होती. शेवटीं मागील लोकांचें देणें त्याचे फडशे करावे, असें कबूल केलें. पांच सात लक्ष रुपये-पर्यंत ऐवज लागेल, तो सध्यां ऐवज मोबदल्यास द्यावा. यास ऐवज कोटें संस्थानचा व महाल बुंदी, कोच वगैरे लावून घ्यावा. पुढें स्वारीखर्चास व फौजेची संचनीस ऐवज वीस लक्षपर्यंत खर्च करून श्रीमंतांजवळ जावें, मोहीम सांगतील ती मसलत मारावी, या प्रकारें करारांत आणलें. दुसरें, त्यांनीं चार कलमें लिहिलीं होतीं कीं, पंचपहाड महाल सोडावा व आंबाडची फडणविसीची असामी द्यावी. दरसालाचा ऐवज आमचा आह्मी पूर्ववत्प्रमाणें घेऊं. चवथी पोतनिशीची असामी आमची आह्मांकडे चालवावी. इतक्या कलमांस बाईनीं रुकार देऊन सर्वस्वी आंतून खातरजमा केली. सरदारांचीं मर्जी, यांजकडे कारभार सांगावा अशी नव्हती. त्यांत पारनेरकरही बुद्धिभ्रंश करीत होते. त्यास, बाईनीं निरोप राधी वगैरे याजहातीं सांगून पाठवून ठिकाणास आणिलें कीं, मी जी गोष्ट करीन ती तुह्मीं निभावली पाहिजे. शेवटीं बाईचा आग्रह पाहून, सरदारांनीं रुकार दिल्हा. त्यांचे वरचेवर निरोप येत गेले कीं, मजला एक वेळ आज्ञा होईल तर वडिलांचे पाय पहावयास येईन; आणि हा मुहूर्तही टाळला पाहिजे. त्यावरून बाईनीं कारभाराची गोष्ट सिद्ध केलीच होती. ती चंद्र १६ आषाढ वद्य २ सोमवारीं सरदारांस निरोप पाठवून अलीकडे बोलाविलें. तेही अठरावे घटकेस रेवा उतरून, अलीकडे बाईजवळ आले. भेट होऊन दोन घटकां बोलणें जालें. कारभाराचीं वस्त्रें आजच द्यावीं असा निश्चय करून, जोशी बोलावून समय विचारला. तेव्हां त्यांनीं मागील सहा घटका दिवस राहतां वस्त्रें द्यावीं असें सांगितलें. ते समयीं जोशी यावरही सरदार रागास आले कीं, बुधवारचे मुहूर्त काय पाहून दिल्हे? आमची नुकसानी जाली. त्यावरून बाई बोलली

कीं, होणार तें चुकत नाहीं. उपरांत कांहींएक आराम करून, कारभाराचीं वस्त्रें सव्वीसावी घटका भरल्यानंतर, राजश्री गणपतराव नारायण व बाळाजी लक्ष्मण या उभयतांस बोलावून, सरदार व बाई व कारभारी वगैरे मंडळी होती. एक विनायक बाजीराव मात्र नव्हते. पहिलें बोलणें सरदाराशीं होऊन मग वस्त्रें सर्वांचे समक्ष दिधलीं. गणपतराव नारायण यांस दिवाणगिरीचीं साडेतीन वस्त्रें, पैठणी लाल पोशाख, तिवट शेला अष्टगोली, किंमत रुपये पाउणशेंपर्यंत, किनखाप अर्ध ठाण, महमुदी एक. एकूण साडेतीन, व बाळाजी लक्ष्मण यांस मुतालकीची वस्त्रें, जैनाबादी पोशाख, तिवट शेला रुपये पन्नासपर्यंत, याप्रमाणें शिरपांव होऊन बोलणें जालें. बाईनीं सरदारांपासून पायांवर हात ठेवून घेतला कीं, यासीं दुसरी गोष्ट न करावी. माझे जिवंत जीव आहे तों एखादी गोष्ट चुकेल, तथापि मजला लिहावें. उपरांतिक मी सांगेन तसें करावें. बाकी परभारें तुह्मीं एखादी दुसरी गोष्ट करूं नये. याप्रमाणें शपथप्रमाण करून, हातांत हात दिल्हे. इकडे यांस सांगितलें कीं, तुह्मीं तुकबास विचारल्याखेरीज कोणताही कारभार न करावा. पारनेरकर राजश्री शिवाजी गोपाळ व खंडो महादेव वगैरे यांस सांगितलें कीं, तुह्मीं आपलें दप्तरचें काम करावें; कारभारांत बोलों नये. दिवाणांनीं दप्तरी दाखला झाडून द्यावा. तुह्मीं कागदपत्र झाडून मागितला तो दिवाणास समजावीत जावा. वरकड दरखदारांनीं आपलालीं कामें करावीं. परगणे पंचपहाडाची मामलत राजश्री खंडो अनंत यांचे पुतण्याकडे आहे. त्याचें फाजिल ऐशीहजारपर्यंत त्यांनीं काढलें, त्यांस महालाची सोडचिट्टी द्यावी, असें जालें. कमाविसदाराचें फाजिल, हिशेबाचे रुईनें निघेल त्याचा फडशा, दुसालांत मामलत कायम त्याजकडे ठेऊन करावा, असें जालें. आंबाडची असामी घ्यावी. पोतनिशी, बाईकडील चालतच आहे. लष्करची मोहोगमच राहिली. त्याचा जाबसाल जाला नाहीं. दरखाचा ऐवज सालमजकूरपासून घ्यावा. याप्रमाणें चौ कलमांचें बोलणें होऊन, एका शिलेदाराची याद, कारकून दप्तरचा, त्याजकडून लिहविली. त्याजवर एकूणात दिवाणांनीं केली. देवावें, राजश्री रामराव आप्पाजी पळसीकर यांनीं केलें. देणें, सरदारांनीं केलें. तारीख यादीवर दिवाणानींच करावी, राजश्री दादाजी गंगाधर यांजकडील कारकुनानें लिहिणें असें चिन्ह करावें, पत्रावर तेरीख करावी. याप्रमाणें पहिलें चालत होतें. हलीं दादाजीकडील कारकून भगवंतराव बोलले कीं, तेरीख आह्मी करूं. असा तट पडला. तेव्हां मोघम राहूं दिल्हें. यादीवर तारीख जाली नाहीं. पूर्ववत्प्रमाणें चालेल असें दिसतें. याप्रमाणें होऊन बाईनीं एकमेकांशीं बोलणें केलें कीं, कोणी कोणाचा द्वेष करूं नये. सर्वांनीं एकचित्तें राहून, आपलालीं कामें करून, दौलत सांभा-

ळावी. मागील गोष्ट जाली तिचें वैरभाव स्मरूं नये. 'वाहिली गंगा, राहिलें तीर्थ', असें बोलून, कचेरी बरखास्त जाली.........पाराजीपंत व खंडो महादेव यांसी बोलणें जालें कीं, शिलेदार वगैरे लोकांचें मागील देणें त्याचे हिशेब सर्व समजाऊन द्यावा. ज्याचीं कबजें होऊन फडशे जाले ते, व पुढें राहिले त्यांचीं कबजें आकारून दाखवावीं. त्याची तोडजोड पाडून लोकांच्या समजुती काढतील. याप्रमाणें होऊन सरदारांस चार घटका दिवस राहतां बाईनीं आपलें रुबुरू भोजनास घालून, दोन वस्त्रें शकुनाचीं देऊन, मागील चार घटका दिवस राहतां निरोप दिल्हा. सरदारांनीं बाईचे पायांवर डोई ठेऊन, सन्मुख चंद्र घेऊन नावेंत बसून, डेरे दाखल जाले. तूर्त बाईनीं सरदारीस आळा पडावा ह्मणून ही गोष्ट आपले हातें केली. पुढें वहिवाटीखालीं येईल तें खरें. लोकांचे फडशे होऊन, येथून कूच करावयास आषाढअखेर होईल. सरकारची नजर व दरबारखर्चाचें बोलणें हें, राजश्री देवराव यांनीं मोघम ठेविलें आहे. पुढें समक्ष होणें तें होईल. याप्रमाणें ऐकिलें त्यावरून लिहिलें असे. वरकड बारीक मोठे राजश्री देवराव तात्यांनीं पत्रें आपले वाकबगारीनें लिहून लाखोटे पाठविले आहेत. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. राजश्री काशीराव होळकर यांस बाईजवळ ठेवावें. असें सरदारांचें लक्ष होतें. परंतु तूर्त राहिलें. समागमेंच न्यावें असें ठरलें. पुढें मुहूर्तानिशीं जातील. यापुढें वर्तमान होईल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६४.

श्री. २३ जुलई इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५ माहे जिल्हेज बुधवारपर्यंत मुक्काम महेश्वरीं सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान छ १७ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर वर्तमान, सरकारचीं पत्रें, पेशजीं राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचे नांवें व मातुश्री बाई यांचें नांवें आलीं होतीं. त्यास, त्यांचीं उत्तरें सुभेदार यांजकडील जाब, राजश्री आनंदराव गंगाधर यांजकडून परभारां सेवेसीं रवाना जाले आहेत. येथील जाब त्याच अन्वयें लिहून दिल्हे, ते घेऊन सेवेसीं रवाना केले आहेत. दोन वेळां पत्रें फिरलीं. याचें कारण, श्रीमंतांचे पत्रीं मित्ती सदरीं लिहीत असतात. हा पहिला धारा असून, हल्लीं मित्ती शेवटीं लिहिली. याचा भाव, तारीखवाल्यास चिन्ह करावयास जागा राहत नाहीं. पहिला धारा, दिवाणांनींच मात्र कागद पुरा करावा, असें होतें. हल्लीं याप्रमाणें जालें. हें सेवेसीं श्रुत व्हावें ह्मणोन लिहिलें असे. वरकड वर्तमान

दिवाणगिरीचीं वस्त्रें नवे कारभारी यांस जालीं. त्याउपरांतिक कारभार जुने लष्करचे कारभारी यांनीं, शिलेदाराचे वगैरे हिशेबाच्या यादी, बाईस व दिवाण व मुतालिक, राजश्री बाळाजी लक्ष्मण यांस समजाविल्या. चार दिवसपर्यंत हिशेब पहात होते. देणें मनस्वी काहाडलें. शिलेदारांचे सात लक्ष, शिवाय पागा दीड लक्ष, व शागिर्दपेशा वगैरे दोन लक्ष. एकूण साडेदहा लक्ष रुपये देणें काहाडले आहेत. हिशेबाची कुन्हा बाईस काय समजे? नवे कारभारी ते नवेच. नारोपंताचे चिरंजीवाचा होष कांहीं तसा नाहीं. मुलांतच जमा. कागद पुर्ता मात्र करावा. बाळाजी लक्ष्मण यांची चाल सात्विकपणाची. कागदापत्राची वगैरे कुन्हा धरून बोलतील अथवा जरब तरी कारभाराचा आटोप करतील, हा अर्थ दिसून येत नाहीं. मनुष्य दुसरें कोणी जवळ खबरदार तसें नाहीं. पोरखेळसा दिसतो. पारनेरकराचे जूट भारी. हिशेबांत ताळ हजरी गणतींत कांहीं न मिळे. त्यांस पुसणारा तसा कोणी नाहीं. आपल्यास काम सुधें करणें नाहीं, दुसऱ्याचें कामांत खलेल, त्याजकडे नाकारेपण यावें; अशा चाली खोट्या दिसून येतात. कारभारांत दुही पडली, हा कालवर लोकांची एखादी तोडजोड व खर्चाची पुढील तजवीज कांहींएक नाहीं. नवे कारभारी मागील लोकांचे देण्याचा मार्ग काढीत नाहींत. त्यांचें बोलणें पडतें कीं, ऐवज लावून द्यावा, पदरीं पडे असा मुबदला होईल. त्यास कोट वगैरे हा ऐवज, सावकार कोणी कबूल करीत नाहीं. खटीत ऐवज, विना जरब पोहोंचल्याखेरीज पैसा येत नाहीं. वकील येथें, त्यांच्या लबाड्या आहेत. सांप्रतकाळीं यांची दहशत नाहीं. वजन हालकें पडलें. अस्तु. बाईनीं अभिमान धरून गोष्ट केली तशी पार पाडावी. पुढील खर्चाचा अजमास पाहून त्याप्रमाणें ऐवज, तजवीज करून देऊं असें बोलतात. येथून पुढें घडून येईल तें खरें. राजश्री सुभेदार रेवा दक्षणतीरीं मुक्काम करून होते. पर्जन्य भारी, वीस दिवस जाले, उघडत नाहीं. चिखल फार जाला ह्मणोन त्रासून छ २२ रोज रविवारीं कूच करून, खरगोण तालख्याचे गांव ब्राह्मणदा येथून, चौ कोसांवर जागा निपाळ पाहून, मुक्कामास गेले. कारभारी नवे जुने पोहोंचवावयास गेले होते. जाऊन आले. स्वारीबरोबर स्वार प्यादे देखील नवते. सडे गेले. आटाल्यांत उंट नाहींत, अशी अवस्था कठीण. गेले ते दिवशीं हत्ती एक मेला. घोडीं खाशीं मातबर मेलीं. ढाल पडली, तिचे दोन तुकडे जाले. या प्रकारचीं चिन्हें! भावी काय असेल तें न कळे? ब्राह्मणद्याहून लौकरच कूच करून शेंदव्यास जाणार. कारभारी चार दिवस थोबून आले आहेत कीं, लोकांची तोड पाडून आह्मी येतों. जुने कारभारी यांचे सूत्रांत. लोक

सरदारांकडे नावेंत बसून जात होते कीं, तेथें जाऊन धरणें घ्यावें, सरदारास आडवावें. हें वर्तमान बाईस समजलियावर राजश्री काशीराव होळकर यांस पाठवून, लोकांस माघारें काल आणिलें. येथून पुढें घडेल तें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २६५.

श्री. १२ आगस्ट इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र १५ माहे मोहरम भौमवासरपर्यंत मुक्काम महेश्वर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— इकडील वर्तमान चंद्र १ माहे मोहरमीं विनंति-पत्रें लिहून व राजश्री देवराव यांचे लाखोटे सेवेसीं रवाना केले. त्यानंतर येथील वर्तमान, राजश्री मल्हारराव यास सोडून आणावयाकरितां राजश्री सुभेदारांचा आग्रह फार पडला, ह्मणोन मातुश्री बाई यांनीं सरकारांत विनंतिपत्र राजश्री देवराव यांचे विद्यमानें लिहिलें. त्याचें उत्तर आल्यावर एखादी गोष्ट करावी, तर इकडे सरदारांस धीर नाहीं. वरचेवर निरोपामागें निरोप निदानपक्ष येत गेले कीं, चिरंजीवास सोडावें. तो तेथें उपासपारणीं करितो, त्याचें शरीर स्वस्थ नाहीं. माझा जीव झाडून त्याजपाशीं लागला आहे, अन्न गोड लागत नाहीं. त्यास आणून भेटवा, नाहीं तर मजला त्याजवळ पावतें करावें. दोघांस एक जागा ठेवावें. तुमचे विचारास असेंच आलें तर मजला सरदारी नको. सरदारीची फारकती देतों. त्याजवेगळें येथून कूच करणें नाहीं. मल्हारराव यास सोडीत नाहींत तर मी कांहीं वांचत नाहीं. मी आपला गळा कापून घेईन." अशीं कित्येक प्रकारचीं भाषणें बोलूं नये तें बोलले. सौभाग्यवती रखमाबाईच्या अस्थि प्रयागास पोहोंचवून गोत्रज आला. गयावर्जन करून आला. येथें मांवदें करावें ह्मणोन साहित्य केलें. चंद्र १४ रोजीं मांवदें करावें असा निश्चय करून, बाईकडे चिठी पाठविली. मराठी मंडळी येथून भोजनास बोलावली. ते दिवशीं दधिश्राद्ध केलें. मांवदें राहूं दिलें. कीं, मांवदें मल्हारराव आल्यावर होईल. असा फारच आग्रह पाहून, मल्हारराव यास आणावयास कारकून व पालखी, माणसें फारासीस याजकडील, चंद्र १५ रोजीं आजच पाठविलीं. एका दों रोजां येथें घेऊन येतील. किल्लेदारांस तीन परवानग्याच्या चिठ्या एकदांच पाठविल्या आहेत. बाई यांचा मनोदय कीं, सरकारचे पत्राचें उत्तर आल्यावर जशी आज्ञा येईल तसें करावें, असें होतें. परंतु सरदारांचे आग्रहा-

मुळें तितकें राहून आणविलें आहे. आल्यावर घडेल तसें सेवेसीं लिहीन. दुसरें, सरदारांचें बोलणें कीं, चिरंजीवास मी आपलेजवळ जाबत्यानें ठेवीन. त्याचा पाय, मी आपला पाय, एके जागां बांधीन. कोठें जाऊं देणार नाहीं. असें बोलणें बाईस सांगून पाठविलें. त्याची खोड आहे ती जाती असा अर्थ नाहीं. त्यास समागमें देशीं घेऊन जाणार. शिलेदारांचा गवगवा होता. त्यास बाईनीं लोकांची फोडफाड करून वाट काढली कीं, ज्याचें देणें बाकी निघाली, त्यांत चौथाई वजा सूट घालून, बाकी ऐवज देऊन, मागील फारखती घेऊन, पुढें तेरीख चालती करावी. अशी तोड पडावी हें, जुने कारभारी यांचे चित्तांत नव्हतें. त्यांनीं लोकांस बहकावयास आळस केला नाहीं. परंतु बाईचे नेटानें गोष्ट चालीखालें आली. पैशांची तजवीज, बाईनीं खाजगीपैकीं दोन लक्ष रुपये पदमसीकडून देविले. तो ऐवज आणावयास येथून उंट व स्वार गेले आहेत. नवे कारभारी यांनीं पांच लक्षांची तजवीज केली आहे. त्यास ऐवज तीन सवातीन लक्षांचा लावून दिल्हा. कोट्याचे दोन लक्ष व बुंदी, पाटण, टोंक मिळून सवालक्ष, एकूण सवातीन लक्षांचे परगण्याची घालमेल करणार. नवा कमाविसदार कोणी उभा राहत नाहीं. पहिले आहेत त्यांचे फाजील ठाणें देतील न देतील हा भरंवसा नाहीं. मामलत बुंदेल्याकडे आहे. त्याची घालमेल होत नाहीं. त्यांजपासूनच कांहीं ऐवज घेणार. राजश्री बापू होळकर, पेंढारीयांचे पारपत्यास गेले आहेत. तिकडे त्यांनीं एका दों पेंढारीयांचें पारपत्य केलें. दोघां धडेकरांचीं डोकीं मारलीं. एक लक्ष रुपये त्यांजपासून घ्यावे असा करार केला आहे. शिवाय दोनशें उंट घ्यावे. ऐवजावर येथून वराता करितात. बापू, हा कालवर तिकडेच आहेत. त्यांचे बंधु राजश्री महिपतराव, महायात्रेस तीर्थरूपाच्या अस्थि घेऊन गेले. बापूंस सरदार देशीं समागमें घेऊन जातील, असें बोलणें आहे. कारभारी यांनीं ऐवज सावकाराकडे केला. त्यांजवर तूर्त चिठ्या लोकांच्या होतात. बाईकडील ऐवज इंदुरींहून आल्यावर तो समागमें वाटखर्चास देणार. लोकांची वाढ फडशाची पडली. दहा पांच जणांचे फडशे मोठ्या मोठ्यांचे जाले ह्मणजे येथून कूच करतील. सारांश, दसरा थालनेरास, अथवा जलदी केली तर, चांदवडास होईल. कारभार एकाचे स्वाधीन नाहीं. बहुनाइकी आहे. नवे कारभारी यांचा अभिमान बाईस आहे. येथून गेल्यावर बंदोबस्त घडून येईल तो खरा. सरदारांचें अंतर शुद्ध नाहीं. परिणाम होईल तो खरा. दिल्लीस वकील पहिलेपासून यांचा आहे, त्यास नवी पालखी दिल्ही; सहाशें रुपयांची नेमणूक कोट्यावर करून दिधली. चंद्र १२ मिनहूस वस्त्रें दिधलीं. वरकड मजकूर राजश्री

देवराव व आनंदराव यांनींही पत्रें सेवेसीं लिहिलीं आहेत, प्रविष्ट होतील. सरकारचें पत्र बाईचे नांवें व सरदारांचे नांवाचीं आलीं. त्याप्रमाणें घांटाचा बंदोबस्त यांनीं केला. तमाम कमाविसदारांस पत्रें लिहिलीं, विना सरकारचे दस्तक खेरीज हत्यार-बंद कोणीं येऊं न देणें. पत्रांचीं उत्तरें तयार जालीं ह्मणजे मागाहून सेवेसीं रवाना करीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६६.

श्री. १७ आगस्ट इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २० माहे मोहरम रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान, चंद्र १५ माहे मिनहूस विनंतिपत्रें लिहून व राजश्री देवराव तात्यांचे लाखोटे रवाना केले, तीं पत्रें प्रविष्ट जालीं असतील. त्या अलीकडील वर्तमान, राजश्री मल्हारराव होळकर यांस आणावयाकरितां, पालखी व कारकून माणसें येथून चंद्र १५ मिनहूस मंगळवारीं रवाना बाईनीं केलीं होतीं. तीं चंद्र १६ बुधवारीं कुसलगडास पावलीं. चंद्र १७ गुरुवारीं मशारनिल्हे यांस पालखींत घालून, कसबे चमेली येथील मुक्कामास आले. तेथून पत्र मातुश्री बाईंस पाठविलें कीं, भेटीस येतों. त्यावरून बाईनीं पत्राचें उत्तर दिल्हें कीं, इकडे येऊन भेट घेण्याचें प्रयोजन नाहीं. तुह्मीं परभारें आंबरपूरचे घाटानें उतरून, तीर्थरूपाकडे जावें. त्यावरून मल्हारराव यांचें कूच, चंद्र १८ रोज शुक्रवारीं चमेलीहून होऊन, महेश्वराचे बाहेरून, पूर्वेस होऊन, श्रीकाळाग्निरुद्र याचें दर्शन घेऊन, तेथेंच नाव बोलावून, रेवापार उतरले. हें, मातुश्री बाई गाईचे पूजेस आली होती, ते वेळेस किल्ल्यावरून पहात होती. इकडे राजश्री सुभेदार यांनीं मांवद्याचा निश्चय करून बाईंस पत्रें पाठविलीं कीं, श्रावण वद्य ५ शुक्रवारीं मांवद्याचा निश्चय आहे. तरी मराठे मंडळी, सोयरे आदीकरून, कारकून, मुत्सद्दी, वकील, कमाविसदार, सावकार मंडळी, या सर्वांस आमंत्रणें देऊन, उदयीक दोन प्रहरपर्यंत सर्वांनीं यावें, अशी गोष्ट जाली पाहिजे. त्यास सुभेदाराकडून कारकून, सरंजाम वगैरे न्यावयास आलेच होते. त्यांनीं सर्वांस सूचना केली होती. चंद्र १८ शुक्रवारीं, कारभारी लष्करचे नवे जुने बाईकडील कोणी नाहींत,–बाकी सर्व रेवा, प्रहर दिवसांत उतरले. तों इकडून मल्हारराव यांची स्वारी येऊन पोहोंचली. कारभारी यांच्या भेटी मार्गांतच जाल्या. सर्व मिळून राजश्री सुभेदारांजवळ दाखल

जाले. चिरंजीवांनीं तीर्थरूपांचे पायांवर डोई ठेऊन भेटले. वडिलांनीं आलिंगन देऊन, उभयतांनीं अश्रुपात केले. त्या उपरांत, त्यांनीं दाढी डोई राखली होती त्यांचें वपन करविलें. मग मंगल स्नान केलें. हर्षाच्या तोफा सोडिल्या. उपरांतिक पुण्याहवाचन त्यांनींच केलें. पुण्याहवाचन जाल्यानंतर आहेर. प्रथम आहेर सरकारी, राजश्री देवराव तात्या गेले होते, त्यांनीं केला. उपरांतिक सर्वांनीं आहेर केले. वस्त्रें होऊन मग मागतीं वडिलांचे पायांवर डोकी ठेविली. आहेरही कंबेस दों हजारांचा आला. मराठे मंडळी व ब्राह्मणमंडळांतील कोणाकोणाचीं भोजनें जालीं. नंतर कारभारी यांनीं, सर्वांनीं निरोप मागून, रात्रींस आपापले घरांस राजश्री काशीराव होळकरसुद्धां आले. कित्येक मंडळी दुसरे दिवशीं आली. राजश्री संताजी होळकर आले होते, तेही बाईचे भेटीस कालच आले. पुढें विचार, मल्हारराव यास समागमेंच देशीं घेऊन जावें, सरदारीचीं वस्त्रें द्यावीं. दुसरें, एक बाईची मर्जी पाहून शेंदव्यांत ठेवावें, घडेल तें खरें. येथें कारभार, शिलेदार यांचे फडशे, कबजे आकारून सावकारांवर चिठ्या देतात. तिसरा हिस्सा बट्टा व चौथाई सूट वजा होऊन खर्च जाऊन, बाकी महेश्वर शिक्का तिसरा पदरीं पडतो. लोकांत फूटफाट करून वाट पडली. या हिशेबीं तीन साडेतीन, निदान चौपर्यंत समजावीस होईल. लोकांचे फडशे होतात. यास पंधरा वीस रोज लागतील. उपरांतिक कुचाचा विचार. कदाचित् सरदारांनीं कूच अमावास्ये-आंत केलें तर, सेंदव्यास जातील. राजश्री बापू होळकर पेंढारीयावर गेले, ते तिकडेच आहेत. पेंढारी इंदूर परगण्यांत, इंदुरापासून पलीकडे आठां कोसांवर, देवाशाचे अलीकडे मध्यभागीं, दोन हजारपर्यंत आहेत. वरकड जिकडील तिकडे पांगले आहेत. कदाचित् सरदारांनीं देशीं न्यावयास जमा केले, तर पांच हजार पेंढार जमा होईल. बापू होळकर यांनीं एक लाख रुपये घेऊं ह्मणोन बोलणें टाकलें होतें. निदान पाऊण लक्ष घेतले ह्मणोन ऐकितों. कांहीं आंतस्त घेतलें असेल. राजश्री जिवाजी बल्लाळ व गोपाळराव व डभई असे एकत्र होऊन, जयपूर प्रांतीं बखेडा केला आहे. पांच चार ठाणीं घेतलीं. मागील कारभार जाला त्याची बाकी राहिली, ती मागतात. कारभारी एक दोघे कैद केले आहेत. ते सोडावे, नाहीं तर लढाईस उभें रहावें, याप्रमाणें वर्तमान यांजकडील वकिलांनीं लिहिलें होतें. राजांनींही खलिते पाठविले आहेत कीं, राजश्री पाटीलबावांचे फौजेसीं आमचा बिघाड आहे, तरी आमचा उपराळा राखावा ह्मणोन पत्रें आलीं आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६७.

श्री. १७ आगष्ट १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन निसबत केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र २० माहे मोहरम रविवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान मुक्काम महेश्वरीं यथास्थित असे. विशेषः-स्वामीकडून चंद्र १ माहे मिनहूचें आज्ञापत्र सादर जालें, ते चंद्र १६ मिनहूस प्रविष्ट जालें. पत्रीं आज्ञा कीं, तुह्मीं चंद्र २९ जिलकादचें व चंद्र २ जिल्हेजचें व चंद्र ८ व छ १२ मिनहूचें याप्रमाणें पत्रें पाठविलीं तीं पावलीं. राजश्री तुकोजी होळकर सुभेदार आषाढ शुद्ध १२ सीस मुहूर्तेकरून गंगाजळनिर्मळ अहिल्याबाईचा निरोप घेऊन, नर्मदादक्षिणतीरीं डेरेदाखल जाले, हा मजकूर वगैरे तपशिलें लिहिला तो कळला; व राजश्री देवराव यांचे लाखोटे रवाना केले आहेत ह्मणून लिहिलें, तें कळलें. त्यास राजश्री तुकोजी होळकर सुभेदार मुहूर्तेकरून नर्मदादक्षिणतीरीं आले; उत्तम गोष्ट जाली. देवराव यांचीं पत्रें पावलीं. पुढें होईल तें वर्तमान याप्रमाणें लिहित जाणें ह्मणून पत्रीं आज्ञा. ऐसियास येथील वर्तमान अलाहिदा पत्रीं लिहिलें आहे. सरकारचीं पत्रें पहिलें, राजश्री सुभेदार व मातुश्री बाई यांचें नांवाचीं आलीं होतीं कीं, हिंदुस्थानांतून कोणी हत्यारबंद माणूस सरकारचे दस्तकाशिवाय येऊं न द्यावें; ह्मणून आज्ञा आली. त्यास, आज्ञेप्रमाणें यांनीं आपले जिल्ह्यांतील कमाविसदारांस पत्रें पाठवून, घांटा नाक्याचा बंदोबस्त करून, पत्राचे जाब लिहून दिल्हे. त्यास राजश्री सुभेदार यांजकडील उत्तरें, राजश्री आनंदराव गंगाधर यांनीं घेऊन, परभारां रवाना केलीं आहेत. येथील उत्तर बजिन्नस पत्र घेऊन सेवेसीं पाठविलें आहे, प्रविष्ट होईल. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २६८.

श्री. २२ आगष्ट १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन निसबत केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २५ माहे मोहरम शुक्रवारपर्यंत सेवकाचें वर्तमान मुक्काम महेश्वरीं यथास्थित असे. विशेषः- येथील वर्तमान छ २० मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्याउपर इकडील वर्तमान, छ २० मोहरमीं शिलेदार लोक, बारगीर, सर्व जमा होऊन, मलई केली कीं, इंदुरीं साडेआठमाही हिशेब होऊन बाकी निघाली, त्यांत चौथाई वजा व

आणखी काटकूट करितात. निमे ऐवज पदरीं पडणें कठिण. यांत सावकार देखील फिटत नाहीं. तेव्हां पुढें गत काय? असे विचार केले. कारभारी यांनीं सात आठ असामी वकलाचीं कबजें आकारून, चिव्ह्या सावकारावर दिल्या, त्या कांहीं फिरल्या नाहींत. ऐवज घेत गेले. पिसे शिलेदार यांनीं आपले गांवचीं कामें, इनामी गांव होते ते सोडून घेतले आणि वाट पाडली. तसेंच आणखी कोणाकोणास कांहीं आशा दाखवून फडशे करीत चालले. हें पाहून वरकडांनीं जमाव करून, राजश्री पाराशर दादाजी यांजकडे गेले कीं, तुह्मीं आह्मांपासून चाकरी कशी घेतली आणि आतां आमचे गळे कापितात. आह्मीं पैसा तुह्मांजवळून घेऊं, याप्रमाणें त्यांशीं खटखट केली. त्यांचीं उत्तरें साफ होत गेलीं, माझें कांहीं चालत नाहीं. नवे कारभारी जाले आहेत, त्यांजकडे जावें; अथवा चित्तास पडेल तें करावें. मजला बदलाम करूं नये. अशीं उत्तरें त्यांचीं ऐकून शिलेदार जमावानशीं नावेवर येऊन, नावाड्यास मारहाण करून, नावेंत बसून, रेवा उतरून, सरदारांकडे जाऊन, त्यांचे डेऱ्याभवतें पाळा घालून, बसले आहेत. पांचशें बारगीर जमा आहेत. इकडे बाईनीं नावेची चौकशी करून, नावा बंद केल्या. एक घोळका पहिले उतरून गेला. बाकी कोणी कोणते घाटें उतरून जाऊन जमा जाले. भोईटे शिलेदार जमा होऊन रात्रीस मंडळेश्वरचे घाटानें जात होते, त्यांजवर बाईनीं चौकी पाठवून बसविले आहेत. जामीन मागतात. या प्रकारें लोकांचा गवगवा आहे. सरकारचीं पत्रें राजश्री देवराव यांचे नांवें लाखोटा एक, व राजश्री आनंदराव गंगाधर यांचे नांवें एक, एकूण दोन लाखोटे छ १२ मिनहूची रवानगी, येथें छ २० मिनहूस बारावे घटकेस पावले. उभयतांचे लाखोटे पावते केले. देवराव यांचे लाखोट्यांत सरदारांचे नांवचीं सरकारचीं चार पत्रें व त्यांचे नांवचीं चार, याप्रमाणें होतीं. त्यांतील मजकूर, पेंढारी देशीं न्यावयाविसी व तुह्मी सत्वर कूच करून यावें ह्मणोन होता. त्यावरून देवराव हे मातुश्री बाईकडे येऊन वर्तमान सांगितलें कीं, सरकारचीं पत्रें याप्रमाणें आलीं आहेत, काय आज्ञा? त्याचें उत्तर बाईनीं केलें कीं, तुह्मीं व राजश्री रामराव आपाजी, उभयतांनीं चिरंजीवाकडे जाऊन, पत्रें दाखवून व तुह्मीं बोलून कूच करवावे; व शिलेदार तेथें जमा जाले आहेत, त्यांस चार गोष्टी सांगाव्या. त्यावरून हे उभयतां, राजश्री देवराव व रामराव, छ २२ मिनहूस मंगळवारीं राजश्री सुभेदारांकडे, मौजे ब्राह्मणग्याचे मुक्कामीं गेले. भेट घेऊन पत्रें सरकारचीं वाचून दाखविलीं, व देवराव आणखी थोडेंसें बोलले कीं, सुभेदार सरकारचाकरीस येत नसले तर, येथें पंधरा हजार फौज ठेऊन पैक्याच्या वराता त्यांजवर करूं,

पैसा द्यावा लागेल; हें विचारून लिहून पाठविणें, त्याप्रमाणें केलें जाईल; असें श्रीमंतांनीं माझे पत्रीं लिहिलें आहे. याचें उत्तर काय लिहूं? तेव्हां सुभेदारांनीं उत्तर केलें कीं, कांहीं इतकें नको. पागा व शागिर्दपेशा व गाडद या तीन वकलांचा बंदोबस्त जाला ह्मणजे दरकूच चाललों. मजकडे गुंता कांहीं नाहीं. याप्रमाणें तुह्मी बाईस व कारभारी यांस सांगून, तूर्त तीन वकलांचा पैसा आधीं देवावा. या मुक्कामींहून एका दों रोजांत कूच करितों. असें बोलणें होऊन, शिलेदारांशीं चार घटकांपर्यंत बोलले कीं, जशी वाट पडली आहे, तसा पैसा तुह्मीं घ्यावा; अधिक मिळणार नाहीं. लटकी दिक्कत न करावी. सरदारांस कूच करूं न द्याल, तर सरकारचें निमित्य तुमचे माथां येईल. दोन लक्ष रुपये दरमहा खर्च लागतो, हा तुह्मांस देणें येईल. याप्रमाणें चार गोष्टी गरमनरम सांगून सरदारांचा निरोप घेऊन सायंकाळीं येथें आले. वर्तमान बाईजवळ सांगून आपले घरास गेले. छ २३ रोज बुधवारीं देवराव बाईकडे आले. कारभारी सर्व होते. शागिर्दपेशा व पागा व गाडद दुदरनेक फराशीस या तिघां वकलांचा पैसा झाडून द्यावा असें ठरलें. पेंढारीयांचा मजकूर बोलणें वरचेवर जालें. बाईचें व कारभारी यांचे चित्तांत कीं, पेंढारी तिकडे नेऊं नयेत. ते सुधे आळ्यांत राहणार नाहींत. स्वदेशचा कारभार, उपद्रव देतील. मागतीं पंचाइती कराव्या लागतील, याप्रमाणें बोलणीं जालीं. परंतु देवराव यांचे ह्मणणें कीं, त्यांस पत्र पाठवून त्यांतील कारभारी घेडेकरी बोलावून आणावें. त्यांचें बोलणें कसें पडतें त्याप्रमाणें आह्मांस लिहावयास येईल, असें ठरलें. दोंप्रहरां बाईजवळ सरदारांकडील दोन चिठ्या आल्या कीं, येथून कूच करून आज घुगरीस गेलों. शिलेदारांनीं अटकाव केला होता, परंतु त्यास सांगितलें कीं, श्रीमंतांची आज्ञा आली, त्यापक्षीं एका कोसाचें तरी कूच केलें पाहिजे. असें बोलून चौ कोसांवर घुगरीगांव येथून आठ कोस तेथें मुक्कामास गेले. शिलेदार लोकांस दररोज पंचवीस रुपये पोटखर्चीस देतात. ते पुढें मजुरा घेतील. दोन चार दिवस आंबवून शेवटीं कांहीं कोणास, अधिक उणें करून घेऊन येतील, आणि तेही येतील, असें दिसतें. राजश्री मल्हारराव त्यांजवळच आहेत. छ २४ गुरुवार एकादशी, कचेरी जाली नाहीं. येथून पुढें होईल तसें सेवेसीं लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

# लेखांक २६९.

श्री. ३० आगस्ट १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन निसबत केसो भिकाजी, कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ४ माहे सफर भानुवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान मुक्काम महेश्वर यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र २५ मोहर्रमीं विनंतिपत्रें लिहून, सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर येथील वर्तमान, राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचा मुक्काम घुगरी अलीकडे नदीवर होता. नऊ दहा मुक्काम त्या तळावर जाले. राजश्री मल्हारराव होळकर जवळच आहेत. इतके दिवस खांसे डेऱ्यांत रात्रंदिवस एक जागां राहणें पडलें, त्यामुळें चिरंजीवाचे अवगुण दृष्टीस पडले. .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... .... .... .... ....

.... .... .... .... .... .... .... त्यावरून खिजमतगारास मार दिल्हा. तोही पळून गेला. याप्रमाणें खाशांनीं वर्तणूक पाहिली. त्यावरून मशारनिल्हे यांस निराळे राहोटीस जाबत्यानें ठेविलें आहे. मुसा दुदरनेक फरासीस चंद्र २६ मोहर्रमीं राजश्री सुभेदार यांचा निरोप घेऊन येथें आले. मातुश्री बाई यांची भेट घेतली. बाईनीं त्यांस खर्चास तीस हजार रुपये देविले आणि निरोप दिल्हा. फरासीस यांनीं विसा दिवसांचा करार करून, इंदुरास चंद्र २७ मोहर्रमीं गेले, कीं विसां दिवसांत पलटणसुद्धां येऊन पोंहोचतों. याप्रमाणें बोलून गेले. चंद्र २९ मोहर्रमीं वस्तींत, गाय सातां महिन्यांची व्याली. तिनें आपला जार खाऊन, वासरूंही खाल्लें. हें वर्तमान बाईस कळलें. त्यावरून बाईनीं वेदशास्त्रसंपन्न राजश्री धोंड दीक्षित यांस पुसावयास पाठविलें कीं, याप्रमाणें दुश्चिन्ह जालें, यास काय करावें? त्यांनीं सांगितलें कीं, हा दोष आपल्याकडे नाहीं; ज्याची गाय असेल त्याजकडे. त्यावरून बाई स्वस्थ जाली. चंद्र २९ मोहर्रमींपासून चंद्र २ सफरपर्यंत बाईनीं दक्षणा ब्राह्मणांस श्रावण मासाची अनुष्ठानाची दिल्ही. तीन सहस्र ब्राह्मण मिळाला होता. एक मासपर्यंत भोजनास सुंदर घातलें. दक्षणा पंचवीस हजारपर्यंत वांटली. गुदस्तांपेक्षां यंदा अधिक दिल्ही. ब्राह्मण थोडाच मिळाला होता. शिवाय भोजनाची रोजची दक्षणा, याप्रमाणें होऊन लक्ष भोजनाची समाप्ति जाली. चंद्र ४ सफरीं सत्र दक्षिणी ब्राह्मणांचें बंद करविलें. येथून रांगडे ब्राह्मणांचें चालतें होईल. शिलेदार

वगैरे लोकांचें धरणें, सरदारांजवळ गवगवा होता तो मिटला. एकांनीं एक येऊं लागले. सरदारांनीं साफ सांगितलें कीं, मातुश्री बाई वडील आहेत; ते देतात त्याप्रमाणें घ्यावें; सर्वांची वाट पडली आहे. त्यावरून, हल्लीं दररोज लोकांचीं कबजें आकारून, एका दोघांच्या चिठ्या देतात. सरकारची ताकीद सरदारांस येण्याविषयीं, दोन तीन वेळां पत्रें आलीं. त्यावरून हल्लीं चंद्र २ सफर शुक्रवारीं कूच करून कसबे सेगांव येथें नदीवर मुक्काम केला. चंद्र ३ शनिवारीं कूच जालें, ते नागलवाडीस गेले ह्मणून वर्तमान येथें बाईजवळ आलें. नागलवाडीहून आज कूच करून सेंदव्यास जाणार. याप्रमाणें कूच दरकूच सेंदव्यास पावतील. काल रात्रीस सरदारांकडील चिट्टी बाईस आली कीं, कारभारी यांस लवकर बिदा करावें. खर्चास पाठवावें. त्यावरून बाईनींही कारभारी यांस ताकीद केली कीं, चौ दिवसांनीं भागवतपारायण सप्ताश्रवण करावयास मी बसेन, मग फावणार नाहीं. तुह्मीं आपला गुंता लवकर उरकून, पौर्णिमेआंत येथून निघावें. याप्रमाणें ताकीद, दिवाण, फडणीस, दसरदार यांस जाली आहे. परंतु कारभारी यांस येथें आठ पंधरा दिवस लागतील. अद्याप गुंते कांहींच उरकले नाहींत. परगणे कोंच येथील मामलतीची घालमील करितात. राजश्री विठोबा निसबत आंबोजी इंगळे यांजकडे सांगणार. सरदारांची मर्जी त्यांजकडे सांगावी असें नाहीं; परंतु बाई सांगणार. पहिले मामलेदार आहेत त्यांचे फाजील देऊन, सवा लक्ष रुपये पदरीं पडतात, याजमुळें घालमील करणार. राजश्री चिमणाजी जयराम पारनेराहून येथें चंद्र २ सफरीं दाखल जाले. सरदारांची भेट मार्गांत घेऊन, येथें बाईचे भेटीस आले. सांप्रत येथेंच आहेत. कारभारीयांचे बरोबर तेही कूच करितील. राजश्री दादाजी गंगाधर यांचा निरोप होता, [तो] सरदारांजवळ परभारा सांगितला. मग काय असेल तो न कळे. राजश्री सुभेदार सेंदव्यास पावल्यावर तेथें दोन तीन मुक्काम करून, सत्वरच घाट उतरून थालनेरास जातील. तापी उतार आहे. फौजेचा जथ अद्याप पुरतेपणें जमला नाहीं. दसरा चांदवडास करावयास जावें, अशी बोलवा आहे. याउपर घडून येईल तें खरें. जयपुरकर राजे यांचें संधान येथें आहे. ते राजश्री रोडजी खवास यांजकडील भला माणूस येथें आहे. बाईशीं व कारभारीयांशीं बोलणें होत आहे. सारांश, कुमक करावी हा अर्थ. शिंदे यांजकडील फौजेची दाटी आहे. येथून उपराळा होईल तो खरा. अद्याप बोलणें निश्चयांत नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. राजश्री देवराव तात्या यांनीं लाखोटे रवाना करावयास दिल्हे, ते सेवेसीं पाठविले आहेत. पावतील. हे विज्ञापना."

---

# लेखांक २७०.

श्री. ३० आक्टोबर इ. स. १७९४.

"सेवेसीं विनंति सेवक केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत चंद्र ५ माहे रविलाखरपावेतों सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान चंद्र २२ रविलावल विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवानगी केली आहे, त्या तारखेस राजश्री देवराव यांनीं पत्रें दिधलीं तीं, लाखोटे सुमारे चार रवाना केले आहेत, प्रविष्ट जाले असतील. सांप्रतचें वर्तमान, राजश्री आनंदराव होळकर येथें आहेत. राजश्री पाराशर दादाजीस घेऊन जाणार. त्यांचें जाणें होत नाहीं. विना पैशांखेरीज ते जात नाहींत. पैशाची तोड पडत नाहीं. चांदोड व नंदुरबार वसूल................देशमुखीचा ऐवज चांदोडचा, ऐसे मिळून सहा लक्ष रुपये दुसाला करार जाले. त्यांपैकीं तीन लाख रुपये खर्च होऊन चुकला, तीन लाख रुपये राहिले. त्याजवर जाणें होत नाहीं. आणखी आंबाडकर व इंदुरकर यांस बोलावूं गेले. इंदुरकर येथें आले. त्यांजला दुसाला रुपये पांच लक्ष मागतात. तीन साडे तीन लाख रुपये देऊं ह्मणतात. जाबसाल पक्का नाहीं. आलेले हिशेब, वराता सरदार तेथें करितात. राजश्री वामनाजी हरीस बोलावूं स्वार गेले आहेत. आल्यावर त्यांजकडील जाबसाल होणें तो होईल. पाराशर दादाजीस चंद्र ३ रविलाखरीं बाईनीं बहुत प्रकारें सांगितलें कीं, तुह्मीं चित्तावर घेऊन दिवाणगिरीचें काम करून चांगला बंदोबस्त करणें. कांहीं पैसा मी देईन. कांहीं तुह्मीं आपले जातीवर घेऊन, फौजेची तोड पाडून, पुढें जमाव करून सरकारचाकरी करावी. त्यांनीं साफ उत्तर दिल्हें कीं, सरदारींत आळा नाहीं, माझ्यानें हें काम होणार नाहीं. मी शिलेदारीनें आहे, तसा राहीन. नाहीं तर श्रीकाशीस, आज्ञा करा, जाईन. येणेंप्रमाणें उत्तर दिल्हें. पुढें तजवीज करून कोणास काम सांगतील न कळे. नारोपंताचे चिरंजीव, त्यांचें बोलणें तेथें इंदुरीं लागलें आहे. राजश्री देवराव यांस चंद्र ४ रविलाखरीं इंदुरास राजश्री सुभेदारांकडे पाठविलें. समागमें राजश्री पांडुरंग शंकर यांस दिल्हे. कारण, आह्मीं सरकारआज्ञेचें लक्ष धरून मान्य केलें. सरदारांचा रुकार घेऊन यावा ह्मणून पाठविलें आहे. मशारनिल्हेंनीं सेवेसीं बजिन्नस पत्र लिहून दिल्हें, तें पाठविलें आहे; त्यावरून श्रवण होईल. मजला घरास जाऊन हुजूर यावयाची आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें अश्विनवद्यपक्षीं निघून येत होतों. परंतु बाईनीं सांगितलें कीं, राजश्री जयराम रावजी पौर्णिमा करून निघतील, त्यांजसमागमें मार्गस्त करून देईन; त्यावरून राहिलों. याउपर कार्तिकवद्य २ निघून शहरास जातों.

तेथें मुलें माणसें ठेवावयाची सोय नाहीं. तेथून कुटुंब घेऊन, वेरुळीं ठेऊन, सेवेसीं येईन. येथील बंदोबस्त अद्यापि होत नाहीं. दौलतींत बखेडा फार आहे. मुसा नारज यांचे चिरंजिवास निरोप दिल्हा. तो माळवेप्रांतीं जाणार. बाईंनीं त्यास ताकीद केली, आमचें घरीं मल्हारराव यांची चाकरी करूं नये व राजश्री पाटीलबावांकडे राहूं नये. मग कोठें चाकरी करावी. याप्रमाणें निक्षून सांगून निरोप दिल्हा. बारा हजार रुपये त्यांस पावते जाले. शेवटीं निरोप दिल्हा. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २७१.

**श्री.** १८ जानेवारी इ. स. १७९५.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ० २६ माहे जमादिलाखर रविवारपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—येथील वर्तमान छ० १३ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान येणेंप्रमाणें कलमबंदीः—

राजश्री दादाजी गंगाधर यांचीं पत्रें मातुश्री बाईस छ० १२ जमादिलाखर-पासून आजपर्यंत दोन तीन आलीं. त्यांतील भाव कीं, नवे कारभारी यांजकडून कामाचा बंदोबस्त होऊन येत नाहीं. स्वारी मोहिमसीर, लोकांचा गवगवा, ऐवजाची तोड व कामाची आटोपही नाहीं, ह्मणोन सरदारांचें बोलणें आह्मांकडे पडतें, व सरकारचेंही मानस. त्यास या गोष्टीची सल्ला आपली पाहिजे. अभयपत्र येईल तशी वर्तणूक घडेल. याप्रमाणें कितीक मजकूर त्यांणीं आपलेपरीं लिहिला होता. त्याचीं उत्तरें राजश्री विनायक बाजीराव वगैरे पारनेरकर यांनीं मागितलीं. परंतु उत्तरें द्यावयास अनमानली, कीं विचारून सांगूं. त्याउपरीं त्यांणीं एक दोन वेळां लगट करून उत्तरें मागितलीं. तेव्हां मोघम मजकूर लिहून उत्तरें दिधलीं कीं, तुह्मीं आपलें आपअवसान पाहून, जी गोष्ट परिणामास उत्तम होईल ती विचारून करावी. या प्रकारचीं दिधलीं ह्मणोन कळलें. तें सेवेसीं लेखन केलें. खुलाशाचीं पत्रें दिल्हीं नाहींत. केल्या कर्माचा अभिमानही आहे. विनायक बाजीराव एक दोन............पण बंदोबस्त करावा हें चांगलें. ते एखादे जाबसाल उरकितात. मग आपल्यास विषम वाटेल. त्यास उत्तरें द्यावीं, तेव्हां पत्रें लेहून दिधलीं. कलम १.

राजश्री शिवाजी गोपाळ हे, राजश्री दादाजीकडील पत्रें आलीं तेव्हां होते. नंतर विचारून श्रीपुष्करास गेले. बाईचा निरोप घेऊन छ १५ जमादिलाखरीं येथून स्वार होऊन निघाले. बे महिन्यांनीं येणार. कलम १.

कारभारप्रकरणीं बाईचें बोलणें पडलें कीं, आजपर्यंत जसा कारभार चालवावयाचा तो बरा वाईट सांबानें निभावला. आतां ज्याचा त्यांनीं आटोपून मजला काशीयात्रेस जावयाचा निरोप द्यावा. माझ्यानें आतां होत नाहीं, व देखवतही नाहीं. हें बोलणें अंतःकरणापासून नाहीं. बाह्यात्कारें मात्र दाखवितात. या प्रकारें वर्तमान ऐकिलें, त्यावरून लिहिलें असें. कलम १.

येथील कारभारीयांत दोन पक्षः—राजश्री दादाजी गंगाधर यांजकडील कारकून व पारनेरकराकडील हा एक, व दुसरा राजश्री गणपतराव नारायण. यांजकडील एकमेकांचीं पत्रें येतात तीं, एकांतीं कोणास कोणी न दाखवितां, कवाडें लावून वाचतात. त्यांत बाईचा प्रकार कोणाकडेही पुरता नाहीं. कलम १.

राजश्री सुभेदार यांचीं पत्रें मातोश्रीस आलीं कीं, वडिलीं कारभारी करून दिल्हे, यांजकडून ऐवजाची सरबरा होऊन, कामाचा बंदोबस्त होऊन येत नाहीं. खर्चाची अडचण बहुत आहे. दुसरी एखादी गोष्ट करावी, तर ठीक पडेल. याजकरितां पत्रें लिहिलीं आहेत. उत्तरें आलीं पाहिजेत. ह्मणोन मजकूर बहुत लिहिला होता. त्याचीं उत्तरें खुलाशाचीं लिहून दिधलीं नाहींत. मोघम लिहून दिधलीं कीं तुमचें सोईस येईल, जसा प्रसंग पहाल, तशी गोष्ट उचित तें करावी. ज्यांत परिणाम उत्तम दिसेल तें करावें. आमचा आग्रह नाहीं. आणखी कितेक मजकूर लिहिला होता, त्याचीं उत्तरें कार्याकारण लिहून दिल्हीं. कलम १.

राजश्री गणपतराव नारायण यांचीं दोन वेळां पत्रें आलीं. त्यांणीं आपला मजकूर लिहिला होता. तीं पत्रें त्यांजकडील कारकुनांनीं वाचून दाखविलीं. ऐकून मात्र घेतलें. उत्तर केलें कीं, म्यां लग्न मात्र लावून दिल्हें. कामाची निभावणी, सरदारांचें साधन, व सरकाराचें व कारभारीयांचें साधन तुह्मांकडून न होय. त्यास मी काय करूं? उपरांत पत्राचें उत्तर मागावयास कारकून व मुकुंदराव हरी यांची मातुश्री आकाबाई गेली. त्यास बोलली कीं, मी पत्राचें उत्तर काय देऊं? जो कोणी पंचवीस लक्ष रुपये देईल तो दौलतीचा कारभार करील. त्यांत तुह्मीं आपलें घरदार पाहून जी गोष्ट करणें ती करावी. येथून लाख रुपये पाठविले होते, ते वरचेवर उडाले. त्यांजकडीलही पत्रें, दहा रोज जाले आलीं आहेत. त्यांस उत्तर देत नाहींत, व तुमचींही देणें नाहींत. त्याउपर तिसरे दिवशीं मागतीं आका व कारकून राजश्री रामचंद्रपंत व मुकुंदराव जिवाजी हे बोलावयास गेले होते. त्यांची खातरजमा केली कीं, तूर्त मी सरकारांत पत्र लिहीत नाहीं. विना सरकार, मजला लिहिल्यावेगळी गोष्ट करणार नाहींत, हा भरंवसा आहे. तथापि केली तरी करोत. मीं जी गोष्ट केली, ती विचारूनच केली. त्याची निभावणी करणें

धन्याकडे. त्यांणीं खातरजमा करावी. इकडूनही उपराळा राखीन. सरकारचीं पत्रें मजला आलीं ह्मणजे त्यांचीं उत्तरें मजला जशीं कळतील तशीं लिहीन. विना सरकारचीं पत्रें आल्याखेरीज मी कांहीं सरकारांत लिहीत नाहीं. त्यांचीं पत्राचीं उत्तरें लिहून द्यावींसीं ठरलीं. ती पोकळ खातरजमा मात्र. एखादी गोष्ट बोलल्याप्रमाणें निभावणी करतील हा भरंवसा नाहीं. मिजाज एकरूप कायम नाहीं. कलम १.

सदरहू पांच कलमें सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २७२.

श्री. १८ जानेवारी स. १७९५.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना छ० २६ माहे जमादिलाखरपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान येणेंप्रमाणें कलमबंदीः—

राजश्री सुभेदार यांजकडे लष्करांत खर्चाची विपत्य. लोकांचीं धरणीं, नित्य हंगामे होऊं लागले. तेव्हां हें वर्तमान सरकारांत समजल्यावर, सरकारांतून पांच लक्ष रुपये साहुकारांकडून तूर्त खर्चास देविले. ह्मणोन हें वर्तमान बाईचें येथें आलें. बाईस कळल्यावर बाई, राजश्री विनायक बाजीराव यांसीं सरदारांस व कारभारी यांस रागें भरून बोलिली कीं, सरकारचा पैसा कां घ्यावा? अशी काय गांठ येऊन पडली होती? लाख रुपये पाठविले होते; आणखी ऐवज पाहिजे ह्मणोन तजविजींत असतां, सरकारचा पैसा घ्यावा ही सल्ला चांगली न केली. ते जबरदस्त. त्यांचा पैसा न पावला, तर महाल जप्त करून घेतील. सरदार आपले पुंजीस हात लावीत नाहींत. पुढें कोणत्या उपयोगीं पडणार? वेळेस नाहीं तों कारभारी काठीनें पाणी सेवितात. अशानें कसा कारभार चालेल? या प्रकारें बोलणें जालें तें लिहिलें असे. कलम १.

राजश्री जिवाजी बल्लाळ हे तापी उतरून फर्दापूरचे घाटानें चढून गेले. बरोबर फौज जमा लुटारी बहुत आहेत. लोकांचा खाया खर्चाचा हंगामा आहे. तसेंच चालढकल करून जातात. बऱ्हाणपुरांतून सावकाराकडून दीड लक्ष रुपये घेतले. होळकरांकडील महालपैकीं, रावेर येथें सहा मुक्काम होते. तेणेंकडून महालची खराबी फार जाली. दहा बारा गांव बेचिराख जाले, व अवांतर महालांच्या नुकसान्या फार जाल्या. त्यामुळें कमाविसदारांचे बोभाटे येथें आले. त्यावरून बाईनीं पत्रें सरदारांस लिहिलीं कीं, हें वर्तमान सरकारांत

श्रवण करून शिंदे यांस ताकीद करवावी. राजश्री देवजी गवळी देशचे महालांस उपद्रव देऊन घांसदाणा घेतात. असें वर्तमान येथें आलें. त्याजवरून लिहिलें असे. कलम १.

राजश्री संताजी होळकर हे, सेंदव्याचे बाहेर जमीयत घेऊन, भिल्लांचे पारपत्यास्तव निघाले आहेत. भिल्लांनीं उपद्रव सेंदव्याचे आसपासचें गांव मारूं लागले. ह्मणोन, त्यांजवर बाईनीं पायचीं माणसें दीडशें, उपराळ्यास पाठविलीं आहेत. भिल्लांचें पारपत्य होऊन येईल तें खरें. कलम १.

सरकारांतून फौजेची हजरी घेण्याविसीं कारभारी यांस ताकीद जाली, हें वर्तमान येथें बाईस आलें. त्यावरून येथील कारभारी यांस ताकीद केली कीं, सरंजामीयांचीं पथकें राजश्री खंडो रामाजीजवळ गिराशाचे पारपत्यास्तव आहेत, तीं बोलावून घेऊन सरदार यांजकडे रवाना करावीं. तेथें हजरीचा प्रसंग आहे. पथक्यांस ताकिदीचीं पत्रें लिहिविलीं. दुसरें बोलणें कीं, इकडे लागल्यास चार हजार फौज नवी ठेवीन. या प्रकारें बोलणें जालें तें सेवेसीं लिहिलें असे. कलम १.

राजश्री तुळसाजी वाघ यांजकडील पथक महतपुराहून येथें आलें. दोन अडीचशें स्वारसरंजाम आहे. येथें चार मुक्काम होते. नंतर बऱ्हाणपुरचे मार्गानें जाण्याचें सांगितलें आहे. कारण, खानदेशप्रांतीं पेंढारी, राजश्री जिवाजी बल्लाळ यांजकडील उपद्रव विशेष देतात. त्यांस शह देऊन पुढें जावें. त्याप्रमाणें पथक नर्मदा उतरून गेलें, छ २२ मिनहूस. कलम १.

मातुश्री बाई यांजकडील कारकून राजश्री आंबाजी दादाजी, गिराशांनीं धरून नेले होते; ते सुटून येथें छ० २२ मिनहूस येऊन भेटले. दुसरे रोजीं शेरणी वाटली; व त्यांस मेजवानी करून वस्त्रें व शालजोडी दिधली. कारकूनमजकूर यांणीं बाईस नजर एक घोडी सरंजामासुद्धां पांचशें रुपयांची नजर केली. शिवाय पानदान वगैरे दोन जिनसा दिल्हे. कलम १.

राजश्री खंडेराव रामाजी, पागा सरंजामसुद्धां, माळवेंप्रांतीं गिराशावर शह देऊन जावऱ्याचें आसपास होते. त्यास, रिंगणोद परगण्यांतील एक गढी खालीं करून, पुढें सोंधाचे पारपत्यास पिढावे व रामपुरा प्रांतीं गेले. कलम १.

पो इंदूरचे आसपास गिराशांनीं मागतीं उपद्रव मांडिला. शहरांत डाके पडूं लागले. ह्मणोन बाईनीं राजश्री मानाजी होळकर यांस पन्नास स्वार देऊन, शहरचे रखवालीस पाठविले आहेत. कलम १.

मातुश्री मावसीबाई होळकर यांचे पहिले भाऊबंद खानदेशांत कोणी आहेत, त्यांचे भेटीस्तव बाईचा निरोप घेऊन, सरंजामसुद्धां कूच करून गेली. सेवेसीं कळावें. कलम १.

सदरहू नव कलमें सेवेसीं श्रुत होतील. जालें तें वर्तमान लेखन केलें. पुढें घडेल तें सेवेसीं लिहीन. हे विज्ञापना."

---

## लेखांक २७३.

श्री. ६ फेब्रुआरी इ. स. १७९५.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १५ माहे रजब भृगुवासर प्रातःकालपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान काल डांकेबरोबर विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, सरकारी लाखोटा एक, मुजरद काशीद जोडीबराबर रवाना जाला, छ ८ रजबीं. तो येथें छ १३ माहे मीनहूस मागील चार घटका दिवस राहतां पोहोंचला. गंगाजळनिर्मळ मातुश्री अहिल्याबाई यांचे नांवाचा लाखोटा होता. पावतांच क्षणीं जाऊन, वर्तमान कानावर घातलें. सायंकाळचें स्नान करून जपांत होती. खुणेंकरून सांगितलें कीं, भोजनोत्तर पत्रें श्रवण करीन. ते दिवशीं ग्रहणाची कर होती. स्नानें करून, दानें करून श्रमली होती. दिवसभर उपोषण. रात्रीस भोजन जाल्यानंतर कांहीं कचेरी जाली होती, ती बरखास करून, बिछान्यावर एकलीच बसून, कारभारीयापैकीं राजश्री विनायक बाजीराव व बाळाजी कृष्ण यांस बोलावून, त्यांजकडून पत्रें अक्षरशा श्रवण केलीं. सरकारचें पत्र एक व नबाबाकडील वकिलाचे पत्राची नकल एक होती. मजकूर, प्रेमसुक जोहरी याचा होता. तो ध्यानास आणून, सरकारआज्ञेप्रमाणें तेच क्षणीं, सवाप्रहररात्रपर्यंत बसून, जागां जागां घांटनाकें येथील कमाविसदार यांस पत्रें लिहून रवाना केलीं, व आसपासचे जवळ होते, त्यांस समक्ष बोलावून ताकीद करून, बंदोबस्त करविला. दक्षण उत्तर पहाडाचे घांट, व नाके, चोरवाटा व उभय रेवातीर येथील नाव घांट पायउताराचे तर नेमावरपर्यंत, यांजकडील जिल्ह्यांतील झाडून बंदोबस्त करविला. राजश्री रघुनाथपंत यांस बऱ्हाणपुर येथें पत्रें पाठविलीं.....येथील कमाविसदार यांस व जमीदार भूमे वगैरे यांस ताकीदी सांगून पाठवून, नंतर सवाप्रहररात्रीस निद्रा केली. प्रत्योत्तराविशीं विनंति काल केली. त्यावरून सरकारचे पत्राचें उत्तर रात्रीस लिहून दिल्हें; तें आज सेवेसीं रवाना केलें आहे.

सरकारांतून हुजरे व कासीदजोडी नेपाळचे कामगिरीस रवाना केले; ते येथें पोंहचून, त्यांच्या मार्गाचा बंदोबस्त करून देऊन, छ ५ रजबीं कूच करून पुढें गेले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २७४.

श्री. २ आक्टोबर इ. स. १७९५.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ १८ माहे रबिलावल भृगुवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– येथील वर्तमान छ १३ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, राजश्री काशीराव होळकर यांणीं परगणे जावरे येथील सोडचिठ्ठी भागवतास दिल्ही. त्याची नजर रुपये तीस हजार ठरावून तिऱ्हायती निशा, दों सालांत घ्यावे असी घेतली. त्यापैकीं पांच हजार खासगी नजर, याची निशा नगदीची घेतली. भागवताच्या बाया चौघी आहेत, त्यांस एक गांव सतंतर तोडून दिल्हा. सात हजार रुपये सरंजाम चाकरीस आहे. त्यांचे खर्चास घेत जावें. याप्रमाणें होऊन भागवतांनीं आपले कडून, मामलत रा पांडुरंग शिवाजी यांजकडे सांगितली. निशाही त्यांचीच आहे. कसबे करईची सोडचिठी शितोळ्याकडे दिल्ही. पंचवीसशें नजर. त्याजपैकीं बाराशें खासगी. याप्रमाणें तेथील कारभार केला. राजश्री भिवजी आघाडे यांचे काम किल्ले जांब येथील घांटाचें वगैरे पूर्ववत्प्रमाणें सांगून सोडचिठी दिल्ही. वस्त्रें दिल्हीं. नंतर मागतीं स्वार पाठवून आणून फेऱ्यांत घातलें आहे. सौभाग्यवती म्हाळाबाई, संताजी होळकर यांची स्त्री, व सौभाग्यवती आनंदीबाई काशीराव यांची स्त्री, यांजकडे कांहीं नजर कबूल केली होती, ती दिल्ही नाहीं. ह्मणोन त्यांचें ऐकून धरून आणले. त्यांस ह्मणतात कीं, तूं आपल्या भावास आणून हजर कर. त्यास शिक्षा लाविली पाहिजे. कैलासवासी बाई यांणीं त्यास काढून दिल्हे. तो देशीं गेला. बदकर्म त्याजपासून घडलें. याचा ऐवजही घेतला असतां मागतीं उलटी खाऊन, चार रुपये दंडावे हा हेत आहे. पो। इंदुर येथील वाणी, उदमी, बनाज, बोहरी यांस उपद्रव मनस्वी देतात. कोणी कोणाचा बाद्या फिर्याद सरकारांत आला ह्मणजे, त्यांजकडे स्वार मसाला पाठवीत असावें. शहरांत चोऱ्या होतात, याजसाठीं येथून पागा पाठविल्या आहेत. ते परभारें उपद्रव करितात, चोऱ्याही होतात. दाऊद बोहरा मातबर, त्याचा गुमास्ता फिर्याद जाला. याजकरितां स्वार पाठवून मसाला केला. हा कजीया लबाड. बाईनीं छान

केली असतां मागतीं उपस्थित जाला. याजमुळें बोहोरी याची हर्ताळ येथें व इंदुरांत, खरगोण येथें पडली आहे. बोहोरी सारे जमा होऊन येथें आले आहेत. यावर काय इनसाफ करितात पहावें. इंदूरची रयत बेदील आहे. परगणे कायथे येथील मामलत पहिले मामलेदाराकडून दूर करून राजश्री रोडोजी होळकर यांस सांगितली. काल छ १३ मि॥ वस्त्रें दिधलीं. वीस हजार रुपये घेतले. पहिले मामलेदाराकडे फाजील आहे. ब्राह्मणाकडील काम दूर करून मराठ्याकडे सांगितलें. परगणे निंबहेडा येथील कमाविसदारांपासून अंतस्थ नजर घेऊन बिदा केलें. तेथील फडणीसी दूर करून, मामलेदाराकडे सांगितली. फडणिसांवर मामलेदारांनीं पन्नास हजार तकरारी केली. फडणीसानें सवालक्ष मामलेदारावर काढले. याप्रमाणें जालें. परंतु कोणाचे अंगीं लावून पैसा घेतील, हा अर्थ तूर्त नाहीं. फडणिसाची जप्ती मामलेदारांनीं करविली. साडेतीन हजार रुपये अंतस्थ घेतले. राजश्री तुळसाजी वाघ महतपुरकर यांणीं सरकारांत श्रीमंतांकडे सूत्र लावलें आहे कीं, आह्मीं पहिलेपासून पदरचे असों. हल्लीं होळकराचें आमचें बनत नाहीं; त्यापक्षीं चाकरी सरकारांत करूं. हें वर्तमान राजश्री सुभेदार यांस तेथें समजलीयावर, त्यांणीं येथें चिरंजीवास लिहिलें कीं, तुह्मीं तूर्त वाघाकडे कोणीं पाठवून खातरजमा करावी. त्यास, राजश्री राणुजी शिंदे चोळीकर हे पहिले गेलेच आहेत, त्यांस पत्रें गेलीं आहेत. तीन लक्षांची वरात कर्जपटीऐवजीं केली आहे; त्याचा तगादा तूर्त मना करविला. याउपर काल छ १३ मी॥ स वाघाचीं पत्रें पुण्यास जात होतीं, तीं धरलीं आहेत. त्यांतील भाव समजल्यावर लिहीन. सांप्रत निदर्शनास आलें, तें सेवेसीं लेखन केलें असे. पुढें घडेल ते सेवेसीं लिहीन. दुदरनेक फरासीस काल छ १३ मी ॥ रेवा दक्षिणतीरीं येऊन दाखल जाला. राजश्री सुभेदार यांजकडून आला. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २७५.

श्री. ९ डिसेंबर १७९५.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २६ जमादिलावलपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील वर्तमान, राजश्री काशीराव होळकर यांणीं परगणे रामपुरा येथील कारभार केल्यामुळें, सुभेदार यांणीं बहुत निषेध केला. बारा कलमांचे जावसाल फिरवावे असें होतें. त्याप्रमाणें एक जावसाल कायथ्याचा मात्र फिरला, बाकी जें जालें तें उत्तम ठरलें. राजश्री बाळाजी रावजी यांजला तिकडून सनदा

आल्यानंतर, मागतीं येथून खातरजमेचीं पत्रें देऊन, शिरपांव शालजोडी देऊन, रामपुरास बिदा केलें. हल्लीं कारभार जो होतो तो, येथील आज्ञेखेरीज होत नाहीं. लोकांचे समाजाविशींचा गवगवा, तसाच शागीर्दपेशास रोजमुरा एक देतात. त्यास ऐवज पदमसी, पानसी यांचे दुकानदारापासून घेऊन, त्यास वराता, किरकोळी नजराणे वगैरे यांचा लावून दिल्हा. दुदरनेक फरासीस यांचीं घरणीं पारणीं होतात. हल्लीं त्यांस वराता कर्जपटीच्या वगैरे, सवा लाख रुपयांच्या लावून देऊन पाठविल्या आहेत. तो आपले जागां श्रमीच आहे. येथील मंडळ आपआपले जागां, कोणाचे कांहीं चालत नाहीं ह्मणून, श्रमीच आहेत. सांप्रत सुभेदारांची सूचना चिरंजिवास आली आहे कीं, तुमची इकडे येण्याची सिद्धता असूं देणें. पत्र लिहूं तसें सत्वर येणें. येथील संस्थान मुख्यत्वेंकरून राजश्री रामराव आपाजी पळसीकर यांची नेमणूक होऊन पत्रें आलीं आहेत. हे आपले जागां श्रमी. काशीराव यांची शुद्धता नाहीं. दुसरे, या प्रसंगीं तेथें असावे ह्मणोन चिंताग्रस्त आहेत. पुढें घडेल तें खरें. राजश्री लखोबा जगोबा यांणीं दतीयावाल्याशीं साम सांप्रतकाळीं केला. हिंदुस्थानांत सिखांनीं कांहीं गडबड मांडली आहे, वरकड राजे रजवाडे तमाम आपआपले ठिकाणीं स्तब्ध आहेत. राजश्री आंबोजी इंगळे दिल्लीस गेले ह्मणोन, वर्तमान येथें आलें. पुढें घडेल तसें सेवेसीं वरचेवर लिहीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक २७६.

श्री. ३१ जानेवारी इ. स. १७९६.

"सेवेसीं विनंति सेवक कचो जनार्दन नि॥ केसो भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाईत छ २० रजब रविवासरपर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— येथील वर्तमान छ १४ मिनहूस विनंतिपत्रें लिहून सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यानंतर इकडील वर्तमान, इलायतचा सुभा आबदाली याजबरोबर चाळीस हजार घोडा, शिवाय पायदळ, याप्रमाणें फौज तयार होऊन, अटक उतरून अलीकडे तीन मजला स्वारी आली. दिल्लीस यावे हा रूख आहे. अल्लीगौर बादशाहा याचा पुत्र शाहाजादा बरोबर आहे. त्याची स्थापना दिल्लीस करावी, हा विचार गिलच्यांचा आहे. रूमचे पातशाहाचेंही संमत आहे. दिल्लींतील लोक खळबळले आहेत. मातबर लोक निघून लखनुरास जातात. चाळीस रुपये भाडें गाडीचें जालें आहे. मथुरेंत वगैरे चोराचा उपद्रव. डांके पडतात. सीखांचें शहर आमरसेर (अमृतसर) उजाड जालें. याप्रमाणें बातमी येथें सावकाऱ्यांत जैपुरची व दिल्लीहून

आली; त्यावरून सेवेसीं लेखन केलें आहे. सत्य मिथ्या ईश्वर जाणे. राजश्री काशीराव होळकर यांचा कारभार पूर्ववत्प्रमाणें चालत आहे. दुदरनेक फरासीस यांची वरात, पंचविसां हजारांची इंदुरचे सायरचे कमाविसदार यांजवर लष्करांतून पेस्तर साल ऐवजीं जाली आहे. त्यावरून कमाविसदाराचे कारकुनाचे मागें तष्ट. फरासीस यांचे दोन पाहारे नेहमीं बसले आहेत. त्यांस पैसा मिळत नाहीं. मामलत नको अशी फारखती दिधली. घालमेल करावी, तर सुभेदारांची आज्ञा नाहीं. त्यावरून कारकुनास काशीराव यांनीं विचारलें. सर्व कारभारी बसून एकांत केला कीं, मामलत तर दूर न करावी आणि पैसा तर घ्यावा. कशी तजवीज करावी? तेव्हां कोणी उत्तर देईनात. बोलले कीं, आह्मांस काय, जशी आज्ञा कराल तशी वर्तणूक करूं. त्यावरून घालमेल करावी असें ठरलें आहे. इंदूरचे नवे कमाविसदार केले आहेत, त्यांजकडे सांगणार. पुढें घडेल तसें लिहीन. खंडूजी लांबाते पतन पावले. ते मल्हारराव यांचे स्वशुर. याजकरितां काशीराव दोन वेळां गेले होते. इंदूरचा ऐवज सावकाराकडे जमा केला. पुढें लोकांस कांहीं द्यावें ह्या विचारांत आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

**समाप्त.**



‘इतिहाससंग्रहां’त प्रसिद्ध झालेलीं

# महेश्वरदरबारचीं बातमीपत्रें.

[ कारकीर्द–अहल्याबाई होळकर. ]

## भाग २ रा.




दत्तात्रय बळवंत पारसनीस

संपादक, ‘इतिहाससंग्रह’,

सातारा.





मुंबई येथें,

‘निर्णयसागर’ छापखान्यांत तुकाराम जावजी

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केला.

नं. २३ कोलभाट लेन.

---

इ. स. १९११.

---

किंमत २ रुपये.




इंदूरसंस्थानचे अधिपति

श्रीमंत महाराज

महाराजाधिराज राजराजेश्वर सवाई

**तुकोजीराव ऊर्फ बाळासाहेब होळकर**

ह्यांस

हा ग्रंथ अत्यंत भक्तिपूर्वक व आदरानें

नजर केला असे.



श्रीरंगपट्टण येथील टिपू सुलतानची स्वारी.

# ३५. महादजी शिंदे यांचे वैद्य शुकदेव मिश्र.

मराठी राज्यामध्यें वैद्यशास्त्रपारंगत असे नामांकित वैद्य बरेच होऊन गेले; परंतु त्यांची माहिती उपलब्ध नसल्यामुळें त्यांचीं नांवें सुद्धां इतिहासांत प्रसिद्ध नाहींत. मग त्यांच्या चरित्राची ओळख कोठून येणार? परंतु, जुन्या कागदपत्रांत त्या वेळच्या वैद्यांचे आणि हकीम तबीबांचे जे उल्लेख आढळून येतात, त्यांवरून मराठीशाईत मोठमोठे नामांकित भिषग्वर्य आणि चतुर शस्त्रवैद्य होते, असें मानण्यास हरकत नाहीं. महादजी शिंदे ह्यांच्याजवळ शुकदेव मिश्र ह्या नांवाचे एक सुप्रसिद्ध वैद्य होते. ते झांशी येथील रहिवासी असून, त्यांनीं झांशीचे सुभेदार नारोशंकर राजेबहाद्दर ह्यांचे कारकीर्दींत आपलें वैद्यचातुर्य प्रकट केलें होतें; व तेव्हांपासून त्यांस सरकारांतून दररोज २॥ रुपयांची नक्त नेमणूक झांशी येथें मिळत असे. हें पुढें झांशीहून काशीस जाऊन राहिले. हे महादजी शिंदे व दुसरे मराठे सरदार ह्यांच्या लष्करांत येऊन, वेळोवेळीं आपल्या अप्रतिम गुणांचें प्रदर्शन करीत असत. महादजी शिंदे ह्यांच्या पत्नीस ह्यांनीं औषध देऊन एक वेळां मृत्यूच्या दाढेंतून सोडविलें होतें. तेव्हां महादजी शिंदे ह्यांनीं त्यांच्यावर प्रसन्न होऊन, त्यांच्या झांशी येथील नक्त नेमणुकीबद्दल ९०० रुपयांचा एक गांव पेशव्यांकडून इनाम करून देवविला होता. ह्या संबंधाचा उल्लेख पुढील एका पत्रांत आढळतो. तो येणेंप्रमाणें:—

श्री.

"विज्ञापना ऐसीजे:–वेदमूर्ति राजश्री शुकदेव मिश्रजी यांस दररोज झांसीचे चौत्र्यावर नारो शंकर यांचे कारकीर्दीपासोन अडीच रुपये दररोज आहे. त्यांचे बारमाही रुपये ९०० नऊशें होतात. मिश्रजींचें रहाणें श्रीकाशीस; यामुळें रोजाची सोय नाहीं. मिश्रजींनीं राजश्री पाटीलबावांचे स्त्रीस व्यथा निर्माण जाली, ती औषध देऊन बरी केली. ते कालीं यांचें वर्तमान, पूर्वापरसंबंध, स्वास्थीव राहणें आदिकरून मनास आणिलें. त्यास, झांसीचे राजाच्या मजकूर बोलण्यांत आला, तो बावांनीं श्रवण केला. मर्जी, मिश्रजींवर प्रसन्न जालीच होती. बोलले कीं, काशीचे राहण्यामुळें रोजाची सोय पडत नाहीं. तर नवशें रुपयांचे जमेचा गांव झांसी गीर्दींत तजवीज करणें, तो सरकारांतून लावून देऊन, सनदा करून आणवितों. त्या मिश्रजींच्या हकीकतीच्या यादी व गांव त्या जमेचा, त्याची फर्द घेऊन बावांनीं आपलीं पत्रें, एक श्रीमंतांस व एक स्वामींस, असीं माझे हवालां केलीं, तीं सेवेसीं पाठविलीं; पावलीं असतील. त्यांची पावती आली नाहीं. तस्मात् पावलीं नसतील कीं काय न कळे!

नंतर बावांनीं फिरून बोलावून, मजकूर मिश्रजींचें काम जरूर करून देण्याचा अगत्य-वाद धरून बोलणें केलें, तेंही पुरवणी रवानगींत सेवेसीं पाठविलीं. आतांहीं बावांनीं हटकिलें आहे. आणखीही पत्रें येतीलसें वाटतें. याचा जाबसाल जालाच असेल. उत्तर बावांस काय सांगावें, तें आज्ञापिलें पाहिजे. हे विज्ञापना."

## ३६. काश्मिरांतील उद्योगधंद्याची निकृष्टावस्था.

काश्मीर येथील लोंकरीच्या उंची मालाची प्रसिद्धी पुरातन कालापासून आहे. त्यांत काश्मिरी शालजोड्यांची प्रख्याति तर सांगावयासच नको. परंतु इ. स. १७८६ च्या सुमारास काश्मिरी मालाची व कारागिरीची किती हीन स्थिति झाली होती, हें शिंद्यांच्या लष्करांतून नाना फडणविसांस आलेल्या पुढील पत्रा-वरून चांगलें दिसून येतें. तें पत्र येणेंप्रमाणें:—

पौ छ ८ सवाल सबा समानीन **श्री.** इ. स. १७८६.

"विज्ञापना ऐसी जे:– छ ७ जमादिलावलचें पत्र सादर जालें. त्यांत आज्ञा जे, पूर्वीं तुह्मांस पत्रें पाठवीत गेलों, त्यांत फर्मास वगैरे:—

१ छिटें मुलतानी व आगऱ्याचीं बहुत चांगलीं.
१ तसबिरा फार चांगल्या.
१ असल तुसी पट्ट पश्मी.
———
३

वेळास हा गांव इंग्रजाकडे आमचा वतनाचा गेला आहे तो मागोन घ्यावा.

सदरहूखेरीजही लिहिलीं गेलीं आहेत, तीं पाहून त्यांचें मनन असावें ह्मणून आज्ञा. ऐशास मौजे वेळास याजविशीं किती वेळ राजश्री पाटीलबावांस हटकिलें आहे. 'होय' 'होय' ह्मणत गेले. आतांही हटकिलें. ह्मणाले जे, 'सारा कोंकणप्रांत इंग्रजांपासून सुटला असतां, हाच गांव कसा राहिला, कळत नाहीं. एक साष्टी मात्र त्यांजकडे राहिली. त्याखेरीज गांव कोणी राहिला नाहीं. याची माहितगारी मजला नाहीं. तरी गांव कोठील, कोणे परगण्याचा व हकीकत त्यांची लिहिण्याविशीं आज्ञा जाली पाहिजे.' छिटें, तसबिरा व पट्ट पश्मी यांचा मजकूर तर, चमेलपार ग्वालेर गोहद प्रांतीं बावांची फौज होती, तेव्हां शालजोड्याविशीं आज्ञा सादर होती. तेव्हां व चमेल उतरून उत्तरेस आल्यावर आजपावेतों जो बेपारी साहुकार कशमिरी माल घेऊन आला, तितकाही मीं पाहिला. किनारा पल्ला व सूत पोत आज्ञेप्रमाणें एकाही जोडीस न पाहिलें. एक पिंवळी जोडी किंचित् दृष्टीस आली, तेही एकांशेंकरून पोत मात्र दिसलें; तितक्यावरच ठेविली होती. दोनशें रुपये किंमत ठरली ती कबूल करून ठेविली. पुण्यांत तसी जोडी पाऊणशें ऐशीस मिळेल;

गरजच आहे तर शंभर रुपये देणार देईल. असें असतांही ती जोडी ठेविली. मथुरेच्या मुक्कामीं केवळ गळाठा ! जलसमाधीपावेतों आलें तेव्हां माघारी दिली. नंतर कांहीं उतार पडला. तदोत्तरही शोधांत आहें. परंतु चांगली जिन्नस मिळत नाहीं. तसबिरांचे मुरके दोन चार आले. पाहिलें, काम अनोटें, आपले पसंतीस यावयाजोगें दिसलें नाहीं. आणखीही शोधास सांगितलें आहे. पशमी माल कशमीरचा पहिला आला, त्याची दशा विनविली. प्रस्तुत कशमीर बिघडली. एक साहुकार हुंडीवाला होता, तो इकडील हुंड्या घेऊन कशमिरींत रुपया देत होता. एक मुकीम होता त्याचे विद्यमानें सौदे होत असत. कशमिरींतील मामलेदार विलायतवाल्याकडील बदलून होता. विलायतवाला शाह फौजबंदी करून कशमिरीवर चालून आला; तेव्हां त्या जुन्या मामलेदारानें तो साहुकार व मुकीम दोघांपासून चाळीस लक्ष रुपये दंड घेतला. रुपये देईनात. त्यांस मारतां मारतां जिवें मारिलें ! सहकुटुंब त्यांचे घात करून लुटून घेतलें. तधीपासून ती पेठ बुडाली. शाहानें कशमीर घेतली, तेव्हां दोन तीन पुरें कटा केला. असा शहरांत नाश पडला. त्यामुळें माल येत नाहीं ह्मणतात. जुना माल खपता लष्करांत राहिला आहे तोच आहे. नवा माल आला ह्मणजे पाहीन. कामाचा असल्यास घेईन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. ”



## ३७. पार्वतीबाईच्या मृत्यूबद्दल पाटीलबावांचे उद्गार.

श्रीमंत सदाशिवराव भाऊसाहेब पेशवे हे इ. स. १७६१ त पानिपतच्या लढाईंत मृत्यु पावले. त्यांची स्त्री पार्वतीबाई. ही पानिपतच्या युद्धांतून वांचून दक्षिणेंत परत आली होती. ही पुण्यास सवाई माधवराव पेशव्यांचे कारकीर्दीपर्यंत विद्यमान होती. ती इ. स. १७८३ मध्यें मृत्यु पावली. ही बाई फार सरळ व सुस्वभावी असून, सवाई माधवराव पेशव्यांच्या बालपणांत, तिनें त्यांची चांगली काळजी घेतली होती. ही मृत्यु पावल्याचें वृत्त नाना फडणविसांनीं महादजी शिंद्यांस लिहिलें, त्या वेळीं त्यांस वाईट वाटून त्यांनीं तिच्याबद्दल जे उद्गार व्यक्त केले, ते येथें नमूद करण्यासारखे आहेत. हे शिंद्यांचे मुत्सद्दी नारो शिवदेव ह्यांनीं नाना फडणविसांस शब्दशः कळविले आहेत. ते येणेंप्रमाणें:—

श्री.

“ विज्ञापना ऐसी जे:—राजश्री पाटीलबावा यांनीं बोलावून सांगितलें जे, “श्रीमंत मातुश्री पार्वतीबाई यांस कैलासवास जाला. त्यास ईश्वरइच्छेस उपाय नाहीं ! मातुश्री होती तोंपर्यंत, श्रीमंत राजश्री रावसाहेब यांजविशीं, घरांतील बंदोबस्ताविशीं खातरजमा होती. सांप्रत बंदोबस्तास खातरजमेचें घरांत कोणी दिसत नाहीं. याकरितां श्रीमंत राजश्री नाना यांस आह्मीं पत्र लिहिलें आहे व तुह्मींही लेहून पाठवणें.

ते जवळ आहेतच. अष्टौप्रहर जे जवळ असतात, त्यांचे हातून प्रातःकालापासून दुसरे प्रातःकालपर्यंत, सर्व क्रियाकर्मे, स्नानपान, भोजनशयन इत्यादिक कर्मे संपादन होत असतात. तीं कर्मे विश्वासुकाचे साक्षीनें घडावीं, हें मोठें संरक्षण आहे. बाहेर राज्यभारविशीं नाना जपतच आहेत. त्यांस घरांतील बंदोबस्ताची काळजी नाहींसें नाहीं. ते पाहत, करीतच आहेत. परंतु जुन्यांपैकीं पार्वतीबाई गेली, व नवा समागम आज प्राप्त जाला. दोन्हीं विलगच जालीं आहेत. यास्तव बंदोबस्त पक्का करावा. " येविशीं काळजी स्वामींस आहेच. तत्रापि बावांनीं सांगितल्याप्रमाणें विनंति करणें प्राप्त. हेच अर्थ बावांनीं पत्रीं स्वामींस लिहिले आहेत. त्यावरून ध्यानास येतील. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## ३८ इंद्रसेनाचा रुसवा.

इंद्रसेन ह्मणजे अंडरसन. हा इंग्रजांकडून शिंद्यांच्या लष्करांत आलेला वकील होता. ह्याचे मार्फत पाटीलबोवांचीं इंग्रजाशीं राजकारणें चालत असत. तो एक वेळ रुसून शिंद्यांच्या लष्करांतून निघून आग्र्यास गेला. त्याची समजूत करितां करितां पाटीलबावांस व त्यांच्या मुत्सद्यांस पुरेपुरेसें झालें. ह्या इंद्रसेनाच्या रुसव्याची हकीकत नानांस आलेल्या एका पत्रांत आढळून येते. ही कोणास मनोरंजक वाटणार नाहीं? तें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री. इ. स. १७८७.

"विज्ञापना ऐसी जे:-इंद्रसेन इंग्रज येथें वकिलीस होता. त्याजवळ दोघे मुसलमान मौलवी या नांवें होते. राजश्री पाटीलबावांकडे जाबसालास येत असत. इंद्रसेनानें त्यांजवर बालंट उचललें जे, आमचीं कुष्टपिष्टें बावांस यांनीं समजाविलीं. हें बालंट घेऊन त्यांस दूर केलें. ते दोघेही बावांनीं चाकर ठेविले. इंद्रसेनानें इतकेंच निमित्त केलें कीं, माझे चाकर तुह्मीं कसे ठेविले? मीं दूर केल्यास त्यांनीं लष्करांत राहूं नये. त्यांस दूर करावें. बावांनीं दूर केले नाहींत. ह्मणून लालसोट नजीकचे मुक्कामीं इंद्रसेनानें रुसवा दाखऊन कूच केलें. त्याचे समजाविशीस राजश्री सदाशिव मल्हार व कृष्णाजी अंबादास यांस पाठविलें. त्यानें मानिलें नाहीं. ती कोसांवर मुक्काम केला, माघारा आला नाहीं. ह्मणून, देशमुख जांवई व राजश्री माधवराव गंगाधर दिवाण, कृष्णाजी अंबादास मजमदार व सदाशिव मल्हार यांस त्या मुक्कामास पाठविलें. यांनीं जाऊन बहुत प्रकारें बोलले, परंतु आला नाहीं. माधवराव आदिकरून फिरून आले. नंतर दुसरे रोजीं खांसा बावा आपण गेले. फार समजाविलें असतां आला नाहीं. बावा परतून आले. यावरून लौकिकांत अनेक प्रकारचे तर्क कुतर्क चालले. यास्तव मींच बावांकडे जाऊन वर्तमान विचारिलें. बावांनीं सांगितलें जे, "मौलवीचें निमित्त करून रुसवा बाहेर मात्र दाखविला. आंतील वर्म आणखीच दिसतें. आह्मी समजाऊं

लागलों, तेव्हां इंद्रसेनानें जाब दिला जे, मी आगऱ्यास राहतों. पत्रें माझीं लखनऊस पापडसाहेबास गेलीं आहेत; त्याचे उत्तराची प्रतीक्षा करितों. बहालीचें पत्र आलें तर परतून येईन." असें बोलला. यावरून बदलीचा प्रकार दिसतो. तफजुल हुसेन-खान याचें पत्र सदाशिव मल्हार यांस आलें जे, आमची तुमची भेट लौकरच व्हावी असें आलें. तस्मात् तो अगर आणखी इंग्रज कोणी येणार. याची बदली जाली ह्मणोन जातो. तगिरी बहाली लागलीच आहे. "आह्मांस कळऊन जातां, तर बादशाचे येथून व आह्मी सन्मान करून बिदा करितों! तें न केलें, आणि रुसवा दाखऊन कड झांकला, इतकें दिसतें." असें बावांनीं सांगितलें. पुढें कळेल तें विनंति करीन, सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."



## ३९. झांशी व बुंदेलखंड ह्या प्रांतांच्या वसुलाबाबद वादविवाद.

महादजी शिंदे ह्यांनीं उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत करून झांशी व बुंदेलखंड येथें आपला अंमल बसविला. ह्या प्रांताचा वसूल व त्याचे हिशेब पूर्वीं विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश ह्यांच्या कारकीर्दींत जसे येत होते, तसे महादजी शिंदे ह्यांजकडून पुणेंदरबाराकडे आले नाहींत. त्याबद्दल नानांचा व शिंद्यांचा बराच पत्रव्यवहार व वादविवाद झाला. तो फार महत्त्वाचा आहे. नानांनीं, विसाजी कृष्ण बिनीवाले ह्यांच्याप्रमाणें, शिंद्यांकडून हिंदुस्थानांतील प्रांतांचा हिशेब व पैका वेळेवर आला नाहीं, ह्मणून महादजी शिंद्यांवर दोषारोप केला. त्याचें निरसन शिंद्यांनीं कसें केलें आहे तें फार पाहण्यासारखें आहे. त्या संबंधाचीं पुढील दोन पत्रें येथें सादर करितोंः—

### लेखांक ३.

### श्री.

" विज्ञापना ऐसी जेः—छ १७ साबानचें पत्र सादर जालें. त्यांत आज्ञा जेः—राजश्री पाटीलबावा तुह्मांजवळ बोलले त्यावरून तुह्मीं मजकूर लेहून पाठविला कीं, श्रीमंत कैलासवासी माधवरावसाहेब यांचे वेळेस राजश्री विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश यांची रवानगी हिंदुस्थानांत केली, तेव्हां लाखों रुपये हुजुरून दिले. याशिवाय बाहेर पैका मेळविला, व बुंदेलखंडची रसद घेऊन खर्च केला. आतांही मसलत सरकारची आहे. आह्मी आज्ञेखेरीज झांशी व बुंदेलखंड या दोहींस तगादा केल्यास हुजुर शब्द लावितील. हल्लीं सरकारांत दोन्ही तालुक्यांचा पैका काय येतो? हिशेब देखील सरकारांत दिले नाहींत. चौकशीअंतीं सर्व समजेल. पातशाहाचें राजकारण

आपले हातचें जाऊन, इंग्रजांचे हातीं लागेल तर त्यास बुंदेले व झांशीच दृष्टीसमोर आहे. यास्तव मर्जीस आल्यास उभयतांकडून ऐवज आमचे मदतीस देविल्यास चार दिवस कालहरण होईल, ह्मणोन लिहिलें तें सर्व कळलें. त्यास, राजश्री विसाजी कृष्ण व रामचंद्र गणेश यांस जमा आली, ती सरकारचे कीर्दीस जमा केली व मुलूखही सरकारांत आला. पडलें पान सरकारांत जमा केलें. त्यांस यांस मेळवितां येत नाहीं. राजश्री पाटीलबावांनीं आजपावेतों संस्थानांपासून खंडण्या घेतल्या व मुलूखही सोडविला. त्याचा पैका आलाच असेल. झांशी व बुंदेलखंड या महालचा पैका घेण्याचें लिहिलें. त्यास सरकारांत ओढ किती आहे? सालमजकुरचे ऐवजीं गुदस्ता वराता जाल्या आहेत, तेव्हां त्याजकडे ऐवज राहिला नाहीं. पैका नसतां सरकारांतून कोणे तऱ्हेनें चालविलें, पाटीलबावांचे ध्यानांत आहेच. सरकारांत पैका आहे आणि पाटीलबावांस पाठवीत नाहींत, असें नाहीं. टिपूचे मसलतीवर फौज काढिली तेव्हां रसदा अगाऊ घेतल्या. गायकवाडांकडे ऐवज येणें, त्याऐवजीं कर्जें घेऊन चालविलें. आणखीं आजपर्यंत फौजेचें वगैरे देणें चढलें आहे, यास ऐवज नाहीं. याप्रमाणें ओढ आहे. सर्व पाटीलबावांस समजावावें ह्मणजे ध्यानांत येईल. विसाजीपंताची उपमा लिहिली, त्याप्रमाणें घडल्यास मग काय पाहिजे? सर्व पहातच आहां. ह्मणोन आज्ञा. ऐसियास हें पत्र पाटीलबावांनीं श्रवण करून उत्तर केलें कीं, "लिहिलें हें फार चांगलें. उभयतांची स्वारी सहा वर्षांची जाली. त्यांत आह्मी व होळकरही होतों. कारकीर्दी कोणकोणाच्या कसकशा जाल्या, तपसील नफानुकसानाचें कोणीं पुसलेंच नाहीं. यामुळें दोष गुण जेथील तेथें आच्छादून राहिले. कोणी पुसणारांनीं चौकशी करावी. चित्तांत होतें व आहे. बादशाहाचे अनुसंधानाचा समारोप जाला ह्मणिजे देशास येतच आहों. विसाजीपंतांनीं हिशेब कसे दिले आहेत ते सरकारांतच आहेत, व कारकीर्दीचे पुरुषांपैकीं रामचंद्र गणेश मात्र गेले. वहिवाटीचीं माणसें, यांपैकीं आह्मांकडील बाळाराव गोविंद गेले. वरकड मनुष्यें मौजूद आहेत. प्रसंग करून दोष गुण निवडून जाबसाल साक्षीनशीं जिंमेवार लाऊन रोबेपोबे केल्यानें सर्व निवाडे होतील. त्यांत ठरेल त्यास शाबास ह्मणावें. चुकल्याचें पारपत्य करून जाबसाल भरून घ्यावे, तर प्रसंग केल्याचें सार्थक. आह्मी या कर्माचे चौकशीस राजी आहों. निर्भिडपणें खरा प्रसंग केल्यास, कोण शुरुखरू, कोण खालीं पाहतो, हेंही ध्यानास येईल. श्रीमंत राजश्री नाना व सखारामपंत बापू एकत्र असतां याविशीं उपक्रम केला होता. त्यांनीं होऊन रहाविला. आतां त्यांनींच उल्लेख केला आहे; तर फार उत्तम आहे. ही चौकशी अवश्यमेव केलीच पाहिजे. आह्मांस इष्ट आहे. एक पक्षीं वर्तमान ऐकिलें असेल, किंवा आणखी कल्पना मनांत आल्या असतील. कोणता प्रकार ध्यानास आला, उल्लेख जाला असेल, बराच आहे. लिहिलें तसें प्रसंग करून शेवटास न्यावें. चूक जिकडे लागेल त्याजपासून भरून घ्यावें. सरकारकिफायत तरी होईल." असें उत्तर जालें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

# लेखांक २.

## श्री.

"विज्ञापना ऐसी जेः—राजश्री पाटीलबावांनीं खासगत खर्चाकरितां सेवकास सांगितल्यावरून मीं पत्रीं विनंति केली होती. त्याचें उत्तर छ १७ सावानीं सादर जालें जेः—पहेरे द्यावयाचा मजकूर तुह्मांस चांगला लिहितां येतो व हरएक कच्चापक्का मजकूर तुह्मांस लिहिला जातो. तुह्मी सारींच पत्रें पाटीलबावांस दाखवितां. याचें उत्तर सेवकानें विनविलें होतें. जें पत्र दाखवायाचेंच दाखवितों. याचेंही उत्तर सादर जालें जे, उत्तम आहे. दाखवावयाचेंच दाखवीत जाणें. अशी आज्ञा सादर होऊन दोन पुरवण्या सेवकास छ मजकुरच्याच सादर जाल्या. त्यांत एक, राजश्री विसाजी कृष्ण बिनीवाले यांनीं स्वारींत जमा जी मेळविली, ती सरकारहिशेबीं दाखल आहे. तो दृष्टांत पाटीलबावांचे कारकीर्दीस लाविला, तर त्यास यास मिळत नाहीं. विसाजीपंतांप्रमाणें वर्तणूक जाल्यास मग काय पाहिजे? दुसरे पुरवणींत, बादशाही मनसबा येऊन शेवटीं मजकूर आला आहे जे, पाटीलबावांकडे परगणे भडोच व ग्वालेर गोहद मिळून मुलुख किती सुटला, व सरकारचे संस्थानांपैकीं रुपया काय मिळाला, तो लिहिणें. या दोन्ही पुरवण्या सादर जाल्या. दाखविल्यास बावांस विषाद येईल ह्मणून न दाखवाव्या, तर खर्चाचे मजकुराचें उत्तर आलें नाहीं. वारंवार बावा पुसों लागतील. माझा तगादा दूर होणार नाहीं. उत्तर मागाहून येईल ह्मणतां, आलेंच आहे. आज टाकून मग दाखऊं ह्मटलें तर हेच कागद दाखवावे. मागील तेरीख पाहून कागद येतात ते दडऊन आह्मांशीं छद्म करितां, बावा ह्मणतील. स्वामींचे पत्राचें उत्तर काय लिहावें? मजकूर वाजवीच पत्रांत लिहिला आला. मुलूख सुटला त्याचा ऐवज, सरकारचे हिशेबीं जमाखर्च राजश्री आपाजीराम दाभोळकर यांजकडे कां करूं नये? मसलतखर्च पडला तो त्यांचेच कीर्दीस उगवत जावा ह्मणिजे सरकारांत दाखला राहील. तें करीत नाहींत आणि खर्चाचें मनस्वी बोलतात. असें मजलाही कळत असतां, स्पष्ट उघडें न पडे असें संज्ञेचें भाषणही करीत होतों. या दोन्ही पुरवण्यांचें सादर होणें गोष्ट मनचीच जाली. अनायासें खर्चाचें उत्तर आलें. याउपर ह्मणणार नाहींत. असें समजून दोन्ही पुरवण्या आधीं भाईस दाखविल्या. त्यांनीं ऐकून बोलले जे "यावरून बावांस विक्षेप होईल. आतांच हे मजकूर लेहावयाचे नवते. विसाजीपंताचा दृष्टांत लिहिला तो सजत नाहीं. कायली विसाजीपंताकडे येईल. सरकारांतून रुजुवात करूं लागल्यास पाटीलबावांचीच सरशी राहील. विसाजीपंतास उत्तर येणार नाहीं. हीं बोलणीं साक्षीनशीं आंगीं लाऊन देऊन विसाजीपंतास खालीं पाहवितील. मुलूख सोडविला त्याचा वसूल व राजेरजवाडे यांपासून खंडण्या घेतल्या हें कलम लिहिलें आहे; तर त्याची उतावळी करावयाची नवती. हे दरबारीं येते, झडती सरकारांत देते, मग पृच्छा करावयाची होती. आतांच लिहिलें, जलदी जाली. विक्षेप वाढेल." मीं उत्तर केलें कीं, कलमें लिहिलीं वाजवी आहेत. विक्षेप

वाढेल ह्मणतां, तर खर्चाचे उत्तराविशीं पुसाल तें आलें. भाई बोलले जे, "सरकारांत ओढ कोणे प्रकारची आणि मसलता कशा पडतात, असेंही लिहायास जागा होती. तें न जालें. पत्रें आलीं. तुह्मांस दडवितां येत नाहींत. खर्चास मिळत नाहीं, या अर्थी त्यांनीं जाब पाठविले आहेत. तगादा दूर केला. तुह्मी न दाखवाल तर उत्तराचा तगादा तुह्मांमागें राहील. दोहींकडून शब्द तुह्मांकडे. यांतही पुढें विक्षेपच. तर आह्मी आधीं बावांशीं बोलतों. आधीं बिंबऊन विक्षेप मनांतील दूर करितों कीं, पत्रावर तंडूं नये. विक्षेप करूं नये. असें करून तुह्मांस बोलाऊं पाठवूं तेव्हां येणें." या अन्वयें भाई व राजश्री माधवराव गंगाधर उभयतां मिळून बावांशीं बोलून करार करून घेऊन मजला बोलाऊं पाठविलें. मग मीं जाऊन पत्रें दाखविलीं. विक्षेप कांहीं दाखविला नाहीं. उत्तर केलें कीं, "आह्मी इच्छाच करितों, सहा वर्षांचे स्वारीचा तपसीलवार झाडा पुसणार भेटावा. त्यांत आह्मी कायल होतों, कीं विसाजीपंत अगर होळकर कायल होतात. सरकारनुकसानी आमचे कारकीर्दींत किंवा ओढण्यानें जाली, किंवा मसलत समूळ उत्कर्षाची व नख्त पैका व मुलूख व रुपया बादशाहाची बक्षीगिरी इतकी व आणखी निघेल ते तकशीर विसाजीपंत, होळकर व दादो मल्हार यांजकडे शाबूत होते. असा पुसता उभा राहील, ते दिवशीं आह्मी शिरणी वांटूं. आज विश्वास येणार नाहीं, तर चिंता काय आहे? दरबारीं येऊं, तेव्हां प्रसंग उपस्थित करून, सारे एकत्र करून, जाबसाल आह्मांस त्यांस पुसावे. आह्मी देशीं असतां सखारामपंतबापू व श्रीमंत राजश्री नाना एकत्र बसले होते. आह्मीं उपक्रम बोलण्याचा केला. उभयतांनीं वर्जिलें कीं, गेल्या गोष्टी आतां कशास काढाव्या? कारण नाहीं. त्यावरून समजलों कीं, यांसच शोध कर्तव्य नाहीं. उगेंच राहिलों. आतां त्यांनींच विसाजीपंतांचा दृष्टांत लिहिला आहे कीं, विसाजीपंतांनीं जें मेळविलें तें सरकार-हिशेबीं जमा केलें. आमचे कारकीर्दीपेक्षां विसाजीपंतांची कारकीर्द निष्ठेची सरस पडली. तेव्हां आह्मी कमी जालों! उत्तम आहे. देशीं आल्यावर अवश्यमेव हा प्रसंग करावा. वाजवी दाखल्या मुकाबल्यानें चौकशी करावी. अन्याय जिकडे असेल तो कुंठित लज्जित होऊन खालीं पाहील. त्याजकडे दोष लागेल. तो जाबसाल भरून घ्यावा तर लिहिण्याचें सार्थक. आह्मीं खर्चास मागितल्यावरून हे दृष्टांत लिहिल्यास मिळणार नाहीं. खर्चास देणें नाहीं. उडवावें कसें त्यास हें निमित्त लाविलें, तर लागत नाहीं. विसाजीपंतांस आह्मी हरणार नाहीं. खातरजमा असावी." असे तपसील आणखीही बोलले. वर्तमान श्रुत व्हावें ह्मणून विनंति केली असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## ४०. दिल्लीच्या कारागिरीची शोचनीय स्थिति.

इ. स. १७८५-८६ मध्यें दिल्ली येथील कलाकौशल्याची किती शोचनीय स्थिति झाली होती, हें त्या वेळच्या अस्सल पत्रांवरून चांगलें निदर्शनास येतें. ह्या संबंधाचीं पत्रें 'इतिहाससंग्रहांत' मागें एक दोन वेळां दिलींच आहेत. ह्याच मासल्याचें आणखी एक पत्र उपलब्ध झालें आहे. ह्यामध्यें 'आग्र्याची स्थिति दिल्लीपेक्षांही शोचनीय झाली होती व दिल्लीची अवस्था किंचित् आगऱ्यापेक्षां बरी' असा एक उल्लेख आहे, तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

पो छ. १३ सफर **श्री.** इ. स. १७८५।८६.

"विज्ञापना ऐसी जेः-फर्माशी जिन्नस, शालजोड्या, पट्ट, घोडा वगैरे करितां सदाशिव दिनकर यांस आज्ञापत्र सादर जाहलें. त्यास ग्वालेरचे मुक्कामापासून मशारनिल्हे या जिन्नस-अजनासीच्या तलाशांत शोधांत आहे. परंतु पसंतीजोगा जिन्नस मिळत नाहीं. मीं आल्यावरही शोध फार केला. राजश्री पाटीलबावा आगरेयाचा किल्ला पाहावयास गेले होते. त्यांसमागमें मीही गेलों होतों. आगरेयांतील लोक, उदमी, बेपारी, साहुकारांचे विद्यमानें शोध करून पाहिला; कांहीं मिळालें नाहीं. शहरची अवस्था काय विनवावी? उजाडी फार! किंचित् वस्ती आहे ती दरिद्री! उत्पन्नभक्षी कारीगर आहेत, त्यांत जिन्नस करण्यास शक्ति नाहीं! कोणी घेणारही राहिला नाहीं! दिल्लीची अवस्था किंचित् आगऱ्यापेक्षां बरी, इतकाच प्रकार आहे. मी शोधांत फार आहें. जिन्नस कोठें आढळत नाहीं. पैदा करावयास सांगितलें, मिळत नाहीं. माहितगार सांगतात, आतां नवा जिन्नस होणें तो पाक्षिकच! घेणारही राहिला नाहीं! मागें दौलतवंद फार होते; त्यांनीं चालते काळांत जिनसा घेऊन ठेविल्या होत्या. दरिद्रास आले, तेव्हां विकविकून खादल्या. आतां तशाच फार मातबरांच्या घरीं कांहीं असल्यास, शोध करतां हातीं लागेल तर लागो. त्याचा शोध आहे. राजश्री आंबुजी इंगळे यांजकडे इकडील राजकारणें आहेत. त्यांस शोध करण्याविशीं सांगितलें आहे. त्यांनींही मान्य केलें आहे. आणखीही दलाल व बेपारी वगैरे यांस आशा दाखऊन, शोधास लाविले आहेत. मिळेल तें घेऊन पाठवीन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## ४१. मराठ्यांचे नवीन बाजार व पेठा वसविण्याचे बाबतींतील प्रयत्न.

महादजी शिंदे यांचे सरदार रायाजी पाटील यांनीं मौजे वारीत या गांवीं नवीन बाजारपेठ वसविली, व डबी नामक गांवीं दुसरी बाजारपेठ वसविण्याचा विचार केला, ह्याबद्दलचा उल्लेख एका पत्रांत आढळून येतो. त्यावरून दक्षिणेंतील

गांवीं बाजारपेठा वसवून लोकसुधारणा करण्याचा शिंद्यांचा प्रयत्न दिसून येतो. वारीत व डबी हीं गांवें धोडप किल्ल्याच्या आजूबाजूस असावींत. कारण, तेथील किल्लेदारानें ह्या नवीन बाजारास उपसर्ग केला, ह्मणून पेशव्यांकडे तक्रार करण्याचाही प्रसंग आल्याचा त्याच पत्रांत उल्लेख आहे! हें पत्र येणेंप्रमाणेः-—

श्री.

" विज्ञापना ऐसी जेः—राजश्री रायाजी पाटील यांनीं वर्तमान सांगितलें जे, मौजे वारीत बाजारपेठ घालून भरविला. पेठेस व बाजारास पैका लावून आबादी केली. पांच वर्षांचा कौलच होता. नवे लोक वस्तीस बाजारास आले; येतात. त्यांस हासलपट्टी पांच वर्षें नाहींच. आतांशी बाजार बरा भरूं लागला आहे. त्याचे संरक्षणास शिबंदी खर्चही होतो. इतर खर्चही जरूरी लागतो. त्यासच जागा होत नाहीं. गुरें बाजारांत विकावयास येतात. त्यास आतां कांहीं घेतों. तें खर्चास पुरत नाहीं. याउपर विचार डबीचा करावयाचा. सरकारांतून आज्ञा घेऊन करणें तें करावें. त्यास सांप्रत वर्तमान आलें आहे जे, धोडपकर किल्लेदार याजकडून बाजारास उपसर्ग लागतो, यामुळें लोक दुःखी होणार. यास्तव विनंति आहे जे, धोडपकर किल्लेदार यास आज्ञा सादर होऊन, बाजारचे लोकांस उपसर्ग न लागे, तें जालें पाहिजे. कौलानें बाजार जमला, तसा दिवसेंदिवस आबादी होऊन उमेदीसच येईल. आह्मींही वतनदारच आहों. आशा राखितों. इतकी मेहनत करणें, पैक्याचे खर्चांत येण्यास कारण सरकारचें आमचे हिताचेंच आहे. सरकारची आज्ञा घेऊन, बंदोबस्त करून डबीचें काम सुरू करूं. तूर्त चालतें तसें चालावें, अशी मशारनिल्हेची विनंति आहे. त्यावरून विनंति केली असे. सेवकास स्वामींचे दर्शनास यावेंच लागतें. आज्ञा जाली ह्मणजे सेवेसीं येईन. तोंपावेतों धोडपकर याचा उपसर्ग बाजारास न लागण्याविशीं आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. वाघोलकर जाधव यांचे वांटणीचा प्रसंग दरबारीं उपस्थित आहे. त्याजविशीं पाटिलांची विनंति आहे जे, राजश्री संभाजी जाधव यांजवर पहिलेपासूनच स्वामींचा लोभ ममता आहे. सेवकाचा त्यांचा शरीरसंबंध जाला तर्धींपासून मजप्रमाणें त्यांसही पदरींच घेतलें आहे. त्यांचें कल्याण तेंच स्वामी करितील. वडील वांट्याचा प्रकार ध्यानांतच आहे. यावेगळें कांहीं विनंति करणें पडलें, तर सयाजी जाधवाच्यानें होणें कळतच आहे. बोलणार त्यांचे नारो शिवदेव होते, ते आतां नाहींत. यास्तव चार दिवस चालतें तसें चालावें. तुह्मीं ह्मणजे मीं सेवेसीं आल्यानंतर वांटणीचा प्रसंग व्हावा. रायाजी जाधव यांचा पुत्र रायाजी पाटिलाचा जांवई होय. त्यास हणमंतराव जाधवानें जखमी करून आणि वांटणीही देत नाहीं, यामुळें तो मूल पुण्यांतच आहे. वांटणी करून देतों, असी समक्ष आज्ञा जाली असतां वांटणी होत नाहीं. तर कृपा करून त्यांची वांटणी होऊन कजिया तुटे, याजविशीं आज्ञा करणार स्वामी आहेत, अशी पाटिलांची विनंति आहे. सेवेसीं श्रुत होय, हे विज्ञापना."

## ४२. पाटीलबावांची दिल्लीच्या बादशाहाबद्दल आदरबुद्धि.

दिल्लीच्या बादशाहाबद्दल मराठ्यांची फार आदरबुद्धि असे, हें इतिहासांत प्रसिद्धच आहे. बादशाही तक्ताचा कोणीं अपमान केला, तर मराठ्यांस तो आवडत नसे. शाहू महाराज, थोरले बाजीराव, बाळाजी बाजीराव इत्यादि थोर पुरुष दिल्लीच्या गादीला फार मान देत असत. पानिपतच्या लढाईच्या अगोदर, भाऊसाहेब पेशव्यांनीं, दूरवर विचार न करितां, बादशाहाच्या तक्तावरील रुप्याचें छत फोडून टाकिलें; तें मल्हारराव होळकर आदि वयोवृद्ध सरदारांस सहन झालें नाहीं, हें इतिहासवाचकांस श्रुतच आहे. तात्पर्य, दिल्लीपदपातशाहाची गादी कितीही हीन स्थितीप्रत पोंचली, तरी तिच्याविषयींची मराठ्यांची पूज्यबुद्धि लवमात्रही ढळली नाहीं. ही पूज्यबुद्धि महादजी शिंदे यांच्या कारकीर्दींतही तशीच कायम होती, असें अस्सल पुराव्यानें दिसून येतें. महादजी शिंद्यांनीं दिल्लीचा बादशाहा शहाअलम यास पूर्णपणें अंकित करून सोडिलें होतें. तथापि त्याचा कोणीं अपमान केलेला त्यांस सहन होत नसे. एके वेळीं (इ. स. १७८६ चे सुमारास) शिंद्यांचे वकील आनंदराव नरसिंह यांनीं दिल्लीच्या बादशाहाचीं शिमग्यामध्यें सोंगें आणून बादशाहाचा अपमान केला. ही गोष्ट महादजी शिंदे यांच्या कानावर गेली. ती त्यांस असह्य होऊन त्यांनीं त्या वकिलास तोफेच्या तोंडीं देण्याचा हुकूम केला. परंतु बादशाहाच्या कृपेनें त्या वकिलाची सुटका झाली. ही हकीकत दिल्ली येथून पेशव्यांस आलेल्या एका पत्रांत नमूद आहे. त्यावरून पाटीलबावांची दिल्लीपतीविषयींची निस्सीम आदरबुद्धि आणि न्यायप्रियता हे गुण चांगले व्यक्त होतात. हें पत्र येणेंप्रमाणेः—

श्री. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसी जेः—राजश्री आनंदराव नरसी, राजश्री पाटीलबावांकडून पातशाहापाशीं वकिलीस होता. त्यानें धुलेडीचे रोजीं आहेयाचें सोंग करून, पातशाहापाशीं नेलें. त्यावरून पातशाहांनीं राजश्री पाटीलबावांस सांगून पाठविलें कीं, याप्रमाणें आनंदराव, सरकारची अमर्यादा करितो. त्याजवरून राजश्री पाटीलबावांनीं आनंदरावास बोलावून आणून आज्ञा केली कीं, यास तोफेचे तोंडीं देऊन उडवून देणें. ह्मणून दोन परवानग्या जाल्या. इतकियाच अवसरांत दुसरा निरोप पातशाहाचा आला कीं, ब्राह्मण आहे, त्यास मारून न टाकणें. लष्करांतून काढून देऊन देशीं वाटेस लावणें. त्याजवरून

त्याची वस्तभाव व राहुटीसुद्धां तोफखान्यांत पहाऱ्यांत आहे. पुढें काय ठरेल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."*

---

* ही हकीकत अगदीं सत्य आहे. ह्या संबंधाचा प्रत्यंतरपुरावा 'इब्रतनामा' नामक एका फारशी तवारिखेमध्यें सांपडतो. त्यांत ह्या गोष्टीचें सविस्तर वर्णन दिलें असून, त्याचा व वरील अस्सल पत्राचा सुरेख मेळ जमतो. इब्रतनाम्यांत दिलेली हकीकत इलियटच्या ग्रंथावरून येथें उतरून घेतों:—

"It is a custom among the Hindus that at the *holi* festival they throw dust upon each other, and indulge in practical jokes. On the 14th of Juma-dil-awwal, in the twenty-eighth year of the reign of His Majesty Shah Alam, when this festival occurred, Anand Rao Narsi dressed up a person in fine garments to represent the Emperor, and applied long false mustaches and a beard to his lips and chin. The person was placed on an old bedstead, with a lad in his arms, in the dress of a woman, to represent the Emperor's daughter, whom he very tenderly loved, and always kept in his presence when he went out in a litter or on an elephant. The bedstead was carried on the shoulders of four men, and before it went several persons of low caste in the habit of the Emperor's attendants, with clubs, umbrellas, and other *insignia* of royalty in their hands. In this manner they proceeded in regular procession, beating drums, and surrounded by a multitude of spectators. They passed by Jahan-numa palace, where the Emperor was sitting. This great insolence, however, excited no indignation in His Majesty's noble mind; but on the contrary, he ordered a reward of five hundred rupees to be given to those persons. Shah Nizam-uddin who was an enemy of Anand Rao, availed himself of this opportunity, and having succeeded in kindling the Emperor's anger, represented the matter on His Majesty's part to Maharaja Sindhia, in whose camp Anand Rao resided.... The Maharaja was highly incensed on being informed of this disrespectful and impudent proceeding, and immediately ordered that the tents of Anand Rao should be plundered, and that he should be sent to Raj Muhammad, darogha of artillery. No sooner was the order passed than his tents and all his property were given up to plunder, and he himself was seized and placed in front of a gun. The Emperor, on being informed of the orders which the Maharaja had given, sent one of his eunuchs to tell the Maharaja that His Majesty was pleased to pardon the offender; but that he hoped, as a warning to others, the Maharaja would turn him out of his camp. Orders were accordingly given by the Maharaja, he was called back from the gun, and his life was spared; but he was disgraced and banished from the presence. Anand Rao remained concealed in the camp for a few days, and after having collected his property which was left from the spoil, he went away to Ujjain."

—*Elliot's History of India*, Vol. VIII. p. p. 243–244.



## ४३. इंग्रजांशीं दोस्ती करण्याबद्दल कर्नाटकच्या नवाबाची पेशव्यांस शिफारस.

कर्नाटकचा नवाब व इंग्रज हे परस्परांचे पुरातन दोस्त होते, हें सुप्रसिद्धच आहे. ज्या वेळीं मराठ्यांचें व इंग्रजांचें युद्ध सुरू झालें, त्या वेळीं कर्नाटकच्या नवाबानें इंग्रजांशीं सख्य करण्याबद्दल मराठ्यांस शिफारस केली होती. कर्नाटकच्या नवाबानें ह्या बाबतींत लिहिलेलें पत्र आम्हांस उपलब्ध झालें आहे. अर्थात् तें अस्सल फारसी पत्राचें अस्सल भाषांतर आहे. तें संग्राह्य वाटल्यावरून येथें दिलें आहे.

श्री.

" पूर्वीपासोन आमची ख्वाहीष तुमचे थोर खानदान यांजवर व इंग्रजांचे दोस्तीवर नजर देऊन आहे कीं, राव पंतप्रधान यांशीं व आमचे दोस्त इंग्रज यांशीं उभयपक्षीं बुनयाद दोस्तीची मजबुती असावी. या कामाकरितां प्रयत्न, आपले शक्तिनुसार येथें व विलायतेंत अमलांत आला. तीन वर्षें जालीं कीं, मेस्तर मॅगफरसन सरदार, उमदा, बहुत शाहणा, मुदतपर्यंत आमचे दरबारांत होता. पत्रासहित विलायतीस रवाना केला. ते समयीं तुह्मांस इतल्ला दिली होती. अलीकडे कितेक सबबेनें तुह्मांत व इंग्रजांत परस्परें लढाई बहुत होत आली. परंतु हे गोष्ट आमचे इच्छेस व बुद्धीस विपरीत वाटत आहे. गौरनर जनरल बंगालेकर बहुत अकलमंद आहेत. तुह्मांसीं दुषमनी करावयाची ख्वाहीष राखीत नाहींत. सांप्रत आह्मीं महमद असमखान बहादर......यांजला गौरनर जनराल बंगालेकर यांजकडे रवाना केलें होतें कीं, या मुकदम्यावरून रुबरू जाबसाल करीत. ईश्वराचे कृपेनें प्रस्तुत खानबहादर तेथून फिरोन आह्मांपाशीं येऊन पोहोंचले, व मेस्तर मॅगफर्सनही बंगालचे उमदे दरजाचे कौसलगिरीस मुकरर होऊन, रघुनाथराव यांजकडील दोघे वकील भारी नफ्याचे उमेदीचीं पत्रें घेऊन गेले असतां, व नाईकांनीं कर्नाटकांत हंगामा केला याची खबर, विलायतींत मेस्तर मजकूर यांची रवानगी जाली तो दिवसपर्यंत पोहचली नसतां, इंग्रेजांचे विलायतीहून कंपनीच्या मजबूत हुकुमासहित तुह्मांशीं दोस्ती करावयाविषयीं येथें येऊन पोहोंचले. जे गोष्ट बहुत वर्षें आमचे चित्तांत इच्छा होती, ती सांप्रत गोष्ट या प्रकारची मजबूत जाली कीं, कोणाच्यानेंही त्यांत खलेल होणार नाहीं. जी दौलत बहुत वर्षें आह्मी इच्छित होतों, ते दौलत घरची वाट पुसत दरवाजावर आली. राव पंतप्रधान यांची व त्यांचे मुत्सद्दी वालाषान यांची इच्छा अशीच असावी कीं, हें काम ज्यामध्यें तिचे मजबुतीचें सबब व थोर फायदा राव पंतप्रधान यांचे आहेत, यास्तव ही गोष्ट करावयास उशीर न करावा. इंग्रजांचे दोस्तीमधें फायदे बहुत थोर तुमचे, व पारपत्य दुषमनाचें आहे. मग या गोष्टीस उशीर कां करावा? चार सरदार, नामदार, एक लार्द मकारटेन बहादर, कीं इंग्रेजांचे बादशाहाचा उमदा नौकर, सांप्रत

विलायतीहून चेनापटणचे गौरनरी करावयास्तव आले आहेत. बादशाहांनीं लार्द मजकूर यांची बहुत तारीफ आह्मांस लिहिली आहे. दुसरे, जनराल सर अयरकूट बहादर, बादशाहाचे नोकर, व बादशाही व कंपनीची तमाम फौज जे हिंदुस्थानांत आहे तिचे सरदार, व सर आबर्ट ह्यूज (?) आडमरल बादशाही जाहाज हिंदुस्थानांत आहेत त्याचे सरदार, व दुसरे मेस्तर मॅगफरसन बंगाल्याचे उमदे दरजाचे कौंसलदार बादशाहाचे व कंपनीचे मजबूत हुकुमाप्रमाणें राव पंतप्रधान यांची दोस्ती करावयास्तव येथें आले आहेत. बंगाल्याचे गौरनर जनराल यांची इच्छा अमलांत आणावयाविषयीं आहे. हे चार सरदार एकत्र होऊन सलूख अमलांत आणावयाविषयीं हें पत्र पाठविलें आहे. षखस मातबर गौरनर जनराल बंगालेकर यांजकडून या कामास्तव तुह्मांजवळ पाठवावा, तोंपर्यंत उभयपक्षींची लढाई बिलकूल बंद व्हावी, यास्तव हुकूम मजबूत, जनरल गार्डर यांचे नांवें व गौरनर कौसल मुंबईकर यांचे नांवें येविषयीं लिहून, पत्रें तुमचे लाखोटीयांत घालोन आमचे हवालीं केलीं. ऐसीं तीन पत्रांसुद्धां लाखोटा करून पाठविला आहे. पत्रें पावतांच गौरनर कौसल मुंबईकर व जनरल गार्डर यांजकडे लौकर रवाना करावी व उभयपक्षींची लढाई बिलकूल मोकूफ करावी, हा करार सांप्रत अमलांत येत आहे. त्यास कोणाची ताकत नाहीं, कीं या करारास विपरीत अमलांत आणील ? दोस्ती राव पंतप्रधान यांची व इंग्रजांची हमेशा मजबूत होईल. आह्मी आजपर्यंत बंगाल्याहून सयद महमद असमखां बहादर मुबारज यांचे येण्याचे, व मेस्तर मगफरसन यांचे विलायतीहून येण्याचे इंतजार होतों. सांप्रत ईश्वरकृपेनें काम मजबूत जालें. पत्राचे जाब कलमीं केला आहे. ज्यादा काय लिहिणें ?”



## ४४. वाडीकर सांवतांचा ‘राजेबहादुर’ किताब.

खेम सांवतवाडीकर हे शिंद्यांचे नातेवाईक. सखूबाई शिंदे ह्यांचे जांवई. त्यांचे करितां महादजी शिंदे यांनीं दिल्लीच्या बादशाहाकडून ‘राजेबहादुर’ हा किताब व मोर्चेलाचा अधिकार मागून घेतला. वस्तुतः सांवतवाडीकर हे पेशव्यांचे मांडलिक असल्यामुळें त्यांना कोणताही बादशाही किताब पेशव्यांच्या परवानगीवांचून स्वीकारितां येत नसे. परंतु महादजी शिंदे यांनीं मिळविलेला किताब सखूबाई शिंदे ह्यांचे मार्फत परस्पर सांवतवाडीकरांकडे गेला, आणि त्यांनीं आनंदाच्या तोफा सोडून त्याचा स्वीकारही केला. ही बातमी नाना फडणविसांस कळली. त्यांना ही गोष्ट नापसंत पडून सांवतवाडीकरांचा फार राग आला व त्यांनीं महादजी शिंदे ह्यांजकडे त्याबद्दल तक्रार केली. महादजी शिंदे यांनीं मोठ्या युक्तीनें उत्तर देऊन आपल्यावरची जबाबदारी टाळण्याचा प्रयत्न केला. परंतु नाना फडणविसांनीं सांवतवाडीकरांकडून नजरेदाखल कांहीं रक्कम घेतल्यावांचून सांवतवाडीकरांस

हा बादशाही मान उपभोगूं दिला नाहीं. या संबंधाचें एक खाजगीपत्र शिंद्यांकडील बातमीदारानें नानांस लिहिलें आहे, तें वाचनीय वाटल्यावरून येथें दिलें आहे.

पै। छ १२ जिल्काद. श्री.

"विज्ञापना ऐसीजेः- राजश्री खेम सांवतवाडीकर यांचा मजकूर पेशजीं छ १७ जमादिलावलचे रवानगींत पत्रीं विनविला होता. त्यास चार पांच महिने जाले, उत्तर सादर जालें नाहीं. सांवत सखुबाईचे जांवई. बाईचे मर्जीकरितां राजश्री पाटीलबावांनीं यांस बहादुरीचा किताब व मोर्चेल बादशाहापासून घेऊन पाठविलें, तें चालत नाहीं. बावा ह्मणतात, 'आह्मी बाईस लेहून पाठविलें कीं, श्रीमंतांस पत्र लेहून दिलें आहे तें प्रविष्ट करून, श्रीमंतांची परवानगी घेऊन, पुढें सांवतांकडे पाठवावें. परंतु स्त्रियांची बुद्धि, परभारें पाठविलें. तें सांवतांनीं घेऊन तोफा केल्या. हें त्यांनीं अयोग्य केलें. परंतु आह्मीं करून दिलें तें, श्रीमंत राजश्री नाना आमचे बंधु, त्यांनीं चालविलें पाहिजे.' अशी भीड घालितात. ते ऐकणें प्राप्त. सरकारचा सिगाही राखिला पाहिजे. याजकरितां सांवतांकडील गृहस्थ येथें आहे, त्यास वेगळ्या मार्गें मीं निषेध केला कीं, राजश्री राघोजी आंगरे यांसही मोर्चेल बादशाहापासोन घेऊन बावांनीं पाठविलें असतां, त्यांनीं श्रीमंतांस नजर देऊन, परवानगी घेऊन, मोर्चेल घेतलें. सरकारची आज्ञा जाल्यास मग प्रतिबंध कशाचा? तुह्मी सरकारसिगा बुडवून चालूं ह्मटल्या कसें चालतें? तेव्हां तो बोलला कीं, 'मातबर जाबसाल धन्यापासोन घडावा ते लांब! आमची कारकुनाची हिंमत किती? एक घोडा श्रीमंतांस नजर करावा. तो येथें विकत घेऊन पाठविल्यास पसंद नापसंद जाल्यास गोष्ट ठीक नाहीं. येथून साहुकारी हुंडी हजार रुपयांची पुण्याची घोड्याबाबतची करून देतों. बशर्त श्रीमंतांचें पत्र बहादुरीचें, नांवाचें सांवतांस जावें व मोर्चेलाची परवानगी व्हावी. जास्त ह्मटल्यास माझी हिंमत नाहीं. हजार रुपयांची हुंडी पुण्याची करून देतों.' आतांच घेणें ह्मणत होता! मीं उत्तर दिलें जे, 'तुमची बशर्त बहादुरीचा किताब चालता व्हावा, मोर्चेलाची परवानगी व्हावी, व हजार रुपये सरकारांत कबूल होतात न होतात हें विनंति लेहून उत्तर आल्यावर तुह्मांस सांगेन.' असें त्याशीं बोलणें होऊन पत्रीं विनंति केली. उत्तर सादर जालें नाहीं. मीं हजार कबूल केले आहेत असें नाहीं. जास्त घेणें असल्यास व बहादुरीचा किताब चालवणें व मोर्चेलाची परवानगी द्यावयाची मर्जी असली तर सेवकास उत्तर सादर होईल. त्यांत मर्जीस येईल तसा आंख लेहून पत्रीं आज्ञा यावी. तोडमोडींत निदानचा आंख किती ठरवावा. त्याचें आज्ञापत्र निराळें सादर व्हावें. परंतु या पत्राची मालुमात उत्तरांत जमेस येईल, त्यांत जास्त आंखाचा मजकूर मीं विनविला आहे, तो मालुमातेंत न यावा. कारण कीं, स्वामीचें उत्तर येईल तें त्या गृहस्थास दाखवावें लागेल. तेव्हां हिंमत असल्यास जास्त बोलेल. मालुमातेंत ज्यास्त आंखाचा मजकूर पाहिल्यास मजकडेच दोष आणील. यास्तव मालुमातेंत मजकूर न यावा. जास्त आंखाचे मजकुराचें उत्तर सादर होईल तें तो गृहस्थ पाहील. मीही त्याशीं बोलेन. मग जास्त काय कबूल करितो न करितो,

ठरावांत येईल त्याप्रमाणें विनंति करीन. बावा दर रवानगीस ह्मणत असतात, 'बंधूनें आमचें केलें चालवावें. पुढें सरकारआज्ञेखेरीज कोणाची रदबदल बादशाजवळ होणार नाहीं. दोन कामें जालीं त्यांत आंगरेस परवानगी जाली. सांवतांसही परवानगी होऊन बहादुरीचा किताब त्यांचे पत्रीं सरकारांतून चालता व्हावा व मोर्चेलाची परवानगी द्यावी.' असें दर खेपेस होतें. येविशीं आज्ञा काय ते सादर जाली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## ४५. महादजी शिंद्यांच्या लष्करांतील एक मनोरंजक बातमीपत्र.

पौ छ ११ जमादिलावल इंदुवार श्री. सायंकाल पुरवणीपत्र छ ३ मिनहू मंदवार.

"विज्ञापना. येथील दिनचर्येचें वर्तमानः– प्रातःकाळीं उठावें तेव्हांपासून चार घटका दिवसपावेतों हकीमजी, मिर्जा, जोशीबावा यांजवळ स्वप्नें सांगावीं जे, रात्रौ असा असा दृष्टांत जाला. त्याचा वर्ताळा जोशीबावांनीं सांगावा जे, महाराज फार चांगलें स्वप्न पाहिलें. शत्रूचें पारपत्य आपोआप घडावें. ते दोनचार घटका जाल्यानंतर दंतधावन करून, स्नानदेवतार्चन गंध. त्यावर भोजन करून कांहीं घटका दोन घटका बोलणें चालणें कारभार, त्यांत विनोद, हे होऊन मग निद्रा चार घटका करावी. मागील दीड प्रहर दिवस राहतो तेव्हांपासून दरबार. त्यांत कांहीं खलबत, कांहीं बातमीचें वर्तमान, कांहीं दरबार. याप्रमाणें सायंकाळपावेतों होऊन मागती भोजन. त्यावर सहा घटका रात्र गेली ह्मणजे माधवराव बाजी व नारोपंत दक्षणदास यांजकडून भगवच्चर्चा अध्यात्म, प्रहर सा घटका होत आहे. माधवराव बाजी एक दोन वेळ बोलले जे, 'काय या स्वप्नांत आहे? स्वप्नेंकरून शत्रू पराभवास पावले असें कोठेंही पाहिलें आहे? कांहीं पराक्रम करावा तेव्हां एखादी कार्यसिद्धि होते. जोशीबावा व हकीमजी आपण सारे दिवस एके जागां बसून स्वप्नें सांगितलीं, तसीं [शत्रूचें] पारपत्य विना लढाई घडेल हें किमपि व्हावयाचें नाहीं.' असे विनोदेंकरून एखाद्या दृष्टांतांत मेळवणी करून दाखल्याचीं बोलणीं बोलले. उत्तर कांहीं जालें नाहीं. 'खरें आहे' ह्मणोन उत्तर करून उगेंच राहिले. लढाईस आपण शत्रूवर जाऊन जरब बसवावी तें एकीकडे राहून, रात्रंदिवस त्याचे छाप्यास जपावें असी तऱ्हा येऊन लागली आहे. तो होऊन आल्यावर मग काय सरसी निरसी होणें तें होईल. परंतु आपण होऊन लढाईस गेले, असें आजपावेतों शिरोंजेहून निघाल्या दिवसापासून घडलें नाहीं. इंग्रजांस येथील अजमास समजला. बहुतकरून छावणी इंग्रजांची सिप्रीकोलारस, इतक्यांतच होईल. गोहदकर इतक्यांतच येऊन मिळाला तर पुढें चाल करितील कीं काय कळेना. इंग्रजांचें ध्यान, पाटीलबावा खांसा आहेत यांजवर छापा घालावा, या उद्योगांत फार आहे. येथील बातमीचा विचार आहे तो आपले ध्यानांतच आहे. एखाद दिवशीं मागती पळापळी न घडावी. ईश्वरइच्छा खरी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## साल अखेरीचे दोन शब्द.

श्रीजगचालक दयानिधी परमेश्वराच्या कृपेंकरून इतिहाससंग्रहाचें तिसरें वर्ष पुरें झालें, ह्याबद्दल त्याचे अत्यंत उपकार आहेत. ह्या वर्षांत, इतिहाससंग्रहामध्यें जी ऐतिहासिक माहिती व कागदपत्र प्रसिद्ध करण्यांत आले आहेत, त्यांपैकीं महेश्वरदरबारच्या बातमीपत्रांचा दुसरा भाग पुरा झाला आहे; आणि "दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें" ह्या नवीन प्रकरणास सुरुवात केली आहे. ह्या प्रकरणाचे दोन किंवा तीन भाग होतील. ह्या प्रकरणांतील पत्रें किती मनोरंजक व महत्त्वाचीं आहेत, हें वाचकांस समजून येईलच. ह्या प्रकरणाशिवाय दुसरे ऐतिहासिक विषय, चरित्रें, स्थलवर्णनें वगैरे नेहमींप्रमाणें प्रसिद्ध होतीलच. गेल्या तीन वर्षांमध्यें ज्याप्रमाणें रसिक वाचकांनीं इतिहाससंग्रहाची सेवा गोड मानून त्यास उदार आश्रय दिला, त्याप्रमाणें ते पुढेंही देतील अशी पूर्ण आशा आहे.

---

Published by Tukarm Javaji, Proprietor N. S. Press,
23, Kolbhat Lane, Bombay.

Printed by B. R. Ghanekar at the Nirnaya-Sagar Press,
23, Kolbhat Lane, Bombay.

